# वेढशीलिमा अनंत



लेखिका • मृणालिनी देसाई





महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

# वेद बोलिला अनंत



( मूळ संहिता : विष्णुदेव पंडित )

मृणालिनी देसाई

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

# अभिवादन

चार वेद हे भारतीय संस्कृतीचे मूलाधार आहेत ही गोष्ट लहानपणापासून शिकवली गेली तरी वेद म्हणजे काही तरी फार अवघड, आपल्याला कधीही त्यातले काही कळणार नाही असे काही तरी वाटत होते. त्यातच 'स्त्री शूद्र आणि चांडाळांना वेदाचा अधिकार नाही' हे ही अधून मधून कानावर पडत होतेच. त्यामुळे कळत न कळत एक प्रकारची अरुचीही मनात होती ! त्यामुळे काही वर्षांपूर्वी कै. श्री. मुरली ठाकूर हे गुजराती प्रकाशन व्यवसायातले लेखक माझ्याकडे श्री. विष्णुदेव पंडितांच्या वेद परिचय मालेची काही लिखिते घेऊन आले व मी हे काम मराठीत करावे असे त्यांनी सुचवले तेव्हा मी त्यांना साफ नकार देऊन टाकला होता !

पण नंतर ती लिखिते वाचता वाचता ऋग्वेदाविषयी एक अपूर्व अशी आत्मीयता वाटू लागली आणि श्रद्धेय विष्णुदेवजींच्या साह्याने मी हे काम हाती घेतले. हे काम करीत असताना वेळ फार आनंदात गेला. आयुष्यात येणाऱ्या विविध अनुभवांची त्यातून संगति लागत गेली. त्यामुळे विचारानाही एक वेगळीच चांगली दिशा लाभली. गुजरात राज्य ग्रंथ निर्माण बोर्डाचे अध्यक्ष डॉ. जे. बी. सेंडिल यानी हे मराठी पुस्तक तयार करून छापण्यास संमति दिली. श्रद्धेय विष्णुदेवजींचे आशीर्वाद होतेच. त्याशिवाय ज्याना ज्याना मी या संहितेतून मला काय जे मिळाले ते सांगितले, त्या सर्वच लोकांनी हे पुस्तक रूपाने

लवकर बाहेर आणावे असा आग्रह केला. लहान थोर, स्त्री पुरुष, विद्वान कलावंत आणि कारागीर सर्वांनाच आवडेल, हिताचे काही सापडेल, आणि जिवाभावाचा वडीलधारा आधार लाभेल असे काही ना काही या ऋग्वेदात आहे.

हा ग्रंथ मराठीत प्रकाशित करण्यासाठी डॉ. बारलिंगे यांनी आपलेपणाने तो स्वत: पाहून तपासून महाराष्ट्र राज्य संस्कृति मंडळाच्या वतीने प्रकाशित केला. त्यांची ती गुणग्राहक आत्मीयता ही मी वेदो-नारायणाचीच कृपा समजते.

मुद्रणालयातील कर्मचारी आणि व्यवस्थापक वर्ग यानीही श्रम-पूर्वक सहकार्य देऊन हे कार्य सिद्धीस नेले आहे. या यशात त्यांचाही वाटा महत्वाचा आहे.

सर्वांनाच–मृणालिनीचे कृतज्ञ अभिवादन.

**–मृणालिनी देसाई**

# अनन्तापूर्वीचे किञ्चित् सान्त

ज्या समाजाला इतिहास असतो त्या समाजाला संस्कृतीच्या नावाखाली काही तरी खोटी शेपटे पण लागत असतात. समाजाचे पुनरुत्थान करताना या शेपट्यांकडे दुर्लक्ष करता येत नाही. एका रीतीने आपला समाज परंपरेत बुडाला असला तरी आपल्या समाजाजवळ विचारधन पण फार मोठे आहे. जगातील सर्वात प्राचीन ग्रंथ म्हणजे वेद या वैचारिक परंपरेचा आपल्याला वारसा मिळालेला आहे. वेद-प्रामाण्य म्हणजे शब्द-प्रामाण्य. केवळ वेद-प्रामाण्य मानून किंवा वेदांची पूजा करून चालणार नाही. पण वेदांची टिंगल करूनही आपणाला सामाजिक सुधारणा किंवा क्रांती घडवून आणता येणार नाही. कारण वेदांची भाषा जरी आपण विसरलो असलो तरी वेदातील विचार झिरपत झिरपत आपल्या मनात उतरले आहेत, आपल्या मनात घर करून बसले आहेत. वेद हा मूळात प्राचीन भारतातील एका विशिष्ट समाजाचा ग्रंथ असला तरी आता तो आपल्या सामाजिक परंपरेचा भाग झाला आहे. वेदाची परंपरा ही एका रीतीने मानवी संस्कृतीची पण परंपरा आहे. वेदांचा इतिहास हा मानवी परंपरेचा इतिहास.

प्राचीन आर्यांनी अग्नीचा शोध लावला आणि त्यातून यज्ञ संस्था निघाली. या संस्थेच्या अनुषंगाने अनेक प्रकारचे चिंतन सुरू झाले. 'अमुक करावे तर ते का करावे' अशाप्रकारचे प्रश्न लोकांच्या मनात उत्पन्न झाले. असे प्रश्न ज्यांच्या मनात उत्पन्न झाले आणि ज्यांना त्याचे उत्तर देण्याचा अधिकार आला ते मंत्रद्रष्टे ऋषी झाले. मधुच्छंदाची गोष्ट ही अशीच, 'का' हा प्रश्न विचारणाऱ्याची. साधे साधे प्रश्न. पण त्यातून केवढे तत्त्वज्ञान निथळत असते, हे त्यावरून दिसावे. 'सकाळी लवकर उठावे', पण का उठावे? 'फिरावे', 'का

फिरावे ?' असले प्रश्न विचारता विचारता जीवनाचे स्वरूप, जीवनचर्येतून मधुच्छंदांना दिसू लागले. मधुच्छंदांचा पुत्र सुंदर होता. मधुच्छंदा त्याकडे सारखे पहायला लागले. 'बाळ सुरेख आहे' पण तो का सुरेख झाला. त्याला प्राण नसता तर तो सुरेख झाला असता का, असा प्रश्न मधुच्छंदांच्या मनात डोकावतो, प्राण हा जीवनाचा गाभा आहे. त्यावर विचार झाला पाहिजे ही गोष्ट त्यातून निघते, प्राण म्हणजे वायू. प्राण म्हणजे जीवन, जीवन म्हणजे तेज. शेवटी ही सर्व मी-पणाची, आत्म्याची रूपे होत ही गोष्ट ऋषी मधुच्छंदा आणि त्यांची पत्नी यांना उमजते. मधुच्छंदाच्या कथेतील पुराणतत्त्व, हेच पुढे अध्यात्माच्या रूपाने आमच्या तत्त्वज्ञानात विकसित झाले. यज्ञ ही केवळ दुसऱ्याला बळी देण्याची कल्पना नाही. आपले प्राणतत्त्व चराचरात विलीन करणे म्हणजे सुद्धा यज्ञच होय. माणसाचा विचारस्त्रोत आचारातूनच कसा विकास पावतो याचा मधुच्छंदा ऋषींची कथा हे उदाहरण.

श्रीमती मृणालिनी देसाई यानी आचार्य कृष्णदेव पंडित यानी लिहिलेल्या ऋग्वेदातील कथांचा 'वेद अनंत बोलिला' या नावाने केलेला हा अनुवाद श्री तुकारामांच्या 'वेद बोलिला अनंत' या पंक्तीत थोडासा बदल करून केलेला. वैदिक परंपरा असे सांगते की, वेदांचा शेवटचा भाग म्हणून ब्राह्मणे, आरण्यके आणि उपनिषदे आली. आजचे भारतीय तत्त्वज्ञान म्हणजे उपनिषदांचे तत्त्वज्ञान. ते वेदातही, वेदऋचांतही दिसते. अग्नी आणि यज्ञ याना केंद्रबिंदू कल्पून जी संस्कृती उत्पन्न झाली ती केवळ कर्मकांडातच राहिली नाही. यज्ञ आणि अग्नी ही आमच्या विचाराची प्रतीके त्यांच्या आधारावर विचाराची इमारत उभी राहिली. अशा विचाराची थोडीशी 'झलक' विश्वामित्राच्या कथेत निश्चितच दिसते. 'अहम् ब्रह्मास्मि' म्हणजे 'मी ब्रह्म आहे' किंबहुना 'मी नाही, आहे ते ब्रह्म,' ही जी विचारसरणी, ती या कथेत फारच सुंदर रीतीने चितारली आहे. अर्थातच 'विश्वाला मी मित्राच्या डोळ्यांनी

पाहिले, त्याच दृष्टीने जगाची ओळख करून घेतली. माझ्या जीवनात त्या योगाने नवे प्राण प्रगटले. मी, मी राहिलो नाही. विश्वाच्या अणूरेणूत मिसळून मी विश्वरूप झालो. विश्वाच्या देवतांनी, आणि शरीरात प्रगटलेल्या प्राणांनी माझे जीवन घडवले. मी विश्वामित्र झालो."

ऋग्वेदात मंडले दहा. या सर्व मंडलातील महत्त्वाच्या कथा विष्णुदेव पंडितानी आपणास दिल्या आणि मृणालिनीबाई देसाईनी त्या मराठी जनतेला सादर करण्याचे ठरविले. साहित्य संस्कृती मंडळाने केले ते एवढेच की या कथा लोकांना मुद्रित स्वरुपात उपलब्ध करून दिल्या. या कथातून आमच्या संस्कृतीचा प्रथम विकास कसा झाला हे तर कळेलच, पण त्याचबरोबर आमच्या प्राचीन परंपराना आमच्या संस्कृतीच्या परिक्रमेत कसे बसविले गेले हेही कळेल. ऋग्वेदाची किंवा वेदाची परंपरा जरी आमच्या देशात राहणाऱ्या एका लहानशा जमातीची होती तरी या परंपरेमागील विजीगिषु वृत्तीमुळे ती सर्व समाजाची झाली आणि सर्व समाजाला तिचा उपयोग करून घेता आला.

वैदिक परंपरेप्रमाणे इतरही बौद्ध, जैन आदी परंपरा आपल्या देशात आहेत. या सर्व परंपरांचे ऋण आपण मानले पाहिजे. त्यातील ग्राह्य असेल ते घेतले पाहिजे. ग्राह्य नसेल ते सोडून दिले पाहिजे. पण या परंपरांचा अभ्यास केल्यावाचून ग्राह्य कोणते आणि अग्राह्य कोणते हे कोणाला कसे समजणार ? परंपरेचा अभ्यास न करताना, परंपरा म्हणजेच धन असे आपण जेव्हा म्हणतो तेव्हा त्यातून शब्द-प्रामाण्य वाढते. पण नीरक्षीर विवेकाने परंपरेचे अध्ययन केले तर त्यातून बुद्धि-प्रामाण्य उत्पन्न होते, समाजाचे पुनरुत्थान होते. मधुच्छंदांनी जो प्राण आपल्या मुलाच्या शरीरात पाहिला तोच सर्व समाजात पाहणे म्हणजे विकासाच्या दिशेने जाणे होय. दुर्दैवाने ही गोष्ट पाहण्याची आपली दृष्टी मंदावली. त्यामुळे भिन्न भिन्न विचार प्रवाहांचा

जन्म झाला. जेव्हा वैदिक परंपरेची समाजाला एकत्र ठेवण्याची क्षमता नष्ट झाली तेव्हा बौद्ध आणि श्रमण परंपरा पण या देशात उत्पन्न झाल्या आणि त्यांनी समाजाला एका सूत्रात गोवण्याचा प्रयत्न केला. आजच्या आधुनिक जगात आणखीही ख्रिस्ती, इस्लामी इत्यादी परंपरा उत्पन्न झाल्या आणि आपल्या मूळच्या त्रिवेणी संगमाला मिळाल्या. या नवीन परंपरानीही आम्हाला पुष्कळ काही शिकविले. कबीरपंथ, दीन-इ-इलाही, दारा शेको व रसखान यांची सांस्कृतिक संपत्ती या सर्व इस्लामची देण, तर ब्राह्मो समाज, सत्य-शोधक समाज इत्यादी चळवळी म्हणजे ख्रिस्ती परंपरेच्या संघर्षातून आम्हाला झालेला सामाजिक पुनरुज्जीवनाचा साक्षात्कार. या सर्व परंपरांच्या मंथनातून जो सामाजिक विचार उत्पन्न झाला व होईल तो प्रतिष्ठित व सामाजिक विकासाला पोषकच राहील. विचारांची अशी भागिरथी प्रवाहित करण्यात 'वेद बोलिला अनंत' अशासारख्या ग्रंथांच्या प्रकाशनाने थोडासा तरी हातभार लागावा.

**सुरेन्द्र बार्लिंगे**

# ऋण निर्देश

लहानपणापासून स्त्री, शूद्र व चांडाळ यांना वेदांचा अधिकार नाही हे वारंवार कानावर पडल्यामुळे वेदाविषयी मनात तशी अरूचीच होती. परंतु वेदमूर्ति सातावळेकरजींच्या स्मरणार्थ सर्व भारतीय भाषांत वेदांचे सुगम संस्करण करावे असा संकल्प गुजरातचे एक महापुरुष श्री. मोटा यांनी केला. पू श्री. विष्णुदेव पंडितांनी अथांग श्रम व तपश्चर्या करून त्या कामास स्वतःला वाहूनच घेतले. त्या महा-कार्यातला एक भाग –ऋग्वेदाच्या सुगम परिचयाचे मराठी संस्करण मी करावे असा आदेश पूज्य वडील मनीषी श्री रामप्रसाद बक्षी यांनी कै. मुरलीभाई ठाकूर यांच्या द्वारे दिला. त्यावर अवाक्षरही उच्चारणे शक्य नव्हते. माझी अरुचि बाजूला ठेवून मी कामास सुरुवात केली. आणि जीवनधनाचे एक समृद्ध व अपार असे भांडारच हाती आले ! गेली काही वर्षे त्यातच हरवून गेले होते.

मराठी संस्करण प्रकाशित करण्याचा प्रश्न आला तेव्हा व्यवहारी जगातील अडचणी समोर ठाकल्या ! पुस्तक अतोनात महाग होऊ नये असे वाटले तरी कोणाही प्रकाशकाला ही अट या दिवसात कशी मानवावी ? पण योगायोगाने डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांच्याशी त्याबाबत बोलणे झाले. ते स्वतः या विषयातले जाणकार. त्यांनी पुस्तक वाचून महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळातर्फे प्रकाशित करावे म्हणून मंडळाच्या विद्वान सदस्यांकडून ते वाचून घेऊन मंडळाने प्रकाशन करावे असा निर्णय घेतला. व त्यामुळेच प्रकाशनाचा योग आला.

गुजरात राज्य युनिव्हर्सिटी ग्रंथ निर्माण बोर्डाचे अध्यक्ष डॉ. जे. बी. सेंडिल व पूज्य विष्णुदेव पंडित यांची अनुमती व सहकार्य सुरुवातीपासून लाभले. पू. विष्णु-देवजींचे समर्थ मार्गदर्शनही होते. या सर्वांचे ऋण इतके स्नेहपूर्ण आहे की त्याचा भार न वाटता ते वैभवच वाटते.

– मृणालिनी देसाई

# आशीर्वचन

गुजरात राज्य युनिव्हर्सिटी ग्रंथ बोर्डाने वेद परिचय मालेची सहा गुजराती पुस्तके प्रकाशित केली. प्रथम पुस्तिकेचे प्रकाशन गुजरात विद्यापीठात भारतीय संस्कृतिचे पुरस्कर्ते पूज्य श्री. काकासाहेब कालेलकर यांच्या हस्ते झाले होते या कृतीस साहित्य स्वामी श्री. उमाशंकर जोशी यांची प्रशस्तिक लोकसेवक पू. रविशंकर महाराज व स्वामिश्री गंगेश्वरानंदजी या शतायुषि योग पुरुषांचे शुभाशिर्वाद पण लाभलेले आहेत. श्री. मृणालिनी देसाई यांनी ही कृति मराठीत आणावी ही आनंदाची गोष्ट आहे. त्या मराठी व गुजराती दोन्हीं भाषा जाणणाऱ्या असून संस्कृत भाषेच्याही अभ्यासक आहेत. तेव्हा या कृतिचे हार्द समजून घेण्याची क्षमता त्यांच्यात निश्चित आहे.

पाश्चात्य तत्वशोधक विद्वानांनी इतिहास, पुराणे, लोकभाषा व मुखोद्गत रूपाने सुरक्षित अशा संहितांच्या आधारे वेद समजून घेण्यासाठी खूप प्रयत्न केले आहेत. त्याचप्रमाणे भारतीय विद्वानांपैकी महर्षि दयानंद सरस्वती, विज्ञानवेत्ता मधुसूदन झा, योगीवर, श्री. अरविंद, वेदमूर्ति. श्रीपाद दामोदर सातवळेकर यांच्यासारख्या महापुरुषांनी वेद साहित्याची महाद्वारे उघडून दिली आहेत. त्यांचा मागोवा घेत वेदपरिचय सर्वांना सुगम वाटावा म्हणून केलेल्या या प्रयत्नास गुजरातमध्ये जनता जनार्दनाने स्वीकारून आपली अनुमती दर्शवली तशीच मराठी संस्करणासही ती लाभावी असे लेखिकेस सद्भावपूर्वक आशीर्वचन.

– आचार्य विष्णुदेव पंडित

# मानस चेतनेचा आविर्भाव

वेदपरिचय पुस्तिका श्रेणी प्रकाशित झाली व गुजराथच्या धर्मप्रेमी गुणानुरागी जनतेला वेदांचे दर्शन झाले. सनातन धर्माच्या स्त्रोताचे उगमस्थान वेद आहेत असे स्वतःला हिंदू म्हणवणारी प्रत्येक व्यक्ति सद्भावपूर्वक मोठ्या श्रद्धेने मानत असली तरी

यद् गृहीतम् अविज्ञातं निगदेनैव शद्यते।

अनग्नाविव शुष्केन्धो न तत् ज्वलति कर्हिचित्। (निरुक्त १-६-१८)

वेदपाठ ग्रहण केला पण त्याचा अर्थ किंवा भाव जाणला नाही. केवळ निगद-शद्ब उच्चारले तर ते निरर्थक होत ज्याप्रमाणे अग्नि विझून गेल्यावर उरते ती राख त्यातून सुकलेले काष्ठ प्रज्वलित होत नाही. त्याप्रमाणे केवळ शद्बपाठाने वेदवाणी प्रज्वलित होत नाही.

या निरुक्ताच्या उक्तीप्रमाणे केवळ मान्यता असून त्यापासून लाभ होत नाही. वेदांचा अर्थ समजल्याशिवाय, वेदांचे हार्द हस्तगत केल्याशिवाय केवळ अहोभावाने वेदांना अंजलि वहाणारी व्यक्ति स्वतःची व समाजाची कोठल्याच प्रकारची सेवा करू शकत नाही. उलट स्वतः अंधश्रद्ध बिरूद मिळवून वेदांच्या व हिंदू धर्माच्या अपमानास कारणीभूत होते.

संस्कृत भाषेचे विद्यार्थी म्हणून आम्हाला इंग्रज विद्वानांची मतेच अभ्यासासाठी होती. सुश्रुत व संन्निष्ठ म्हणता येतील असे पाश्चात्य विद्वान देखील भारताच्या या अमूल्य भांडाराची पुरती पारख करू शकले नव्हते व त्यांनी केलेली मूल्यांकनेच भारतीय विद्यार्थ्यांच्या समोर ठेवली जात.

सृष्टीच्या भौतिक बळाने प्रभावित होऊन, भय व भाव प्रेरित आदिमानवाच्या तोंडून साहजिक बाहेर पडलेले शद्ब हेच वेद आहेत अशा प्रकारचे तात्पर्य त्यांच्या कथनातून निघे. परंतु 'भारताच्या पुरातन प्रणालिकेनुसार वेद हे सर्व प्रकारच्या ज्ञानचे उगमस्थान, हिमालय आहे' हे वास्तविक तथ्य प्रतिपादित करण्याचे श्रेय संत व महात्म्यांच्या वाट्यास जाते. आचार्य श्री. विष्णुदेव पंडित यांनी हे कार्य सेवाभावाने सफळ व सिद्ध करून संत महात्म्यांच्या मालिकेत स्वतःचे स्थान चिरंतन प्राप्त करून घेतले आहे. या म्हणण्यात कोठलीही अतिशयोक्ति नाही.

साहित्याचे सर्जन करणारी व्यक्ति स्थूल, सूक्ष्म व कारण शरीराच्यावर असलेल्या मानस चेतनेच्या स्थितीत जाऊन पोचलेली असते, आणि द्रष्टया ऋषीना

वेदांच्या गहन नैतिक आणि अध्यात्मिक सत्यांचे सहज दर्शन झाले होते हेच ते अतिमानस चेतनेच्या कक्षेत जाऊन पोचले होते हे दाखवून देते. त्यांची कक्षा खरोखरीच आत्मिक व दैविक व ब्रह्मवेत्त्यांची म्हणता येईल.

गृहस्थ जीवन सुंदर व मधुर करणारे ऋषि मधुच्छंदा जीवनाला प्रयोगशाळा करतात. हे कथानक अत्यंत हृदयस्पर्शी वाटते. त्याकाळी जे यज्ञ याग होत त्यात परस्परांचे सहकार्य साधले जाई. अनेक हातांचे सौंदर्य ही भावना मूर्त होई हे चित्र आजही किती उपकारक आहे! विश्वामित्रांच्या प्रेरणेने भरतजन महायाग करतात तेव्हा यूपाला राष्ट्रध्वज म्हणून फडकावण्यात आले. त्याप्रसंगी सारा आर्यावर्त एकत्र जमल्याचे वर्णन भाव विभोर करून टाकते. त्याकाळी गुरु शिष्यांना केवळ शिक्षणच देत नसत पण आत्मा त्यांच्यात ओतीत. ते सारे एकाच परिवारातील संतानांसारखे रहात व त्या परंपरेचे जतन केले जाई. मग ते अत्रि असोत वसिष्ठ असोत की भरद्वाज असोत! स्त्रीच्या विविध रुपांचे चित्रण पण पंडितजींनी वेदातून साकार केले आहे. मानवी जीवनात स्त्रीच्या प्रेरणेने व प्रतिभेने काय घडवून आणले. (सूर्या घोषा मुद्गलानी सरमा) वेळ आली तर नांगरही ओढला आणि संकटसमयी राष्ट्राला आवाहनही केले. खरोखरीच नारी तू नारायणी आहेस. थेट वेदकालापासून! वेदात काव्यत्व आहे, निसर्गाची भव्य वर्णने आहेत. उत्तम सूक्ते आहेत. असे सांगितले आहे पण वेदांचा प्रत्यक्ष जगल्या जाणाऱ्या जीवनाशी किती संपर्क होता. बारीक सारीक विधीमध्ये पण रहस्य कसे दडलेले आहे त्या काळचे केवळ ऋषिमुनीच नाही पण सामान्य स्त्री पुरुष कोठल्या गुणांनी युक्त होते हे सारे पंडितजींनीच दृष्टांतासहित व सविस्तर प्रथमच सांगितले आहे, वेद हे शेवटी साहित्य आहे. खरे साहित्य हे 'सहित' हितकारीच असावयास हवे. अशा साहित्यातून साहजिकच बोधनीति निष्पन्न होते. आचार्य श्री विष्णुदेव पंडितजींनी ऋग्वेदातून उध्धृत केलेल्या कथा या उर्ध्वहेतूस सहज रितीने सिद्ध करतात. साध्या सरळ तरीही मधुरतम वाक्याद्वारे नीतिबोध देण्याची शक्ति ऋग्वेदात आहे तेवढी इतरत्र क्वचितच असेल. दैनंदिनीच्या पानापानावर सुवचनासारखी देता यतील अशी क्षमता आर्ष वाणीच्या या सूक्तात आहे.

**– नारायणभाई भट्ट,**
मा. न्यायमूर्ति–गुजरात
हायकोर्ट अहमदाबाद ९.

# अनुस्मृति

उत त्वः पश्यन् न ददर्श वाचम् उत त्वः श्रृण्वन् न श्रृणोति एनाम् ।

उतो त्वस्मै तन्वं विसंस्त्र जायेव पत्य उशती सुवासाः । ऋ १-७१-४

ती वाणी ऐकावयाची आहे, तिचे रूप पहावयाचे आहे तिचे सौंदर्य, स्त्री सारखे आहे ते पाहूनही कित्येक पहात नाहीत कानावर पडले तरी ते ऐकत नाहीत. कारण तिचे रूप, आकार झाकलेले आहे. अंतर्हित आहे ते पडद्यामागे आहे. ज्यांनी तो पडदा आवरून घेतला त्यांना वाणीचे रूप सौंदर्य, आकार दिसला त्यांच्या समोर स्वतःला उघडे करून तिने आपली काया पसरून टाकली.

सक्तुमिव तितउना पुनन्तो यत्र धीरा मनसा वाचमक्रत

अत्रा सखायः सख्यानि जानते भद्रैषां लक्ष्मीर्निहिता अधि वाचि (ऋग्वेद-१०-७१-२)

वाणीचे झाकलेले रूप तेच विचार. ते मनात येतात. येणारे सर्वच विचार शद्वात बाहेर पडत नाहीत. त्यासाठी धीर धरून अंर्तदृष्टीचे अनुसंधान करावयाचे आहे. धीर आणि विवेक हे मनाचे गुण आहेत. अंतःकरणाचे ते करण आहे. साधन आहे. गाळणी असो किंवा चाळणी असो ती ज्याप्रमाणे वेगळे करते, गाळून किंवा चाळून चांगले ते काढते त्याप्रमाणे मनातून गाळून निघालेल्या वाणीची रचना होते. मन धीर धरून वाणीचा व्यवहार करते, मनाने विचार करणारे व मतिने विवेक ठेवणारे धीराचे मित्र होत. त्यांचा स्वभाव व शील त्याच्या सारखेच होते. वाणी आणि विचार यांच्या विवेकपूर्ण व्यवहारातून त्यांची मैत्री होते. याचे कारण काय? त्यांच्या त्या वाणीत भद्र लक्ष्मीचा वास असतो. तिची लक्षणे कल्याणकारी आहेत. हितकारी आहेत. ते वाङमय आहे साहित्याचे स्वरूप आहे. त्यात वाणीचे सौंदर्य वसत आहे.

वेद वाणी हे असे दिव्य वाङमय आहे, साहित्य आहे. ज्यांनी त्या सौंदर्याचे दर्शन घेतले त्यांना कवि म्हटले आहे. ऋषि, मनिषी, धीरजन म्हटले आहे, त्यांच्या मनात जे विचार आले तेही सारेच शद्वात उतरले नाहीत, त्यातील जे सहज, सरळ आणि निर्मळ भाव होते ते साररूपाने वाणीत उतरले. त्यात हितकर बोध आहे. भद्रा लक्ष्मी आहे. ती वाणी ज्यांनी ऐकली, तिचे रूप सौंदर्य ज्यांनी पाहिले, जाणले ते बुध जन म्हटले जातात. त्यांनी वेदवाणीचे अध्ययन केले. अभ्यास करून ती बोधमय वाणी रुजू केली. म्हणून ते मित्र म्हटले जातात. ती वाणी समजून घेऊ च्छिणाऱ्यांना त्यांनी मित्र मानून ती देण्याची भावना ठेवली पण कोणाला ती ऐकावीशीच वाटली नाही ती कल्याणकारी वाणी जाणून घेण्याची इच्छाच नसली तर ते या बोधवाणी देणाऱ्या मित्रांना सोडून जातात त्यांना या वाणीचा लाभ

मिळत नाही. त्या भाग्यापासून ते वंचित होतात. अशी सामान्य माणसे जे काही ऐकतात ते सारे वाया जाते कारण वाणीच्या द्वारे दिसणारा सुक्ताचा मार्ग त्यांना त्या श्रवणातून लाभत नाही.

ऋग्वेदाच्या संहितेत दहा मंडले आहेत, पंचाऐंशी अनुवाक् एक हजार अठ्ठावीस सूक्ते व दहा हजार पाचशे बावन मंत्र आहेत. ऋगनुक्रमणी, चरणव्यूह व ऋगविधानात यांचे सविस्तर वर्णन आहे. ऐतरेय आरण्यकाच्या दुसऱ्या आरण्यकातील दुसऱ्या अध्यायात ही दहा मंडले व त्यांच्या ऋषींचा जो निर्देश आहे त्याला आगळेच महत्व आहे. कारण संहिताचे संकलन झाल्यानतर ब्राह्मण ग्रंथात मंत्राचे ऋषि, देव छंद वगैरे वर्णन मिळते त्या दृष्टीने सविस्तर माहिती पहिल्यांदा आरण्यकात मिळते.

ऋग्वेदाच्या प्रथम मंडळात १९१ सूक्ते आहेत. त्यांचे द्रष्टे ऋषि पंधरा आहेत. त्यातील सात ऋषि शंभर ऋचांचे द्रष्टे आहेत व चार ऋषि दोनशे ऋचांचे म्हणून त्यांना शर्तचि म्हटले आहे. बाकीचे चार मध्यम शंभराच्या आत बाहेर त्यांच्या ऋचा असून त्या शे दोनशे ऋचांच्या अधेमधे घातलेल्या आहेत हे निरुपण येथे प्राणरहस्य जाणणाऱ्या उपासनेच्या दृष्टीने रुजू केलेले आहे.

' मंडलामध्ये तळपणारा सूर्य या लोकांचे पूजन अर्चन करतो. तो पुरुष रूप आहे. सूर्य रूपाने तळपणारा प्राणच शरीराला पूजनास योग्य बनवतो. अर्थात् प्राणाशिवाय शरीर शव होते. येथे आदित्य आधिदैव व प्राण म्हणजे अध्यात्म म्हटले आहे. प्राण मानवी शरीराला शंभर वर्षे पूजनीय बनवतो. म्हणून माणसाचे आयुष्य शंभर वर्षांचे म्हटले जाते. ऋग्वेद संहितेच्या पहिल्या मंडलाचे शर्तचि ऋषि हे प्राणरूप आहेत. '

दुसऱ्या मंडलाचे गृत्समद, तिसऱ्याचे विश्वामित्र, चौथ्याचे वामदेव, पाचव्याचे अत्रि, सहाव्याचे भरद्वाज, सातव्याचे वसिष्ठ हे सहा ऋषि पण प्राणरूप आहेत. त्यांचे ध्यान धरण्याविषयी म्हटलें आहे.

' येथे जो प्राण आहे तो गृत्स–गळणारा व अपान आहे तो मद म्हणजे शक्ती रस आहे. प्राण व अपान यांचा योग करणारे ऋषि गृत्समद हे दुसऱ्या मंडलाचे द्रष्टे आहेत.

हे सारे विश्व प्राण देवाचे मित्र आहे. कारण विश्व भोग्य असून प्राण भोक्ता आहे. तिसऱ्या मंडलाचे ऋषि विश्वामित्र ते विश्वाचे मित्र आहेत कारण ते विश्वाचा प्राण झालेले आहेत.

पुरुषाच्या देहात जी इंद्रिये आहेत त्यांच्या अधिष्ठात्या देवता अग्नि वगैरे आहेत. त्या देवांनी सांगितले की देहात असलेले प्राण आमच्या ठिकाणी वाम–वरणीय आहेत म्हणजेच प्राण वायु आहे असे देवांनी सांगितले. ते प्राण 'वाम देव' चौथ्या मंडलाचे ऋषि आहेत.

प्राण पापापासून सर्वांचे 'त्राण' – रक्षण–करतात 'प्राणे अत्रायत्' म्हणून ते अत्रित. पाचव्या मंडलाचे द्रष्टे प्राणरुपाने सर्वांचे रक्षण करतात.

विश्वाची प्रजा ही वाज. तिचे भरण पोषण करणारे प्राण हे 'भरद्वाज' सहाव्या मंडलाचे ऋषि प्राणरूपाने सर्वांचे भरण पोषण करतात.

या शरीराच्या इंद्रियांच्या ठायी वसणाऱ्या देवांनी सांगितले की आमच्यात प्राणाने प्रवेश केला तेव्हाच चैतन्य निर्माण झाले. म्हणून प्राण हा 'वसिष्ठ' आहे. सातव्या मंडलाचे ऋषि वसिष्ठ प्राणरूपाने श्रेष्ठ होऊन शरीरात वास करतात म्हणून त्यांना वसिष्ठ म्हणतात.

आठव्या मंडलात एकशे तीन सूक्ते आहेत. त्याच्या द्रष्टयात कण्व गोत्राचे ऋषि मुख्य आहेत. त्याचप्रमाणे प्रगाथ छंदात ही सूक्ते विशेषे करून रचली आहे. गायत्री वगैरे छंदात एक एक ऋचा रचलेली असते. परंतु प्रगाथ दोन ऋचांना जोडणारा छंद आहे. एक ऋचा बृहति व दुसरी सतोबृहति छंदात असली तर त्या दोन्ही जोडून तीन ऋचांचे तृच सूक्त होते. याप्रमाणे यज्ञात प्रगाथ छंदाचा उपयोग करतात. त्याविषयी माहिती सांगितली आहे.

हाच तो प्राण, जो शरीरात प्रवेश करून सर्वांचे प्रगथन करतो, म्हणजेच सर्वांना प्राणवान करतो, म्हणून त्याला प्रगाथ म्हणतात. आठव्या मंडलाचे ऋषि प्रगाथ आहेत, कारण ते दोन ऋचा जोडून सूक्तांचे प्रगथन करतात.

नवव्या मंडलाची ११४ सूक्ते आहेत. त्यात पवमान सोमाचे वर्णन केलेले आहे. पवमान सोम हाच त्या सूक्तांचा देव आहे. त्याचे वर्णन करणाऱ्या ऋचांना पावमानी ऋचा व द्रष्टया ऋषींना पावमानी ऋषि म्हटलेले आहे. त्याविषयी म्हटले आहे,

या विश्वात जे म्हणून क्षुद्र आहे, हलके आहे. त्यात प्राण ओतून त्याला पवमान म्हणजे शुद्ध केले. ज्याप्रमाणे सोमरस गाळण्यातून पवमान गतिने शुद्ध पात्रात पडतो त्याप्रमाणे प्राण सर्व इंद्रियांना पूत शुद्ध करतो. म्हणून त्या प्राणाच्या मूर्तींना (ऋचांना) व द्रष्टया ऋषींना पण पावमानी म्हटले आहे.

पहिल्या मंडलाप्रमाणेच दहव्या मंडलाचीही १९१ सूक्ते आहेत. त्याची सुरुवात महासूक्तांनी होते. व शेवट लहान लहान सूक्तांनी होतो. त्याविषयी पुढील प्रमाणे माहिती दिलेली आहे.

'त्या प्राण देवाने सांगितले, 'या लोकात जे क्षुद्र म्हणजे लहान आहे व जे महत्-मोठे आहे त्या सर्वांच्या ठायी मी आहे.' यावरून ज्या सूक्तात दोन ऋचा असतील ती क्षूद्र सूक्ते व दहा, पंधरा ते पन्नासापर्यंत ऋचांची ती महासूक्ते, क्षुद्र सूक्तांचे ऋषि ते क्षुद्रसूक्त व महासूक्तांचे महासूक्त म्हणून प्रसिद्ध आहेत.

येथे मंडल हे सूर्यासारखे असून दहा मंडलाच्या ऋणीना आदित्य व प्राणरूप म्हटलेले आहे. त्या शिवाय सूक्त, ऋचा, अर्धर्च, पाद, पद अक्षर वगैरे प्रकार पण प्राणासारखे असल्याचे दाखवताना सांगितले आहे.

'स्वतःचा महिमा गाणाऱ्या मंत्रदृष्टया ऋषिस पाहून त्या प्राणदेवाने म्हटले की, या ऋषींनी सूक्त-शोभन वचन म्हटले हे आश्चर्यच आहे' ते सूक्त-उक्तसुवचन त्यावरून त्याला सूक्त व द्रष्टा कवि तो सूक्त सुभाषी नावाने ओळखला जाऊ लागला.

आता हा प्राणदेव, हाच ऋक् आहे. कारण प्राण सर्वांच्या कल्याणासाठी देहाचे अर्चन करतो.-अर्थात् देहात प्रवेश करून त्याला पूज्य, चेतनवंत करतो या ऋचेचे द्रष्टे ऋक् या नावाने ओळखले जातात

आता प्राणदेव ऋचेचा अर्धभाग म्हणजे अर्धर्च पण आहे येथे अर्ध हा शद्ब स्थानवाचक आहे देव मनुष्य वगैरेंची जी स्थाने आहेत त्यासाठी प्राण अर्चन करतो यावरून प्राणांचा महिमा गाणारे मंत्रभाग हे अर्धर्च आहेत व त्यांच्या द्रष्टयांना पण अर्धर्च म्हटले जाते.

आता हे अर्धर्च म्हणजे ऋचेचा चौथा चरण-पाद आहे. त्याचप्रमाणे प्रत्येक ऋचेत एक एक शद्ब आहे त्याला पद म्हणतात. ते पाद व पद ही दोन्ही प्राणाची रूपे आहेत. तो प्राण आपल्या प्रवेशाने सर्व प्राण्यांना प्राप्त करून घेतो. म्हणून प्राणांचा महिमा गाणारे अर्धर्चाचा भाग, पाद व पद आहेत. त्यांच्या द्रष्टयांना पण पाद व पद म्हटले जाते.

आता जे अक्षर, वर्ण तेच हा प्राण. कारण सर्व प्राण्यांच्या अनुष्ठानासाठी प्राण हा 'क्षरति' म्हणजे फलप्रदान करतो. पण इतर प्राणी त्याचे क्षरण करू शकत नाहीत म्हणून प्राण हा 'अक्षर' आहे व त्याचे द्रष्टे ऋषि पण 'अक्षर' आहेत.

याप्रमाणे 'अग्निमीळे' पासून प्रारंभ करून 'यथा वः' या शेवटापर्यंत ऋग्वेद संहितेच्या सर्व ऋचा, सर्व वेद, सर्व घोषयुक्त वर्ण एकाच व्याहृतिची रुपे आहेत. या प्रमाणे प्राण हा जो शद्ब आहे त्याचा उच्चार पण प्राणाद्वारे होतो. म्हणून प्रत्येक ऋचेचे ध्यान प्राणरूप समजून करावे.

वेद वाणीची ही विविध रुपे, अक्षर, पद पाद, अर्धर्च, ऋचा, सूक्त, मंडल तसेच द्रष्टया ऋषींची लक्षणे व व्याख्या याप्रमाणे रुजू केल्या आहेत. अर्थात ही व्याख्या देण्याची 'व्याख्यान' पद्धति प्राचीन आहे पण ती वाणीचे दिव्य रूप व्यक्त करणारी आहे. 'यत् मनसा मनुते तद् वाचा वदति' (तैतरिय आर. व्यक)

तसे पाहिले तर विचार हे वाणीचे पूर्वरूप आहे. जो मनाने विचार करतो तो वाणीने बोलतो ही सामान्य गोष्ट आहे. येथे वाणी व प्राण यांचे ऐक्य साधलेले

आहे. प्राण हे चैतन्याचे रूप आहे वाणीत प्राणांचा संचार झाल्याने तिच्यात दिव्य चेतना पहावयास मिळते.

ज्या प्रमाणे माणसाला श्वास घेण्यासाठी प्रयास करावे लागत नाहीत, सहज सरळपणे ते काम होत असते, त्याचप्रमाणे वेद हा नारायणाचा श्वास आहे (अस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद् यद् ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदो अथर्वांगिरसः। बृहदारण्यक २-४-१०) त्याप्रमाणे ऋषि हे प्राणरुप आहेत. ते सात ऋषि प्राणरुपाने शरिरात वसतात (प्राणा वै यशो निहितं विश्वरुपं, प्रणानेतदाह तस्यासत ऋषयः सप्त तीरे इति प्राणा वा ऋषयः (बृहदारण्यक २-३-२) याचे तात्पर्य हेच आहे. बोलण्या-साठी माणसाला प्रयत्न करावा लागतो. असा पुरुषाचा प्रयत्न या मागे दिसत नाही. म्हणून वेद हे अपौरूषेय आहेत. 'वैदिक वाङमयका इतिहास' मध्ये सुरूवातीस पं. भगवद्दत्त म्हणतात.

'आर्ष परंपरेत मानवसृष्टीच्या सुरुवातीपासून हे तथ्य सुरक्षित आहे की वेदवाणी ही दैवी वाणी आहे. ही वाणी क्षीण झालेली नाही. ती परमव्योम आका-शात स्थिर झालेली होती. मानवी जीवनाच्या सुरुवातीस जेव्हा ऋषींनी शरीरे धारण केली तेव्हा ही दैवी वाणी ईश्वरी प्रेरणेने त्यांच्या ठायी प्रवेशली. ती त्यांनी ऐकली म्हणून ती श्रुति म्हटली गेली. (सप्त ऋषयः प्रतिहिताः शरीरे) यजुर्वेद ३४-५५

ही वाणी आहे. ती नुसती वाणी नसून वेदवाणी आहे. ते ज्ञान आहे. ती मंत्रवाणी आहे. मनातील अव्यक्त मननाचे मंत्रवाणीत व्यक्त झालेले रूप आहे. ते मंत्र रुजू करणारा तो द्रष्टा. तो कवि आहे. गायक आहे. त्याच्या अंतर्यामी जो भाव जागृत झाला मनात जो स्फुरला त्याचे त्याला दर्शन होते.

यास्कार रचित निरुक्त (७–१–२) मध्ये मंत्राचे विभाग तीन प्रकारांनी मांडले आहेत. परोक्ष प्रत्यक्ष व अध्यात्मिक. अग्नि इंद्र वगैरे देवांचे वर्णन प्रथम पुरुषी शैलीने केलेले आहे ते परोक्ष वर्णन. समोर दिसणाऱ्या देवाला संबोधून केलेले मध्यम पुरुषी वर्णन. ते प्रत्यक्ष वर्णन व स्वतः स्वतःलाच उद्देशून केलेले ते स्वतःच उत्तम पुरुष असल्याप्रमाणे केलेल वर्णन ते अध्यात्मिक वर्णन आहे.

'वज्रधारी इंद्राने जे उत्तम पराक्रम केले, ते इंद्राचे पराक्रम मी सांगतो. त्याने अहिला मारले व जल मुक्त केले. त्याने पर्वतांचे व मेघांचे खंड तोडून टाकले.'

पहिल्या मंडलाच्या ७२ व्या सूक्तात हिरण्यस्तूप अंगिरस ऋषींनी इंद्राच्या पराक्रमाचे वरील प्रमाणे वर्णन केले आहे ते परोक्ष रीतिचे वर्णन. त्याच ऋषींनी अग्निला संबोधन करून ३१ व्या सूक्तात त्याच्या गुणांचे वर्णन केले आहे. ते प्रत्यक्ष वर्णन.

'हे अग्नि, तुम्ही प्रथम अंगिरा ऋषि आहात. देवांचा देव व शिव सखा आहात. तुमचे व्रत व वर्तन असे आहे की ज्यातून क्रांतिकारी मरुत जन्म घेतात.' जर मी

असत्यवादो असेन अथवा मी कोणाला संतापदायक झालो असेन वा कोणाचा जीव घेतला असेल तर मी आजच मृत्यू पावेन. परंतु ज्याने मला खोट्या रितीने असत्यवादी ठरवले असेल तो पुरुष आपल्या दाही पुत्रांसह मरण पावेल.'

वरील भावार्थाचे मंत्र (ऋग्वेद ७-१०४-१५) मध्ये आहेत. वसिष्ठ ऋषि प्रकट शपथ घेऊन आपला निर्दोषीपणा सिद्ध करतात. ते अध्यात्मिक वर्णन आहे. याच प्रमाणे स्वगत उच्चारलेले मंत्र या विभागात मोडतात.

यास्काने रुजू केलेल्या या प्रकारात ऋषींचा भाग महत्वाचा आहे, ते मंत्र द्रष्टे आहेत. वेदात मुख्यत्वे देवांचीच स्तुति व प्रार्थना आहे. म्हणून देव हा वेदांचा मुख्य विषय आहे.

'यो देवेभ्य आतपति यो देवानां पुरोहितः ।
पूर्वो यो देवेभ्यो जातो नमो रुचाय ब्राह्मये ।
रुचं ब्राह्मं जनयन्तो देवा अग्रे तदब्रुवन् ।
यस्त्वैवं ब्राह्मणो विद्यात् तस्य देवा असन् वशे ।

यजुर्वेदाच्या या (३१-२०-२१) दोन मंत्रात म्हटलेले आहे की 'देवांच्यासाठी जे तप करणारे, जे देवांचे पुरोहित आहे तसेच जे देवांच्या आधी प्रगट झाले आहे त्या रुचिकर ब्रह्माला प्रणाम. रुचिकर ब्रह्माला प्रगट करणारे देव होते त्यांनी सांगितले की रुचिकर ब्रह्माचा विषय जाणणारे जे ब्राह्मण हे रहस्य जाणतात त्यांना देव वश होतील.'

वरील दोन्ही मंत्रात आलेला देव हा शद्ब अर्थ भाव व विषय यांचा सूचक आहे तसेच ब्रह्म हा शद्ब ' वेदमंत्र ' या अर्थी आहे.

देवताध्याय ब्राह्मणात तर देवांची व्याख्या देताना म्हटले आहे. ऋषी ां विषयज्ञो यः स शरीराद् विमुच्यते ।

याप्रमाणे ऋषि व देव यांचा परस्पर सबंध आहे त्याच बरोबर छंदालाही जोडलेले आहे. अर्थाला अनुसरुन चरणाची व्यवस्था आहे ती ऋचा. सा ऋक् यत्रार्थ वशेन पादव्यवस्था (जैंमिनी सूत्र)

प्रत्येक मंत्राचा ऋषि देव व छंद जाणून घ्यावा ही प्रचीन परंपरा आहे आणि म्हणूनच छापलेल्या कोणत्याही ऋग्वेद संहितेच्या प्रत्येक सूक्ताच्या शीर्षकावर ऋषि देव आणि छंद यांचा निर्देश असतो. अर्थात मूळ सूक्त वाचून त्याविषयी स्पष्ट माहिती होत नाही छंदाच्या लक्षणावरुन तो ओळखता येतो त्याचप्रमाणे वर्णनावरुन

सामान्य परिचय मिळतो पण ऋषींचा परिचय मिळू शकत नाही. काही ठिकाणी ऋषींच्या नावाचा निर्देश सापडतो. बहुधा तो गुणनिदर्शक असतो याप्रमाणे ऋषि देव आणि छंदाच्या माहितीसाठी सर्वानुक्रमणि सारख्या प्रमाणभूत ग्रंथाचा

आधार घ्यावा लागतो. सूक्त व ऋचांच्या या संकलनात पण ऋषि देव आणि छंदाचा आधार घेतलेला आहे. आर्षेय ब्राह्मणाच्या सुरुवातीस स्पष्टच म्हटलेले आहे.

अथापि ब्राह्मणं भवति–' यो ह वा अविदित आर्षेयछन्दो दैवत ब्राह्मणेन मंत्रेण याजयति वा अध्यापयति वा. स्थाणुं वा ऋच्छति गर्त वा पद्यति प्र वा मीयते पापीयान् भवति यातयामानि अस्य छन्दांसि भवन्ति। अथ यो मंत्रे मंत्रे वेद सर्वमायुरेति श्रेयान् भवति आयात्यामानि अस्य छन्दांसि भवन्ति । तस्मादेतानि मंत्रे मंत्रे विद्यात् । '

येथे आर्षिय ब्राह्मणाने पण कोठल्यातरी प्राचीन ब्राह्मण ग्रंथांतील प्रमाण उधृत केलेले आहे. वेदाचा प्रत्येक मंत्र यज्ञाच्या प्रयोगात व स्वाद्यायात घेतला जातो तेव्हा ज्या मंत्राचे ऋषि, छंद देव आणि ब्राह्मण (ब्रह्म मंत्राचा अर्थ व विवेचन रुजु करणारा तो ब्राह्मण) यांची माहिती न जाणता त्यांचा प्रयोग किंवा पठण पाठन केले तर करणारा जड होऊन जाईल, खड्डयात पडेल, मरुन जाईल अथवा पापी होईल, छंद छंदोबद्ध ऋचा 'यातयाम' शिळया (नीरस) होऊन जातील जे विद्वान मंत्रामंत्राचे ऋषि छंद देव आणि ब्राह्मण जाणतात ते दिर्घायु होतात त्यांचे कल्याण होते त्यांनी पठन केलेले छंद 'अयातयाम' शिळे होत नाहीत. ताजेतवाने रहातात. म्हणून प्रत्येक मंत्राचा ऋषि देव छंद आणि ब्राह्मण सांगावेत.'

येथे मंत्रद्रष्टया ऋषिला प्रथम स्थान दिलेले आहे. इतकेच नाही, परंतु दुसऱ्या मंडलापासून ते सातव्या मंडलापर्यंत एकेक मंडल एकेका ऋषींच्या सुक्तांचे संकलनच त्यामुळे त्या मंडलाला आर्षेय संहिता म्हणता येईल. नवव्या मंडलातील सर्वच सूक्ते पवमान सोमाचे वर्णन करणारी आहेत, त्या मंडलाला दैवत संहिता म्हणता येईल. त्याचप्रमाणे मंडलांच्या रचनेत छंदांची अनुरूपताही संभाळलेली आहे. विशेषतः त्रिष्टुप, गायत्री व जगती छंदात बहुसंख्य ऋचा आहेत त्या छांदस संहिता म्हणता येतील.

ऋग्वेदाच्या १०१७ सूक्तात १०४७२ ऋचा असून त्यापैकी ४२५१ त्रिष्टुप, २४४९ गायत्री. व १३४६ जगती छंदात आहेत. अनुष्टुप ८५८ आहेत. बाकी इतर छंद बृहति ३७१, पंक्ती ४९८ उष्णक ३९८, द्विपदा विराट १३९, अत्यष्टि ८२ शकवरी १९, अतिजगती, १७, अतिशकवरी १०, द्विपदा त्रिष्टुप १४. अष्टि विराटरूप, द्विपदा गायत्री ३, धृति २ व अतिधृति, द्विपदा जगति व एकपदा त्रिष्टुप या छंदात एकेक ऋचा आहे. येथे आठव्या मंडलाच्या ४९–ते ५९ या अकरा वालखिल्य सूत्रांच्या ऐंशी मंत्रांत प्रगाथ आहे त्याही यात मिळवून घेतल्या पाहिजेत,

गायत्री छंदात २४ अक्षरे असून नंतर चार चार अक्षरे वाढत जाऊन क्रमशः उष्णिक २८. अनुष्टुप ३२, बृहती ३६, पंक्ति ४०, त्रिष्टुप ४४. जगती ४८, अति

जगति ५२, शकवरी ५६, अति शकवरी ६०, अष्टि ६४, अत्यष्टि ६८, अतिधृति ७२ अक्षरांचा छंद आहे. त्याशिवाय द्विपदा जगतीत २४, द्विपदा त्रिष्टुपात २२, द्विपदा विराटात २०, द्विपदा गायत्रीत १६, एकपदा त्रिष्टुपात ११, एक पद्य विराटात ११ अक्षरे आहेत.

ऋग्वेदाच्या ऋचांवर व्याख्यान प्रवचन ऐतरेय ब्राह्मणांत केलेले आहे. त्यात छंद हे दिव्य चैतन्यरूप मानून ऋषि व देव यांच्या बरोबर त्यांची प्रतिष्ठा केली आहे. शिवाय छंदाना साध्य देव मानून त्यांची संगति यज्ञाशीही लावलेली आहे. ऋक् ऋचा ही सामान्यत: देवांची स्तुति किंवा प्रार्थना करण्यासाठी असते. सर्व ऋचा छंदोबद्ध आहेत. त्या त्या छंदात त्या गावयाच्या असतात.

छंदाचा मूळ धातू छद् आच्छादने: देवांचे आच्छादन करते. ते अर्थात् देव हा विषय व्यवस्थित करतात. दुसऱ्या प्रकारे सांगायचे झाले तर छंद हे देवांचे निवास आहेत. गायत्रीच्या आठ अक्षरात आठ वसु त्रिष्टुपाच्या अकरा अक्षरात अकरा रुद्र आणि जगतिच्या बारा अक्षरात बारा रूद्र वसतात (जैमिनीय ब्राह्मण १-२८०-२८८)

ऐतरेय ब्राह्मणात तसा मुख्य सात छंदांचा उल्लेख आहे. त्यातही विशेषत: गायत्री त्रिष्टुप व जगती या तीन छंदांचे रूप लक्षण तत्व वगैरेंचा विचार केलेला आहे. छंदाचा मूळ अर्थ जो अच्छादन तो विशद करून सांगितला तर असे म्हणता येईल की छंद वेदवाणी ऋचांचे नियामक होतात. या प्रकारे प्रत्येक मंत्राचा ऋषि हा द्रष्टा, देव हा विषय आणि छंद हा त्याचे नियमन करणारा आहे.

ऋग्वेद मंत्रांचा अर्थ समजण्यासाठी व्याकरण आणि निरुक्त (विवेचन) ही वेदांची अंगेच समजली जातात.

त्याप्रमाणे पाणिनीच्या व्याकरण शास्त्राला शब्दानुशासन म्हटलेले आहे. ऋचेत येणारे पद हे शब्द आहेत. त्यात प्रकृति व प्रत्यय यांचा संयोग आहे. त्यांची व्युत्पत्ती सांगणारे निरुक्त व त्यांचे नियमन शासन करणारे व्याकरण हे आहे. त्याच प्रमाणे पिंगलाचार्यांनी रचलेले छंदशास्त्र ऋचेच्या पाद व पदस्वरांचे नियमन करते म्हणून त्याला स्वरानुशासन मानतात. गायत्री वगैरे छंदात व्यंजनांबरोबर स्वरांची गणना होते. फक्त व्यंजनांची गणना करीत नाहीत. म्हणून त्या अक्षरांचा, स्वरांचा मेळ तो छंद म्हटला गेला. त्यात मात्रेप्रमाणे गणना होत नाही. मालिनी शार्दूल शिखरिणी वगैरे छंदात ती मात्रेवरून होते.

ऋग्वेदातील सर्वात जास्त ऋचा त्रिष्टुप छंदात आहेत. तरीही गायत्री छंद प्रधान छंद समजला जातो. कारण यज्ञात अग्नि हा प्रधान आहे. व गायत्री हा अग्नीचा छंद आहे. 'आग्नेयं गायत्रं' (ऐत. १-३०) गायत्रीच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे आहेत. 'अष्टाक्षरा वै गायत्री' (ऐत. १-३०) व तीन चरण आहेत,

अग्नि शिवाय सोम व सविता या देवांचा मुख्य छंदही गायत्री आहे. त्रिष्टुप छंदात पण अग्नि व सोमाची प्रार्थना आहे, तथापि त्रिष्टुप हा इंद्राचा छंद मुख्यतः आहे. 'ओजो वा इन्द्रियम् वीर्यं त्रिष्टुप (अैत. १-५) त्यात अकरा अक्षरांचे चार चरण असतात. त्यानंतरचा महत्वाचा छंद जो जगती तो बारा अक्षरांचा असून त्याचे चार चरण आहेत. द्वादशाक्षरा वै जगती (अैत. ब्राह्म. ३-१२) जगती हा छंद विशेषे करून अदिती, आदित्य व विश्वेदेवांचा समजला जातो. त्याचप्रमाणे पशुधनाच्या समृद्धीसाठी त्याचा उपयोग होतो. एकंदर आठ अक्षरांचा गायत्री, अकरा अक्षरांचा त्रिष्टुप व बारा अक्षरांचा जगती गणात समावेश होतो.

याप्रमाणे ऋग्वेद संहितेच्या वाङ्‌मयात छंदांना अतिशय महत्व आहे. जर गायत्री वगैरे छंदानुसार छांदस् संहितेचे संकलन केले तर हे सहज समजण्यासारखे सोपे होईल. या दृष्टीने नवव्या मंडलात ११४ सूक्ते आहेत त्यात १–६७ गायत्री ६८–८६ जगती, ८७–९७ त्रिष्टुप अशा क्रमाने रचना केलेली आहे तसेच त्यानंतर अनुष्टुप, बृहती, उष्णिक, प्रगाथ व पंक्ति हा छंदाचा क्रम व्यवस्थित लावलेला दिसतो म्हणूनच नवव्या मंडलास छांदस् संहितेचे एक रूप म्हणता येण्यासारखे आहे.

दुसऱ्या एका दृष्टीनेही या नवव्या मंडळाला महत्व आहे. याच्या सर्व सूक्तांत पवमान सोम या एकाच देवाची स्तुति प्रार्थना केलेली आहे. अर्थात दुसऱ्या मंडलात पवमान सोमाची सूक्ते आहेत. परंतु पावमानी ऋचा या नावाने नववे मंडल प्रसिद्ध आहे. या मंडलात एकच देव आहे म्हणून त्याला दैवत संहिता म्हणता येईल याचप्रमाणे इतर मंडलातून दैवत संहितांचे संकलन केले तर त्यात मुख्यत्वे अग्नि व इंद्र हे देवच येतील. ऋग्वेदात अग्नीवर २०१३ मंत्र आहेत. इंद्रावर २८६२ मत्र आहेत. सोमावर १७७५ आहेत. बाकीच्या चार हजार मंत्रात मरुत, विश्वेदेव, अदिती, अदित्या, सारखे गण, त्याचप्रमाणे सूर्य सवित्याची विविध रूपे. भग, पूषा, मित्र, वरुण, अर्यमा या सर्वांची स्तुति प्रार्थना आहे. ऋग्वेदाच्या प्रत्येक मंडलाची सुरुवात अग्निसूक्ताने करून नंतर इंद्र सूक्ते व त्यानंतर इतर देवांचो सूक्ते असा क्रम आहे.

या मागच्या तात्विक रहस्याच्या दृष्टीने पाहिल्यास अग्नि, इंद्र वगैरे देवांच्या वर्णनात एक प्रकारच्या आदर्शाची प्रतिष्ठा केलेली आहे. निसर्गाच्या सामान्य क्रमात दिव्यत्वाचे निरुपण केलेले आहे. हे देव हाच वेदांचा विषय आहे हे देव मानवाचे चरित् घडवणारे आहेत. ज्याप्रमाणे अंधःकार असतो तो तेजाने, प्रकाशाने, किंवा ज्योतीने दूर होतो. त्याचप्रमाणे माणसाच्या मनातील अज्ञान दूर करणारी अग्नि ही ज्योति आहे. इंद्र ही ज्योति आहे. सूर्य ही ज्योति आहे. वेदातील अग्नि हा सामान्य अग्नि नाही चुलीत पेटणारा अग्नि नाही. अग्नि हा पुरोहित आहे. कवि आहे गृहस्थ आहे.

युवा आहे. या अग्नीच्या ठिकाणी एक प्रकारचा उष्मा आहे तो हृदयाचे चैतन्य प्रेरक बळ आहे. त्याचबरोबर तो दिव्य भावना देणाराही आहे. त्याला जठराग्नि पण म्हटलेले आहे. तो वैश्वानर अग्नि असून ज्ञानाग्निही आहे. अग्निचा स्पर्श झाला तर तो भाजतो. पण अग्नि हा मनाचा देव आहे. अंतःकरणाचा अंतर्यामी आहे. तो हृदयाचा स्वामी आहे. जेथे जेथे म्हणून ऊब आहे. चैतन्य आहे, गति आहे तेथे सगळीकडे अग्नीचा वास आहे हे अग्नीचे विज्ञान आहे, ते अधिभूत आहे. त्याचेच दिव्य विज्ञान ते आधिदैव आहे व तेच अध्यात्म विज्ञान.

वेदात अग्नीच्या विविध रूपांचे वर्णन आहे. त्याच्याशी संबंध जोडतात त्यांचा तो मित्र होतो, पिता होतो. पुरोहित होतो. परंतु मैत्री न साधणाऱ्यांना तो शत्रू वाटतो. जीवनास अवरोध करणारा वाटतो. परंतु वस्तुतः त्याच्या साह्याने प्रगतीचा मार्ग विस्तृत होतो, अवरोध दूर होतो व शत्रू नाहीसे होतात.

मानवी जीवनास प्रेरणा देणारा जसा अग्नि आहे तसा जीवनाचे रक्षण करणारा इन्द्र आहे. अग्नि सर्जक आहे तर इन्द्र हा पालक आहे. अग्नि हे ज्ञानाचे प्रतिक आहे तर इन्द्र हे बलाचे आहे. एक ब्रम्ह बल आहे जे मन मति हृदयातील अंतरीची प्रेरणा आहे. तो इंद्र क्षात्रबल पण आहे. हातापायातील शक्ति व शारिरिक बल देणारा आहे. इन्द्र हा इन्द्रियांचा अधिष्ठाता आहे. त्याचे दिव्य वज्र इन्द्रियांच्या विकासासाठी साह्य करते. वज्राला अनेक दाते आहेत. त्याची गति अविरत असून शक्ति अमोघ आहे. त्याच्या रचनेत पाषाण व धातूचा उपयोग होत नाही. दधीचि एक ऋषि आहेत. तेच वेदाचे दधयक् आथर्वण आहेत. त्यांच्या अस्थीतून वज्र निर्माण झालेले आहे त्या दधिचींना अग्निचा उष्मा ब्रह्माचे ओजस व तपाचे वर्चस्व प्राप्त झालेले आहे.

इंद्र व त्याचे वज्र हे एक प्रतीक आहे. त्यात ब्रह्मबल व क्षात्रबलाचा समन्वय साधलेला आहे. समाज राष्ट्र व विश्वाच्या कल्याणासाठी हा समन्वय साधलेला आहे राष्ट्राची ही दोन्ही बले एकमेकास पूरक आहेत पण त्यांच्यात जेंव्हा परस्पर संघर्ष निर्माण होतो तेंव्हा त्यातून राष्ट्राचा विनाश होतो. माणूस माणसाला साह्य करतो. परस्परांशी सहकार्य केले जाते त्यास प्रत्यक्ष शक्ति म्हटले आहे. ती शक्ति आपण प्रत्यक्ष पाहू शकतो. तिचा अनुभव घेऊ शकतो. देव जे साह्य करतात ते प्रत्यक्ष दिसत नाही म्हणून त्यास दैवीसाह्य म्हटले आहे.ती परोक्ष शक्ति आहे तिचे रहस्य उकलण्यासाठी तप करावे लागते. ज्ञान मिळवावे लागते. विज्ञानाचा शोध लावावा लागतो.

अग्नि व इंद्र हे जसे देव आहेत तसाच पवमान सोमही देव आहे. परंतु त्यांच्यात फार मोठा फरक आहे. अग्नि व इन्द्र मानवाचे सहायक आहेत, बल देणारे आहेत वसु देणारे आहेत. अन्न देणारे आहेत तर पवमान सोम स्वतःच दिव्य अन्न आहे.

अमृत पेय आहे. जीवनाचे रसायन आहे. सोमवल्लीला कुटून वाटून तयार करून पावमानी गाळणीतून सोमाचा एक एक थेंब ठिबकतो गति करतो 'पवते' तो पवमान सोम इन्द्रासाठी तयार करण्यात आलेला आहे. 'दिवः पीयुषम् उत्तमम् ।'

'सोमम् इन्द्राय पातवे । सुनोता मधुमत्तमम् ।' सोम म्हणजे काही मादक अथवा सामान्य पेय नाही. ज्या प्रमाणे अग्नि हे ज्ञानाचे व इन्द्र हे बलाचे प्रतीक आहे त्याचप्रमाणे सोम हे दिव्य अन्नाचे प्रतीक आहे म्हणून तर उपनिषदात म्हटले आहे "देवा नाऽश्नन्ति नाश्नन्ति, अमृतं दृष्ट्वैव तृप्ता भवन्ति ।" हे देव खात नाहीत पीत नाहीत ते अमृताच्या दर्शनानेच तृप्त होतात. देवांशी साधलेला हा मनोयोग आहे. सहज रितीने. निसर्गोपचाराच्या पद्धतीने तो साधावयाचा आहे तो सिद्ध होताच कायेचा कल्प होतो, जीवनात परिवर्तन होते. सापाने कात टाकावी तसा माणूस आपले स्थूल, स्वार्थपरायण जीवन टाकून सेवापरायण होतो. परोपकाराची कामे करू लागतो. यज्ञभावना विकसित करतो. तो सोमपान करून स्वतः इन्द्र होतो. इतरांना प्रेरणा देतो 'अहमिन्द्रो न पराजिग्ये' मी स्वतः इन्द्र असून अपराजित आहे.

यो मर्त्येषु अमृत ऋतावा देवो देवेषु अरतिर्निधायि । होता यजिष्ठो महना शुचध्यै हव्यैरग्निर् मनुष ईरयध्वे । (ऋग २-२-१)

वामदेव ऋषि सांगतात की हाच तो अग्नि आहे जो मर्त्य मानवात अमृत होतो व देवात देव होतो. जो 'ऋतावान्' निसर्ग नियमाला अनुसरणारा तसेच अरति म्हणजे दानशील होतो त्यानेच देवरूप व मानवरूप धारण केलेले आहे. हा अग्नि स्वतःच होता आहे व यजनशील अध्वर्यु पण आहे. त्या अग्निचे तेज धारण करणाऱ्या हविष्याने आहुतींच्या द्वारे मानवाची वृद्धी केली आहे.

येथे अग्निचे आवाहन करणारा व अग्नीस तेजस्वी आहुती प्रदान करणारा यांचे ऐक्य साधलेले आहे. ते एकरूप झालेले आहेत, देवाला भजणारा स्वतःच देव होतो. देव भाग्य वाढवणारा 'भगवान' म्हणून आम्हीही भगवान होतो.

'भग एव भगवानस्तु देवाः । तेन वयं भगवन्तः स्याम । (ऋग्वे. ७-४१-५-यजु ३४-३८)

अग्नि, इन्द्र, सूर्य, सोम वगैरे देवांची स्तुति प्रार्थना करणारे मानव ऋषि होतात, मंत्रद्रष्टे होतात. ते विषयास छंदोबद्ध करतात. पद व पदार्थांचा सुयोग साधतात, त्या विषयी ब्रह्मवादी म्हणतात,

'तदेतत् कौकुरुंडेर्वचनम्–: वेदयन्ते त्रिभिः पर्यायः यः संपूर्ण पश्यति ।'
छन्दस्तो देवतातो निगमत इति स मंत्रदर्शी भवति ।(संहितोपनिषद् ब्राह्मण ३-२१)

यात मंत्रदर्शी हा शब्द ऋषि या अर्थी आहे. दृशर प्रेक्षणे - या धातूपासून ऋषि हा शब्द होतो त्याचा अर्थ आहे दृष्टा, धातूतील प्रथम व्यंजनदकाराचा लोप व र ा ृ परिवर्तन वैदिक व्युत्पत्तीत सामान्य आहे.

ऋग्वेदाचे देव व छंद यांच्या विषयी जाणून घेतल्यावर ऋषींचा परिचय करून घेणे आवश्यक आहे कारण त्यांच्या दिव्य दृष्टिस जे दर्शन झाले त्या भावाला त्यांनी शब्दरूप दिले त्यांच्या त्या वाणीस कविता म्हणा ऋचा म्हणा की मंत्र म्हणा त्यांची मननशील भावना या दिव्य वाणीतून प्रगट झाली आहे, म्हणून त्या त्या ऋषींना स्वतःच्या तपोमय दिव्य जीवनात जी आगळी अनुभूती झाली तिचे प्रत्यक्ष दर्शन वेदवाणीद्वारा घडते.

वेद दर्शनाचार्य स्वामीश्री गंगेश्वरानंदजी महाराजानी ऋग्वेदाच्या दहा मंडलाच्या आधारे वेदोपदेश चंद्रिका नावाचा नीति ग्रंथ लिहिला आहे. त्यात परिशिष्ट ३ मध्ये ऋषि विचार नावाचे प्रकरण आहे. त्यातील काही अवतरणे पुढे दिली आहेत-

'ज्या ऋषींनी अधिक तप केले त्यांना अधिक मंत्रांचा, अधिक सूक्तांचा लाभ झाला. ऋग्वेदाच्या मंत्रद्रष्टया ऋषींची संख्या ४०३ आहे. या ऋषींचे दोन वर्ग करता येतील. एकाकी व कुलपरंपरेस अनुसरणारे यांत कुलपरंपरेतील सात ऋषि मुख्य आहेत. गौतम भरद्वाज, विश्वामित्र, जमदग्नि, कश्यप, वसिष्ठ व अत्रि. गौतम कुल-परंपरेत ४ भरद्वाज परंपरेत ११, विश्वामित्र परंपरेत ११, जमदग्नि परंपरेत २, कश्यप परंपरेत १०. वसिष्ठ परंपरेत १३ व अत्रि परंपरेत ३८ ऋषींची नांवे आहेत.

या सात परिवारात पण चार कुले मुख्य आहेत, अंगिरस, भार्गव, काश्यप आणि आत्रेय. अंगिरस कुलात ५६ ऋषि आहेत. ते सर्वात अधिक आहेत गौतम व भारद्वाजांचा त्यात समावेश आहे, भार्गव कुलात वैश्वामित्र व जामदग्न्यांचा समावेश आहे. वसिष्ठ कुलात काश्यपही येतात. आत्रेय परिवार मात्र स्वतंत्र आहे.

प्रजापतीने यज्ञद्वारा तीन पुत्र निर्माण केले. भृगु अंगिरा व अत्रि

यदभृज्यत तस्माद् भृगुः समभवत् । तस्य संतप्तस्य सर्वेभ्यो अंगेभ्यो
रसो अक्षरत् सो अंगरसः अभवत् । अंगरसं सन्तम् अंगिरा इत्याचक्षते ।
(गोपथ ब्राह्मण १ )

भृगुंचे पुत्र कवि, च्यवन वगैरे आहेत त्यांचा एक पुत्र ऋचिक त्याचा पुत्र जमदग्नि व त्याचा पुत्र परशुराम ऋचिकाने दिलेल्या प्रसादाचे भक्षण केल्याने गाथीची पत्नी विश्वा हिला विश्वामित्र हा पुत्र झाला. त्याचा पुत्र शुनःशेप या प्रमाणे विश्वामित्र परिवार भृगुकुलात समाविष्ट झालेला आहे.

अंगिरा ऋषींचे दोन पुत्र उचथ्य व बृहस्पति. बृहस्पतीचे चार पुत्र भरद्वाज. अग्नि. तपुर्मूधा व शंयु. भरद्वाजाचा पुत्र पायु. उचथ्थाचा पुत्र दीर्घतमा त्याचा पुत्र कक्षीवान त्याला काक्षीवती व घोषा या दोन मुली शबर व सुकीर्ती हे दोघे त्याचे पुत्र. याप्रमाणे भारद्वाज कुल अंगिरस परिवारातील आहे. आठव्या मंडलाच्या काण्व परिवारातील ३३ ऋषींचा समावेश पण अंगिरसातच होतो कारण यांचा मूळ पुरुष हा घोर आंगिरसांचा पुत्र आहे.

या आंगिरस परिवाराशी गौतम परिवाराचाही संबंध आहे. आंगिरांचा पुत्र रहूगण. त्याचा पुत्र गौतम व त्याचा पुत्र वामदेव. वामदेवाचा भाऊ बोधा व त्याचा पुत्र एकद्यु आहे. वसिष्ठ परिवाराचा समावेश कश्यप परिवारात होतो. कारण मरिचिचा पुत्र कश्यप. त्याचे दोन पुत्र मैत्रावरुण व वसिष्ठ. वसिष्ठाचे शक्ति व पराशर. अत्रि परिवार हा स्वतंत्र आहे. अत्रिचा पुत्र भौम. त्याचा अर्चनाना. त्याचा पुत्र श्यावाश्व. श्यावाश्वाचा अंधिगु श्यावाश्वी आहे.

याप्रमाणे पहाता ऋग्वेदाच्या ऋषींच्यात ४३ कुल परिवार आहेत. आणि ८२ एकाकी ऋषि आहेत. त्यात आंगिरसांचे ५६, आत्रेय ३८, काण्व ३३, भार्गव १४ ऐन्द्र १४ वैश्वामित्र १२, भारद्वाज ११ काश्यप १० प्राजापत्य ९, व बाकीच्या परिवारातील त्याहूनही थोडया ऋषींची नावे आहेत. त्यात आग्नेय आथर्वण, आप्त्य, कौत्स, गौतम, गौंपायन, तापस, दैवोदासि. बाह्य. भारत, भौवन, मानव, आगत्स्य, यामायन. वातरशन. वार्णागिर, वैरूप. वैवस्वत, सर्प, सौहोत्र वगैरे आहेत.

संसारात एक मार्ग आहे स्वार्थाचा, जवळचा मार्ग, लहानसे लक्ष्य, त्यात जीवन संपून जाते. पण ज्या मानवाच्या कायेचा कल्प झालेला आहे त्याचा अध्वा-मार्ग विस्तृत आहे. त्या मार्गे कोणाचा ध्वंस नाही. पीडा नाही. हिंसा नाही तो 'अध्वा' आहे. आणि त्या मार्गाचे रक्षण करणारे ते अध्वर. सेवा व परोपकाराची साधना करणारे, अध्वर म्हणजे यज्ञ. व तो मार्ग अनुसरणारे ते अध्वर्यु त्याने अध्वर यज्ञाची दिक्षा घेतली. म्हणून तो ऋत्विज म्हटला जातो. त्याने आपल्या यज्ञात अग्नि इन्द्र व सोम यांना आवाहन केले. तो होता म्हटला गेला त्याने गीते म्हटली म्हणून तो उद्‌गाता व स्थिर राहून, मौन पाळून मंत्रब्रह्मास त्याने यज्ञाच्या मार्गाने जतन केलें म्हणून तो ब्रह्मा समजला गेला.

संसारात स्वार्थ साधू पहाणाऱ्याचे जीवन एकाकी होऊन जाते. पण सेवा आणि सहकार्याचे जीवन एकाकी जगता येत नाही. त्यात अनेकांचे सहकार्य असते. मिळवावे लागते. या प्रकारच्या सहकार्याचे यज्ञ पहिल्यांदा देवांनी रचले होते. त्या यज्ञात अग्नि हा होता, इन्द्र उद्‌गाता, बृहस्पति अध्वर्यु, व प्रजापति ब्रह्मा होते. या प्रकारची अनेक कथानके व उपाख्याने ऐतरेय वगैरे ब्राह्मण ग्रंथात पहावयास मिळतात त्यांत देवांच्या विषयी वेगवेगळया व्याख्या केलेल्या आहेत त्याच बरोबर वेद मंत्रांचे द्रष्टे जे ऋषि आहेत त्यांच्या विषयीचे निरूपण पण या ब्राह्मण ग्रंथात पहावयास मिळते म्हणून छंद व देव या विषयी विचारणा रुजू करताना ऋषींच्या परिचयाचेही महत्व तितकेच आहे.

सूक्तात देवांची नावे मिळतात तितक्या स्पष्टपणे ऋषींची नावे मिळत नाहीत. बहुधा ऋषींचा उल्लेख गुणवाचक विशेषणाने पण केलेला दिसतो म्हणून

मंत्रदृष्टचा ऋषींचा परिचय मिळवण्यासाठी ब्राह्मण ग्रंथ बृहद्देवता व अनुक्रमणी सूत्रग्रंथ वगैरेंचा आधार घ्यावा लागतो ऋषींच्या चरित्र आलेखनात त्यांच्या सूक्तांनी महत्वाचा भाग वठवलेला आहे. जसे अग्नि अथवा इंद्र यांच्या विषयी सामान्य माहिती सारखीच असली तरी ऋषि ऋषींच्या दर्शनात प्रत्येकाचे वेगळे वैशिष्ठय आढळून येते. एका ऋषिंना इंद्र हा मित्र–सखा वाटतो. तर दुसऱ्याला तो पालक पिता वाटतो वरूण व त्याचे पाश यांची कोणाला भिती वाटते तर शुनःशेपाला त्या पाशात अध्यात्मिक रहस्य पहावयास मिळते. तर वसिष्ठ वरूण पाशात सापडले तेंव्हा वरूण-पित्याची स्नेहभावना जागृत करण्यात त्यांना सफलता मिळाली.

हा आदर्श जीवनाचा एक दृष्टीकोन आहे. सूक्तातील मंत्रद्रष्टयांच्या विशेष दृष्टीने तो पारखण्याजोगा आहे. मंत्रद्रष्टचा ऋषींची ही वाणी आहे. दिव्य भावनेने अंतरीच्या प्रेरणेत खोलवर जाऊन केलेले विशेष आलेखन या कवितेत आहे.

वर सांगितल्या प्रमाणे एका संदर्भात छांदस् संहितेचा उपयोग होतो तसा दुसऱ्या संदर्भात दैवत संहितेची मदत होते. त्याच प्रमाणे किंवा त्याहूनही विशेष सूक्तांचे संकलन द्रष्टचा ऋषींच्या क्रमाने केले तर आर्ष संहितेची एक विशेषता त्यातून स्पष्ट होते. ऋग्वेद संहितेची दहा मंडले आहेत. त्यातील दोन ते सात ही मध्यम मंडले एकेका ऋषींच्या सूक्तांचे संकलन आहे. व तेही सूक्तांच्या संख्येच्या चढत्या क्रमाने लावलेले आहे. आठवे मंडल पण त्या क्रमात येते.

| मंडल | ऋषि | सूक्त | मंत्र | मंडल | ऋषि | सूक्त | मंत्र |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २ | गृत्समद | ४३ | ४२९ | ६ | भरद्वाज | ७५ | ७६५ |
| ४ | वामदेव | ५८ | ५८९ | ७ | वसिष्ठ | १०४ | ८४१ |
| ३ | विश्वामित्र | ६२ | ६१७ | ८ | काण्व प्रगाथ वंश | १०३ | १६३६ |
| ५ | अत्रि. | ८७ | ७२७ | | | | |

पहिल्या मंडलाची १०४ सूक्ते ऋषींच्या क्रमानुसार लावलेली आहेत. परंतु दहाव्या मंडलाच्या १०४ सूक्तात विषयांची विविधता दिसून येते. त्यात नासदीयासारखे भाववृत्त रुजू करणारे सूक्त, पुरुष सूक्त किंवा हिरण्यगर्भ सूक्त या सारखी सूक्ते एका बाजूस तर दुसरी कडे यम-यमी संवाद, उर्वशी पुरुरवासंवाद अशी संवाद सूक्ते आहेत.

मानवी जीवन, चारित्र्य यांच्या घडणीत साहित्याचे योगदान काही–थोडे थोडके नाही. खरे पहातां जे स-हि-त–हितकारी तेच साहित्य म्हणायचे. हंसान जशी

नीर–क्षीर वेगळे कढण्याची विवेक शक्ति आहे तशी ती माणसात जागी व्हावी, बरे स्वीकारून वाईट ते टाकून द्यावे या प्रकारचा बोध साहित्यातून मिळतो. या दृष्टीने रामायण, महाभारत, भागवत, पुराणे. व पंचतंत्र तसेच काव्यरूपाने रुजू केलेली कथानके व आख्याने बोधप्रद आहेत. व चारित्र्य निर्मितीच्या दृष्टीने महत्वाची आहेत. पुराणातील आख्यानासारखी ऋग्वेदाची कथानके व आख्याने प्रसिद्ध नाहीत. तथापि विश्वासाहित्यात ऋग्वेदाला प्रथम स्थान दिलेले आहे. परंतु एक काळ असा होता की त्याचे महत्व फक्त पठन पाठना पुरतेच मर्यादित राहून त्याची अर्थ संगति लावणे दुर्घट होऊन गेले. असे झाल्यामुळे माणसाला बोधप्रद म्हणून त्याचा काही उपयोगच उरला नाही. साहित्य मग ते कोठल्या का कालातले असेना समाज रचनेसाठी त्याचा उपयोग होत नसेल तर ते विस्मृतच होणार. नावापुरता अवशेष राहिला तरी त्यात काय ?

आज एका परीने वेद या नावाबद्दल अपार आदर दिसतो पण दुसरीकडे वेद म्हणजे खरोखरीच काय आहे याबद्दलचे अज्ञानच समाजात बहुधा दिसून येते. त्यातील बोधप्रद, चारित्र्य घडवणारी नीति तिचा परिचयच समाजाला नसेल तर तिचे मूल्य कितीही मोठे असले तरी लोकांचा त्यापासून कोठलाच लाभ होणार नाही.

साध्या सरळ आणि आणि मधुर वाक्यात बोध रुजू करण्याची रसप्रद शक्ति जेवढी ऋग्वेदाच्या बोधवाणीत आहे तेवढी शक्ति इतरत्र क्वचितच दिसेल. नेहमी वापरण्यात येणाऱ्या दैनंदिनीच्या पानापानावर सूक्ते देता येतील इतकी क्षमता या वेदवाणीत आहे शिवाय चारित्र्य घडवतील असे अनेक प्रसंग पण त्यात वेगवेगळ्या प्रकारे आलेखलेले आहेत.

तसे पाहता पुराणात वेदाच्या कथानक आख्यानांचा विस्तार खूप मोठ्या प्रमाणात आहे. पण त्यात इतर घटनांची भरही घातली गेली आहे, सरळ वेदकथांना हात घालणारे ग्रंथ म्हणजे बृहददेवता व त्यानंतर नीतिमजरी. हे करावे व हे करू नये या प्रकारे मानव जीवनात ज्या नीतिचे आचरण करावयाचे त्या नीतीचा बोध मूळ ऋग्वेदाच्या ऋचांचे प्रमाण देऊन त्यात रुजू केलेला आहे 'एव कर्तव्यम् एव न कर्तव्यम् इत्यात्मको यो धर्मः नीतिः' नीतिमंजिरीचे लेखक श्री. द्विवेदी (१५५० विक्रम संवत्) हे गुजराती नागर ब्राह्मण होते, ऋग्वेदाचाच सरळ आधार घेऊन त्यांनी नीतिकथा लिहिल्या आहेत. वेदांती ऋषींच्या नीतिमान जीवनाचे चित्रण करण्यात या ग्रंथाने अपूर्व सिद्धी मिळवली आहे.

आजच्या बुद्धिमान विचारकांच्या पुढे एक प्रश्न उभा आहे. मानवी जीवन घडवण्यात, चारित्र्याचा आदर्शबोध देण्यात वेदांचा भाग किती ? असत्य फसवणूक

कपट. तप, क्लेश लोभ लालसा वगैरे पासून दूर राहून माणूस एका सत्याच्या व नीतीच्या मार्गाने चालण्याचा प्रयत्न करीत असतो. तेव्हा त्याला वेदांचा उपदेश मिळू शकेल काय ?

वेद दर्शनाचार्य स्वामी श्री. गंगेश्वरानंदजी महाराजांनी स्वत:च्या त्यागमय जीवनाद्वारे वेद प्रचाराचे एक मात्र लक्ष्य साध्य केले आहे आणि त्यानी वेदसाहित्याच्या प्रकाशनासाठी व प्रचारासाठी वेदांनुसंधानात ज्यांना रस आहे. अशा विद्वान व वेद प्रेमी लोकांचे सहकार्य मिळवून वेदांची अमृतवाणी आदर्श व बोधप्रद रितीने रूजू करावी असा विचार केला. त्याचं फलित म्हणून वेदोपदेश चंद्रिका ग्रंथ प्रकाशित झाला. त्याच्या पूर्वभूमिकेत त्यांनी श्री. द्विवेदी यांच्या नीतिमंजरीची प्रतिष्ठा स्पष्ट केली आहे.

ज्याप्रमाणे रामायण, महाभारत, भागवत तसेच पुराणातील नीतिकथा लोकांना सरळ, मधुर बोध देणाऱ्या आहेत त्याच प्रमाणे वेदातील बोधकथा पण माहिती व्हाव्या अशा शुभ आशयाने स्वामीजींनी वेदोपदेश चंद्रिकेची रचना केली आहे. ऋग्वेदाच्या १०८ ऋच्यांचावर ९० कथा आधारित आहेत व त्यांच्याशी संबंधित १०२ श्लोक आहेत. नीति विषयक दृष्टीचे हे एक उदाहरण आहे त्याप्रमाणे दुसऱ्या अनेक कथा रचता येतील.

ऋग्वेदाची प्रधान देवता अग्नि आहे. त्या विषयीच्या दोन कथा तेथे सांगितल्या आहेत. त्याबद्दल म्हटले आहे की वेदोपदेश चंद्रिकेची सुरूवात अग्नि वंदे या श्लोकाने केली आहे व तिचा उपसंहारही अग्निनारायणाच्या प्रार्थनेने करण्याचे औचित्य दाखवलेले आहे,

बंधु मेधां यशो ब्रह्म वेदान् रत्नं भगं व्रतम् ।

आहाराग्ने धनानि अष्टै नत्वा त्वा प्रार्थयामा हे : वेदोपदेश चं. १०१

हे अग्नि नारायण, आम्हाला आठ प्रकारचे धन द्यावे म्हणून आम्ही तुम्हाला नमन पूर्वक प्रार्थना करतो. बंधू-संबंधीजन, मेधा-बुद्धि, यश-कीर्ति, ब्रह्मतत्व, चारवेद रत्न, भग-भाग्य. आणि व्रत पालन हे आठ प्रकारचे धन हीच मनुष्याचा खरी संपत्ति आहे, ती देणारा म्हणून अग्नीला 'रत्न धातम्' म्हटले आहे, जीवनाची सात्विक संपत्ति समृद्ध करून जीवनाचा आदर्श निर्माण करणाऱ्या वेदोनारायणाला प्रणाम,

**– आचार्य विष्णुदेव पंडित**

# श्री. विष्णुदेव पंडितांच्या ग्रंथावरील काही अभिप्राय

वेदात अपौरुणेय ज्ञान व ते प्राप्त करून घेण्याच्या क्रिया सुसंबद्ध व मनोवैज्ञानिक रितीने दाखवण्यात आलेल्या आहेत. जगातील तो सर्वात प्राचीन ग्रंथ आहे सर्वांना मूळ वेद वाचणे शक्य नाही. सरळ भाषेत ते उपलब्ध करुन देण्याचा आचार्य श्री विष्णुदेव पंडित यांचा प्रयत्न स्तुत्य आहे. शाळा महाशालांच्या विद्यार्थ्यांना यातून दिव्य अनुपम सामुग्री उपलब्ध होईल, ही मोठीच उणीव भरून काढण्याचा हा जबरदस्त प्रयत्न आहे.

– **शांतीलाल ठक्कर** एम्. ए. विद्याभास्कर

वेद हे अनुभवाचे ज्ञान आहे. जीवनात प्रत्यक्ष उतरवण्याचे ज्ञान आहे. वेदांचे पाठ करतात. अर्थही केले जातात. परंतु वेदातील भाव प्रत्यक्षात उतरवणे ही मुद्याची गोष्ट आहे. वेदाप्रमाणे जीवन जगायला हवे. तरच वेदांचा उपयोग. गीतेने वेदवादाची निंदा केली असली तरी वेदविद्‌ांच्या अनुभव ज्ञानाची प्रशंसाच केलेली आहे. वेद मंत्र म्हटले की स्वर्गप्राप्ती होते ही समजूत अपूर्ण आहे. वेद या जगातील जीवनास उतरवले पाहिजेत.

वेद परिचय लेखक श्री. विष्णूदेव पंडित हे वेदांचे खरे जाणकार आहेत. वेद साहित्याचा त्यांनी फार चांगला अभ्यास लेलेला आहे. तत्वज्ञानी साधुपुरुष आणि वेदविद् वैज्ञानिकांच्या अनुभवाच्या साररुपाने त्यांना जे लाधले ते या पुस्तकात उतरवण्याचा हा सफल प्रयत्न आहे. त्यांची भाषा सरळ व लोकभोग्य आहे त्या शिवाय वेदवाणीचा भाव अचूक टिपण्याचे आगळे चातुर्य त्यांच्या जवळ आहे.

**– रविशंकर महाराज**

परम आदरणीय महामना श्री. विष्णुदेव पंडितांच्या तेजस्वी प्रतिभेचा परिचय तो काय करून द्यायचा ? पंडितश्री संस्कृत वाङमयाचे, त्यातूनही वैदिक वाङमयाचे चिंतनशील विद्वान आहेत. या श्रेणीत त्यांनी ऋग्वेदासारख्या मूर्धन्य कोटीच्या ग्रंथाचे आराधन करून त्यांतील मंत्रद्रष्टचा ऋषिंच्या चिंतन धारेचे पान करवले आहे. ऋग्वेदासारख्या महान ग्रंथावर लिहिणे,त्यातील नवनीत सरळ शद्बात, सर्वभोग्य शैलीत सर्वसाधारण लोकांसाठी सादर करणे हे मोठे बिकट काम आहे, त्यासाठी तीव्र तपश्चर्या, कठीण परिश्रम, सतत स्वध्याय याशिवाय ते शक्य होण्याजोगे नाही. आनंदाची गोष्ट ही की श्री. विष्णुदेव पंडितांनी हे अवघड कार्य अत्यंत सरलतेने पार पाडले आहे.

मूळ ऋग्वेद संहितेच्या आधारे रचलेल्या या ग्रंथात श्री विष्णुदेवांच्या सर्जन प्रतिभेचा मौलिक स्पर्श अनुभवगम्य बनतो. त्यांच्या शैलीत सरलता प्रवाह आणि विविध उदाहरणांच्या योगाने येणारी प्रत्यायन क्षमता व प्रासादिकता आहे. काही ठिकाणी पुनरुक्तीचा दोष वरवर पहाता जाणवतो पण त्यामुळे अर्थबोध सरळही होतो. म्हणून पुनरुक्ति हे त्या दृष्टीने दूषण नाही पण भूषण आहे. त्यांच्याकडून असे अनेक ग्रंथ मिळवण्याचा आपला अधिकार आहे.

**डॉ. भगवतीप्रसाद पंड्या**

गांधीजी स्वतः भारतीय संस्कृतीचे प्रतीकरूपच होते. पाश्चात्य संस्कृतीचे भारतावर होत असलेले आक्रमण रोखून धरण्यासाठी झालेल्या प्रयत्नात त्यांचा फार मोठा वाटा आहे. म्हणून 'नई तालिम' पद्धतीच्या शाळांतून वेदपरिचय पुस्तिका हे चांगले पुस्तक मानले जाईल. परंतु दुःखद परिस्थिती अशी आहे की आजकाल शिक्षण क्षेत्रात काम करणाऱ्या शिक्षकांना व अधिकाऱ्यांना त्यात रस वाटत नाही. जसे आहारात लाडू आवडत नाही पण भजी आवडतात तसेच सर्वच क्षेत्रात आढळून येते 'नई तालीम' पण समाजात आपला पाय रोवण्याच्या प्रयत्नातच आहे म्हटले तरी चालेल. आमच्या सर्वोदय योजने खाली चालणाऱ्या शाळातून या पुस्तकाचा प्रचार करता येईल.

**– शिवाभाई पटेल**

प्रथम पुस्तकाला पू. स्वामी श्री गंगेश्वरानंदजींचे आशीर्वाद लाभले. त्याचा प्रकाशन विधी पू. काकासाहेब कालेलकरांच्या हस्ते झाला. साहित्य स्वामी श्री उमाशंकर जोशी यांची प्रशस्ति ह्या पुस्तकाला लाभली. त्याच प्रमाणे सहाव्या पुस्तिकेच्या पुरोवचनात काका साहेबांनी म्हटले आहे,

वेदांचा परिचय करून देणारांची भषणे मी लहानपणापासून ऐकतो आहे. कित्येकदा मूळ वेदाहून परिचयच दुर्बोध, जड असतो. ते पाहून मी म्हणे हे लोक वेदांचा भार वहातात' पण आपले विष्णूदेव पंडित वेदज्ञान पचवू शकले आहेत. म्हणून त्यांनी करून दिलेला वेदपरिचय वेद समजून घेण्याच्या दृष्टीने फार उपयोगी आहेच परंतु त्याहूनही विशेष म्हणजे त्यांच्या वाणीने वेदाविषयी उत्साह आणि प्रेम वाटू लागते.'

श्रमातून श्री निर्माण करतात ते आश्रमास लायक आहेत. बाकीचे सारे श्रमांनी थकतात. श्री विष्णू देवांनी वेदावर परिश्रम करून वैदिक ऋषींचे आशिर्वाद प्राप्त करून घेतले आहेत हे मला तरी स्पष्ट दिसून येते आहे. म्हणून त्यांच्या लिखाणातून आपल्याला प्रसन्नतेची 'श्री' मिळते. खरा वेदप्रचार अशा 'श्रीयुत' पंडितांच्या द्वारेच होऊ शकेल.

**– काका कालेलकर**

वेंद परिचय श्रेणीचा आरंभ आपल्या वर्तमानकालीन समाज जीवनात वैदिक संस्कार परंपरेस नव्याने प्रवाहित करण्याच्या दृष्टीने खूपच मंगल आहे. गुजरातची सांस्कृतिक समृद्धि वाढवणाऱ्या श्री. मोटा यांचे प्रोत्साहन व परम श्रद्धेय वेद दर्शनाचार्य प्रज्ञाचक्षु श्री. गंगेश्वरानंदजींचे आशिर्वाद या श्रेणीला लाभले आहेत. तसेच युनिव्हर्सिटी ग्रंथ निर्माण बोर्ड गुजरात राज्याच्या अध्यक्षांच्या विशेष प्रयत्ना-मुळे ही श्रेणी प्रकाशित होऊ शकली. या सर्व सुमेळात वेदशास्त्र संपन्न आचार्य श्री. विष्णुदेव पंडित यांची साधनाही त्यात मिसळली आहे. सरळ सुबोध भाषेत त्यांनी जे सार लेखन केले आहे ते फारच सुरस व रुचिकर आहे. हातात पुस्तक घेतल्यावर वाचून संपवल्या शिवाय ते खाली ठेववत नाही. आजच्या व उद्याच्या पिढीची त्यांनी ही फार महत्वपूर्ण सेवा केलेली आहे. त्याचा लाभ घरोघरी परिवार संस्कार समृद्ध करण्यासाठी शक्य तेवढा व्हावयास हवा.

**– मदालसा नारायण**

---o---

# १ / जीवन एक प्रयोगशाळा

**(ऋग्वेद : प्रथम मंडल)**

त्या ऋषींचे नाव होते मधुच्छंदा. जसे नाव तसेच त्यांचे गुण. जीवनातला सारा 'मधु'-गोडवा-सौंदर्य शोधावे, त्याचा आस्वाद घ्यावा, हा त्यांचा स्वभावच होता. त्यांचा तो छंदच होता.

अर्थात् हा गोडवा शोधण्यासाठी खूप खूप तपश्चर्या करावी लागली. ऋषि जेव्हा विद्यार्थी होते तेव्हा गुरुच्या घरी, गुरुकुलांत रहात. तेथे सर्व विद्यार्थी-वर्गाला गुरुंची आज्ञा होती—'सकाळी लवकर उठावे.' नियमाप्रमाणे सर्व विद्यार्थी लवकर उठत.

मधुच्छंदाने विचार केला. 'सकाळी लवकर उठावे' हे बरोबर. पण उठून करायचे काय? त्यांनी गुरुदेवांना विचारले. गुरु मितभाषी होते. त्यांनी उत्तर दिले 'फिरावे.'

'फिरावे—कोठे फिरावे—कशासाठी फिरावे.' हे प्रश्न कसे विचारायचे? 'उठावे आणि फिरावे.' हा मंत्र घेऊन जीवनचर्या सुरू झाली.

सकाळी लवकर उठले की सगळीकडे अंधार असे. पक्षीही उठलेले नसत. कोंबडा आरवण्याच्या देखील आधी ऋषी उठून फिरायला निघत.

आश्रमापासून थोड्याच अंतरावर नदी वाहत होती. तिचा अविरत मधुर नाद त्या नीरव पहाटेच्या वेळी कानाला मोठा गोड वाटला. तो ऐकून ऋषींची पावले तिकडे वळली. पण त्या मार्गावर घोर अंधार होता. मार्ग दिसेना. पाऊल उचलावे तरी कसे?

तेथून दूर, नदीकिनाऱ्याजवळ एक झोपडी होती. त्या झोपडीसमोरच्या अंगणात अग्नीची वेदी होती. त्या वेदींत अग्नि प्रकट झाला की त्याचा प्रकाश पडे. गाढ अंधारात त्या प्रकाशाची रेखा पडली की पाऊलवाट दिसू लागे. त्या तेजाच्या आधारे नदीच्या किनाऱ्यावर जाणे सहज शक्य होई.

चालता चालता विद्यार्थी मधुच्छंदाच्या मनात विचार आला, 'अहो! रात्रीच्या निबिड अंधारात हा प्रकाश किती सुंदर दिसतो आहे. दिवसाच्या उजेडात त्याचे हे माधुर्य, मूल्य काहीच कळत नाही!'

भावनाप्रधान मन मग अग्निबद्दल विचार करू लागले. "हा अग्नि कोणी बरे प्रकट केला असेल? त्या तेजाच्या शलाकेला कोणी बरे समिद्ध करून प्रज्वलित ठेवले? तेजाची पखरण करून अग्नि अंधार नाहीसा करतो. म्हणूनच अग्नि हा देव या देवाने कोणाचे नि कोणते हित साधले बरे? कोणी या देवाचे आवाहन केले? कोणाच्या अंगणात याचे प्रथम पाऊल पडले असावे?'

असे अनेक प्रश्न मनात येत होते. समोर डोळे मार्ग दाखवीत होते. पावले त्या मागून पडत होती. पण मन मात्र विचारात गुंगले होते. आचार आणि विचारांची संहिता आपोआपच त्या विद्यार्थ्याला मिळत होती.

'रोज सकाळी लवकर उठावे आणि फिरावयास जावे' हा विद्यार्थ्याचा नित्य नियम झाला होता. वाहत्या नदीचा खळखळ आवाज कानावर येताच कान टवकारले जात. दूर अग्निचा प्रकाश दिसे. तो पहाताच डोळे चमकू लागत. पायात नवा जोम येई. आणि मनात नवनवीन विचारधारा सुरू होत

जीवनाचा पहिलावहिला बोधपाठ त्या विद्यार्थ्याला त्याच्या जीवनचर्येतून मिळत होता. अग्निमध्ये त्याला अलौकिक दैवताचा वास असल्याचा साक्षात्कार झाला. अग्निविषयी मनात आदर व सन्मान जागला आणि त्या प्रकाशात मनात उद्भवलेल्या प्रश्नांची उत्तरे आपोआपच सापडू लागली. अग्निच्या दर्शनाने मनात अहोभाव निर्माण होऊ लागला त्याने अग्निची स्तुति गायली.

'खरोखरीच मनःपूर्वक मी अग्निदेवतेचे पूजन व स्तवन करतो अग्निदेवच पुरोहित आहे, यज्ञाचा अधिष्ठाता आहे, ऋत्विज आणि होताही तोच आहे. त्याने उत्तम रत्ने धारण केलेली आहेत.

आजवर या देवतेचे स्तवन अनेक ऋषि मुनींनी केलेले आहे त्याचप्रमाणे नवे नवे ऋषिवरही याचे स्तुतिगान करीतच आहेत. कारण अग्नि देवरुप धारण करून माझा जीवन यज्ञ प्रज्वलित करीत आहे. तोच दुसऱ्या देवतांनाही आपल्या बरोबर घेऊन येत आहे.

हे अग्निदेव! पिता ज्या प्रमाणे पुत्राला स्नेहभराने भेट देतो तशीच भेट आपण मला द्यावी. आमचे जीवन कल्याणकारी करण्यासाठी आम्हांला, हे देव! आपण सिद्ध करावे.

पहाटेच्या प्रहरी हा विद्यार्थी नदीच्या पात्रात स्नान करून पाण्याने आपला घडा भरून घेई. वनातून कुश, दर्भ व समिधा गोळा करून गुरुकुलाकडे परत फिरे. त्यावेळी पक्ष्यांचा मधुर कलरव सुरू झालेला असे. गाईंचे हंबरणे कानावर येऊ

लाग. वासरे बागडतांना दिसत. अग्निशाळेत अग्नि प्रज्वलित झालेला असे. एक एक विद्यार्थी वेदमंत्राचा उच्चार करून अग्निला समिधा अर्पण करी. तुपाची आहुती देई. या प्रमाणे कुंडातील अग्नि 'समिद्ध' होई. त्या अग्निप्रकाशात गुरुजवळ बसून विद्यार्थी पाठाला सुरुवात करीत.

गुरुकुलात अनेक विद्यार्थी होते. मधुच्छंदा हा त्यांच्यातीलच एक विद्यार्थी गुरुकुलात राहून त्याने अनेक व्रते केली. तपश्चर्या केली. वेदांच्या ऋचांचे अध्ययन केले. गुरुकृपेने त्याचे आचार व विचार शुद्ध झाले होते.

गुरुदेव वत्सल पित्याप्रमाणे सर्व शिष्यांचा सांभाळ करीत, सर्वांना उपदेश करीत. एक गोष्ट ते वारंवार सांगत असत, 'मुलांनो मी जे काही शिकवतो ते समजून घेऊन आपल्या जीवनांत उतरवलेत तरच त्याचा उपयोग होईल. तुमचे आचार जर शुद्ध नसतील तर तुमचे विचारही दृढ होऊ शकणार नाहीत. आचार आणि विचार या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. मी मंत्र देतो ते तुम्ही मनन करावे म्हणून देतो. जसे मनन कराल तसे तुमचे जीवन घडेल. जीवन शुद्ध असू द्या. संस्कारी असू द्या, असे जीवन निर्माण करणे हे तुमचे पवित्र कर्तव्य आहे आणि त्यासाठीच आईवडिलांचे घर सोडून तुम्ही गुरुकुलात रहात आहात.'

गुरुकुलात राहून मधुच्छंदाने खूप विद्या मिळवली. विद्येच्या प्रभावाने अज्ञानाचा अंधार दूर होत होता. संस्कारांच्या प्रकाशाने जीवन उजळत होते. शरीर निर्मळ करण्यासाठी रोज स्नान करावे लागते त्याचप्रमाणे मनात, जीवनात साठणारा मळ दूर करण्यासाठी, त्यांची जडता, त्यांना व्यापून राहिलेला अंधार दूर करण्यासाठी ज्ञान आणि विद्येची आराधना करावी लागते.

गुरुकुलातील विद्यार्थ्यांचे जीवन उजळणारी विद्या त्यांना मिळावी अशी काळजी गुरुजन घेतातच. विद्यार्थ्यांच्या आचारात आणि विचारात विद्येचा प्रभाव उतरला किंवा नाही याचे प्रमाणपत्र पण गुरुंनीच द्यावयाचे. ज्यांना असे प्रमाणपत्र मिळेल तो विद्यार्थी स्नातकविद्या मिळवून शुद्ध झालेला म्हटला जाई. अशा योग्य स्नातकांना गृहस्थाश्रम स्वीकारण्याची आज्ञा गुरु करीत. अशी गुरुकुलाची रीत असे.

× × ×

सर्वत्र 'मधु' शोधण्याची जीवनदृष्टी लाभल्यामुळे त्याचे सारे जीवनच मधुर झाले, सुंदर झाले. ज्या अग्निदेवतेची त्याने स्तुती केली, त्या देवतेकडून त्याला आगळीच प्रेरणा मिळाली. स्वतःच्या घरात त्याने अग्निची स्थापना केली होती. त्याचे पूजन अर्चन करून त्यापासून प्रेरणा मिळवून तो पुढे पुढे जात होता.

गृहस्थ धर्माचे पालन व अग्निचे पूजन अर्चन करण्यासाठी त्याला योग्य व अनुकूल अशी सहधर्मचारिणी पत्नीही लाभली होती. तिच्या सहकार्याने त्याची संपत्ती व समृद्धी वाढत होती. त्याच्या पत्नीने एका सुंदर पुत्राला जन्म दिला.

घरात पाळणा हलू लागला. आई त्या बाळाचे प्रेमाने लालनपालन करीत होती. परंतु मधुच्छंदाला त्या बाळरूपातसुद्धा देवांचेच दर्शन होत होते. आईच्या मांडीवर खेळणाऱ्या त्या लेकराकडे तो डोळे भरून एकटक पहात राही. पत्नीला मोठे नवल वाटे. "इतकं काय एकसारखं पाहता ?" तिने विचारले.

स्वत:च्या त्या आवडत्या सहचारिणीला उत्तर देता देता त्याच्या अंगावर आनंदाने रोमांच उभे राहिले. त्यांच्या मनात घोळणारी कविता– त्या ऋचा शब्दरूप घेऊन प्रकट झाल्या–

'पाहिलेस सुदर्शने ? बाळ कसे सुरेख आहे. गोड आहे ! पण ते इतके सुंदर कसे झाले ? माहित आहे ? जीवनाच्या पहिल्या क्षणी त्याने पहिला श्वास घेतला आणि प्राणज्योती प्रकट झाली. तेवू लागली. जर तो श्वास घेतला नसता तर प्राणच प्रकटला नसता. हे सौंदर्य निर्माणच झाले नसते. प्राणाशिवाय असलेले कलेवर कोणाला बरे आवडणे शक्य आहे ? तुला देखील ते आवडले नसते !'

भोळी मुग्ध ऋषिपत्नी खाली पहात लाजून म्हणाली, 'असं काय बरं बोलता ? बाळ कोणाला बरं आवडल्याखेरीज राहील ?'

सहज विचारल्या गेलेल्या त्या प्रश्नाचे उत्तर ऋषींनी दिले, 'निष्प्राण असले तर बाळ देखील कोणाला आवडणार नाही. बालजीवनाचा आरंभ प्राणानेच झाला पाहिजे. प्राण देणारा देव आहे वायु. वायुच्या ठायी जी गति आहे, जे चैतन्य आहे तेच बाळाच्या कायेत प्रवेशते. वायु सुंदर आहे. त्याच्यामुळेच हे बाळही सुंदर आहे. वायु हा या प्राणाचा देव आहे. त्याच्यामुळेच बाळ जन्माला आला. त्याच्यामुळेच त्याला जीवन लाभले. वायुचा संचार नसला की जीवन संपते, जीव मृत्यू पावतो'

'पहा, पहा, सुदर्शने ! बाळाला शिंक आली. अरे हा जांभई पण देतो आहे. आणि ढेकर देखील ! प्राणदेवामागून अपान देव पण जागृत झाल्याच्या या खुणा आहेत. आता याच्या अंगांगांत स्फूर्ती भावनाशी झाली आहे. त्याच्या निद्रेला तंद्रेला दूर करून चैतन्य आणि स्फूर्ति देणाऱ्या कृपादेवतेचे नांव आहे इंद्र.'

जीवनाची सुरुवात वायुदेवाच्या प्रेरणेने होते आणि विकास इंद्राच्या कृपेने होतो.

हा तुझा पुत्र, सुरुवातीस डोळे मिटून झोपलेला असे. आता तो डोळे उघडतो. आजूबाजूस पहातो. तुझ्याकडे पहाताना त्या इवल्या डोळ्यांतून प्रेम ओसंडते आणि माझ्याकडे पाहताना पण तो स्नेह चमकतो. काण अंत:करण जागल्याची ही लक्षणे ! बाह्य करण म्हणजे त्याचे डोळे अंत:करण म्हणजे त्याचे मन. विवेकाचे चक्षु हे चक्षु मानव बाळाळाच लाभतात. पशु पक्ष्यांच्या बाळांना ते मिळत नाहीत."

मधुच्छंद ऋषींची ही वाणी सुदर्शना मनःपूर्वक ऐकून त्यावर विचार करी. ती समजून घेण्याचा प्रयत्न करी. आपल्या मुलाच्या प्रगतिकडे तीही मग त्या दृष्टीने पाहू लागली. तिला पतीचे सांगणे पटू लागले. आश्चर्यचकित होऊन ती विचारी, ‘मुनिवर हे सारे तुम्हाला कसे कळते बरे?’

‘मी गुरुकुलात होतो तेव्हा गुरुकृपेने जीवनाची रहस्ये कशी उकलावीत ते शिकलो. बाळाला पाहून तर मला वाटते की ही चालती बोलती जीवनाची प्रयोग-शाळाच तर नाही? जीवनाच्या विकासासाठी स्वर्गातल्या देवता त्याला प्रेरणा देत आहेत. चेतना देत आहेत. माझ्यावर अग्निने कृपा केली आणि त्या कृपेमुळेच मला मार्ग सापडत गेला. माझ्या जीवनाच्या आरंभापासून कोण-कोणत्या देवदेवतांनी माझ्यावर कृपेचा वर्षाव केला ते मला या बाळाकडे पाहिल्यावर कळते आहे.

बाळाच्या डोळ्यात मित्रदेवाचा वास आहे. आणि त्यामागच्या आंतर्चक्षु अंतःकरणाचा देव वरुण आहे.

माझ्या एका प्रश्नाचे उत्तर देशील सुदर्शना? तुलाच ते देता येईल. बाळाला पहिल्यांदा ऐकता येऊ लागले की पाहता येऊ लागले बरे? प्रथम नयन की श्रवण?’

‘मुनिवर! तुमच्या या गूढ ज्ञान गोष्टीत मला हो काय कळतंय?’

‘असे का बरे म्हणतेस? तू या बाळाची आई. तू नऊ महिने याला धारण केलेस. जन्म दिलास. नंतर त्याचे लालनपालन करीत आहेस. त्याची पहिली गुरू तूच आहेस.’

‘हे खरे माझे जीवन बाळाच्या जीवाबरोबर गुंफले गेले आहे आणि त्याचे लालनपालन करता करता माझ्या जीवनाची घडण घडते आहे. पण आपल्या सारखी ज्ञानदृष्टी माझ्या जवळ कोठून असणार?’

‘का बरे? तुला जे कळते आहे तेही थोडे नाही. बाळाला आता ऐकू येते यात शंका नाही. पहिल्यांदा तो नुसता पहात राही आता तो ऐकतो. दोन्ही कानांनी ऐकतो कानांचे देव आहेत आश्विनीकुमार. देवांची ती जोडी मोठी सुंदर आहे तसेच हे बाळही किती सुंदर आहे! त्याच्या प्रगतीचे एक एक माप तोलणारी तू – म्हणून तर तू त्याची माता.’

सुदर्शनेला हे सारे समजू लागले होते. तीही बाळाची प्रत्येक हालचाल त्या दृष्टीने टिपत होती. बाळ आता सहा महिन्याचा झाला. तो श्वासोच्छवास नाकावाटे करी. त्याची छाती फुले, आता चळवळही खूप करी. स्फूर्ति अंगात मावेनाशी झाली होती. त्याला ऐकू येई. समजून तो इकडे तिकडे पाही. आता तर स्वतः विचारही करीत असेल नाही?

एकदा असाच बाळ हात पाय हलवून सारे अंग घुसळीत होता. आईला पाहून तो हात वर करी. उठून बसण्याचा प्रयत्नही तो करू लागला होता. सुदर्शनेने प्रेमभराने त्याला उचलून घेतले. ती त्याच्याकडे डोळे भरून पहात होती तेवढ्यात मुनिवर आले. त्यांच्या हाती त्याला देत ती म्हणाली,

'मुनिवर, आपण नेहमी सांगता ते मलाही थोडे कळू लागले आहे. बाळाला आता एका जागी पडून रहाणे आवडेनासे झाले आहे त्याला पाळण्यात झोपवले तरी डोके बाहेर काढायचा प्रयत्न करतो. कुशी बदलतो. आता त्याला पाळणा नकोसा वाटतो. ही कोणत्या देवाची प्रेरणा असावी बरे ?'

हा योग्य प्रश्न ऐकून मुनिवरांना आनंद झाला.

'वा, वा सुदर्शने ! माझे म्हणणे काय ते तुला खरेच फार लवकर समजले. पण त्यांत आश्चर्यही नाही म्हणा. कारण हे बाळच आपल्या दोघांना शिकवीत आहे. हाच आपला गुरु आहे. बालक म्हणजे पित्याचा पिता !'

आता पहा हं– सुरुवातीला बाळाच्या शरीरात प्राण चेतवला वायुने. स्फूर्ति आणि चेतना निर्माण केली इंद्राने. बाळाच्या अंगांगांत चेतना, प्रेरणा, स्फूर्ति निर्माण करणारा तो महेंद्र, देवराज तोच शरीराचा राजा. त्याचे राज्य, म्हणून शरीराच्या अंगांना इंद्रिये म्हणायचे बाळाच्या प्रत्येक अवयवात इंद्राचा वास आहे.

वाणी ही मानव बाळांना देवांनी दिलेली एक अपूर्व देणगी आहे. जगातील इतर सर्व प्राण्यांना संचार व हलन चलनाची शक्ती मिळाली आहे त्यांना जन्मल्याबरोबर चालता येते उड्या मारता येतात खेळता येते. त्या मानानें माणसाची प्रगति फारच मंदपणे होते. त्याला जन्मानंतर पायावर उभे राहून चालण्यासाठी चांगली वर्षभर वाट पहावी लागते. तसेच बोलण्यासाठी पण बरेच दिवस लागतात.'

'पाहिलंत का ?' सुदर्शना मध्येच म्हणाली, 'हा ओठ हलवतोय् आणि अलीकडे तो आवाजही काढतो. त्याच्या रडण्यात देखील बोलण्यासारखा ध्वनी मधूनच उमटतो. असे वाटते, ही आता बोलायची तयारी."

"तुझे म्हणणे बरोबर आहे वाणीची देवता आहे सरस्वती. तिचा वास अंतरात असला, तर ती बाहेर प्रकटते. जसे विचार तशी वाणी. मनुष्यमात्रांच्या अंतरात तिचा वास आहे. वायूच्या गतीने जठरातील अग्नि प्रदिप्त होतो आणि त्या ठिकाणी नाद निर्माण होतो. हा नाद छातीच्या वर कंठनळीत प्रवेश करून तेथून मस्तकापर्यंत पोचतो. मस्तकातून खाली उतरून मुखात प्रवेश करतो. त्यामुळे जीभ हलू लागते आणि त्याबरोबर सरस्वती जागते. गोड शब्द निर्माण होतो. सुदर्शने, हे सारे समजून घेण्यासारखे आहे. नाक, कान व डोळे ही ज्ञानेंद्रिये, हात व पाय ही कर्मेंद्रिये. पण जीभ ही ज्ञानेंद्रिय आहे आणि कर्मेंद्रियसुद्धा आहे.

एवढयाशा जीभेला दोन्ही कामे करून वर शिवाय कोंडून रहावे लागते. हेच पहा ना–आंबट, खारट, तिखट, तुरट, कडू, गोड या सहा रसांचा स्वाद घेणारी आणि तो ओळखणारी जीभ हे ज्ञानेंद्रिय आणि बोलण्याचे काम करणारी जीभ हे कर्मेंद्रिय

वाणी आहे म्हणून तर माणसामाणसामध्ये व्यवहार चालतो. कारण आतले विचार, ज्ञान शब्दावाटे प्रकट होते. जे मनात असेल ते तोंडून बाहेर येते. जसे विचार तशी वाणी. म्हणून वाणीला बाह्यकरण कर्मेंद्रिये म्हणतात. आणि मनाला अंत:करण म्हणतात. वाणी जागृत झाली की वर्णवर्ण उजळून निघतो. अक्षरा अक्षरातून जणू दीप प्रगटतो. शब्द ज्योतीनी जगातील उत्तमोत्तम साहित्य रचलेले आहे. साहित्याशिवाय जग हे अंधाराने गुडुप झालेल्या गर्तेसारखेच होईल !

" वाणीचा महिमा एवढा दिव्य आहे हे आजच मला कळले. खरोखरीच बाळाला जोवर बोलता येत नव्हते तोवर तेही गोंधळून गेल्यासारखे असे. आता त्याला बोलता येते. त्याच्या मनातले सांगता येते. त्यामुळे आता तो किती आनंदात आहे. "

याप्रमाणे ऋषिपत्नी सुद्धा समजू लागली. बाळाचे पालनपोषण करता करता तिच्याही व्यक्तित्वाचा त्यातून विकास होऊ लागला. एका वर्षात त्या ऋषिपुत्राने केवढी तरी प्रगती केली होती. आई व वडील समजपूर्वक त्याचे संगोपन करीत होते.

× × ×

मधुच्छंदा हे ऋषि होते. मंत्रद्रष्टे ऋषि होते. मोठे विचारवंत होते. सर्वत्र सौंदर्याचे दर्शन त्यांना होई. सकाळी लवकर उठण्याच्या व्रतापासूनच सुरुवात झाली. ते व्रत तर त्यांचा स्वभावच झाल्यासारखे होते. जीवनांत येणारे कडू अनुभवही संसारात आल्याखेरीज कसे राहणार? पण त्यांचा स्वीकारही मधु-वृत्तीने करण्याचे महाव्रत हे मुनिवर कसोशीने पाळीत होते.

दिवे लागणीची वेळ होती. ऋषि अग्निच्या पूजेची तयारी करीत होते तोच सुदर्शना धापा टाकीत त्या जागी येऊन पोचली. धावत पळत आल्यामुळे तिला धाप लागली होती. ती खूप गोंधळून गेलेली दिसत होती. काहीतरी सांगायचे होते. पण कसे सांगावे ते सुचत नव्हते. ऋषिवर थोडावेळ तिच्या कडे पहात राहिले व मग गोड शब्दांनी बोलू लागले.

' चारु सुदर्शने ! किती सुंदर दिसते आहेस तू ! मनातले विचार व्यक्त कसे करावेत ते न कळल्यामुळे उडालेला गोंधळ तुझ्या रूपात किती भर टाकतो आहे ! '

मुनींचे ते निश्चित, शांत, प्रसन्न शब्द ऐकून बिचारी जास्तच गोंधळून गेली. आता यांना सांगावे तरी काय नि कसे ! संसारात एक एक अडचणी कशा येतात पण यांच्या मनाला त्याचा विचारही कसा तो शिवत नाही. सारा वेळ ' मधु ' ' मधु ' पण घरात मधाचा थेंब नाही त्याचे काय ? मधाचे एक असो पण धान्यही संपले आहे. तूप गूळ सारेच आणावयाचे आहे. हे आता यांना कधी नि कसं कळणार ? हे सारे सांगायचे काम आता मलाच करायला हवे– पण या ज्ञानी, विचारक आणि भल्या माणसाला संसारी दुःखांची जाणीव करून देणेही त्या बिचारीच्या जिवावर येत होते.

पत्नीला विचारात पडलेली पाहून मुनींनीच तिला विचारले, ' कसला एवढा विचार करते आहेस ? काय सांगायचे आहे ? आणि तू इतकी दमलीस कशामुळे ? सांग ना.'

' काय सांगू मुनिवर ! मधुतत्त्वाच्या विचारातून तुम्ही मोकळे व्हाल तेव्हा ना ! सारा वेळ ' मधु ' ' मधु ' केल्याने घरातला मधुघट थोडाच भरणार आहे ? घरात लागणारे दूध तूप मी आणायचे कोठून ? धान्यही संपले आहे. नवी पिके उतरेपर्यंत काय करू ? मला कळेनासे झाले आहे.'

' ओहोहो. तू या काळजीत पडली आहेस तर ! अग, धान्यधून्य ही सारी प्राथमिक साधनं. त्यांच्यासाठी का इतके गोंधळून जायचे ? एक गाय बांधली की दूधच दूध, नि जमीन नांगरली की ढीगभर धान्य. इतके साधे, सरळ गणित आहे हे. आणि मधमाशी रात्रंदिवस खपून मधाचा संचय करते. आपल्याला हवा असेल तेव्हां तिच्या पोळ्यातून मध घ्यायचा बाकी आपले जीवन म्हणशील तर व्रत आहे. प्रयोगशाळा आहे.'

' माझ्या देवराया ! आपले हे साधे, सरळ गणित संसारात काही उपयोगाचे नाही. जमीन नांगरली, पेरणी केली की ढीगभर धान्य मिळते ही खरी गोष्ट. पण यंदा धान्ये पिकलीच नाहीत. पाऊस पडला नाही. गाय दाराशी असली की दुभतेच दुभते. पण आपल्या दारची गाय आटली आहे आणि दुभती गाय होती ती कुरणातून आज परतलीच नाही. तिलाच शोधायला गेले होते. रानेवने तुडवली' पण सापडलीच नाही. गुराखी सांगत होते, तिला वाघाने नेली ! गाईला नेली. मला नाही नेलीन् म्हणून हे सारे सांगायला तुमच्यासमोर येऊन उभी आहे !'

इतक्या साऱ्या अडचणींना तोंड देतानाही सुदर्शनेला हसणे सुचत होते. कारण ऋषींची जीवनदृष्टी तिलाही मिळाली होती. मधुतत्त्वाचे दर्शन तिलाही होत होते. म्हणून तर घरातल्या अडचणींचे रडगाणे न गाता ती हसतच त्याबद्दल सांगत होती. पण मुनिवर मात्र ते ऐकून विचारात पडले. संसारात या अशा अडचणी जर वारंवार येऊ लागल्या, तर प्रगतिच्या मार्गात मोठाच अडथळा

निर्माण झाल्याखेरीज रहाणार नाही. धन, साधन या सामान्य जरुरीच्या वस्तु माणसांना सहज मिळाल्या पाहिजेत पण वस्तुस्थिती वेगळी आहे. त्या मिळवण्यातच जीवन सरून जाते. माणसा–माणसांत त्यामुळेच उच्च–नीच, गरीब–श्रीमंत असे भेदभाव निर्माण होतात. हे सारे नाहीसे करायला हवे.

मुनिवर विचारमग्न झालेले पाहून सुदर्शनने ताडले की आता या मधुतत्वाच्या प्रयोगशाळेत नवा विचार आणि त्याच्या प्रक्रिया हे चक्र फिरू लागणार. पण नुसत्या विचारांनी अडचणी दूर होत नाहीत. विचारांच्या जोडीला आचारांची आवश्यकता आहे. आता आपले अनुभवाचे चार शब्द सांगून ही विचारतंद्री दूर करायलाच हवी.

ती शांत मृदु स्वराने म्हणाली,

'देव ! आपण परत विचारात पडला. पण नुसती काळजी किंवा विचार करून त्याचा काय बरे उपयोग ? विचार करून का घरात मध नि धान्य येऊन पडणार आहे ? त्यासाठी उद्यम करायला हवा. जीवनाचा खरा योग–उद्योग. त्या योगानेच जीवन सफल होते.'

'तुझे म्हणणे खरे आहे. पण मी काय करू ? मला सुचत नाही. तू सांगशील तो उद्योग करायला मी तयार आहे.'

'मुनिवर ! आपण ऋषींमध्ये श्रेष्ठ आहात. येथून जवळच सरस्वती नदी आहे. त्या नदीच्या तीरावर एका महायज्ञाची तयारी चालली आहे. आपण तेथे जाऊन त्या यज्ञाचे ऋत्विजपद घ्यावे. दक्षिणा म्हणून मिळेल ते धन घ्यावे. म्हणजे संसारातल्या आपदा दूर होतील.'

स्वतःच्या प्रिय पत्नीच्या सूचनेप्रमाणे ऋषि सरस्वती नदीच्या तीरावर यज्ञमंडपात जाऊन पोचले. त्यांना सर्वच जण ओळखत होते. मोठ्या मानाने सर्व लोक त्यांना सामोरे जाऊन यज्ञस्थानी घेऊन गेले आणि आपसात म्हणू लागले, 'ओहोहो अहो ! हेच ते ऋषिश्रेष्ठ मधुच्छंदा. जीवनभर प्रयोग करून यांनीच जीवनातला मधु गोळा केला आहे. एका मधुतत्त्वाचाच यांना छंद आहे. त्यामुळेच त्यांना मधुच्छंदा म्हणतात.'

यज्ञाच्या यजमानाने त्यांचा भावपूर्वक सत्कार केला व यज्ञाच्या मुख्य हो–त्याच्या जागी त्यांची स्थापना केली. अग्निला आहुत करून, बोलावून, जो देवांना आहुती घेण्यासाठी आमंत्रण देतो व देवतांना विधिपूर्वक हवि अर्पण करतो त्याला 'होता' असे म्हणत.

मधुच्छंदा होत्याच्या जागी बसले. तो महायज्ञ त्यांनी संपूर्णपणे पार पाडला. यज्ञाची पूर्णाहुति झाली तेव्हा यजमानाने सर्व ऋत्विजांना यथायोग्य दान दक्षिणा

देऊन संतुष्ट केले. मधुच्छंदा ऋषींना आपल्या पुरोहित पदावर स्थापले व त्यांनाही खूप धनधान्य देऊन त्यांची मनोकामना पूर्ण केली.

ऋषि सारे धन व साधनं घेऊन घरी परतले. मिळालेले सर्व पत्नीच्या स्वाधीन करूत स्वत: निश्चितपणे आपल्या ज्ञानसाधनेत रमून गेले.

× × ×

गृहस्थ जीवन सरळ व सुंदर रितीने चालवण्याचा उत्तम मार्ग मधुच्छंद ऋषींना आता सापडला होता. त्याना मोठमोठ्या यज्ञांसाठी आमंत्रणे येऊ लागली. त्यांनी अग्निची सूक्ते रचली होती. अग्नि म्हणजे देवांचा पुरोहित ऋषींनी त्याच्या त्या रूपाचीच स्तुती केली होती. आणि ऋषिवर स्वत: यज्ञाचे पुरोहितपद संभाळीत होते. यज्ञाची देवता म्हणून ते अग्निचे दर्शन करीत होते. व त्याना बोलावणारे यजमान त्यांनाच प्रत्यक्ष यज्ञदेवता मानीत होते. देवांच्या यज्ञकर्मात अग्नि ऋत्विज आणि होत्याचे पद संभाळी. पृथ्वीवर ती जागा ऋषींच्याकडे होती. अग्निदेव सुंदर रत्नालंकार अंगावर घालीत. ऋषि आपल्याला मिळालेली रत्ने व सुवर्ण सुदर्शनेच्या स्वाधीन करीत.

ऋषिवरांच्या सहवासात सुदर्शनासुद्धा सुखी आणि समाधानी होती. मधुच्छंदांना साधनेबरोबरच फिरण्याचाही छंद होता. दूर दूर जावे आणि जगाला व्यापून राहिलेले मधुतत्त्व शोधून त्याचा आनंद लुटावा हेच त्यांचे जीवन होते. गृहस्थ जीवनाचे महाव्रत पण त्यांनी उत्तम रितीने पार पाडले.

ऋषींनी खूप यात्रा केल्या. नद्यांच्या काठाकाठाने परिक्रमा केली. नदी व सागर यांचा संगम पाहून त्यांना आनंदाचे भरते येई. गगनचुंबी पर्वतशिखरे चढताना त्यांच्या उत्साहाला उधाण येई. पण एका शिखरावरून दुसऱ्या शिखरावर जाण्यासाठी खाली उतरावे लागे ते मात्र त्यांना आवडत नसे. एका शिखरावरून सरळ दुसऱ्यावर जाऊन पोचावे असे वाटे. मनात असा विचार घोळत असतानाच एक पक्षी उडाला आणि पंख पसरून समोरच्या शिखरावर जाऊन उतरला. 'मी पक्षी असतो, मलाही असे पंख असते तर!' ऋषींना वाटले. त्या विचाराला आतून आणि बाहेरच्या दशदिशांतून प्रतिसाद मिळाला, 'अरे ऋषिवर! त्यासाठी पक्षी होण्याची काय आवश्यकता? तुम्ही कवि आहात. कल्पनेचे पंख पसरून मनाच्या गतिने कोठेही विहार करण्याचे वरदान तुम्हाला लाललेले आहे. आता ही पायपीटी किती दिवस करणार?'

'खरे आहे!' ऋषींना पटले. किती दिवस असे फिरत राहायचे? आता एका जागी राहावे. जीवनाला कोणी सागराची उपमा देतात, तर कोणी पर्वताची. पण मला तरी ही एक मोठी प्रयोगशाळाच वाटते. जीवन हेच माझे यज्ञकर्म यज्ञाची देवता अग्नि आणि यजमान आहे इन्द्र.

या प्रमाणे कल्पनेचे पंख पसरले. मधुच्छंदांनी इंद्राची स्तुती गायली. मंत्रांतून इंद्रमूर्ती साक्षात् उभी केली. इंद्र म्हणजे देवांचाही राजा. प्रचंड, मोठ्या पर्वताहूनही विशाल. आकाशात फिरणारा मेघराजाच तो. त्याच्या वज्राचा एक घाव पडला की ढगांचे फुटून तुकडे होत आणि मग पाऊस पडू लागे. सारीकडे हिरवेगार होऊन जाई. वृक्ष वेलींवर नवी पालवी फुटे– असा हा देवांमध्ये श्रेष्ठ महेंद्र !

ऋषि त्याची मूर्ती साक्षात पहात असल्यासारखी त्याची स्तुती करीत होते. तो खरोखरीच वीज चमकली आणि साक्षात् देवेन्द्र तेथे प्रकट झाले.

'ऋषिराज ! आपण मला का बरे बोलावले ?' तो देवाधिदेव विचारू लागला. 'तुमचा यज्ञ कोठे आहे ? समिधा कोठे आहेत ? सोमरसाचे पात्रही कोठे दिसत नाही ! यज्ञाच्या सुरुवातीपूर्वीच तुम्ही मला बोलावले ?'

'यावं यावं देवराज ! माझ्या जीवनयज्ञाची सुरुवात केव्हाच होऊन चुकली आहे. आता पूर्णाहुतीची घटका जवळ येत चालली. म्हणून आज आपले स्मरण केले. ज्ञानाचा अग्नि प्रज्वलित ठेवण्यासाठी मी कल्पनेच्या समिधा त्याला अर्पण करतो आहे आणि सोमरस माझ्या ऋचांतून काठोकाठ भरलेला आहे. माझी वाणी ऋचांचे रूप घेऊन चरणांचरणांना गुंफून आपले मधुर स्तुतिगान करीत आहे. एकेका शिखरावरून दुसऱ्या शिखरावर झेप घ्यावी तशी ही गिरा एकेका चरणातून एकेक उत्तुंग शिखरच ओलांडीत आहे. गीति गाणारे तुमचाच महिमा गातात ऋचा म्हणणारे तुमचेच अर्चन करतात. ब्रह्ममंत्राचे योजक तुम्हालाच अर्घ्य देत असतात. तुमचेंच पूजन या सर्व कर्मांतून होत आहे.'

ऋषींचे भावसुंदर भाषण ऐकून इंद्र प्रसन्न हसून म्हणाला, 'ऋषिवर ! तुम्ही भावनाशील आहात. म्हणूनच ज्या देवाचे चिंतन तुम्ही करता त्याचे दर्शन तुम्हाला होते इतकेच नाही तर त्या देवतेशी तुम्ही एकरूप होऊन जाता ! अग्निची उपासना करता करता तुम्ही स्वतः तेजरूप पुरोहित होऊन गेलात. यज्ञदेव, ऋत्विज आणि होता झालात. हा तुमचा अग्निदेव तुमच्या शुष्क समिधा ग्रहण करून प्रसन्न होईल. पण मला या समिधांचे काय होय ? मी सोमरसाचा चाहक. तुम्हाला रानावनातून फिरताना पाहिले नि मला वाटले तुम्ही माझ्यासाठी सोमवल्ली शोधून काढली की काय ! सोमरसाची पात्रे भरून मगच मला निमंत्रण देण्याची रीत आहे. कोठे आहे सोमरस ?"

"देवराज ! अशी घाई करूं नये. सोमरस भरलेला आहे. देव ! केवळ सोमवल्लीतच सोमरस असतो असे थोडेच आहे ! मला तर तुमच्या हजारो नेत्रांतून सोमरस भरलेला दिसतो आहे. आणि तुमच्यामुळे माझे सारे जीवन सोमरसातच निथळते आहे. मधु म्हणजे सोमच. माझ्या जीवनाच्या क्षणाक्षणात आपलाच वास नाही का ?

तुम्ही वर्षा आणणारे देव. पावसाच्या थेंबातून अमृत झरते. त्याच्या स्पर्शाने सुकल्या समिधांना पालवी फुटते. त्या समिधाही सोमरसाने भरून जातात. रसरशीत होतात हे स्तोत्र, ही गिरा, या ऋचा सफल होवोत. देवराज आपण प्रसन्न व्हा !'

'धन्य ऋषिवर! आपले जीवनव्रत हा खरोखरीच यज्ञ आहे. आणि त्याच्या सुरुवातीपासून मी तुमच्यातच आहे. जीवनाच्या मध्यकाळी वायुबरोबर माझी स्थापना केली होती आणि आता जीवनाच्या संध्याकाळी मला आवाहन करून सोम-रसासारख्या मधुर वाणीचे अर्घ्य मला दिलेत. खरंच ही यज्ञाच्या पूर्णाहुतिची मंगल घटिका आहे.'

जीवनयज्ञाची पूर्णाहुति करून देवराजांनी निरोप घेतला. त्यांच्या बरोबरच वायु, मित्र, वरुण, अश्विनीकुमार आणि सरस्वतीही जाण्याची तयारी करू लागली. अग्निदेवानेही निरोप मागितला. यज्ञाची समाप्ति होताच निरोप मागणाऱ्या त्या देवतांच्याकडे ऋषि विस्मयाने पाहू लागले. वाणी विराम पावली. इंद्रिये शिथिल झाली, शरीराच्या शक्ति क्षीण झाल्या. पण जीवनात परमसिद्धि मिळवल्याचा परमसंतोष मनात काठोकाठ भरलेला होता

एक विद्यार्थी म्हणून त्यांनी जीवनाला आरंभ केला. आदर्श गृहस्थ म्हणून मध्यकाळ घालवला. जीवनाला त्यानी यज्ञ मानले होते. एक प्रयोगशाळा मानले होते जीवनाच्या सतत अभ्यासातून त्यांना 'मधु' मिळाला होता. मधुतत्त्वाचे दर्शन झाले होते. त्यांच्या आर्यदृष्टीने 'मधुविज्ञान' शोधून काढले होते. जीवनाच्या शेवटच्या संध्याकाळीही ते मधुचे रहस्यच उकलीत हाते.

'खरोखर ही भूमि म्हणजे सर्व भूत पदार्थांतील मधुच आहे. या भूमि, साठीच तर भूत पदार्थ मधु धारण करीत आहेत. त्याचप्रमाणे जल, अग्नि, वायु-सूर्य, दिशा, चंद्र, वीज, ढग, आकाश, धर्म, सत्य, मानवता हे सारे त्या मधुतत्त्वा-चेच आविष्कार. जी ज्योति आत्मा होऊन माझ्या जीवनाचा दीप चेतविते तिचा अंतरतम रस तोच 'मधु'. गोड आणि सुंदर!'

मधुच्छंदा ऋषि मधुच्छंदाचे गान गाता गाताच विराम पावले. ज्या रितीने त्यांनी जीवनाकडे पाहिले, जीवनाचा अनुभव आणि उपभोग घेतला त्याच रितीने ते पूर्ण करून त्यांनी परम शांती मिळवली.

卐 卐

# २ / जन्मभूमीची आठवण

(ऋग्वेद : प्रथम मंडल)

त्या गुरुकुलाचे कुलपति होते गुरु विश्वामित्र. ते मंत्रद्रष्टे ऋषि होते. ज्या मंत्राचे स्वत:ला दर्शन होई त्या मंत्रांचे दान करण्याची त्यांची भावना होती म्हणूनच त्यांनी गुरुकुलाची रचना स्वत:च्या व्यवस्थेला अनुरूप अशी केली होती. ते स्वत:च मंत्रद्रष्टे, मंत्राचे गायक आणि मंत्रदातेही होते.

गुरुकुलात राहणारे विद्यार्थी विद्येचे अभ्यासक तर असतच पण मंत्रदान करणाऱ्या विश्वामित्राना ते सर्वजण आपल्या जन्मदात्या वडिलांप्रमाणे मानीत. असे शंभर विद्यार्थी पुत्र त्या गुरुकुलात होते त्या सर्वांना मंत्र मिळाले होते.

मंत्रसिद्धी मिळवलेल्या व गुरुकुलात राहणाऱ्या त्या सर्व विद्यार्थ्यांच्या मनांत ममता होती की, हे गुरुकुल 'आमचे' आहे. विश्वामित्र हे 'आमचे' वडील आहेत, आणि त्यामुळे स्वाभाविकच त्यांच्यात कुटुंब भावना निर्माण झाली होती.

विश्वामित्र हे नावाप्रमाणे विश्वाचे मित्र होते परंतु पूर्वायुष्यात त्यांनी खूप यातना सोसल्या होत्या. सहन केले होते. आणि खडतर तपश्चर्या करून मंत्रदर्शनाची सिद्धी मिळवली होती.

त्यांच्या शिष्यांमध्ये एकाच्या मनांत खरीखुरी जिज्ञासा जागृत झाली होती. त्याच्या मनांत ऋषींच्या जीवनाविषयी जाणून घेण्याची इच्छा होती. एकदा हात जोडून त्याने नम्रतेने विचारले.

'भगवन् ! आपण एकदा राजे होता ?'

'होय. मी राजा होतो. राज्य करीत होतो. त्या सत्तेमुळे माझे भान हरपले होते. मी रागीट झालो आणि त्या रागाच्या भरातच एक दिवस राज्य सोडून तप करायला सुरुवात केली. खडतर तपश्चर्या करून प्रथम मी माझा क्रोध जिंकला. माझ्या तपश्चर्येने इंद्राचे आसनही डळमळू लागले.'

'आणि मग गुरुदेव — आपल्या तपात विघ्न आले.' मुनि विश्वामित्राला तपापासून चलित करण्यासाठी मेनका नावाची अप्सरा आली होती ते त्या विद्यार्थ्याला ऐकून माहीत होते.

'होय, वत्सा! माझे तप भंगले. साऱ्यांना ते माहीत आहे. मी परत पहिल्यापासून तपश्चर्येला सुरवात केली. आधीच्या तपाने क्रोध विरघळला. नंतर काम गेला. कामाला जिंकण्यासाठी फारच कठोर, घोर तप करावे लागले.'

'त्याच्या योगानेच आपण राजर्षिचे ब्रह्मर्षि झाला. आणि आता तर मंत्रद्रष्टेपद सुद्धा प्राप्त झाले.'

'खरे आहे वत्स देवराता! जीवनाचे हे वेगवेगळे मार्ग आहेत. काहीं वर वर जातात तर काही खाली खोल जातात. आणि पुन: वर चढतात.'

'गुरुदेव, ज्या मंत्रांचे आपल्याला दर्शन घडले त्यांचे रहस्यही आपल्याला उकलले असेलच ना?'

'अर्थातच विश्वाला मी मित्राच्या डोळ्यांनी पाहिले. त्याच दृष्टीनें जगाची ओळख करून घेतली. माझ्या जीवनात त्या योगाने नवे प्राणांनी प्रकटले. त्या विश्वाला प्रेरणा दिली. मी 'मी' राहिलो नाही. विश्वाच्या अणुरेणूत मिसळून मी विश्वरूप झालो. विश्वाच्या देवतांनी आणि शरीरात प्रकटलेल्या प्राणांनी माझे जीवन घडवले. मी **विश्वामित्र** झालो.'

गुरुदेवांच्या मनोभावना जाणून घेणारा देवरात गुरुकुलात नवीनच आलेला होता. पण गुरुच्या हृदयालाच त्याने हात घातला होता. त्यांच्या जीवनाचे रहस्य जाणून घेऊन खरेखुरे ज्ञान मिळवण्यासाठी तो झटत होता. त्यामुळे तो त्यांचा प्रिय शिष्य– प्रिय पुत्र झाला होता.

गुरुकुलातील आपल्या शंभर शिष्यांना बोलावून मुनिवर विश्वामित्रांनी आदेश दिला,

'माझ्या लाडक्या मुलांनो, तुम्ही माझे जुने शिष्य आहांत रिद्धिसिद्धिची सारी साधने या गुरुकुलात तुम्हाला मिळालेली आहेत. देवरात तुमच्या मागून येथ आला. पण माझ्या जीवनाचे रहस्य त्याने जाणून घेतले आहे म्हणून आश्रमातला श्रेष्ठ विद्यार्थी म्हणून त्यालाच नेमावे असा माझा विचार आहे. तुम्ही सर्वजण त्याला आपल्या वडील भावासारखे मानाल ना? तुमच्या रिद्धिसिद्धीचा त्याला मोह नाही. तो स्वतःच मंत्रद्रष्टा आहे, ऋषी आहे. जीवनाची खरी समृद्धि त्याला मिळून चुकली आहे.'

गुरुकुलातील पन्नास शिष्यांनी गुरूंचा अभिप्राय मान्य केला गुरुदेवांना प्रणाम करून ते म्हणाले, 'पिताजी! आपला आदेश आम्हाला शिरोधार्य आहे.

आपली आज्ञा सदैव मधुर, योग्य आणि सुंदरच आहे– ही मान्यता हाच आमचा छंद आहे.'

'वा वा!' गुरु आनंदाने म्हणाले, 'म्हणजे तुम्ही सर्वच मधुच्छंदा झालात तर! देवरातालां आपला वडील बंधू मानून तुम्ही गुरुकुलाची प्रतिष्ठा वाढवली आहे.'

बाकीच्या पन्नास शिष्यांना आपल्या जुनेपणाचा अधिकार सोडण्याची इच्छा नव्हती. आम्ही मोठे, आमचे मोठेपण हिरावून घेतल्यावर बाकी काय राहिले? या भावनेने त्यांनी गुरुची आज्ञा न मानता स्वच्छंदाचा मार्ग पत्करला.

हे पाहून ऋषिवर विश्वामित्र उदास झाले. ज्यांना पोटच्या मुलासारखे मानून पालनपोषण केले, मंत्रदिक्षा दिली त्यांना आपल्या उत्तराधिकाराची हाव आहे– आपली संपत्ति हवी आहे, पण आदेश पाळण्याचे बंधन नको आहे–हे पाहून त्यांचा पुण्यप्रकोप जागा झाला, आणि ते बोलून गेले.

'माझे म्हणणे ज्यांना ऐकावयाचे नसेल व स्वच्छंदपणे वागावयाचे असेल त्यांनी गुरुकुलात राहू नये हेच योग्य. आज्ञा पाळणारे शिष्य मधुच्छंदा आहेत. बाकीच्या अनाधिकारी, स्वच्छंदी मुलांना घेऊन मी काय करू? तुम्ही येथून निघून जा.'

गुरुदेवांचे ते रागाचे उग्र भाषण ऐकून त्या पन्नास शिष्यांनी गुरुकुल सोडले. तेथून ते ज्या ज्या गुरुकुलात गेले तेथेही त्यांना थारा न देता सर्वांनीच निरोप दिला. तेव्हा गुरुकुलांच्या वसतीतून बाहेर पडून, पुण्यपवित्र आर्यभूमी सोडून ते पुढे निघाले. हिमालय ओलांडून वैरस्थान–(बलूचीस्तान) देशात ते जाऊन पोचले तेथूनही पुढे उत्तरेकडे आर्मान्य (इराण) राज्यात ते गेले.

त्या राज्यात त्यांच्याही आधी काही आर्यकुले आर्यभूमी सोडून येऊन राहिलेली होती. त्यांनी त्या ऋषिमुनींचे मोठ्या आनंदाने स्वागत केले.

'आपण सर्व इकडे आलांत हे फारच छान झाले. येथे रहाण्या जेवणाची किंवा निर्वाहाची काहीच काळजी करावी लागणार नाही. कारण आमच्याजवळ सुखसमृद्धीची साधने भरपूर आहेत ज्या पुण्यशाली आर्यभूमीतून आपण आलात तिकडचे उत्तम संस्कार आमच्या मुलाबाळांच्यावर आपल्या सहवासाने होतील आणि आमच्या सर्वांच्या जन्माचे सार्थक होईल.' असे म्हणून त्या लोकांनी सर्व ऋषीमुनींची रहाण्याची सोय केली. इच्छाभोजने घातली. ऋषींनी तेथील मुलांना शिकवण्यास सुरुवात केली. कारण दुसरे कोणतेच काम त्यांच्यापुढे नव्हते. पण आर्यभूमीचे संस्कार देण्याऐवजी त्या देशातील सुखासीन रहाणीकरणीच त्या तपस्व्यांच्या अंगवळणी पडू लागली. आणि ते स्वतःच त्या देशातील प्राकृत

लोकांच्या सारखे राहू लागले. त्यांच्या सारखेच खाण्यापिण्यात आणि सुखात मग्न होऊन गेले. संस्कार विसरत चालले.

या ऋषिमुनींच्या बरोबर एक लहानसा विद्यार्थी पण आर्यभूमीतून आला होता. तो ऋषिवर मधुच्छंदाचा मुलगा. तो विश्वामित्र मुनींच्या गुरुकुलात विद्याभ्यासासाठी गेला होता. गुरुजींची आज्ञा त्यालाही पटली नव्हती म्हणून तो आश्रम सोडून इतरांच्या बरोबर परदेशी येऊन पोचला होता. आर्यभूमीपासून दूरदूर या अनोळखी प्रदेशात त्याला करमेनासे झाले होते. पशुप्रमाणेच केवळ आहार विहारात रंगून गेलेल्या माणसांच्याकडे पाहून तो गोंधळून गेला होता. त्या माणसांच्या मुलांना विद्या आणि संस्कार देणारे त्याचे काका आणि ते शिष्य पाहून त्याला वाटू लागले अधिकाराशिवाय संस्कार देणे आणि घेणे जमावे कसे ? आणि तसेच घडू लागले. गुरुपदी बसलेले ते काका स्वतःच मन मानेल तसे वागू लागले सुखे हाताशी होती. सुखासीनांची संगत होती. तेच जीवन त्यांच्या अंगवळणी पडू लागले. पण या मुलाला मात्र तेथे चैन पडेना. त्याला वाटे 'हे का जगणे आहे ? सकाळी कोणी लवकर उठत नाही. मग मंत्र कोठले नि घोष कोठला ! येथे कोठे अग्निशाळा नाही अग्नि समिद्ध तरी कोठे नि कसा होणार ? समिधांचेही कामच नाही मग ! येथे अंथरुणातून उठल्यापासून खाणे नि पिणे मग रिकामटेकडे हिंडणे स्वाध्याय नाही की पाठ नाही. येताजाता खावे प्यावे आणि उरल्या वेळात त्याबद्दलच बोलत रहावे पशु, पक्षी आणि माणसे यांच्यात फरकच कसा तो नाही. आणि त्याचे काकाही या पशुजीवनात रमले होते. त्यांच्या मागोमाग आलेल्या या बटुला मात्र आपली जन्मभूमी वारंवार आठवत होती. तेथले वातावरण कसे पवित्र. पक्षी जागत त्यापूर्वीच ब्राम्हण उठून आपली नित्यकर्मे आटोपून गोड आवाजात देवांची स्तोत्रे म्हणू लागत.

थोडे दिवस तो बटू काकांच्या बरोबर त्या परदेशात कसाबसा राहिला. त्या भोगभूमीमध्ये दुष्काळ पडला. अन्नपाणी कमी पडू लागले. मोठे प्राणी लहानांना गिळून टाकू लागले. पशूंच्या सारखीच गत नरपशूंचीही होऊन गेली. सगळीकडे 'खा' 'खा' दुसरे काहीच उरले नाही.

लहानगा ब्रह्मचारी ही दुर्दशा पाहून कळवळला. त्याला गुरु विश्वामित्रांनी दिलेला मंत्र आठवला. 'सर्वांच्या ठायी मित्रभाव असू द्या. सर्वांच्या दुःखात सहभागी व्हा. सर्वांचे हित होईल असे करीत रहा.

गुरुमंत्राची आठवण होताच त्या लहानग्या शरीरातले प्राणतत्त्व जणू जागे झाले. अंगागांतून चेतना स्फुरू लागली. त्याला वेगळेच बळ आले. इंद्रियांचा नियंता साक्षात इंद्र समोर दिसू लागला. देवराजाच्या कृपेनेच पाऊस पडतो. दुष्काळ पळतो. त्याने इंद्र देवाची मनोमन स्तुती केली.

'हे देवराजा, इंद्रदेवा ! दूर देशी मी तुझें स्मरण करीत आहे. येथे धाव घ्या. नवनवीन भावनांना जोडणारे चिरयौवन तुमच्या ठायी आहे. तुम्ही कवि आहात. पुरांचा नाश करणाऱ्या पुरंदरा, गुंफा आणि बिळांची दारे उघडून टाकणाऱ्या देवा, सिंधूच्या पैलतीरी या. सदा विजयी, अपराजित देवराजा या भूमीवर दया करा. येथे पाऊस पडू द्या.'

त्या बटूची प्रार्थना त्याच्या तोंडून बाहेर पडली आणि आकाश ढगांनी भरून गेले. विजा चमकू लागल्या. ढगांचा गडगडाट सुरू झाला आणि मुसळधार पाऊस पडू लागला.

त्या देशातील लोकांना या लहान मुलाच्या सामर्थ्याचे आश्चर्य व कौतुक वाटू लागले. ते म्हणू लागले, 'या बटूच्या प्रेरणेने आणि स्तुतीनेच हा चमत्कार करून दाखवला. आणि पाऊस पडला.'

त्याच्याहून मोठे असलेले त्याचे काका मंत्रसिद्धी गमावून बसले होते. ते आता त्याला आदरपूर्वक मान देऊ लागले.

पण हा चमत्कार फार दिवस कोठला टिकायला ? दुष्काळाची भीती दूर झाली. सुकाळ झाला आणि परत सर्व लोक भोगविलासाच्या मागे पहिल्यासारखे लागले. एक तो बटू मात्र एकटा त्या मोहात फसला नाही. त्याला ती भोगभूमी नकोशी वाटत होती. मातृभूमीची ओढ लागली होती. भोगांच्या पाशातून सुटण्यासाठी तो धडपडत होता. तळमळत होता. त्याचे काका आणि इतर लोक त्याला पकडून ठेवण्यासाठी प्रलोभने दाखवीत होते. त्याच्या चारी बाजूला भोग आणि लालसेचे मायाजाळ पसरलेले होते पण त्या पवित्र ब्रम्हचाऱ्याच्या मनात देवेंद्राचा वास होता. आणि देवांच्या राजाची दिव्य शक्ती मोहमायेला भेदून त्याला मार्ग दाखवीत होती.

आणि एक दिवस इंद्रदेवाच्या चेतनेच्या बळावर त्याने तो देश सोडला जन्मभूमीच्या दिशेने तो चालू लागला. कोठली तरी दिव्य शक्ती त्याला रस्ता दाखवीत होती. श्रम करीत कष्ट सहन करून, अनेक अडचणींना तोंड देऊन, हिमालयाची शिखरे ओलांडून अखेरीस तो सिंधु नदीच्या तीरावर येऊन पोचला.

जन्मभूमीचे दर्शन होताच मन शांत झाले. थकवा उतरून गेला. तहान भूक सारे शमले. तृप्तीने मन भरून गेले. अखेरीस तो विश्वामित्रांच्या गुरुकुलात परत जाऊन पोचला.

पुत्राला परत आलेला पाहून ऋषिवर मधुच्छंदांना अत्यंत आनंद झाला. वडीलांचेही वडील असे गुरु विश्वामित्र. नम्रतेने तो त्यांच्या पाया पडला. स्वतःची चूक कबूल करून क्षमा मागितली. आता त्याला खरेखुरे जीवनधन गवसले

होते. परम साधन मिळाले होते. अंतरात तृप्त शांतता भरून राहिली होती. हरपलेले श्रेय फिरून हाती आले होते.

क्षमाशील गुरुंनी त्याला मनापासून आशीर्वाद दिला आणि म्हणाले, 'वत्सा तू खरोखरीच धन्य आहेस. भोगभूमीत राहून देखील मायामोहात तू फसला नाहीस. भोग–विलासांना जिंकून विजयी जेता होऊन तू मायभूमीला परतला आहेस. साक्षात् देवराज इंद्राने तुला दर्शन दिले. देवेन्द्रासारखा जीवीचा जिवलग तुला लाभला. देवराज स्वत: अपराजित जेता आहे. पुत्रा, ज्या देवाची आराधना केलीस त्याचे गुण तुला प्राप्त झाले आहेत. भोगविलासांना जिंकून तू अजेय जेता म्हणून परत आला आहेस. तुझे आयुष्य असेच अपराजित राहो. आजपासून सर्व जण तुला **जेता** या नावाने ओळखतील.'

सर्व ऋषींनी त्या बटूचे स्वागत करून त्याच्या नव्या नावाला मान्यता दिली.

卐 卐

# ३ / मोठी विद्या कोणती ?

(ऋग्वेद : प्रथम मंडल)

त्या ऋषींचे नांव होते मेधातिथी. ज्याने सर्व शास्त्रांचे सार जाणून घेतले त्याची मेधा–बुध्दि जागी झाली असे म्हणतात. बुध्दि जागी व्हावी म्हणून अभ्यास करावा लागतो. अभ्यासानेच शास्त्रे कळतात. आणि सारासार विवेकही अंगी येतो.

मेधातिथी विद्याभ्यास करण्यासाठी एका गुरुकुलात गेला. त्या गुरुकुलाचे आचार्य होते वाचस्पति. वाणी ही कलेची एक शाखा आणि त्या शाखेचे प्रति-पालक, ते कलागुरु वाणी ही साक्षात् सरस्वती. विद्वानांच्या मुखमंडळाची ती शोभा. साहित्याचा मुख्य विषय कला समजला जातो. काव्यविचारणा आणि काव्यशास्त्र केवळ करमणुकीसाठी रचलेले नसून भावना आणि संवेदना हा कवितेचा प्राण असतो.

गुरु वाचस्पतींच्या गुरुकुलांत मोठमोठे कवी येत. कविता गात. ऋचांचा अभ्यास चाले. नृत्याची रचना होई. नाटक चाले. वाद, संवाद रंगात येत. वातावर-णात उत्साह भरून राहिलेला असे.

मेधातिथी विद्यार्थी होता. विद्या मिळवण्यासाठी तो त्या ठिकाणी आला होता. मेधा जागी होईल अशी विद्या त्याला हवी होती. गुरुकुलातील कलांना विद्या म्हणायचे का ? त्याच्या मनात शंका निर्माण झाली. कवींशी त्याने या प्रश्नावर चर्चा केली. कुलपतीजवळ बसून काव्यशास्त्राचे सिध्दांत त्याने जाणून घेतले. कवितेचे गुणदोष पण शिकून घेतले. पण त्यामुळे मेधा काही जागेना तो गुरुंच्याकडे गेला व त्यांना सारे सांगून मार्गदर्शन करण्यासाठी विनंती केली.

'शिष्या, कला शाखेची विद्या तुला मिळवता येईलसे वाटत नाही. तू दुसऱ्या विद्येचा अभ्यास करावास हेच योग्य.' गुरुंनी त्याला सांगितले. कलागुरु

वाचस्पतींच्या मार्गदर्शनाचा नम्र भावाने स्वीकार करून त्याने प्रणाम करून गुरुंचा निरोप घेतला. तेथून बरेच दूरवर एका जनपदात ब्रह्मणस्पतींचे गुरुकुल होते. ब्रम्हन् म्हणजे ज्ञान-विज्ञान. त्यांचे गुरुकुल म्हणजे विज्ञान शाखेची प्रयोगशाळा होती. आणि ब्रम्हणस्पती हे तेथील कुलपती होते तेथे मोठमोठे विद्वान शास्त्रज्ञ जमून वेगवेगळ्या पदार्थांबद्दल चर्चा करीत. लहान-मोठे प्रयोग सतत चाललेले असत. त्या प्रयोगांच्या साधकबाधक परिणामांची विचारणा चाले. प्रयोग सफल होवो वा निष्फल, संशोधनाचा उत्साह सतत वाढतच राही.

या प्रयोगशाळेत मेधातिथीचे मन रमले. शास्त्रज्ञांच्या चर्चासभात बसून तो त्या चर्चा मनापासून ऐके. गुरुंच्या जवळ बसून त्यांच्या गूढ गंभीर चिंतनातून प्रकटलेले विचार ऐके. गुरु प्रत्येक विद्यार्थ्याला एखादा पदार्थ पाठ देऊन त्यावर प्रयोग करावयास सांगत. प्रयोग करण्याची रीत, पद्धत सुचवीत '

मेधातिथीच्या मनात एक विचार आला, ' हे ज्ञान आणि विज्ञान प्रयोगापुरतेच मर्यादित असेल, प्रयोगातही अनुकरणच असेल तर याला विद्या म्हणता येईल कां ?

विज्ञानाच्या त्या महाशाळेतही या विद्यार्थ्याला विद्या सापडेना. ब्रम्हणस्पतींना प्रणाम करून त्याने त्यांचाही निरोप घेतला.

तेथून दूरदूरच्या एका वनात बृहस्पतींचे गुरुकुल होते. तेथे तो जाऊन पोचला बृहत् म्हणजे विशाल जीवन. त्या जीवनाचा सांगोपांग विचार करणारा आयुर्वेद त्या वेदशाखेचे अधिपती भीषग्-वैद्यराज. आयुर्वेदात ज्ञान आणि विज्ञानाबरोबर जीवविद्या, योगविद्या, त्याचप्रमाणे मानसशास्त्र आणि प्राणशास्त्र. सर्वच शास्त्रे आणि विद्यांचा अभ्यास होत होता.

अरण्यामध्ये औषधी वनस्पती आजुबाजूलाच फुललेल्या होत्या तेव्हा त्यांचा प्रत्यक्ष परिचय आणि प्रयोग सहजच होई. त्या वनस्पतीच बरेचसे शिकवीतही.

मेधातिथीला या आयुर्वेदाच्या बृहत् विद्या शाखांच्या अभ्यासात स्वारस्य वाटू लागले. कुलगुरु बृहस्पतींच्या बद्दलही आदर वाटे. आजवर मात्र कला, ज्ञान आणि विज्ञानाची एकांगी उपासना पाहून त्याचे मन विटले होते. पण या गुरुकुलात बृहत्-विद्या संपादन करण्यासाठी जीवनाच्या सर्वच बाजूंचा अभ्यास होत होता.

काही वर्षे मेधातिथी त्या गुरुकुलात राहिला. अध्ययन करता करता तेथेही त्याला एक उणीव भासू लागली. विद्येची ही शाखा विशाल होती. कुलगुरुंचे कार्यक्षेत्रही खूप मोठे होते पण येथे प्रयोग करणारे कोणीही विचारवंत एक-

मताने एका निर्णयावर येत नव्हते. एकाच्या शंकेचे निरसन दुसऱ्याला करता येत नव्हते. संशयाचा निरास त्यामुळे होतच नव्हता. त्यामुळे सर्वच बाबतीत संशय तसाच रहात होता.

कुलगुरु बृहस्पति सर्व दृष्टीने श्रेष्ठ आणि समर्थ होते. पण ते स्वतः योगी होते. तपस्वी होते. आत्मानंदात मग्न होते. त्यांच्यापर्यंत पोचणाऱ्याच्या मनात संशय उरत नसे. पण तेथवर पोचायचे म्हणजे फार धीर धरावा लागे. समाधी आणि योगसाधनेत दिवसचे दिवस पसार होत. पण त्यांना त्याची खंत नसे. योगसमाधींत मग्न राहणाऱ्या त्या कुलगुरुंच्या गुरुकुलात त्यामुळे कितीतरी कामे साठून रहात. कितीतरी निर्णय घ्यायचे राहून जात.

मेधातिथीचे मन त्या गुरुकुलात रमले होते. पण विद्या मिळवल्यावर त्या जागी राहाणे त्याला जमत नसे. कारण त्याला मिळवलेल्या विद्येच्या पुढची, त्याहून मोठी विद्या मिळवण्याचा नाद लागला होता. ज्या विद्येने 'मेधा' जागी होईल, सारासार विचार आणि विवेक करता येईल अशी विद्या त्याला मिळवायची होती. तिच्या शोधासाठी तर त्याने आपले जीवन वाहून टाकले होते. दूर दूर जाण्याचा कंटाळा केला नव्हता. तो थकलाही नव्हता. वेगवेगळ्या विद्यांचे अध्ययन करता करता तो अनुभव घेत होता.

स्वतःचे आवडते गुरुकुल सोडून तो निघाला. बरेच दूर गेल्यावर एका जागी रस्त्याचे तीन दिशांना जाणारे तीन भाग झाले होते. त्या ठिकाणी सदस्पतींचे गुरुकुल होते. सद् म्हणजे सभा आणि तेथील सदस्य ते सभासद. ते खूपच मोठे विद्याधाम होते. गुरु-शिष्यांचे संवाद आणि चर्चा, सभा संसदेतून चालत हात्या. राजे आणि प्रजाजनांना जोडणाऱ्या परिषदा भरत होत्या. त्याचप्रमाणे मोठमोठे आचार्य आणि सिद्धपुरुषांच्या रहस्यमय गुप्त चर्चाही 'उपनिषदां'तून होत.

या गुरुकुलात मेधातिथीच्या मनाचे पूर्ण समाधान व्हावे असे सर्व काही होते. आचार्य सदस्पतींच्या विषयी त्याच्या मनात आदरभाव निर्माण झाला. विनयपूर्वक हात जोडून त्याने गुरुस्तुती करणाऱ्या ऋचा म्हटल्या.

'मी आज अद्भुत विद्यागुरु सदस्पतींच्या चरणाशी येऊन पोचलो आहे. आचार्य, देवराज इंद्राला प्रिय आहेत. सर्व लोक पूज्य भावाने त्यांची आराधना व स्तुती करतात. खरेखुरे जीवनधन मिळवण्यासाठी आणि मेधा जागृत करण्यासाठी मी त्यांना शरण आलो आहे. विद्वान आणि बुद्धिशाली ज्ञान्यांची देखील मेधा सदस्पतींच्या कृपेशिवाय जागृत होऊ शकत नाही. म्हणून हे गुरुदेव आपल्या कृपेचा सुयोग व्हावा अशी मी प्रार्थना करतो.'

आचार्य सदस्पतींच्या कृपेचा सुयोग साधण्यासाठी अनेक बुद्धिमान माणसे त्यांच्या चरणाशी येत होती. त्यांच्या गुरुकुलांत मोठमोठे प्रतिभाशाली कवि येत

आणि आपल्या उत्तमोत्तम कविता तेथे रुजू करीत ज्ञानी आणि विज्ञानी आचार्यांशी विचारविनिमय करून त्यांचा अभिप्राय घेत. वैद्य आणि जीवशास्त्री, मानसशास्त्री आणि नीतिज्ञ गुरुजींशी चर्चा करून आपले संशय फेडून घेत.

आचार्यश्रेष्ठ सदस्पतींच्या ठायी एक अद्भूत शक्ती होती. विशाल गुरुकुलात अनेक विभागांचे संयोजन करावे लागे. अनेक संमेलने योजावी लागत. देशोदेशींचे राजे आणि प्रजाजन त्यात सहभागी होत. त्या सर्वांचा सहकार घेऊन, ती संमेलने पार पाडून त्यातून सर्वांचा कार्यभाग साधून देण्याचे अद्भूत कौशल्य गुरुदेवांच्या ठायी होते. ते स्वतः सतत सावधान आणि जागृत असत.

विद्यार्थी मेधातिथीची मेधा या ठिकाणी पूर्ण विकसित झाली. आजवर वेगवेगळ्या गुरुकुलात राहून मधुकराप्रमाणे वेगवेगळ्या विद्या त्याने ग्रहण केल्या होत्या. अनुभवाची एक अनुपम खाणच त्याला त्यातून लाभली होती. अनेकविध लोकांशी परिचय पण झाला होता.

कवि ज्या अग्नीचे स्तुतीगान करीत त्या अग्निदेवाचे दर्शन त्याला घडले होते. ज्ञानी लोकांचे दैवत वरुण, विज्ञानी ऋषींची प्रेरणामूर्ती- सूर्यदेव, वैद्यांची देवता इंद्र, समाजधारणा करणारे देव- विश्वदेव आणि मरुद्गण या सर्व कल्याणकारी देवदेवतांचा परिचय त्याने करून घेतला होता. ज्या देवाचे दर्शन होई त्याच्याच भजनी लागावेसे वाटे. सर्वच देवतांच्या दिव्य शक्तीचा साक्षात्कार त्याला घडला होता हा खरोखरच मोठा अपूर्व लाभ होता.

या सर्व अनुभवांतून त्याने एक सार काढले होते. शक्तिखेरीज देवही काही करू शकत नाहीत. आपण जशी देवांची स्तुती करतो तसे देव शक्तीची आराधना करतात. मग या सर्व देवतांना आपल्या जीवनयज्ञात आवाहन करून बोलावताना त्यांना एकेकट्यानाच काय म्हणून बोलवायचे ? मनातली ही भावना त्याने स्तुतिस्त्रोत्रात गुंफून काढली.

' हे अग्निदेव, सर्व देवतांना घेऊन माझ्या यज्ञासाठी आपण यावे. देवपत्नींनाही बरोबर आणावे. आणि त्याशिवायही ज्या समर्थ आणि स्वतंत्र देवता असतील त्यांनाही आपण घेऊन यावे. देवी भारती, वाणी, इडा, मही या देवता दैवी पंख असलेल्या पऱ्या आहेत. त्यांचे पंख अच्छेद्य आहेत.

या यज्ञप्रसंगी इंद्रासह इंद्राणी, वरुणाबरोबर वरुणानी आणि अग्निसमवेत अग्नाईने येऊन सोमाचा स्वीकार करावा आणि आमचे कल्याण करावे अशी प्रार्थना आहे.

विशाल, अनंत आकाशदेव आणि पृथ्वीदेवी उभयतांनी येऊन आपला रस आणि कस एकवटून भरणपोषणाची साधने आम्हाला द्यावीत आणि आम्हाला

सतत ताजेतवाने ठेवावे अशी त्याना विनंती आहे. अंतरिक्षातील इतर देवताही त्यांना सहकार देवोत.'

मेधातिथी ऋषींना अग्नी, इंद्र वगैरे देवांच्या बरोबरच त्याच्या देवांगनांचेही दर्शन झाले होते. त्याचबरोबर एका फार व्यापक आणि विशाल देवाचे दर्शन पण त्यांना घडले होते. उंच उंच शिखरावर चढून खोल खोल दऱ्यात उतरतांना ऋषींना जेव्हा थकवा येई तेव्हा ते आसन घालून एका जागी बसत. त्यावेळी त्यांना समोर एक वामनमूर्ती दिसू लागे. पण ती लहानशी मूर्ती पाऊल उचली तेव्हा समग्र जगताला, तिन्ही भुवनांना व्यापून टाकी. पाहता पाहता विराट रुप धारण करी. तो चमत्कार पाहून चकित झालेले ऋषि मग हात जोडून म्हणू लागत–

'सर्व देवता मिळून आमचे रक्षण करोत. कारण सर्वव्यापी देव विष्णु भगवान् आता पाऊल उचलीत आहेत. साती भुवने त्यांच्या पावलाखाली सामावली जाताना दिसत आहेत.

सर्वव्यापी भगवान् विष्णूंनी आपल्या तीन पावलांत त्रिभुवन सामावून घेऊन त्रिविक्रम स्वरूप धारण केले आहे. त्यांच्या पायाच्या धूळीत सारे जग मावलेले आहे.

या त्रिविक्रम परमदेवाला दुखविण्याची कोणाची प्राज्ञा नाही. तोच या विश्वाचे रक्षण करतो. त्याच्याच प्रभावामुळे निसर्गाचा क्रम चाललेला आहे.

या सर्वव्यापी देवाची विविध कर्मे आणि पराक्रम तरी पहा! गृहस्थ आपले यजमान व्रत आणि धर्म पाळतात ते याच देवामुळे. खरोखरीच हे दैवत इंद्राला अनुसरणारे, अनुकूल आणि सर्वांचे परममित्रत्व पावणारे आहे

रोज सकाळी आकाशात सूर्यबिंब उदयाला येते. ते म्हणजे जणू याचाच स्थिर चक्षू आकाशात उघडलेला असावा. ज्ञानी जनांना त्या द्वारे विष्णूचे परम दर्शन घडत असते. कुशल योगीजनांना हा दर्शनाचा महालाभ अनुभवता येतो '

याप्रमाणे ऋषि मेधातिथींनी ज्या देवाची स्तुतिस्तोत्रे रचली ते त्रिविक्रम, सर्वव्यापी विष्णू असोत, बटू वामन असो किंवा आकाशात रोज उगवणारा सूर्य असो, गगनचुंबी शिखरे आणि साती भुवने व्यापून उरणाऱ्या या देवतेचे दर्शन अद्‌भुत आहे यात शंका नाही.

जीवनाचा अनेकविध अनुभव घेतल्याने मेधातिथी ऋषींना विशेष ज्ञान मिळाले होते. दिवसचे दिवस त्यांनी रानावनातून रस्ता शोधण्यात घालवले होते त्यामुळे निसर्गाचा परिचय त्यांना चांगल्या प्रकारे झाला होता. ऋतुमानाप्रमाणे

बदलणाऱ्या निसर्गाची रुपे त्यांनी जवळून पाहिली होती. त्यांच्या मनात ते सारे काही टिपले जात होते होणारा प्रत्येक बदल त्यांच्या ध्यानांत येत होता. हिवाळा आला की वाऱ्यात गारवा येई उन्हाळचात तोच वारा ऊन ऊन असे. पावसाळचात तो पावसाच्या सरींना घेऊन येई. निसर्गाच्या या लीलेत प्रकृतिमातेचे साक्षात् दर्शन घडत असे. ही माता जणू प्रत्येक ऋतूत आगळा शृंगार सजत होती. प्रकृतीच्या अंगणात जणू एकेक देव येऊन खेळून बागडून जात होता. आपल्या सेनेचे व्यूह रचून मोडीत होता. हसत खेळत एकाने निरोप घ्यावा तोच त्याच्या मागून दुसरा येत होता, ऋतु बदलत होता आणि नवनवीन देवता येत होत्या, जात होत्या. ऋतुंच्या बरोबर वातावरणही बदलत होते. हे फेरफार माणसांना नवजीवन आणि स्फूर्ति देत होते. कित्येकदा दोन ऋतुंच्या मिश्रणाने हवा दूषित होऊन रोगराईही फैलावत होती. प्रकृतिमाता जीवनशक्ती देत होती. पण हवामानाच्या विषमतेपुढे तिचेही काही चालत नव्हते. अशा वेळी रोगांचे निवारण करण्यासाठी मानवाने प्रयत्नांची शिकस्त करून उपाय शोधून काढले पाहिजेत. उपचार केले पाहिजेत.

ऋतुंच्या चक्रात होणारे फेरबदल मेधातिथींना चांगले उमगले होते. लोकही त्यांना ऋतुमानाचे जाणकार म्हणून मानू लागले होते. कोणत्या वेळी कोणत्या रोगाचा उद्‌भव होतो व त्याची चिकित्सा करून कोणती उपाययोजना करावयास हवी, कोणत्या देवतेची उपासना करावी, स्तुती पूजा करून शांती करावी ते ऋषींना कळत होते व त्याप्रमाणे उपाययोजना करून यज्ञाद्वारे ते महामारीसारखे रोग दूर करीत. ते सांगत,

'यज्ञ सुरू करा सर्वांचे सहकार्य तुम्हाला मिळेल. सर्वांची बुद्धि, बल आणि शक्ती यांचा योग्य समन्वय व उपयोग होवो. यज्ञ परोपकारासाठी करावयाचा असतो. म्हणून सर्वांनी मिळून यज्ञाचा प्रयोग करावा.'

हिवाळा संपत आला की हे ऋत्विज मिळून वसंतयागाची सिद्धता करीत. त्यावेळी मरुतांचा वेग शांत झालेला असे. देवराज इंद्र झाडा-फुलांचा शृंगार प्रकृतिच्या अंगावर चढवू लागे. त्याचप्रमाणे उन्हाळचाच्या अखेरीस वर्षायागाची तयारी होई. त्यावेळी गरम वारे गार होऊ लागत. अग्निदेव प्रसन्न होऊन प्रकृतिला नवी स्फूर्ती देई. पावसाळा संपत आला की शरदयागाची सिद्धता होई. पावसाचा ओला गारवा जाऊन नवजीवनाची चाहूल घेऊन येणारे थंड वारे वाहू लागत. प्रत्येक ऋतूच्या देवतेला अर्घ्य देऊन ऋत्विज तिची स्तुती करीत.

'हिवाळचाचा असह्य गारठा दूर करून प्रसन्न वसंत यावा म्हणून देवराज इंद्राला आम्ही विधीपूर्वक आवाहन करीत आहो. इंद्राबरोबर त्वष्टा आणि विश्वकर्मा यांनीही यावे आणि अर्घ्य स्वीकारून प्रकृतीला नवजीवन द्यावे.'

'उन्हाचा ताप दूर करून नवजीवन देण्यासाठी अग्निदेवाने यावे.'

'शरदाच्या रोगराईपासून वाचवण्यासाठी इंद्र, वरुण व मित्र यांनी येऊन वातावरण निरामय करावे.'

ऋतुयज्ञासाठी जे देव येत त्यांच्याबरोबर द्रविणोदा नावाचा एक देव पण येई. तो सर्वांना वेगवेगळे 'कव्य' देऊन सर्व उपद्रव दूर करी. 'द्रविणोदा' हे इंद्राचे वा अग्निचेही रुप असे. प्रत्येक ऋतुच्या संधिकाळी या देवतेचे आवाहन करीत. त्याच्याबरोबर वरुण आणि मित्र या देवता असत. आश्विनीकुमारांची जोडी असे. जे जे गृहपति यजमान असत, त्यांच्या घरी वास करणारा अग्नि, गार्हपत्य, गृहपतीला प्रेरणा देई. जे कोणी सहकार करून यज्ञयाग करण्यासाठी येत त्यांची सर्व कार्ये गार्हपत्य अग्नीच्या कृपेने सफल संपूर्ण होत. कारण तोच अग्नि सर्व देवदेवतांना घरी घेऊन येणारा असतो. अग्नि व इंद्र ऋतूंचे अधिष्ठाते देव. ते प्रसन्न झाले की प्रकृति पण प्रसन्न राहून ऋतुमानही अनुकूल होते. आपले जीवन त्यामुळे सदाचारी होऊन समाजाचे व राष्ट्राचे कल्याण करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते व समग्र जीवन यज्ञमय होऊन जाते.

अशा प्रकारे वेगवेगळ्या ऋतुंचे यज्ञ करून या ऋषींनी समाजाची व राष्ट्राची उत्तम प्रकारे सेवा केली. शिवाय विष्णुयाग करून विष्णूच्या व्यापक विराट रूपाची स्तुती त्यांनी केली होती. त्या स्तोत्रांच्यामुळे ऋषींचे दर्शन उदात्त झाले होते. समाजाच्या सेवेसाठी ते पुढे येत तेव्हा त्यांची पावले त्रिविक्रमासारखे च पराक्रमी, सर्वव्यापी होऊन जात. त्यांची कीर्तीही त्यांच्या आराध्य दैवताच्या कीर्तीप्रमाणे विश्वभर पसरली होती. त्या उदात्तचरित् तपस्वी ऋषींचे दर्शन करून इतर ऋषिमुनी कृतार्थता अनुभवीत. त्याचप्रमाणे सर्व देवदेवता, ऋत्विज आणि विज्ञानी मेधातिथीला आपला प्रियजन, मित्र मानीत. वसु, रुद्र, आदित्य वगैरे गण रचून कार्य करणाऱ्या देवतांच्या दर्शनाने ऋषींना संघ-सहकाराची प्रेरणा लाभली होती. त्यांची उदार प्रेमदृष्टी पृथ्वी, आकाश आणि अंतरिक्षापर्यंत पोचत होती.

या ऋषिवर्यांना ऋभु देवांचाही परिचय लाभला होता. ते तीन ऋभु मूळचे मानवच. त्या तीन राजकुमारांनी कला-कौशल्यात अपूर्व कुशलता मिळवली म्हणून त्यांना देवपद मिळाले. ऋतुंच्या विविध सौंदर्याचे कारागीर तेच. ते मोठे परोपकारी देव होते. त्यांची मनापासून स्तुती करून कोणीही त्यांना बोलावले की ते जात. कित्येकदा अगदी सामान्य कामासाठी ते धावून जात. तेव्हा इतर देव त्यांना अडवीत. त्यांचे देवपद काढून घेत. पण खरी गोष्ट अशी होती की, या ऋभूंना देवपद मिळाल्याचा हर्ष नव्हता तसे ते गेल्याचा खेदही नव्हता. ते

म्हणत, 'परोपकार हेच आमचे कार्य आहे. आमची सर्वच कामे परोपकाराची. मग ती देवांची असोत वा माणसांची. आमच्या मते सारीच सारखी.'

मेधातिथींना हे सहजसाध्य देव फार आवडले. ते स्वत: ऋभूंना बोलावीत. त्यांची स्तुती करीत.

'ही माझी प्रार्थना–स्तोत्रे मोठमोठ्या कवींच्या मुखांतून बाहेर पडलेली आहेत. हे ऋभु देव पूर्वी मानव होते. पण उदार, परोपकारी आणि कलाविद् असे हे तिघे देवपदी विराजमान झाले. त्यांचे हे स्तुतिगान केल्याने प्रसन्न होऊन ते तुमचे काम सिद्धीस नेतील.

या ऋभूंनी देवराज इंद्रासाठी दोन अलौकिक अश्व निर्माण केले होते. त्या अश्वांना चाबूक न मारता केवळ तोंडाने आज्ञा केली की ते उडू लागत. आश्विनी-कुमारांसाठी त्यांनी सुखसोयी असलेला दिव्य रथ घडवला. ऋषिमुनींना त्यांनी कामधेनू दिल्या. त्यांच्या या अद्भुत कार्यामुळे त्यांना देवपद मिळाले. परंतु ते साधेपणाने सगळीकडे जातात.

हे ऋभुदेव आमच्या यज्ञासाठी आपण या आणि येताना देवराज इंद्र आणि आदित्यांनाही घेऊन या. त्यांच्याबरोबर आम्ही तुम्हाला बोलवीत आहो. तुमच्या-साठी आम्ही आसने ठेवली नाहीत. या देवांच्या बरोबर त्यांच्याच असनावर आपण बसावे. तुमच्यासाठी आम्ही वेगळी पात्रेही आणलेली नाहीत कारण तुम्ही कुशल कारागीर आहात ते काय आम्ही जाणत नाही ?

पूर्वी जेव्हा देव यज्ञ करीत तेव्हा तुमचे गुरु त्वष्टा प्रजापति त्यांनी आहुती-साठी एकच चमस् घडवला होता. त्या देवयज्ञात तुम्ही तिघे जाऊन पोचला आणि त्या एका चमसाचे तुम्ही चार चमस करून टाकले. तुमच्या अद्भुत कलेबद्दल काय सांगावे ? एका रत्नाची तुम्ही तीन रत्ने करता आणि तीनाची सात ! एका क्षणाचाही विलंब तुम्हाला लागत नाही. आमच्या यज्ञात आपण या. आमची साधने तीन पट, सात पट होवोत. तुमची ही कुशलता पाहून तर देवांनी तुम्हाला यज्ञाचा भाग दिला आहे. सर्व देवतांसहवर्तमान आपण यज्ञास या.'

'पूर्वी अंगिरा प्रजापति होऊन गेले. त्यांच्या पुत्राचे नाव सुधन्वा. राजा सुधन्व्याचे तीन पुत्र ऋभू. विभू आणि वाज. त्या तिघांनाही 'ऋभु' च म्हणत. इतकेच काय, पण त्या तिघांचे देह वेगळे असले तरी गुण, कर्म आणि स्वभाव एकच होता म्हणूनच त्या तिघांना देवपद मिळाले होते.

अशा या ऋभूंच्यावर ऋषींचे फार प्रेम होते. आणि या उदारचरित् ऋषींच्यावर ऋभूही स्नेहभाव ठेवून त्यांच्या कामासाठी सदा तत्पर राहत.'

× × ×

ऋषीवर्यांनी वेगवेगळे अनुभव घेऊन त्यांचे सार काढून जी मेधा प्राप्त करून घेतली होती तिचे बीज त्यांच्या वडीलांनी लहानपणापासून लावलेले होते त्यांच्या पित्याचे नाव कण्व प्रजापति. ते मोठे ऋषि होते. त्यांचे वडील घोर तत्त्वज्ञानी होते. घरात वास करतो-रहातो-तो घोर. आपले शरीर हे जिवाचे रहाण्याचे घर आहे, हे ज्यांना कळून चुकते त्यांना 'घोर-घर' ज्ञान होते. घोर तपस्वी पित्याच्या पुत्राला ज्ञानाचे बालकडूच मिळाले होते.

अशा त्या कण्व प्रजापतीने आपल्या 'घोर-घर' निवासात अग्निदेवाचे दर्शन व उपासना केली होती. त्यामुळे त्यांचे शरीरच त्यांना यज्ञवेदीसारखे वाटत असे. यज्ञकार्यात ज्याप्रमाणे सर्व लोकांचा आणि देवांचा सहकार मिळतो. त्याच-प्रमाणे शरीराचे व्यवहारही अग्नि, इंद्र, वायू वगैरे देवतांच्या सहकार्यानेच होतात. आणि ज्या ठिकाणी देवाचा वास असतो ते देऊळ. वेदांमध्ये शरीराला 'नगरी' म्हटलेले आहे आणि त्या नगरीत-'पुरां'त जो रहातो तो पुरुष. शरीरात पहिला प्रवेश करणारा पुरुष अग्नि. अग्निमुळेच जीव येतो. चेतना येते. अग्नि विझला की शरीर गतप्राण होते. थंडगार होते. सडू लागते.

शरीरात अग्नि असतो आणि पाणीही असते. तसे पाहता आग आणि पाणी ही परस्परविरोधी तत्त्वे. पण या शरीरपुरात ती दोघेही एके ठिकाणी मिळून मिसळून रहातात. शरीरात रहाणारे देव ते पुरुष. त्यांच्यात जर विरोध होऊ लागला तर शरीर बिघडते. रोग होऊ लागतात. पीडा होऊ लागते. म्हणून हे पुरुष गुण्यागोविंदाने शरीरात नांदत असतात.

या पुरीत जर यदु-यादव आणि तुर्वसु राहू लागले तर आतमध्ये भांडणे माजू लागतात आणि त्यातून मग द्रुह्यु-परस्पर द्रोह करणारे-उत्पन्न होतात.

वेगवेगळ्या स्वभावाची प्रजा एकत्र आली तर पुरीमध्ये तक्रारी होऊ लागतात. परंतु हे 'पुर' शरीर 'मनु'चे-मानवाचे आहे. मानव सर्वांचे भले करतो. दानव दुसऱ्यांचे नुकसान करतो आणि देव 'पुरा'चे रक्षण करतात. मनुचे पुत्र मानव वेगवेगळ्या स्वभावाचे, वेगवेगळ्या विकारांना वश होणारे होतात. तेव्हा त्यांच्यात पुरु यादव, तुत्सु, तुर्वसु, द्रुह्यु वगैरे प्रकार निर्माण झालेले दिसतात. बाकी खरे पाहता एक मनु महाराजांची ही मानवप्रजा एकमताने, सहकार्याने काम करणारी असते.

मनुच्या हितासाठीच अग्निदेवाने पुरामध्ये वास केला आहे. त्यानेच कण्व-म्हणजे तेजस्वी पुरुषांचे भाग्य उजळले आहे. अग्नि हा नित्य नवीन असून तो सर्वांचे कल्याण करतो. त्याच्या तेजस्वी ज्वाला शत्रूंचा नाश करतात.

कण्व ऋषींनी शरीरात वास करणाऱ्या अग्निदेवाचे दर्शन घेतले होते व त्याची स्तुति-सूक्ते रचली होती. तसेच निसर्गाच्या अवकृपेने होणाऱ्या झंझावातांना शांत करणारी सूक्तेही त्यांनी रचली. तसेच आदित्य, ब्रह्मणस्पति, पूषा आणि मरु या देवतांचा महिमा वर्णन करणारी स्तोत्रे रचली. अशा जन्मदात्याकडून मेधातिथी ऋषींना ज्ञानाचा पहिला बोधपाठ मिळाला होता.

घोर तपस्वी कण्व मुनींनी शरीरात वसणाऱ्या अग्निचे दर्शन घेतले होते. त्याच अग्निला आहुती देऊन समिद्ध करून यज्ञशाळेत त्याची प्रतिष्ठापना करावयास हवी. त्यासाठी अग्निला प्रिय आणि अप्रिय अशा प्रवृत्ती ऋषींनी पाहून घेतल्या. अशा दहा-बारा प्रवृत्तींतून ' अप्रिय ' अग्निदर्शन घडले त्याचे सुंदर वर्णन त्यांनी अप्रिय सूक्तात केले आहे

' रात्र अद्याप संपलेली नाही. पहाटेला अजून वेळ आहे. अशा वेळी आर्ष द्रष्टयांच्या हृदयाची दोन दिव्य दारे उघडतात. जणू अग्निशाळेची महाद्वारेच म्हणा ना. आणि आतल्या गाभाऱ्यात दोन दिव्य होते मधुर स्तुती करीत उभे असलेले दिसू लागतात.'

' येथे यजमान अग्निला समिद्ध करीत आहे अग्नी शरीर टिकवतो.माणसाची प्रशंसा होते ती अग्निकृपेनेच होते. अग्नी इतर देवतांना बोलावून आणतो व यज्ञाच्या जागी ठेवलेल्या दर्भासनावर बसवतो. अग्निचा दिव्य रथ त्वष्टयाने घडवलेला असून यज्ञाच्या समिधा वृक्ष वनस्पतींनी दिलेल्या आहेत.

यज्ञासाठी आलेल्या देवांच्या बरोबरच इळा-मातृभूमी, वाणी-सरस्वती आणि भारती-संस्कृति पण आलेल्या आहेत. स्वाहाकृती सुंदर हविमूर्ती पण त्यांच्याबरोबर आलेली आहे. त्या सर्वांचे हार्दिक स्वागत असो.'

अप्रिय अग्नीचे दर्शन अनेक ऋषींना झालेले आहे. त्यांच्या सूक्तांत त्यांनी अग्निला वेगवेगळया नावांनी संबोधलेले आहे. १) सुसमिद्ध अग्नि. २) तनूनपात, ३) नराशंस, ४) इळ-पुज्याग्नि, ५) बर्हि-दर्भ, ६) दिव्य व्दिद्वार, ७) नक्तोषसा-रात्रदिवस, ८) दोन दिव्य होते. ९) इला, सरस्वति, मही, भारती १०) त्वष्टा, ११) वनस्पति, १२) स्वाहाकृति.

× × ×

पित्याने कलेल्या अग्निदर्शनांतून पुत्रांना पण अप्रिय अग्नीचे दर्शन घडले होते. मेधातिथींचे बंधू प्रस्कण्व पण आर्ष द्रष्टे ऋषि होते. त्यांनी पित्याच्या आश्रमात राहून दिव्य विद्या मिळविली होती.

पिता सकाळ संध्याकाळ अग्निशाळेत अग्नीचे ध्यान पूजन करीत असता कित्येकदा संध्याकाळी समिध्द केलेला अग्नी रात्रभर प्रज्वलित ठेवावा लागे. या

प्रकारच्या यागास अतिरात्र याग म्हणतात. रात्रभर जागत राहून अग्नि प्रज्वलित ठेवण्याचे काम प्रस्कण्वाकडे असे. अग्निसाक्ष जाग्रण करीत असता त्याला अपूर्व उत्साह वाटे. त्या अग्नीबरोबर तो इतर अग्नितत्वांनाही आवाहन करी. अग्निस्तुती करताना तो म्हणतो,

'हे अग्निदेव, रात्रीच्या पहिल्या प्रहरी तुम्ही आठ वसूंना दुसऱ्या प्रहरी अकरा आदित्यांना व तिसऱ्या प्रहरी बारा रुद्रांना घेऊन यावे.'

ऋषींच्या मनात आपल्या आराध्य अग्निविषयी इतके प्रेम होते की मंत्रांच्या ऋचातून गुणांना अनुरुप नावांच्या मागे स्वतःचे नावही ते जोडीत.

'हे अग्निदेव, प्रियमेध, अत्रि, विरुप आणि महिव्रतांनी बोलावल्यावरून तुम्ही त्यांच्या यज्ञासाठी गेला होता. त्याचप्रमाणे मीही तुम्हाला यज्ञासाठी आमंत्रण देत आहे. प्रस्कण्वाचे निमंत्रण स्वीकारून आपण यावे. या यज्ञाची पूजा सामग्री हातात घेऊन प्रजापती कण्व मुनींचे पुत्र मधुर वाणीने आपल्याला बोलावीत आहेत. प्रभात होण्यापूर्वीच सर्वच देवदेवतांना घेऊन सत्वर यावे.'

अशी प्रिय, मधुर आणि निर्दोष स्तुती ऐकून अग्नी रात्रभर प्रज्वलित राही. प्रस्कण्वही रात्रभर जागाच असे त्याला अग्निच्या विविध नवनव्या रुपांचे दर्शन होई. त्याच वेळी आकाशाचेही दर्शन घडे. आकाशातून पृथ्वीवर उतरणाऱ्या अनेक देवदेवतांचे दर्शन होई. आणि रात्र संपली की पहाटेच्या पहिल्या प्रहरी पूर्वेकडून उतरणाऱ्या उषाराणीचे दर्शन होताच आनंद विभोर होऊन उषादेवीची स्तोत्रे तो गाऊ लागे.

'अहो! हे प्रकाशपूर्ण उषादेवी, तू आकाश आणि द्यु लोकीची दुहिता आहेस. तुझ्या पावलावर पाऊल टाकीत अश्व, गाई आणि धनसंपत्तीच्या राशीच्या राशी येताना दिसत आहेत. तू आलीस नि आमचे घर भरून गेले. घरी स्त्री आली की घर शोभिवंत दिसू लागते. त्याप्रमाणे तुझे पाऊल पडताच आमची अग्निशाळा दैदिप्यमान होत आहे.'

'तू येताच अंधःकार दूर होतो आणि उजेड पडतो. तू सर्वांना जीवन देणारी चेतनाच आहेस.'

'हे उषादेवी ! आकाशाच्या कल्याणमार्गावरून तुझी पावले आमच्या घरांत उमट देत. तुझ्यामागून देव सारथी अरुण येतो. तुला घेऊन येणारा रथ सुखसोयींनी भरपूर भरलेला असतो. आम्ही सर्व कण्व तुझे स्तवन करीत आहोत.

उषादेवीच्या मागून अरुण येतो. त्याच्या दैवी रथाचे घोडे सूर्याला विश्वदर्शनासाठी घेऊन येतात.'

सूर्योदयाचे भव्य दृश्य पाहता पाहता आनंदित होऊन प्रस्कण्व ऋषी म्हणतात, 'सूर्याच्या आगमनाबरोबर रात्रीची नक्षत्रे लपून बसतात. अंधारात वावरणारे चोर उजेड होताच पळतात त्याची आठवण त्या नक्षत्रांना पाहून होते. रात्रीच्या अंधारामुळे आणि थंडीमुळे आळस, प्रमाद आणि रोग शरीरात प्रवेश करतात. तेही उगवत्या दिवसाचे दर्शन होताच पळू लागतात. मानवी जीवनात नव्या स्फूर्तीचा, चैतन्याचा संचार होतो. अशा सूर्याचा उदय होत असताना प्रस्कण्व ऋषी स्तुतिपूर्वक पूजन करून त्यांचे स्तोत्र रचीत आहेत."

'अहो! आदित्य सूर्य आकाशात चढून विश्वाला बल आणि पराक्रमाने भरून टाकीत आहे.

हे देव! आपण आलात ते फार चांगले झाले. आता आमचे शत्रुत्व करणारे रोग, आळस, प्रमाद, पाप या सर्वांचा निश्चित नाश होईल. आपण येण्यापूर्वी त्यांनी शरीरावर आक्रमण केले होते आणि अंधारामध्ये आम्ही पार गारठून गेलो होतो.'

कण्वपुत्र प्रस्कण्व ऋषी आपल्या आराध्य इष्ट देवतेची याप्रमाणे सुंदर भावपूर्ण स्तुती रचीत आहेत. ही स्तुती म्हणजे उपनिषद् रहस्य आहे

'उत्तम मित्राप्रमाणे आमचे कल्याण करणाऱ्या सूर्य देवा! आकाशात तुमचा उदय होताच जगाचा कोनाकोपरा प्रकाशाने उजळून निघतो. माझ्या शरीरातले हृदय रोगाने पिडले आहे. माझे शरीर फिक्कट झाले आहे. त्या रोगाचा नाश करा. वनात दूर दूर, जेथे पोपट-मैना राहतात तेथे त्या रोगाला पिटाळून लावा. माझ्या पिवळटपणाला झाडांच्या हिरवट रंगात ओतून टाका. सूर्यनारायण वीर्य आणि सामर्थ्य घेऊन येत आहेत. हे सूर्यदेव, मला अंधारात पिचवीत ठेवणाऱ्या रोगांचा, माझ्या शत्रूंचा नाश करून मला सोडवा'

घोर तपस्वी कण्व ऋषी आणि त्यांचे पुत्र मेधातिथी आणि प्रस्कण्व या प्रमाणे जीवन जगता जगता विविध अनुभव मिळवीत होते.

卐 卐

# ४ / जीवनसिद्धी

**(ऋग्वेद : प्रथम मंडल)**

या ऋषींचे नाव आहे शुनःशेप. ते बंधनात जखडले गेले होते त्यावेळी त्यांनी वरुणाची स्तुती केली. ज्या राजा वरुणाने त्यांची सुटका केली तो आम्हां सर्वांना मुक्त करो.

शुनःशेप वेगवेगळ्या तीन बंधनांत फसले. गुरफटले. फरफरटले गेले. त्यातून त्यांना सोडवणाऱ्या वरुणदेवांनी आम्हालाही सोडवावे.

हजार हजार यूपस्तंभांशी जखडल्या गेलेल्या शुनःशेपांनी फार फार कष्ट सहन केले. त्यांची त्यांतून सुटका करणाऱ्या देवा आमचीही सुटका करा.

अजिगर्ताचा पुत्र शुनःशेप राजा वरुणाच्या पाशात सापडला होता. त्यावेळी प्रार्थना करताना त्याना वरुण सूक्ताचे दर्शन घडले. त्या सूक्ताच्या ऋचा त्यांच्या तोंडून बाहेर पडत गेल्या आणि त्यांचे एक एक बंधन गळत गेले. त्या ऋचा म्हटल्याने वरुणपाश दूर होतात.

खरोखरीच जीवन मरणाच्या चक्रात फसलेल्या जीवाची सुटका होणे कठीण. एक एक जीव संसाराच्या यूपाशी जखडला जातो आणि त्या बंधनातून सुटण्यासाठी धडपडत रहातो.

राजा वरुण संसाराचे नियमन करणारा देव आहे. जल स्थलावर त्याची सत्ता आहे. त्याच्या नियमाप्रमाणे तेथील सर्व व्यवहार चालतात. रात्र आणि दिवस, महिने आणि वर्ष. ऋतूंचे चक्र घडवणारा राजा वरुण आहे. त्याचे आज्ञे-प्रमाणे निसर्ग चालतो निसर्गाचे नियम मानणाऱ्यांना उपद्रव होत नाही. त्यांना बंधने पडत नाहीत. वरुण त्यांना पकडीत नाही. यूपाशी जखडून ठेवीत नाही त्यांचे जीवन विनासायास सरळ चाललेले असते.

असेच म्हणा ना की निसर्गाचे नियम जाणून घेऊन त्यांचे पालन करता येणे ही जीवनाची सफलता आहे. मोठी सिद्धी आहे. पण ही सिद्धी मिळवण्यासाठी जन्मोजन्म साधना करावी लागते. मरणाने जीवाला मोक्ष मिळत नाही. पुनःर्जन्म घेऊन पुनः त्या चक्रात फसून जीव गरगरत रहातो. हे चक्र अविरत फिरत राहते. जीवनसिद्धी कोणा एखाद्यालाच मिळते.

असाच एक विरला जीव खूप खूप वर्षांपूर्वी होऊन गेला. त्याचे नाव शुनःशेप त्याच्या पित्याचे नाव अजिगर्त. विश्वामित्र ऋषींनी त्याला मंत्र दिला होता. त्या मंत्राद्वारे त्याने नवजीवन मिळवले. ऋषी विश्वामित्र त्याचे मंत्रदाते वडील होत. नवजीवन मिळाल्यावर त्याचे नावही बदलून गेले. वरुण देवाने त्याचे रक्षण केले म्हणून त्याला 'देवरात' (रात=रक्षण) असे म्हणू लागले आणि विश्वामित्रांनी त्याला पुनर्जन्म दिला म्हणून त्यांना त्याच्या पित्याचे पद मिळाले. त्याच्या जुन्या व नव्या दोन्ही नावांनी तो प्रख्यात झाला.

शुनःशेप ऋषींना जन्ममरणाच्या फेऱ्यात आपण गुंतून पडलो आहोत ही जाणीव झाली व या भवबंधनातून सुटण्यासाठी इष्ट देवतेची प्रार्थना करून अजर अमरपद प्राप्त करून घेण्याची इच्छा त्यांना झाली. ते विचार करू लागले,

'सारेच देव अजर आणि अमर. मला अदिती मायेच्या अमर मुक्तीच्या मांडीवर नेऊन बसवील असे दैवत कोणते बरे ? ज्या देवनामाचा जप केल्याने मला माझ्या माता-पित्यांचे दर्शन होईल तो इष्ट देव कोणता ?'

सूर्य म्हणजे माझी भाग्यदेवता आहे. माझ्या धनसाधनाचे रक्षण करून माझ्या पापांचा नाश याच देवाने केलेला आहे.

राजा वरुणाचे नाव किती गोड आणि मधुर आहे. आकाशात उडणारे पक्षीही त्याचा पराक्रम पुरता जाणू शकत नाहीत. पाण्याचे प्रवाह त्याचा थांग काढू शकत नाहीत. वायू त्याच्या वेगाच्या पासंगाला पुरत नाही. त्याला कोणी अडवू शकत नाही.

या वरुण देवानेच सूर्याला मार्ग मोकळा करून दिला. आकाशात त्याने मोठा तेजाचा स्तंभ उभा केला. जेथें पाय ठेवण्यास जागा नव्हती तेथे रहाण्यासारखी स्थळे निर्माण केली.

हे राजा वरुण, तुमच्या भांडारात शेकडो औषधी आहेत. तुमची सु-मति खूप खोल, विशाल आहे आमच्या अवगतिपासून ती आमचे रक्षण करो. आमच्या पापांच्या राशीपासून ती आम्हाला मुक्त करो.

हे देव, तुम्ही ज्या नक्षत्रांना उंच आकाशात जागच्या जागी लावून ठेवले आहे. ती सर्व रात्र झाली की चमकतात दिवस उगवताच ती कोठे बरे दिसेनाशी

होतात ? निश्चितच वरुण देवाचे नियम अनुल्लंघनीय, अतूट आहेत. त्यांच्याच प्रभावामुळे चांदण्याचा वर्षाव करणारा चंद्र रात्री आकाशात शोभतो.

हे देव ! मंत्रानुसार मी तुम्हाला शरण आलो आहे. तुमचे यजन पूजन करणारा यजमान होऊन आलो आहे. मी करीत असलेल्या स्तुतीचा स्वीकार करून मला दीर्घायुष्य द्यावे.

हे वरुणराज, कित्येक शहाण्या माणसांनी आम्हाला हे रहस्य सांगून ठेवले आहे. ती शहाणी माणसे रात्री आली की दिवसा ते आता आठवत नाही. पण त्यांनी दिलेला बोधपाठ आमच्या मनात कोरला गेलेला आहे. त्यांनी आम्हाला सांगितले होते, 'वरुणाची स्तुति व पूजा करणारा तेजस्वी शुनःशेप जेव्हा वरुणपाशात जखडला गेला होता तेव्हा त्याला तीन–तीन पाशांनी आवळले होते. तरीही आदित्य वरुणाची प्रार्थना करून तो त्या बंधनातून मुक्त झाला.'

हे वरुणदेव, तुमच्या वेगाला आणि क्रोधाला आम्ही दूर उभे राहून नमन करतो. आम्ही केलेली पूजा आणि प्रसाद आपण ग्रहण करा. आमच्या राहाण्याच्या जागी आपण वास करावा आणि सर्व प्रकारच्या पाप, ताप, संतापाला दूर करावे.

हे देव. पुण्य–यश वगैरे जी उच्च प्रकारची बंधने आहेत तीही सैल करावी. मध्यम व नीच बंधनांतून आमची मुक्तता करावी. मुक्तिमातेच्या मांडीवर आम्हांला बसवून आनंद द्यावा. पापापासून मुक्त होऊन तुम्ही घडवलेल्या नियमांचे निरंतर पालन आमच्याकडून व्हावे.

खरोखरीच ज्याची स्तुति–पूजा केल्याने जीवनाची सिद्धी मिळते, पापापासून मुक्ती मिळते तोच आमचा इष्ट देव. तोच ईश्वर. तोच भक्तांचा भगवान. त्या ईश्वराचे नाम सुंदर, मंगल आणि त्याचे चिंतनही सुंदर, मंगलमय आणि मुक्तिदायी !'

त्या ईश्वराची नावे अनेक पण रुप एकच आहे. त्याला अग्नि म्हणा, वरुण, सविता, इन्द्र, आदित्य, मित्र काहीही म्हटले, तरी अंती ते एकच सत्यरुप आहे हे जाणून शहाणी माणसे त्याची बहुविध रुपे समजावून सांगतात.

आपण अग्निला आगीची देवता मानतो. परंतु ते देवाचे स्थूल रुप आहे. पंचमहाभूतांपैकी तेज तत्त्वाचे पदार्थरुप म्हणजे भौतिक अग्नि. परंतु त्याच्या आत तेवणारे जे चेतन आहे, जो दिव्य पदार्थ आहे तो त्यात वसणारा देव. अंतर्यामी. तो त्या जळणाऱ्या आगीत राहून तिचे नियंत्रण करीत असतो. आग विझली तरी त्याचा नाश होत नाही कारण ते तत्त्व अजर आहे. अमर आहे. ईश्वर आहे. आपल्या मतिमध्ये त्याच अग्निदेवाचे वास्तव्य असते. त्याच्याचमुळे अज्ञान दूर होते आपली ती आत्मज्योती आहे.

तसेच पाहिले तर वरुण ही जलदेवता आहे. पण वरुणाचे स्वरूप पाण्यापुरते मर्यादित नाही. सर्व सूक्ष्म आणि तरल पदार्थात वरुणाचे वास्तव्य आहे. त्याने अनेक नियम केलेले असून त्या नियमांनुसार निसर्गाचे व्यवहार चालतात. नीति, धर्म, सदाचार अशा सूक्ष्म नियमनांचा देव वरुणच आहे. आपल्या शरीरात त्याचा वास असल्यास जीवन्मुक्त अवस्था प्रप्त होऊ शकते.

अग्नि, सूर्य, वरुण ही वेगवेगळी नावे आहेत. परंतु अंती त्यांचे स्वरूप एक आहे. रूपे भिन्न आहेत. गुणही भिन्न आहेत.

ज्ञानी पुरुषांना त्या तिन्ही रुपांचे आकलन करता येते. भूत–महाभूतांच्या ठायी वसणारे ते भौतिक. देवांच्या ठायी असणारे दैविक आणि देहात असणारे ते दैहिक. याप्रमाणे आधिभौतिक, आधिदैविक व अध्यात्मिक अशा नामरूपाने ते त्या व्यवहारांना जाणून घेतात.

साधारणपणे प्रत्येक जीवाला तीन प्रकारची बंधने असतात माता, पिता व कुठुंबी जनांशी तो संसारबंधनाने बांधला जातो. मातापित्याचे ऋण त्याच्या माथ्यावर असते, त्याचप्रमाणे विद्या व शिक्षण देणाऱ्या गुरुंचे ऋण आणि ज्या समाजात जीव जगतो त्या समाजदेवतेचे ऋणही त्याच्यावर असते.

‘ मातापित्यांची सेवा करावी. गुरुची आज्ञा पाळावी आणि समाजासाठी उपयोगी परोपकाराची कामे करावी, याप्रमाणे ही ऋणे जीवनात फेडावी. यापैकी एखादे ऋण न फेडल्यास वरुणपाश, यूप अथवा संसाराच्या बंधनांतून सुटका होत नाही. ईश्वराचे मूळ स्वरुप ओळखणाऱ्यास वरुणपाशाचे बंधन पडत नाही.’

देवरात शुनःशेप हे अद्‌भुत मंत्रद्रष्टे ऋषि आहेत. स्वतः जन्म घेण्याआधीच जीवनाचे रहस्य त्यांना अवगत झाले होते. ईश्वराची स्तुति–पूजा करून त्यानी ईश्वराचे दर्शन घेतले होते. साक्षात् वरुणदेवाने प्रत्यक्ष येऊन वरुणपाशातून त्यांची सुटका केली. जीवन्मुक्त होऊन त्यांनी जीवनाचा आनंद लूटला.

त्या ऋषींनी जीवनाचे अनेक पैलू पाहिले. पाश जाणून घेतले. जलचर, स्थलचर, पशू आणि पक्षी आदी मूढयोनीत जीवाची कशी अधम दशा होते व मानवयोनी मूढ नसली तरी मोहवश होणारी आहे. त्यामुळे देवांच्या सारखी उत्तम दशा नाहीच. आणि देवांच्या सारखी उत्तम दशा मिळवली तरी त्यातून मुक्ती थोडीच मिळते ? मानवाच्या मध्यम दशेतून मुक्तीचा मार्ग शोधून काढणे हीच खरी जीवनसिद्धी.

卐 卐

—

# ५ / संध्या–सकाळी–सायंकाळी

(ऋग्वेद : प्रथम मंडल)

'अहो! हा तर जणू अग्निगोलच. तापलेल्या सोन्यासारखा त्याचा रंग. येथे अग्नि प्रज्वलित झाला आहे. त्याच्या ज्वाला प्रकाशत आहेत. आकाशात सूर्य उगवला आहे. त्याची लाल सोनेरी किरणे पसरली आहेत.

ऋषि यज्ञवेदीसमोर आसन घालून बसले आहेत. अग्नीला तुपाची आहुती देत आहेत. आणि स्तुतिमंत्र म्हणत आहेत. त्यामुळे अग्निकुंडातून ज्वाला निघत आहेत, त्यांच्या प्रकाशात आकाशातील सूर्यकिरणांचा प्रकाश मिसळून त्या दोन्ही-मध्ये ऋषिवर्यांची काया अग्निसारखी लाल होऊन सूर्याच्या सोनेरी प्रकाशात चमकते आहे. अग्नीची लाली आणि सूर्याचे सोनेरी तेज त्यांच्या ठायी एकवटले आहे.

अग्निची ज्वाला, सूर्याचे किरण व ऋषींची काया मिळून प्रकाशाचा केवळ पुंजच असा एक सोन्याचा स्तंभच रचला जातो आहे. म्हणूनच या ऋषींना हिरण्यस्तूप–अंगिरस म्हणतात.

सरस्वती नदीच्या किनारी अंगिरस ऋषींचा आश्रम होता. हिरण्यस्तूप–अंगिरस त्याचे कुलपती होते. गुरुकुलात अनेक विद्यार्थी होते. त्यात अर्चन नावाचा एक तेजस्वी विद्यार्थी श्रेष्ठ होता. हिरण्यस्तूप ऋषी ज्या ऋचा, कविता म्हणत त्या तो मनःपूर्वक ऐकून लक्षात ठेवी व त्याचप्रमाणे स्वतःही देवांची स्तुती करून पूजा करी.

त्या गुरुशिष्यांचा परस्परसंबंध पितापुत्राप्रमाणे होता. पित्याच्या प्रत्येक क्रियेत पुत्राला स्वारस्य वाटे. आणि तोही त्या क्रिया करू लागे.

संध्याकाळी ऋषिवर संध्या–पूजा करींत. अग्नीला समिद्ध करून तुपाची आहुती देत. अर्चन पण तसेच करी.

नित्यकर्मे आटोपून गुरु ध्यानाला बसत. अर्चनाला ध्यान करता येत नव्हते. तो समोर बसून गुरुंच्या ध्यानस्थ मूर्तीकडे पहात राही. मावळत्या सूर्याच्या लाल लाल प्रकाशात अग्निच्या तेजात ऋषींची मूर्ती तळपत असे.

ऋषी डोळे उघडून पाहत. समोर बसून आपल्याकडे पाहत असलेल्या शिष्याला विचारीत, 'एवढे काय पाहतो आहेस अर्चना ? या शरीरात तुला पाहण्याजोगे काय आढळले ?'

'दुसरे काय दिसणार पिताजी ! तुम्ही अग्निदेवाची स्तुती करता. आणि तुमचे रूप साक्षात अग्निसारखेच तळपते. आकाशातील सूर्याचे तुम्ही स्तवन–पूजन करता आणि तुम्ही स्वतःच सूर्यासारखे दिसू लागता. खरोखरीच आपणच माझे 'अंगिरा' आणि आपणच साक्षात् सूर्यदेव आहात.'

'तुझे म्हणणे खरे आहे पुत्रा ! अग्नीची स्तुती करणारे अग्नीचे गुण प्राप्त करतात. अग्नीची प्रार्थना तुझ्या लक्षात आहे ?'

'होय गुरुजी, आपण अग्निदेवाला बोलावून जणू देव प्रत्यक्ष उपस्थितच आहे अशा भावनेने त्याच्याशी बोलत राहता, ते ऐकता ऐकता मलाही साक्षात अग्निदेव समोर दिसू लागतात. तुम्ही म्हणत असता–

'हे अग्नि महाराज, आपण पूर्वी अंगिरा ऋषि होता. आता देवांचेही देवपद आपल्याला प्राप्त झाले आहे. परंतु आमचे मात्र तुम्ही परम–शिव–मित्रच आहात. तुमची कामे करण्यासाठी मरुद्गण वाऱ्याच्या वेगाने धावपळ करीत आहेत.

हे देव ! तुमच्या कृपेने मनु दीर्घायु झाला. आणि माझ्या पित्याला पुत्रप्राप्ती झाली. तोच मी अंगिरस आपले स्तवन करीत आहे.

हे देव ! आम्हाला तुम्हीच मती देता. आणि वस्तुतः तुम्ही आमच्या पितृस्थानी आहात. म्हणून आपली उपासना करणारे सर्वजण परस्परांची भावंडेच आहेत. या जगात तुमच्या तोलाचे दुसरे दैवत नाही. तुमच्या कृपेनेच आम्हांला हजारो सुखसाधने मिळत आहेत.'

खरोखरीच संध्यासमयी अग्नि समिद्ध करून प्रज्वलित केला पाहिजे. प्रभातीचा संधिकाळ आणि मावळतीचा संधिकाळ दोन्ही वेळा अग्निनारायणाला समिद्ध करून तुपाची आहुती द्यावी. सकाळ-संध्याकाळ अग्नीचे स्तवन–पूजन करावे. समिद्ध अग्नि अहोरात्र आपले संरक्षण करून आपली सर्व कामे सफल करतो अशी भावना ठेवावी.

'रात्रीचा समय विश्रांतीसाठी आहे आणि त्यावेळी अग्नि आपले रक्षण करतो, असे गुरुदेव आपण मला सांगितलेले आहे. पण त्या अग्नींला समिद्ध करण्यासाठी प्रयत्न करायला नको काय ?'

'होय. प्रयत्न करायला हवाच. प्रयत्न एकट्याच्याने होत नाही. आश्रम स्थापन केला तेव्हा मी एकटाच येथे होतो. अग्नि समिद्ध करण्यासाठी मदत आणि सहकार करणारे कोणी तरी हवे म्हणून यथाविधी अग्निचे आधान स्थापन करण्यासाठी मी पत्नीचा स्वीकार केला. तुमची माता या आश्रमात आली आणि आश्रमाला शोभा आली. दुसऱ्याच दिवशी पौणिमा होती. अरणीची वाळलेली दोन लाकडे आम्ही दोघांनी तयार केली अग्नि प्रकट करण्याचे मंत्र मला येत होते. आणि तुमच्या अंबेला दोहनाचे-घुसळण्याचे काम चांगले अवगत होते. मी मंत्र म्हटले. आणि तिने त्या काष्टांना चांगले घुसळले त्यातून अग्नी प्रकटला. त्या अग्नीला एका ताटात घालून यज्ञकुंडात त्याची स्थापना केली. अग्नीबरोबर इतर देवदेवतांचेही आवाहन करून आम्ही अग्नीची स्थापना गार्हस्पत्य कुंडात केली. व आहुती देण्यासाठी आहवनीय कुंडाची रचना केली

काष्ठमंथनातून अग्नि निर्माण होतो. वाळलेली लाकडे, इंधन आणि समिधा यांच्या योगाने तो समिद्ध-चेतता रहातो. आज्य म्हणजे तुपाची आहुती, त्याला प्रकाशित करते. अरणीच्या लाकडांत अग्नि सुप्त रूपात होता. ती दोन लाकडे एकमेकांवर घासली गेल्याने जन्मलेल्या अग्नीला दोन माता आहेत.

आत्म्याविषयीचे ज्ञान अग्नीसारखेच आहे. ते शिष्याच्या हृदयात सुप्तरूपाने पडलेले असते. गरु आणि शिष्य यांचे मीलन अरणीच्या दोन काष्ठांच्या मीलना-प्रमाणे होते व ज्ञानाचा उदय होतो.

गृहस्थांकडे रोज अग्नीवर अन्न शिजविले जाते आणि अतिथीला दिले जाते. हे काम रोज व्हावयास हवे. ज्यांच्या घरी अग्नि समिद्ध होत नाही, अतिथी जेवत नाहीत, आणि अग्निला आहुती दिली जात नाही ते घर घरच नव्हे. गृहिणी ही घराची शोभा आहे. तिला मदत करून तिच्या कामात तिला सहकार व सोबत करतो तो गृहस्थ. अग्नीची सेवा-पूजा हा गृहस्थधर्म आहे.'

'पिताजी, सकाळी व संध्याकाळी अग्निपूजन करताना आहुती एकाच प्रकारची द्यावयाची ना ?'

'होय. जेथे एकच अग्नि प्रज्वलित असतो तेथे स्तुती आणि आहुती सकाळ-संध्याकाळ तीच द्यावयाची असते. पण अग्नि हा एकच आहे अशी प्रथम माझी समजूत होती. पण पुढे चिंतन करता करता त्याच्या ठायी मला इतर वेगवेगळी रूपे दिसू लागली. प्रथम दर्शन झाले सूर्यनारायणाचे. त्यामुळे माझ्या अंत:करणात ज्ञानाचा प्रकाश फाकला. मी ध्यानस्थ असतो त्यावेळी माझे डोळे अर्धे मिटलेले असतात. पश्चिमेकडे मावळणाऱ्या सूर्यावर ध्यान केंद्रीत झाले असता तो एखाद्या लाल अग्निगोलासारखा दिसतो. मावळतीच्या टोकावर

टेकलेला दूर दूर जाणारा तो गोल ध्यानपूर्वक पाहता पाहता जवळ येऊ लागतो. माझी दृष्टी त्याच्यावर स्थिर होऊ लागते. आणि मग मला दिसू लागतो हा सूर्य म्हणजे काही लाल अग्निगोल नाही. तो आहे चकमकणारा सोन्याचा रथ. त्या रथात सवितानारायण विराजमान झालेले आहेत. आकाशमार्गे ते पृथ्वीवर उतरत आहेत त्यांचा मार्ग सोन्याच्या कणांनी चमकतो आहे. आकाशातील अमरलोक व पृथ्वीवरचा मर्त्य लोक दोन्ही लोकात सवितानारायणांनी प्रवेश केला असून सर्व जीवांवर कृपादृष्टी टाकीत ते संचार करीत आहेत. याप्रमाणे सूर्यनारायणाचा सोन्याचा रथ, त्याचे तेजाने तळपणारे अश्व, सुवर्णकणांनी चमचमणारा त्यांचा राजमार्ग, त्याच्या आजूबाजूस स्वर्ग, पृथ्वी व सर्व भुवने त्या मार्गावरून पार करून सवितानारायण जवळ जवळ येताना दिसू लागले आणि माझ्या डोळ्या-देखत कुंडातील समिद्ध अग्नीत सामावून गेले. ते पाहून मी रोमांचित झालो !

आता अग्नीचे दर्शन करताना त्यातच मला सूर्यनारायणाचे पण दर्शन घडू लागले मी दिलेली आहुती घेण्यासाठी सवितानारायण माझ्या यज्ञकुंडात प्रवेशले होते. त्यांचे चमकणारे डोळे, तळपणारे हस्त मला दिसत होते. त्यांची वारंवार स्तुती करून मी त्यांना आहुती देत होतो.'

'तात, तसे पाहता अग्निहोत्रामध्ये दोन आहुतींचे विधान आहे. आणि ते योग्यच आहे. अग्निबरोबरच इतरही देवदेवतांना इष्टियागासाठी आवाहन करणारे मंत्र मी आपल्याकडून ऐकले आहेत.' आपण म्हणता,

'आम्हा सर्वांच्या कल्याणासाठी मी अग्नीला बोलावीत आहे.त्यानंतर आमचे रक्षण करण्यासाठी मित्र व वरुणाला निमंत्रण देत आहे. जिच्या छत्रछायेखाली प्राणीमात्र विश्रांती घेतात त्या रात्रिदेवतेला मी बोलावतो. आणि आमच्या पालनकर्त्या सूयंदेवाला पण आवाहन करतो.'

'हिरण्मय रथात बसून येत असलेल्या सूर्यनारायणाला पाहून माझ्या तोंडून आपोआपच स्तुतिगान बाहेर पडू लागते.'

'हे सवितादेव ! दोन घोडे जोडलेला आपला रथ उंच सखल मार्गावरून आमच्या दिशेने येताना दिसत आहे. खूप दूर अंतरावरून अंधाराला दूर सारीत आपण येऊन पोचला आहात.'

'तात !' अर्चनाने विचारले, 'सूर्यनारायण अग्नीबरोबर किती वेळ राहतो ?'

'मावळत्या संध्याकाळी सूर्यदेव अग्निकुंडात प्रवेश करून प्रभातीच्या संध्येच्यावेळी तो निरोप घेऊन जातो. रात्रभर अग्नि व सूर्य कुंडामध्ये एकत्र

असतात. म्हणून रात्रीच्या आहुती दोघांना दिल्या जातात. सांजप्रहरी आणि सकाळच्या संध्याप्रहरी.'

'गुरुदेव! आता मला समजले. संध्या–पूजा करून आपण जेव्हा ध्यानस्थ होता तेव्हा आपण अग्नि व सूर्याशी एकरूप होता. ज्याप्रमाणे या यज्ञकुंडात अग्नि व सूर्य वास करतात त्याचप्रमाणे आपल्या कायेतही ते दोन्ही देव वास करतात.'

'वत्सा! या देहात देवाने प्रवेश करावा हीच खरी संध्या आणि खरी पूजा. मी जेव्हा ध्यान धरतो त्यावेळी शरीरावर नवीच कांती चढल्यासारखी वाटते. नवीच स्फूर्ती संचारते.'

ऋषि हिरण्यस्तूपाचा महिमा सूर्यनारायणाप्रमाणेच दशदिशांत पसरत होता. राजा मनूने जेव्हा महायज्ञ केला तेव्हा ऋषि त्या यज्ञाचे पुरोहित झाले. त्यांनीच संकल्प बळाने राजा पुरुरव्याला गंधर्व केले होते. मोठमोठ्या यज्ञांत अग्नीला आवाहन केले जाते, त्याचप्रमाणे ऋषिवर्यांना पण आमंत्रण येई. अग्नि हविष्य पाक तयार करतो. सूर्य प्रकाशतो. नदी वहाते. वृक्षवनस्पती फळे, औषधी देतात. याप्रमाणे सर्व देवता परोपकार बुद्धीने सेवा करतात. त्यांची सेवा नियमित, अविरत चालू असते. त्यात खंड नाही. विलंब नाही. अडचण, विटंबना, प्रमाद, आळस काहीच नाही. त्याचप्रमाणे हिरण्यस्तूप ऋषि सर्वांच्या कल्याणासाठी सेवाकर्मे सतत करीत. जेथे म्हणून सहाय्याची आवश्यकता भासे तेथे ऋषीवर जाऊन उभे रहात प्राणीमात्रांना पीडा देणारी पापे, संकटे, विघ्ने दूर करण्यासाठी ते देवांना स्तुतिपूर्वक विनवून, यज्ञ विधीने प्रसन्न करून त्यांचे सहाय्य घेत. याप्रमाणे सर्वांचा सहकार मिळवून ते सर्वांचे कल्याण साधीत.

× × ×

रेणु नावाच्या एका राजाने ऋषींना निमंत्रण देण्यासाठी राजपुरुषांना त्यांच्याकडे पाठवले होते त्याच्या राज्यातून अग्नी रुष्ट होऊन निघून गेला होता. त्यामुळे प्रजेचे जीवनच खुंटले होते. विविध ऋतूंची पिके पिकेनाशी झाली आणि सर्दीच्या रोगाने लोक त्रस्त होऊन गेले.

खरोखरीच अग्नि मानवाचे आयुष्यच होय. ते जिवंतजागते जीवन तत्वच होय. अग्नीला प्रसन्न करून घेण्यासाठी राजाला यज्ञ करावयाचा होता. त्यासाठी पुरोहितपद स्वीकारावे अशी विनंती त्याने ऋषींना केली. परोपकारी वृत्तीचे ऋषी हिरण्यस्तूप राजपुरुषांच्या बरोबर जाण्यास निघाले.

आश्रमाची दैनंदिन कामे व सेवाकार्य नीट चालावी म्हणून त्यांनी शिष्यामध्ये श्रेष्ठ अशा अर्चनाकडे ती व्यवस्था करण्याचे काम सोपवले. सकाळ–संध्या-

काळ-संध्यादि पूजा नियमाप्रमाणे करून सूर्यनारायण व अग्निनारायणाला यथाविधी आहुती द्यावी. त्याचप्रमाणे आश्रमात येणाऱ्या अतिथींचा खानपानादी देऊन योग्य आदरसत्कार करावा ही कामे करण्यास अर्चन सर्वतोपरी योग्यच होता.

सरस्वती नदीच्या तीरावरचा प्रदेश ओलांडून ऋषी मगध देशात जाऊन पोचले. वर्षा ऋतूची सुरवात होऊन गेली होती पण त्या प्रदेशात पावसाचा थेंबही अद्याप पडला नव्हता. त्यामुळे शेतकरी व इतर प्रजाजन मोठ्याच काळजीत होते. त्यांना कोणताच उपाय सुचत नव्हता.

हिरण्यस्तूप ऋषींचे आगमन होताच त्या सर्वांनी पाया पडून हात जोडून त्यांची प्रार्थना केली—

'महाराज या संकटाचे निवारण करून आम्हाला वाचवा. आपण देवराज इंद्राची आराधना करून त्याला प्रसन्न करून येथे पाऊस पडेल असे करा.'

ऋषी आश्रम सोडून परोपकार करण्यासाठीच बाहेर पडले होते. राजा काय किंवा प्रजा काय कोणाहीसाठी तन मनाने सेवा करता आली तर लगेच ती करावी असा त्यांचा भाव होता. त्यासाठी मुदत किंवा वायदे ह्या गोष्टी संभवतच नव्हत्या.

शेतकऱ्यांच्या त्या जनपदांत ऋषी राहिले. सर्वांना बोलावून त्यांच्या मनात साठलेल्या दुःखाला वाचा फोडली. त्या सर्वांनी ऋषिवरांना सांगितले, 'भगवन्, आम्ही दोन्हीकडून नाडलेले आहोत. शेतीवर आमचा निर्वाह चालतो. गाय व बैल यांच्या जिवावर आम्ही शेती करतो. शेजारच्या रानावनांतून लुटारू आले, त्यांनी आमचे गोधन पळवले. आता आम्हाला कोण मदत करू शकणार आहे ? आम्ही दीन दरिद्री झालो !

दुसऱ्या बाजूने मेघराजानेही अवकृपा केली. मोठमोठे ढग आकाशांत दिसतात. वारा कोंडतो. मळभ दाटते. पण पाण्याचा एक थेंब पडेल तर शपथ ! विजा चमकत नाहीत ढग गडगडत नाहीत नि पाऊसही पडत नाही. हवा बंद झाल्याप्रमाणे या कुंद वातावरणात आम्ही गुदमरत आहोत. या पावसाला कोणी अडवले काही कळत नाही. ढग खूप आहेत. आकाशात एकावर एक रचलेल्या ढगांचे पर्वतचे पर्वत जणू निर्माण झाले आहेत. परंतु त्यांचा असा खच पडल्याने पाऊस मात्र पडत नाहीसा झाला आहे.

कोठली शूर पराक्रमी देवता या अडविलेल्या जलराशींना मुक्त करू शकेल बरे ? ढगांचे हे पर्वत फोडून पाण्याच्या धारा पृथ्वीवर कोणी आणील का ?'

प्रजाजनांची ती केविलवाणी विनंती ऐकून ऋषि म्हणाले, 'बंधूनो तुम्हाला तारण्याची शक्ती देवराज इंद्राच्या ठिकाणी आहे. यापूर्वी त्या देवश्रेष्ठाने अनेक पराक्रम केले आहेत. त्याचा महिमा मी तुम्हाला सांगतो--

देवांचा राजा इंद्र हातात वज्र नावाचे शस्त्र धारण करतो. त्या वज्राच्याच साह्याने त्याने अहि राक्षसाचा वध केला त्याने असेच पाणी अडवून ठेवले होते म्हणून इंद्राने त्याचा नाश केला. त्याचा वध होताक्षणी पृथ्वीवर मुसळधार पाऊस पडला होता

अधांतरी तरंगणाऱ्या या ढगांच्या पर्वतांचे पंख इंद्राने कापून टाकले होते. देवांचा कुशल कारागीर त्वष्टा प्रजापतीने इंद्रराजाचे वज्र घडवले. त्या वज्राच्या साह्याने त्याने पर्वताच्या गुहेतून राहणाऱ्या अहिसर्पांचा नाश केला व पावसाचे पाणी त्यांच्या पाशातून सोडवले. संध्याकाळ होताच गाई आपल्या वासराकडे धाव घेतात तशा पर्जन्याच्या धारा आकाशातून पृथ्वीकडे झेपावल्या. नद्या वर्षावामुळे दुथडी भरभरून समुद्राच्या दिशेने खळखळ वाहू लागल्या. अशा अपूर्व वेगाने व उत्साहाने पाण्याच्या धारा वरसू लागल्या.

पाण्याला अडवणारा अहि हा एकटा नाही. अंतरिक्षात आणि पृथ्वीवर असे अनेक अहिराक्षस आहेत. त्या सर्वांचा अग्रेसर वृत्र. त्याने सारे आकाश भारून टाकले होते त्यावेळी त्याचे व देवराज इंद्राचे भयंकर युद्ध झाले होते. त्या तुमुल युद्धात इंद्राने वृत्राचे हात, पाय व इतर अंगे वज्राने तोडली. पण त्यावेळी मायेचे जाळे पसरू लागले. वृत्राची आई दनु हिने आपली काया विस्तारून वृत्राला आपल्या छायेखाली घेतले.

दनु आणि वृत्र एकवटल्यावर इतके भक्कम झाले की त्यांच्यामधून पाणीच काय पण वाराही जाणे अशक्य होऊन गेले. सूर्य झाकला गेला आणि उषाही ग्रासली गेली. तिन्ही लोकांत गाढ अंधार व हाहा:कार पसरला. वृत्र स्वत:च गाढ अंधारासारखा होता. त्याला शोधून काढणेही अशक्य होते. ज्ञानी जन नेहमी अंतरात्म्याचा प्रकाश शोधीत असतात. त्या प्रकाशाचा मागोवा घेणाऱ्या ज्ञात्यांनाच वृत्राची माया कळून चुकली. या ज्ञानी जनात श्रेष्ठ होता देवराज इंद्र. देवेंद्राला उमगले की ज्याप्रमाणे हा वृत्र बाहेर अंधार पाडीत आहे त्याचप्रमाणे माणसांची मने पण काजळून टाकीत आहे. त्याच्या मायेमुळे सर्वत्र अज्ञान पसरत आहे. आत की बाहेर, बरे-वाईट काही कळेनासेच झाले आहे.

अज्ञानाच्या मायेतूनच वृत्र स्वतः निर्माण झालेला होता. आणि स्वत:च्या उत्पत्तीनंतर त्याने सगळीकडे मायाजालच पसरले. त्याच्या त्या मायांचा इंद्राने

नाश केला. लहानमोठ्या माया नाश पावतात त्यावेळी मूळमाया समोर येऊन ठाकते. सर्व प्रकारच्या अज्ञानाने ती घेरलेली असते. देवेंद्राने वृत्राबरोबरच त्याची माता दनू हिचा पण नाश केला. अज्ञानाचा अंधार दूर होताच सर्वत्र प्रकाश पसरला असा चमत्कार झाला.

बंधूनो, लुटारू तुमच्या गाई चोरून घेऊन गेले आहेत. आणि त्याना गुहेमध्ये कोंडून ठेवले आहे हा अहिचा स्वभावधर्म असून त्यांचा नायक असतो वृत्रासूर. पावसाला त्यानेच अडवून ठेवलेले आहे.

तरी आता तुम्ही त्या लुटारूंच्या गुहा शोधून काढा. त्यांची दारे उघडा तुमची गाई गुरे धावतच तुमच्या गोठ्यात परत येतील. इंद्रदेवानी वृत्राला मारून आकाशाची दारे उघडून टाकली आहेत. पाणी आता वाहू लागेल. अंधार ओसरताच उषेची प्रभा फाकेल. सूर्योदय होऊन सारे जगत प्रकाशात न्हाऊन निघेल.

देवराज इंद्र महापराक्रमी आहे. लुटारूंचा नाश करून तो गाईंना मुक्त करतो. तो सोमरस आणून देतो आणि सप्तसिंधू आणि नद्या दूथडी भरून वाहू लागतात.

देवराज इंद्र जड, चेतनाचा स्वामी असून तो सर्वच प्रजाजनांच्या अंतरात वास करतो. चक्राच्या आसाप्रमाणे सर्व जड चेतन पदार्थ इंद्राच्या आजूबाजूस वेढलेले आहेत.

ऋषीनी केलेली ही स्तुति ऐकून इंद्र प्रसन्न झाला आकाशात विजा चमकू लागल्या. ढगांचा गडगडाट होऊन मुसळधार पाऊस पडू लागला शेतकरी आनंदाने व उत्साहाने आपल्या शेतीच्या कामास लागले शेतातून नवी पिके डोलू लागली. देवराज इंद्राची स्तुती करणाऱ्या त्या शेतकऱ्यांच्या हातात इंद्राचे बळ आले. त्यांच्यात नव्याच शक्तीचा संचार झाला.

त्या शेतकऱ्यांनी मग आपले संघ रचले. परस्पर सहकार्याने एकत्र येऊन लुटारूंवर आक्रमण करून त्यांचा पराभव केला आणि त्यांच्या गुहांची दारे उघडून कोंडलेली गाई गुरे सोडवून आपआपल्या घरी परत आणली.

× × ×

शेतकऱ्यांना याप्रमाणे सुखी करून हिरण्यस्तूप ऋषि रेणुराजाच्या राजधानीस गेले. त्याच्या राजवाड्यात ते राहिले आणि त्यांना दिसून आले की राज्याची स्थिती फारच वाईट झाली होती. अग्निशाळांतून अग्निकुंडे विझून गेलेली होती. राज परिवारातील माणसेदेखील अर्धे कच्चे अन्न खात होती. त्यामुळे सर्वांची पोटे बिघडून अजीर्णाने व इतर रोगाने सर्वजण पीडले गेले होते. या अवदशेचे कारण ऋषींना लगेच उमगले.

रेणुराजाची पत्नी मरण पावली होती. युवराज पुरूचा अद्याप विवाह झाला नव्हता. त्यामुळे राज्याची व राजभवनाची व्यवस्था पाहणारी राजमाता तेथे नव्हती. त्यामुळे खाण्यापिण्याची काळजीही कोणी घेत नव्हते. कोणीही केव्हाही यावे, काहीही खावे आणि अग्नि विझवावा. पुन्हा दुसरे कोणी आल्यास तो परत चेतवावा. तिसऱ्याने येऊन तिसरेच काही करावे अशी अनावस्था चालली होती.

राजाच्या राज्य सभेत पण हीच अवस्था होती. राजा स्वतःच नियमित येत नसे. त्यामुळे इतर राजपुरुषही अनियमित वागत. कोणी कोणाचे ऐकत नसे. सेवक मनःपूत वागत असत. आपसात कलह माजले होते आणि सारे राजतंत्रच पार बिघडून गेले होते. अर्थातच प्रजाजनांची स्थितीही अशीच झाली होती. कोणी कोणाचा विचार करीत नव्हते. सांभाळ करीत नव्हते. त्यांच्या कुटुंबजीवनात देखील रागद्वेष पसरले होते.

हे सारे पाहून ऋषी विचार करू लागले. ' अरे, येथे तर तिन्ही प्रकारचा अग्नि विझून गेलेला आहे. राजभवनातला अग्नि मालवला आणि रोगराई पसरली. राजसभेतला अग्नि शमला आणि ज्ञानाचा प्रकाश जाऊन अज्ञानाचा अंधार तेथे माजला. प्रजेच्या घराघरातून स्नेहभावाची ऊब नाहीशी झाली आणि ईर्षा वाढीला लागली.

आता यावर उपाय म्हणजे पहिल्यांदा जठराग्नीला प्रज्वलित करून रोगांचा नाश करावयास हवा. ज्ञानाग्नीचे साधन करून अज्ञानाचा अंधार दूर केला पाहिजे. सहकाराचा अग्नी चेतवून इर्षेला घालवून दिले पाहिजे.

ही कामे व्हावीत म्हणून प्रथम युवराज पुरूचे लग्न करून त्याच्या पत्नीला पट्टराणी, सम्राज्ञीचे पद दिले. भाग्याची गोष्ट अशी की युवराजाला सुयोग्य राज-कन्या पत्नी म्हणून लाभली. अरणीची काष्ठे आणून अग्नीचे आवाहन करून ऋषींनी यज्ञकुंड राणीच्या स्वाधीन केले.

आता राजभवनात संध्याकाळ होताच अग्नि नियमित समिद्ध होऊ लागला दिवे लागू लागले. अग्निला आहुती देऊन संध्यापूजा होऊ लागली. राजमंदिरात देवांची आरती होऊ लागली. रात्रभर अग्निला चेतता ठेवण्यासाठी समिधा इंधन घालून प्रभात होताच विशेष समिद्ध करून त्याला आहुती दिली जाई. त्या अग्नि-ज्वालेबरोबरच राजभवनात नवी चेतना, नवी स्फूर्ती येऊ लागली. अग्नि म्हणजे प्रत्यक्ष चिरयौवनच.

अग्निशाळेची कामे नियमित रितीने होऊ लागली. त्याचबरोबर पाकशाळाही व्यवस्थित चालू लागली. रूचकर भोजन तेथे होऊ लागले. रोज वेळेवर ताजे अन्न

मिळाल्याने राजपुरुषांचे आरोग्य सुधारू लागले. ज्यांचे शरीर निरोगी, त्यांचे मनही निरोगी होऊ लागले.

राजभवनांतील नियमिततेने राजा पुरूलाही नवजीवन प्राप्त झाले होते शरीर धष्टपुष्ट झाले होते. त्याने राज्यसभा नियमितपणे बोलावून स्वत: वेळेवर उपस्थित रहाण्यास सुरवात केली. त्यामुळे इतर राजपुरुष व सेवक वर्ग सावधान होऊन राजतंत्र सुधारू लागले. त्यामुळे आपोआपच अज्ञान व आळस दूर होऊन प्रजातंत्र पण नीट चालू लागले. सर्वजण मिळून मिसळून एकोप्याने कामे करू लागले. राजा आणि राजतंत्र यांच्याबद्दल त्यांच्या मनांत आदरभाव नांदू लागला· ईर्षा आणि मत्सर नाहीसे होऊन प्रेम आणि दयाभावाची ऊब जीवनांत येऊ लागली.

राज्यातील तिन्ही विझून गेलेले अग्नि याप्रमाणे प्रकटले. ऋषींनी त्यांना समिद्ध केले. त्यामुळे राजा व प्रजा सुखी व समृद्ध झाले. भौतिक संपत्तीबरोबर दैवी संपत्ती पण वाढावयास हवी हे ऋषी बरोबर जाणत होते. त्यांनी राजा आणि राणी यांच्याकरवी अनेक यज्ञ केले. इंद्र, अग्नि, सोम, वरुण आदि देवतांचे आवाहन करून त्यांना प्रसन्न केले

एक वर्षपर्यंत ऋषि त्या राज्यात राहिले. तेवढ्या काळात त्यांनी राजाला व प्रजेला नवजीवन दिले. त्यांच्या जीवनात नव्या अग्नीची चेतना, स्फूर्ती व संपत्ती आली. त्यानंतर आपले कार्य पूर्ण करून ऋषींनी राजाजवळ निरोप मागितला. राजा व प्रजेने प्रेमपूर्वक त्यांचा आदरसन्मान करून त्यांना निरोप दिला.

× × ×

एक वर्षानंतर ऋषी आपल्या आश्रमात परतले. वस्तुत: एका वर्षाहून अधिक काळ लोटला होता. तथापि ब्रह्मचारी अर्चनाने गुरुपत्नीच्या सहकार्याने आश्रमाची कार्ये सुरळीत चालवली होती.

अर्चन आश्रमाच्या गृहपती पदावर असला तरी तो खराखुरा जिज्ञासू विद्यार्थी होता. काहीही नवीन पाहिले की ते जाणून घेण्याची त्याला इच्छा होई· आणि याप्रमाणे ज्ञान मिळाले की त्याला परम संतोष होई. ऋषिवर हिरण्यस्तूप पितृस्थानी असले तरी त्यांचे गुरुस्थान तो प्रथम मानीत होता. त्यांच्याकडून त्याची जिज्ञासा तृप्त होई. गुरु आल्यावर त्याने विनयपूर्वक त्यांना विचारले,

'गुरुदेव, ज्या राज्यात अग्नि पूर्ण विझून गेला होता तेथे आपण जाऊन आलात. तेथे अग्नि समिद्ध करण्यासाठी आपण कोणता उपाय योजला? कोणत्या देवांची स्तुती केली बरे?'

'अर्चना, मी गेलो होतो त्या राज्यात राजा होता. युवराज होता. पण कोणी सम्राज्ञी मात्र नव्हती. मग राज्यलक्ष्मी तेथे कशी बरे राहील? त्या राष्ट्रात तिन्ही अग्नि विझून गेलेले होते. तेव्हा तीन तीन साधने ज्यांच्याजवळ असतील अशाच देवांना आवाहन करावयास हवे होते. म्हणून मी प्रथम माझ्या शरीरात वास करणाऱ्या प्राणदेवतेचे ध्यान धरले व त्या देवतेलाच उत्तर देण्यास विनवले. माझ्या अंतरात्म्याने मला आश्विनीकुमारांची स्तुती करण्यास सुचवले.

त्याप्रमाणे मी आश्विनीकुमारांची स्तुती केली. त्यांच्या कृपेने राजा व प्रजाजनांना नवजीवन प्राप्त झाले. प्राणतत्त्व जागे होताच विझलेला अग्नि पुन: प्रज्वलित होऊन समिद्ध झाला. राजाच्या आणि प्रजेच्या जीवनात अग्नीची नवनवी रुपे प्रकट होऊ लागली. नव्याच चैतन्याचा संचार झाला. हे कार्य पुरे होताच मी तेथून निघालो. कारण एक तर मी पुरोहिताचे काम करीत होतो आणि दुसरे मी तेथे अतिथी म्हणून गेलो होतो. तेव्हा काम झाल्यावर जास्त वेळ तेथे राहणे उचित नव्हते.'

'खरे आहे तात. राजभवनात आपल्यासारख्यांनी फार दिवस रहाणेही उचित नाही. आपल्यासारख्या सेवाव्रती ऋषींचे आश्रम हेच तपोधन होय. तेथे रहाण्यानेच तप वाढते. प्रभो, आपण आश्विनीकुमाराची स्तुती केली, ती मला ऐकायला मिळेल का?'

'ऐक वत्सा. आश्विनीकुमार हे दोघे सतत एकमेकांबरोबर राहणारे देव आहेत. त्यांची स्तुती पहाटे लवकर उठून करावयाची असते. पक्षांचा कलरव सुरु होण्याआधी केलेल्या स्तुतीने हे देव प्रसन्न होतात. त्यांना 'नवेदा' असेही एक नाव आहे. त्याचा अर्थ विपरीत ज्ञानापासून दूर राहून सतत नवनवे ज्ञान देणारे. त्यांनाच 'नासत्य' असेही म्हणतात. असत्य त्यांच्या वाऱ्यासही उभे रहात नाही छाया—संज्ञा आणि सवितानारायणाचे ते पुत्र. देवांचे ते वैद्य आहेत. ते दोघेही सदैव रथात बसलेले असून जेथे जेथे काम असेल तेथे लगेच धाव घेतात त्यांच्या रथाचे घोडे विशेष प्रकारच्या रस–वेगाने चमकणारे असून त्यांना 'रासभ' असे म्हणतात. वाऱ्याच्या वेगानें संचरणारे हे देव म्हणजे माझी आराध्य दैवतेच आहेत. राजा, युवराज, राणी आणि प्रजाजनांच्या समवेत मी या देवयुगुलाची स्तुती केली. ती सूक्ते अशी :–

'हे नवेदा आश्विनीकुमारांनो, आज आपण आमच्याकडे त्रिवार यावे अशी आमची प्रार्थना आहे. तुमचा मार्ग विशाल असून तुम्ही फार मोठे दान देणारे आहात. रात्र आणि दिवस ज्याप्रमाणे जोडलेले आहेत त्याचेप्रमाणे तुम्हीही एकमेकांशी जोडलेले आहात. तुमच्या दैवी रथाला तीन चाके असून तो रथ

आमच्यासाठी अन्नधान्यादी सामुग्री घेऊन येतो. ज्यावेळी 'वेना' व सोमराज यांचा विवाह झाला त्यावेळी त्या वधूवरांना तुम्ही आपल्या रथात बसवले होते. त्याचप्रमाणे आमच्या राजाला व राणीला आपल्या रथात स्थान देऊन आम्हाला त्रिविध प्रकारचे अन्नदान करावे.

तुम्ही त्रिवार आमचे पापापासून रक्षण करता. तुमच्या पूजेचे व्रत घेणाऱ्यांच्या सवन-हवनासाठी आपण त्रिवार येता. तुम्ही त्रिवार शिक्षण देता आणि फळही त्रिवार देता.

आमचे रोग दूर करण्यासाठी तुम्ही तीन प्रकारच्या औषधी घेऊन येता. आकाशांत सूर्याचा प्रकाश आहे. अंतरिक्षात वायूचा संचार आहे. आणि पृथ्वीवर वृक्ष-वनस्पती उगवलेल्या आहेत. त्यांतून औषधी आणि उपचाराची सामुग्री घेऊन आपण यावे. आणि आम्हाला त्रिविध शांती मिळवून द्यावी.

आत्मा ज्याप्रमाणे तीन प्रकारच्या शरिरांत वास करतो त्याप्रमाणे तुम्ही आमच्यापासून दूर असूनदेखील जेव्हा पृथ्वीवर याल तेव्हा आमचे रक्षण करण्यासाठी तीन प्रकारची धातु-द्रव्ये घेऊन यावे. आमच्या हवनाच्या प्रसंगी आपण या. आपल्यासाठी मधुर रस सिद्ध केलेला आहे. सूर्योदयापूर्वी-उषेचाही उदय होण्याआधीच तुपाचा घट भरलेला आहे आणि आम्ही तुमचे स्तवन करीत आहोत.'

हे अश्विनीकुमारांनो, तुम्ही याल त्यावेळी तीन्ही देवगणांना बरोबर घेऊन या पृथ्वीच्या अकरा देवता, अंतरिक्षाच्या अकरा आणि स्वर्गाच्या अकरा देवतांना आमच्या यज्ञात मधुर रसपान करण्यासाठी घेऊन यावे.'

अंगिरा कुलात जन्मलेले हिरण्यस्तूप ऋषि सर्व लोकात फार प्रसिद्ध होते. ज्याप्रमाणे सर्व देवांत अग्नीची प्रथम पूजा केली जाते आणि सर्व छंदात बृहति छंद श्रेष्ठ मानला जातो, त्याचप्रमाणे सर्व ऋषींत हिरण्यस्तूप ऋषींचे स्थान प्रथम गणले जाते.

याच अंगिरा कुलात दुसऱ्याही दोन ऋषींनी देवांचे अरांदिव्य दर्शन घेऊन विविध सूक्तांची रचना केलेली आहे. त्यापैकी एका ऋषीचे नांव सव्य असून दुसऱ्या ऋषीचे कुत्स असे आहे. त्यांचे वडील अंगिरा ऋषि देवराज इंद्राचे पूजन अर्चन करीत. आणि देवराजास इष्ट देव मानीत. ते आपल्या शिष्यांना सांगत-

'माझा भाग्यविधाता देव इंद्र असून मला शक्ती व सामर्थ्य देणाराही देवराज इंद्रच आहे.'

ऋषींची अनन्य भक्ती पाहून प्रसन्न झालेल्या इंद्राने त्यांना वर मागण्यास सांगितले असता त्यानी देवराजाकडून त्याच्याचसारखे वीर पराक्रमी पुत्र मागून घेतले.

त्यांची भावना पूर्ण करील अशा वीरांना शोधण्यासाठी देवराजाने चौदा भुवने पालथी घातली. पण त्याला स्वतःच्या तोडीचा कोणीच वीर अथवा देव आढळला नाही. शेवटी इंद्राने स्वतःच ऋषींच्या पोटी जन्म घेतला. देवराजाच्या उजव्या अंगाचा तो श्रेष्ठ अंश. म्हणून ऋषींनी त्याचे नाव 'सव्य' असे ठेवले. सव्याने पित्याचेच गुरुपद स्वीकारून उत्तम विद्या मिळवली.

इंद्राचा महिमा वर्णन करणारी सात सूक्ते त्यांनी रचली आहेत. इंद्राच्या अद्भुत पराक्रमांचे गुणगान करताना नदी जशी अथांग अविरत वहात जाते तशी ऋषींची वाणी अस्खलित काव्यधारा वहात राहते.

'हे देवराज इंद्र, तुमच्या पराक्रमांना अंत नाही, त्यांतले किती नी कोणते वर्णन तरी करावे ? आम्ही तुझेच आहोत. तू आमचा देव नि आम्ही तुझे भक्त. आमची मनोकामना तूच पुरवतोस. विशाल आकाशाच्या देवांनी तुमचे पराक्रम पाहून तुमचे श्रेष्ठत्व मान्य केले आहे. आणि पृथ्वी तर तुमच्यापुढे विनम्र झालेली आहे.

अंगिरा ऋषीच्या दुसऱ्या मुलाचे नाव कुत्स. त्याच्या मातेचे नाव अर्जुनी. या पुत्राने पित्यापासून वीररसाचा वारसा घेतला होता. आणि आईकडून कोमल-करुणामय स्वभाव घेतला होता. त्याने मातेला गुरुस्थानी मानून मातेला 'मातृदेव' आणि पित्याला 'पितृदेव' मानून त्यांची उपासना केली होती. करुणामयी माता व वीररसाची प्रतिमाच असा पिता हीच त्यांची दैवते होती.

मातापितरांचे पूजन करणाऱ्या कुत्स ऋषींना सर्व देव मित्र वा भाऊच असावेत तसे वाटत. सर्व शक्ती त्याला भगिनींच्याप्रमाणे वाटत. अग्निदेवाची स्तुती करताना ते वारंवार म्हणतात,

'जातवेदा- सर्व जाणणाऱ्या अग्निदेवा ! माझे हे स्तोत्र रथासारखे रमणीय असे घडवून मी तुला अर्पण करतो. हे देव तुझ्या संगतीत आमची बुद्धी सतेज होते. हे अग्निदेव, आपण तर एकमेकांचे मित्र-सखे. आमच्यावर रुष्ट होऊन कसे बरे चालेल ? कारण आपण आप्त आहो- आणि आम्ही तुझे भक्तही आहोत.'

कुत्स ऋषींनी अग्नीशी मैत्री केली. आणि त्याच देवाला त्यांनी द्रविणोदा-सर्वद्रव्य-साधन देणारा सहाय्यकही करून घेतले. त्यांनी पाहिले की, विश्वात जे जें नरश्रेष्ठ असतील, परोपकारी असतील त्यांना एकत्र आणून त्यांचा 'विश्वनर' संघ केला पाहिजे. अशा नरश्रेष्ठांचा अग्रणी तो 'वैश्वानर' आणि या पदाला योग्य असा अधिकारी देव अग्नीच आहे, अशा भावनेनें वैश्वानर अग्नीची प्रार्थना केली आहे :-

'विश्वातील जात–जन्मलेल्या प्राणीमात्रांचा ज्ञाता जो अग्नि तो स्वत: 'जात–वेदा'–स्वयंभू आहे. मरीचीचा पुत्र कश्यप याने या स्वरुपात त्याचे दर्शन घेतले होते. कश्यपाने केलेल्या स्तुतीमध्ये कुत्साने आपली स्तोत्रे घालून त्यात मित्रत्वाची भावना व्यापक केली आहे. इतकेच नाही तर वृषागिर राजाच्या पाच राजकुमारांनी देवराज इंद्राचे गुणवर्णन करून त्याची प्रार्थना केली– त्या राजकुमारांची नावे ऋणाश्व, अंबरीष, सहदेव, भयमान व सुराधस अशी होत. त्यांच्या सूक्तांचा समावेश पण कुत्सांच्या स्तोत्रात केलेला आहे.

माता व पित्याच्या करुण–कोमल व वीर वृत्तींनी घडलेल्या त्या ऋषींना पितरांचा इष्ट देव इंद्र स्वत:च्या भावासारखा वाटे. म्हणून त्यांनी इंद्राला मरुतांच्या सेनेसह मित्राला बोलवावे त्याप्रमाणे बोलावलेले आहे. इंद्राची मैत्री टिकविण्यासाठी त्याच्याचसारखा पराक्रमही करावयास हवा. म्हणून ऋषींनी निश्चयाने बलोपासना केली. आणि देवेन्द्राप्रमाणेच अद्भुत पराक्रम केले. युद्धात त्याच्या मदतीस इंद्रही येत असे. रणांगणावर ते दोघे सारखेच शौर्य दाखवीत असत.

ज्याप्रमाणे पांडवांच्यापैकी एक अर्जुन स्वर्गात इंद्राच्या भेटीसाठी गेला असता इंद्राने आपल्याच आसनावर बसवून त्याचा सत्कार केला होता, त्याचप्रमाणे कुत्स ऋषींना पण आमंत्रण देऊन आपल्या आसनावर आदरपूर्वक बसवून त्यांचे आतिथ्य केले होते. त्या दोघांच्या रुप आकार व वेषभूषा यांतील साम्य पाहून यांतील इंद्र कोणता व कुत्स कोणता असा प्रश्न इंद्राणीला पडला होता. खरोखर भक्त आणि भगवान यांच्यात इतके साम्य हीच सारुप्य भक्ती होय.

कुत्स ऋषी मात्र इंद्र व अग्नीचेच पूजक नव्हते. त्यांनी इतरही अनेक देव–देवतांची आराधना केलेली आहे. मित्र, वरुण, आदित्य, वसु, पितृ आणि इतर देवता, आदिति. बृहस्पती, सिंधु, पृथ्वी आणि द्यौ सर्वांचेच स्तवन करून मानवी कल्याणासाठी त्यांनी त्यांना आवाहन केलेले आहे.'

'माझ्या मते जो इंद्र आहे तोच वरुणही आहे. अग्नि हाच अर्यमा आणि सविता आहे आदिति, सिंधु पृथ्वी आणि द्यौ या देवता मला अनुमोदन देत आहेत.'

या ऋषींनी इंद्र व अग्नि दोघांना एकाच समयी आवाहन करून त्या दोघांचा सारखाच सत्कार केलेला आहे पूर्वी कुशल कलाकार मानव असून आपल्या गुणांमुळे ज्यांना देवपद प्राप्त झाले त्या ऋभुंना आणि देवांच्या वैद्यराज आश्विनीकुमारांना पण ऋषि भावपूर्वक यज्ञासाठी बोलावून त्यांची प्रशंसा करतात.

कुत्स स्वभावत: तरल संवेदनशील कवि आहेत. निसर्गाच्या पलीकडे वसणारे तत्त्व त्यांना दिसते, जाणवते उषेचे दर्शन घेताना ते म्हणतात,

'अहो ! पहा पहा. रात्र जात आहे. आपली जागा ती उषेला देत आहे. ही उषा पण जाईल आणि मग सूर्य उगवेल. सूर्य ही सर्व ज्योतींमध्ये श्रेष्ठ ज्योत आहे. तिचा प्रकाश आकाशगंगेप्रमाणे आणि अंतरिक्षातील ध्वजापताकांच्याप्रमाणे आश्चर्यकारक रितीने सर्वत्र पसरतो.

आजची उषा झोपलेल्याला उठवणारी आणि जागे असलेल्यांना पुढे नेणारी असून अशा कित्येक उषा उदयाला आल्या आणि पुढे येतील. हा क्रम अव्याहत चालूच रहाणार आहे. सूर्योदयाचे दर्शन घेऊन ऋषी म्हणतात,

'अहो ! कोण आश्चर्यकारक चित्र ! हा सूर्य म्हणजे मित्र, वरुण व अग्नि, या देवांचा स्थिर चक्षुच होय. सूर्य नारायणाने उगवताच त्रैलोक्याला व्यापून टाकले आहे. प्रभु सूर्यदेव हा जड व चेतनाचा आत्मा आहे.'

कुत्स ऋषींनी झंझावात, समुद्रातील वादळे, सैर भैर वाहणारे वारे वगैरे भयानक दृश्ये पण आनंदविभोर मनाने पाहून, एका परमआत्म्याच्या त्या लीला आहेत. या भावनेने निर्भयपणे त्यांचे वर्णन केले आहे. महाकाल जटाधारी महादेवाच्या रौद्र रुपाची पण त्यांनी स्तुती केली आहे.

याप्रमाणे अंगिरा ऋषि, त्यांचे पुत्र हिरण्यस्तूप, सत्य व कुत्स प्रभातीच्या व सायंकाळच्या संध्या समयी स्तुति स्तवने करून अग्नि, इंद्र, अदिति, उषा, सूर्य रुद्र, या देवता व वसु, रुद्र, आदित्य, पितर, ऋभु, विश्वदेव, आदि देवगणांची प्रार्थना करून सर्व शक्तींचे आवाहन करीत.

★★

# ६ / सर्वांचे कल्याण असो

(ऋग्वेद प्रथम मंडल)

'सर्वांचे कल्याण असो. हे परम दयाळू प्रभो, सर्वांचे कल्याण करा.' ही एक अत्यंत सुंदर प्रार्थना आहे. दयामय देवाने सर्वांचे कल्याण करावे या भावनेने प्रत्येकाने इतरांचे कल्याण करण्याचा संकल्प त्यात आहे. आपले प्रत्येक काम, आपली प्रत्येक भावना, आपले प्रत्येक साधन सर्वांचे कल्याण साधणारेच असावे.

आपण सर्वांनी जमून कल्याणकारी गोष्टी ऐकाव्या. जे जे पाहून आपले भले होईल अशी सुंदर दृश्ये पहावी. त्याचप्रमाणे देवाची प्रार्थनाही सर्वतोभद्र– सर्वकल्याणाच्या साठी करावी. 'सर्वांचे भले होवो. सर्वांचे हित साधो' हेच आपले मागणे असावे.

ही मंगल प्रार्थना करणाऱ्या ऋषिवर्यांचे नाव आहे गौतम. गौतमांच्या पित्याचे नाव रहूगण. ऋषींनी इंद्र, अग्नि, मरुद्गण, विश्वदेव, उषा आदि देवतांची स्तुती करून कल्याणकारी प्रार्थना केली आहे ते म्हणतात :

'अग्नि ही ज्ञानाची देवता आहे. तो आपल्याला हितकारी बुद्धी व विद्या देतो. देवांचा राजा इंद्र आपल्याला घर, पुत्र, परिवार, गुरेढोरे, आदी सुखसाधने देतो. सातांच्या समूहात रहाणारे मरुत रूप गुण वेश आदी सर्वच एकसारखे धारण करतात. त्यांच्या वेशाला गणवेश म्हणतात. एकेका गणात सात असे सात गण आणि एकूण एकोणपन्नास मरुत् देव लोकांच्या कल्याणासाठी झटत असतात. दुष्ट तत्त्वांशी संग्राम करून प्राणिमात्राला ते सुखसाधने मिळवून देतात.

विश्वदेवांमध्ये सर्व मोठ्या देवदेवतांचा समावेश होतो. ते सर्व देव सर्वांचे भले करतात. त्या खेरीज वरुण, मित्र आणि अर्यमा– सूर्य हे सर्वांना नीतिमार्गाने नेणारे आहेत. आपल्या धनसाधनांचे ते स्वामी आहेत. विशेष ज्ञानी असून ते स्वतःही व्रत नियमादींचे पालन करून सर्वांचे हित साधतात.

'हे पूषादेव, हे महापराक्रमी देव विष्णू, हे मरुद्‌गणांनो आम्हाला कल्याण-कारी मार्ग दाखवा. ज्यांचे आचरण सरळ आहे; त्यांच्यासाठी वायु अनुकूल रीतीने वहात असतो. ते ऋत–सरळ मार्गाने जाणारे लोक, त्यांच्यासाठी नद्या उत्तम प्रकारे वाहतात. आकाश त्यांच्यावर पित्याप्रमाणे छाया धरीत असते. हे देवांनो वनस्पती व सूर्य आम्हाला अनुकूल होवोत. आमच्या गायी आमचे कल्याण करोत.'

'हे देवतांनो, मित्र, वरूण आणि अर्यमा, देवांमध्ये श्रेष्ठ इंद्र आणि देवगुरू बृहस्पति आमचे हित करा. त्रिलोकांत उत्तम पराक्रम करणाऱ्या विष्णु देवा! आमचे कल्याण करा-'

गौतम ऋषींनी रचलेली ही प्रार्थना व स्तुतिस्तोत्रे भक्तजन नेहमी गातात. यज्ञाच्या प्रारंभी ऋत्विज 'सर्वांचे स्वस्तिकल्याण असो,' असे पुण्याह वाचनाचे मंत्र म्हणतात. आत्मज्ञानी वेदांती, पंडित पण उपनिषदाचे मंत्र म्हणताना याच मंत्रांचा शांतिपाठ करतात.

याप्रमाणे शांतिपाठाचा एकच सूर आहे. परंतु जेव्हा मानव दुसऱ्यांचें भले करणारी कामे थांबवतात आणि एकमेकांच्या अहिताचे चिंतन करू लागतात तेव्हा मानवी जीवनातून सुख आणि शांती नाहीशी होतात.

खरोखरीच ज्या राष्ट्रात सर्वांचे हित करण्याची वृत्ती असते त्याच राष्ट्रातील समाज सुखी होतो.

या कल्याणभावनेच्या प्रेरक ऋषिचे नाव 'राहूगण गौतम' त्यांच्या पित्याचे नाव रहूगण

राहूगण गौतमाचा पुत्र नोधा. हे पण मोठ ऋषि होते. त्यांना अग्निमध्ये विश्वरूप, वैश्वानर प्रभूचे व इंद्राच्या ठायी प्रजापालक परमेश्वर पितृरूपाचे दर्शन झाले होते. त्यांनीं केलेली स्तुती गोड व सिद्धिदायक आहे. त्यामुळे वेगवेगळे यज्ञ करणारे ऋत्विज त्यांच्याकडून स्तुतिपाठ शिकून घेण्यासाठी येत. आणि यज्ञ प्रसंगी ते पाठ म्हणताना गौरवपूर्वक म्हणत :

'हे देव, ही स्तुती गौतम नोधा ऋषींनी रचलेली आहे. ज्या प्रमाणे देवांचा कारागीर त्वष्टा प्रजापती देवांचे रथ घडवतो व त्या रथात बसून देव यज्ञासाठी येतात त्याचप्रमाणे नोधा ऋषींनी रचलेली स्तोत्रे गाऊन त्या रथासारख्या रमणीय स्तोत्रावर आरूढ होऊन देवांनी यावे म्हणून आम्ही ती गात आहोत.'

अशा प्रकारे त्या स्तोत्रांना दिव्यरथाची उपमा देऊन ऋत्विज त्यांचा अद्‌भुत महिमा गातात. स्तुति–प्रार्थनेमध्ये म्हटली जाणारी स्तोत्रे व शस्त्र–शंसन

ही मंत्रांची वाणी आहे. वेदांच्या प्रत्येक ऋचेमध्ये आगळा दिव्य भाव आहे. सात स्वरात गुंफलेल्या स्तोत्रांची गीती होते. त्या गीतीतून जागलेले सामगान कानावर पडताच देव यज्ञाकडे जाण्यास आकर्षित होतात.

वैश्वानर अग्नीची स्तुती गाताना ऋषी म्हणतात, ' हे देव, पक्ष्यांना पंख असतात त्याप्रमाणे वेगवेगळ्या स्वरुपांचे पंख आपण धारण केलेले आहेत. तुम्ही महावृक्ष असून विविध ज्वाला या तुमच्या शाखा आहेत. आणि म्हणूनच हे देव, तुम्हाला वैश्वानर म्हटले जाते. विश्वाच्या प्रजेचे तुम्ही नाभिस्थानच आहात. घराला जसा मधल्या एका खांबाचा आधार असतो त्याप्रमाणे मानवी जीवन तुमच्या आधारावर निर्भर आहे.

वैश्वानर अग्नी हे द्युलोकाचे मस्तक असून पृथ्वीचे नाभिस्थान आहे. अग्नी दोन आकाशांना जोडणारा आहे. हे विश्वपालक तुम्ही सब लोकांचे कल्याण करता हे जाणून इतर देवांनी तुम्हाला प्रकट केले. तुम्ही सर्वांना कल्याणाचा मार्ग दाखवला आहे.

विश्वानर म्हणजे विश्वाच्या कृषिकाराचे रूप आहे. विश्वाचा तो महान प्रजाजन आहे. त्याच्या ठायी असलेल्या कल्याणकारी भावनेमुळे त्याला ते स्थान प्राप्त झालेले आहे.

भक्तांच्या हृदयात सतत जागृत रहाणाऱ्या अग्नीला आमचा कीर्ती लाभो. आम्ही यज्ञाचे ऋत्विज प्रगतिशील व दीर्घायुषी मानवी आहोत. आमच्या यज्ञात वैश्वानर प्रकट होवो. वैश्वानर अग्निप्रमाणेच ऋषींनी इंद्राचीही स्तुती केली आहे.

' शीघ्र गति धारण करणाऱ्या, महिमावान आणि गुणी अशा देवराज इंद्राला ही स्तुतिस्तोत्रे अर्पण असोत. मननीय अशा या स्तोत्रांमुळे अन्नाने देहाला मिळते तशी पुष्टी देवश्रेष्ठ इंद्राला मिळो, ही स्तोत्रे सामगानाच्या सप्तसुरांत गायिली असता कानाला फार गोड लागतात.

हे बलशाली इंद्रदेवा, हरि–अश्वांच्या रथात तुम्ही बसता त्याचप्रमाणे गौतमाचा पुत्र नोधा याने आपल्या साठीच केवळ रचलेल्या या नव्या स्तोत्रांवर आरुढ होऊन आपण यज्ञासाठी या. '

या स्तोत्रांप्रमाणेच मरुतांचीही स्तुती रचावी अशी विनंती ऋत्विजांनी नोधा ऋषींना केली.

' हे नोधा ऋषी, विपुल बल मिळावे, उत्तम यज्ञ करावे, खरे ज्ञान व्हावे. मिळून मिसळून कामे व्हावी यासाठी तुम्ही आम्हाला सुवचनानी युक्त अशी

सूक्तमय प्रार्थना रचून द्या. तिच्या योगाने मरुद्गण आमच्यावर प्रसन्न होतील.

ऋत्विजांची विनंती मान्य करून ऋषींनी मरुतांची प्रार्थना केली.

'हे ऋत्विजहो, पावसाच्या सरी जशा एका धारेत पडतात, तशी ही स्तोत्र वाणी एका धारेत वाहत राहील. कलाकार ज्या कुशलतेने आपली कलाकृती घडवतो त्या कौशल्याने मी ही रचना केली आहे. देवांच्या सभेत जेव्हा तुम्ही या स्तोत्रांचे गान कराल तेव्हा त्यांचा प्रत्यक्ष प्रभाव तुम्हाला कळून येईल. कारण मी फार काळजीपूर्वक धीराने ही रचना केली आहे.

या प्रमाणे ऋत्विज नोधा ऋषींकडून ऋचांचे पाठ घेऊन गेले व यज्ञ प्रसंगी त्यांनी सुंदर, गोड स्वरात त्या स्तोत्रांचे गायन केले. ते ऐकून सर्व देव प्रसन्न होऊन यज्ञाला आले.

'प्रभु प्रभावशाली असून परम दयाळू आहे. माझा दयामय देव अग्नि-नारायण असून सर्व विश्वाच्या कल्याणासाठी तो अहोरात्र जागा राहातो. त्याचे अस्तित्व सर्वत्र असून आपल्या शरीरातही त्याचा निवास आहे. त्याच्यामुळेच आपल्यामध्ये चेतना आणि स्फूर्ती आहे. अग्नि हाच समाजाचा अग्रेसर असून त्याच्या नेतृत्वाखालीच समाजाला योग्य मार्गदर्शन मिळते. अग्नि प्रत्येक लोकीच्या नरप्रतिनिधीच्या संघाची रचना करतो. त्याला 'विश्व नर' असे म्हणतात विश्वनरांचा प्रमुख जो अग्नी त्याला वैश्वानर असे म्हणतात.

या विश्वव्यापक वैश्वानर प्रभूचे दर्शन करणाऱ्या ऋषींचे नाव पराशर त्यांच्या पित्याचे नाव शक्तिमहाराज. ऋषींच्या जन्माआधीच पिता स्वर्गवासी झाला. परंतु त्यांनी आपली दिव्यशक्ति कल्याण भावना आपल्या पुत्रासाठी मागे ठेवली होती. पराशर मुनींनी नऊ सूक्ते रचली आहेत. त्या सर्व सूक्तात त्यानी परम कृपाळू अग्नीची स्तुती केलेली आहे.

'हे परम दयाळू प्रभो, तुम्ही माझ्या हृदयाच्या गुहेत दडून बसला आहात. पण तुम्हाला शोधण्यासाठी तुमचे भक्तजन इतस्ततः फिरत आहेत. लुटारू ऋषींच्या गाई चोरून घेऊन गेले असता इंद्राच्या कुशल दूतांनी पावलांच्या खुणांवरून चोरांचे निवासस्थान शोधून काढले, त्याप्रमाणे मला माझ्याच हृदयांतरी दडलेल्या देवाला शोधावयाचे आहे.

हे हृदयनाथ, तुम्हाला मी हात जोडून नमन करतो आणि प्रार्थना करतो. मिळून मिसळून भक्ती करणाऱ्या धीर पुरुषांनी तुमच्या पावलांच्या खुणा शोधून काढल्या असून ते सर्व यज्ञसभेत बसून तुमची स्तुतिस्तोत्रे गात आहेत.

‘ज्ञानी देवांनी तुमचा खूप शोध केला. तुमच्या कल्याणकारक परोपकारी कृत्यामुळे तुमची योग्यता त्यांना कळून चुकली आहे. त्यांना पटले आहे की परम-दयाळू प्रभुखेरीज प्राणिमात्राचे भरण पोषण कोण बरे करील? भरणपोषण झाल्यामुळे प्राणी पुष्ट व सुंदर दिसतात. भूमीचा विस्तार करून तिला राहण्यास योग्य व सुखकर कोणी बरे केली? वनांतरी उगवणाऱ्या वनस्पती, पाने, फुले फळे कोणी दिली? नद्या अशा वाहात राहिल्या नसत्या तर प्राणिमात्र तहानेने व्याकुळ होऊन मरण पावले असते. त्या सर्वांना परोपकाराचे, जनकल्याणाचे ज्ञान कोणी करून दिले? धावत्या घोड्यांना ‘दिवस मावळायच्या आत स्वामीला घरी घेऊन जा,’ असे कोणी बरे समाजावले असावे? या सागराला त्याच्या खाऱ्या पाण्याबरोबरच रत्नेही सांभाळून ठेवायचा पाठ कोणी बरे दिला?

‘ही सारी त्या परम दयाळू प्रभूचीच प्रेरणा’ असा निर्णय करणारे आत्मज्ञानी ऋषी होते शक्तिमहाराजांचे पुत्र पराशर.

★★

# ७ / जन्मांतरीचे सहकारी

(ऋग्वेद प्रथम मंडल)

ते सुद्धा एक मोठे अद्भूत ऋषी होते. त्यांचे नाव होते परुच्छेप ते इतके तेजस्वी की प्रकाशाचा झगमगता झोतच जणू ! त्यांचे वडील दिवोदास हे मोठे चक्रवर्ती सम्राट होते. राजा दिवोदासांच्या दानशूरपणाची कीर्ती थेट स्वर्गापर्यंत पोचलेली होती. देवांचा राजा इंद्रदेखील त्यांचा मोठा प्रशंसक होता.

गंगा-यमुनेच्या तीरावर त्या राजाने अनेक यज्ञ केले होते. एका बाजूला होते शस्त्र शंसन म्हणत. दुसऱ्या बाजूस उग्दाते सामगीते गात तर अध्वर्यु सोमरसाचे कुंभ भरण्यात मग्न असत. मोठमोठे ऋषी ऋत्विजपद संभाळीत असत. सोमयागाची पूर्णाहुती होते न होते, तोच अनेक दिवस चालणाऱ्या अहीन यागाची सिद्धता झालेलीच असे आणि त्यानंतर प्रत्येक ऋतूंची सत्रे तर चालू असतच.

परुच्छेप चक्रवर्ती राजाचा पुत्र होता. सतत ऋषींच्या संगतीत राहून त्याला मंत्रदर्शन झाले होते. त्याचा कंठ मोठा गोड होता. गायत्री, उष्णिग, अनुष्टुभ वगैरे लहान छंद गाणे त्याला जमत नसे. सात छंदांच्याही पुढे जाऊन अतिछंद, अत्यष्टि, अतिशकवरी वगैरे मोठमोठे छंद तो गात असे. त्या एकेका छंदात सात सात पदे व चरण असत. ते तो सहज सुंदर रितीने गात असे.

लहानसहान यज्ञात त्याला सूक्ते गाण्याची संधी लाभत नसे. कारण लहान यागात संकल्प सोडून व्रत, उपवास करून विधीपूर्वक पूर्णाहुती होत असे. परंतु अतिरात्र, दशरात्र, संवत्सर अशी सोमयागाची सत्रे असत त्यावेळी ऋत्विज परुच्छेपाला छंद गाण्यासाठी आग्रह करीत. त्याच्या मनात असे त्यावेळी प्रहरचे प्रहर तो गात राही. मनात नसले तर गातच नसे. तो फार स्वाभिमानी मुनी होता.

कोणत्या प्रसंगी कोणत्या देवाची स्तुती गावी हे त्याला सांगावे लागत नसे.

प्रसंगानुरूपच तो प्रार्थना करी. अग्नि, इंद्र, वायु, मित्र, वरुण, पूषा, आणि विश्वदेवाला प्रसन्न करणारी, अनेकविध सूक्ते त्याला येत. एक एक सूक्त गाताना तो तल्लीन होऊन जाई.

मोठी सूक्ते तो गाऊ लागे तेव्हा ती ऐकण्यासाठी स्वत: देवही येऊन पोचत. आणि ते गोड स्वर ऐकून सोमरसाचा आस्वाद घेतल्याप्रमाणे तृप्त, प्रसन्न, होत.

ऋषींचे बोलणे फार कमी. वर्तनही मुनीसारखे साधे, सरळ. त्यामुळे ते राजपुत्र आहेत हे कोणाला कळतही नसे. ऋषीसारखेही ते दिसत नसत. यज्ञात बारीक सारीक कामे करीत. ऋत्विजांची सेवा करीत. लोक त्यांना कोणी सेवकच समजत. सेवकासारखेच जीवन त्यांनी स्वीकारले होते. सेवा हेच त्यांचे जीवनव्रत होते.

दिवोदास राजाच्या एका मोठ्या सत्रासाठी बरेच ऋत्विज आलेले होते. त्यापैकी एक ऋषी त्रिकालज्ञानी होते. बोटावर ते युगांचे गणित मांडीत आणि काल, महाकालाला चुटकीसरसे बाजूला सारीत. आगमनिगमाच्या गोष्टी ऐकण्यासाठी त्यांच्या सभोवार लोकांची गर्दी जमे. ते पाहून परुच्छेपाच्या मनात विचार आला, 'हे ऋषी फारच बोलतात. वाणीचा फुकट व्यय करतात. जे येईल त्याला उपदेश करीत सुटतात. त्यांना खरे ते कोणी बरे सांगावे ? सर्वांच्या देखत याविषयी बोलणे योग्य नाही.'

एक दिवस त्या ऋषींना एकटयानाच भेटण्याची संधी परुच्छेप मुनींना मिळाली. पहाटेच्या पहिल्या प्रहरी ताज्या सोमरसाचा कुंभ इंद्राला अर्पण करून एक लहान पेला भरून मुनींनी त्रिकालज्ञानी ऋषींना नेऊन दिला. ऋषी त्यामुळे फारच प्रसन्न होऊन म्हणाले,

'हे सेवका तुला धन्यवाद. आज सोमरस पिऊन माझे जीवन धन्य झाले.'

'आपण यापूर्वी सोमरस घेतला नव्हता ?' सेवकाने नम्रतापूर्वक विचारले.

ज्ञानी ऋषींना उमगले. कपटाशिवाय तोंडून शब्द निसटले होते. त्यांनी लगेच सावरून घेत म्हटले,

'सेवका, माझ्या म्हणण्याचा अर्थ तुला कळला नाही. सोमरसाचे मला नवल कसले ? कोठल्याही यज्ञप्रसंगी पहिला सत्कार माझाच होतो. आणि ताजा सोमरस मलाच अर्पण केला जातो. पण तुला पाहून मला एका जुन्या गोष्टीची आठवण झाली. फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. ऐक. त्यावेळी अशीच पहाटेची वेळ होती. अतिरात्र याग चाललेला होता. रात्रीचे जागरण झालेले होते. त्यावेळी देवराज इंद्राचा पुत्र जयंत सोमरसाचे पात्र घेऊन आज जसा तू आलास तसाच

माझ्याकडे आला. मी प्रसन्न होऊन त्याला 'तू इंद्र होशील' असा आशीर्वाद दिला.

'ऋषिराज ! मग माझाही आज भाग्योदयच झाला म्हणायचा. मला पण आपण आशीर्वाद द्याल ना ? आपण त्रिकाल ज्ञानी, काल महाकालाची गणना करणारे. तर प्रलय काल केव्हा येईल त्याची गणना आपण केलीच असेल.'

'अर्थात् ! सर्जन आणि विसर्जन, आरंभ आणि अंत एकदमच सुरू होत असतात. युगांच्या चार चौकड्या आहेत. प्रत्येक युगात सात ऋषि व चार मनु असतात.'

'ही झाली युगांची गोष्ट. प्रलयाची घडी कोणती ते सांगावे ऋषिराज' परुच्छेपाने मध्येच प्रश्न करून मूळ विषयाला पुनः हात घातला.

'प्रलय होय ? हो हो. तो सुद्धा येईलच. काल महाकाल जेथे पाहता पाहता येतात नि जातात तेथे प्रलय देखील होणारच आहे. अजून दहा हजार वर्षे तरी लागतील.' ऋषी गणना करीत म्हणाले.

'आपण फार दूरची गोष्ट केली ऋषिवर ! पण माझ्या समजुतीप्रमाणे प्रलय आजच होणार आहे. हा दिवस संपून रात्र झाली की प्रलय !'

'काय म्हणतोस ? असा काय रोज रोज प्रलय होतो ?' ऋषि आश्चर्याने म्हणाले.

'होय ऋषिराज. रोज नवे सर्जन आणि प्रलय होतच असतात. आपणच पहाना. रात्री आपण झोपला की डोळे, कान, हात, पाय वगैरे इंद्रियांचे व्यवहार बंद पडतील. तुमचे चंचल मन पण बुद्धीबरोबर झोपून जाईल आणि जीवात्मा पण झोपेल याचेच नाव प्रलय. सर्व व्यवहार बंद झाले की त्याला प्रलय म्हणतात. सकाळी उठल्यावर नवे सर्जन सुरू होते, याप्रमाणे रोजच सर्जन आणि प्रलय होतच असत.'

ज्ञानाचा हा चमत्कार पाहून त्रिकालज्ञानी चकित होऊन परुच्छेपाला कडकडून मिठी मारून म्हणाले,

'अरे तू तर मोठा ऋषि आहेस ! तू मला ज्ञानाचा प्रकाश दाखवलास !' त्यानंतर हे ऋषिही मुनीप्रमाणेच वागू लागले.

या प्रकारानंतर इतर ऋषिनाही जिज्ञासा वाटू लागली. अशा अद्भुत ज्ञानी ऋषींबरोबर चर्चा करावीशी वाटू लागली. चर्चेच्या वेळी पण परुच्छेपांची भाषा साधी, सरळ, प्रश्नाला अनुरुप असे उत्तर ते देत. स्वत: प्रश्न विचारून परिचय करून घेण्याची वृत्ती असे. प्रश्नाचे उत्तर देऊन संशयाचे निराकरण करण्याची कुशलता हा त्यांचा सहज स्वभावच होता.

एकदा एक ऋषी ज्ञान मिळवण्याच्या इच्छेने परुच्छपांकड आले. पण त्यांच्याकडून काय जाणून घ्यावे हे काही त्यांना कळेना. ते गोंधळून गेले. ते पाहून मुनीनीच त्यांना विचारले–

'ऋषिवर, आपले नाव काय बरे ? आपले कुल, गोत्र कोणते ?' या साध्या सरळ प्रश्नाला ऋषींनी उत्तर दिले.

'हे राजपुत्र, माझें नाव प्रियमेध असून कुल व गोत्र अंगिरस आहे'

'ओहो ! किती सुंदर नाव मेधा–म्हणजे शास्त्राचे सार. ते ज्याला प्रिय–तो प्रियमेध. तुमच्या पित्याने तुमच्या गुणाना अनुरुप असेच नाव ठेवलेले दिसते. पूर्वीही याच नावाचे एक ऋषीं होऊन गेले. ते पण अंगिरा कुलाचे होते. अंगिरा म्हणजे अग्निचे अंगार. ज्ञानाचा अग्नी प्रकटला की अज्ञानाचा नाश व्हायचाच आपण ऋषी आहात आणि ज्ञानीही आहात

'राजकुमार, यापूर्वी प्रियमेध या नावाचे दुसरे एक ऋषी होऊन गेले हे तुम्हालां कसे बरे कळले ?' ऋषींनी विचारले

'आपण फार चांगला प्रश्न विचारला, आज आपण भेटत आहो ही काही आपली पहिलीच भेट नाही. यापूर्वी माझे आणि तुमचेही अनेक जन्म होऊन गेले आहेत आणि आपण दोघे जन्मांतरीचे साथी आहोत. माझ्या पूर्वजन्माची साक्ष म्हणजेच पूर्वी होऊन गेलेले प्रियमेध ऋषी. अशाच एका यज्ञप्रसंगी आम्ही भेटलो होतो. त्यावेळी माझे नाव आणि रुप आजच्याहून वेगळेच होते. ते प्रियमेध ऋषि म्हणजे तुम्हीच असून या जन्मीही तेच नाव व तेच कार्य करीत असलात तरी तुम्हाला ते कळण्याची शक्यता नाही, पण पुर्वजन्माची मी सांगत असलेली हकीकत पूर्णपणे खरी आहे

राजकुमाराच्या तोंडून आपल्या पूर्वजन्माविषयी ऐकून प्रियमेध ऋषि आनंदित झाले. त्यांचे मन ज्ञानाच्या प्रकाशाने उजळून गेले. पूर्वी होऊन गेलेले प्रियमेध म्हणजे आपणच अशी त्यांची खात्री झाली. ही गोष्ट कळल्यामुळे पूर्व कर्मांचे पुण्यही मिळेल व त्या जन्मी अर्धवट राहिलेली कार्ये पूर्ण करता येतील. तसेच राजकुमाराचे सहकार्य लाभेल म्हणून त्यांना आनंद झाला.

त्याचप्रमाणे अथर्वा कुळातील दुसरे एक ऋषी राजकुमाराला भेटण्यासाठी आले. त्यांच्या कुळात दधिची नावाचे एक ऋषी होऊन गेले होते. त्या ऋषींचे नाव ऐकताच राजकुमाराने उत्साहपूर्वक सांगितले, 'अहो ऋषिवर, आपण फार भाग्यशाली आहात. दधिची ऋषींना मी पुरातन कालापासून ओळखतो. त्यांचे

तीन–चार जन्म त्यानंतर होऊन गेले. पहिल्या जन्मी त्यांनी प्राणांचे अनुष्ठान करून देह सुकवला. अश्विनीकुमारांनी उपचार करून त्यांना नवजीवन दिले. त्या जन्मी त्यांनीं इंद्रियांचे वेग शमवून इंद्रापासून मधुविद्या मिळवली. हा त्यांचा दुसरा जन्म. त्यानंतर अश्विनीकुमारांनी त्यांच्या धडावर घोडयाचे डोके ठेवले. घोडयाच्या मुखाने त्यांनी अश्विनीकुमारांना मधुविद्या शिकवली. हा त्यांचा तिसरा जन्म.

इंद्राने येऊन घोडयाचे मस्तक काढून परत मानवी मस्तक त्या धडावर बसवले. आत्मविद्येचा हा प्रत्यक्ष महिमाच होय. डोके उतरून ठेवावे तेव्हाच विद्या प्राप्त होते.

देवराज इंद्राला वृत्राला मारण्यासाठी जेव्हा वज्राची आवश्यकता भासू लागली तेव्हा दधिची ऋषींनी देह सुकवून आपल्या अस्थि त्वष्टयाला वज्र घडवण्यासाठी दिल्या. तसे पाहता जन्म घेऊन मरण पावणारे दधिची हे एक ऋषी नसून लोक कल्याणासाठी काया झिजवणारे, बलिदान करणारे सर्वच जण दधिची आहेत. ऋषीवर आपणही दधिची व्हा. तुमच्या कायेचा पण कल्प होवो. तुमचे जीवन सफल होवो.

दधिचींची ही दिव्य कथा ऐकून त्या अथर्व कुलातील ऋषींना मोठा आनंद झाला.

'राजकुमार, तुमची दृष्टी मोठी अद्‌भूत आहे. तुम्ही सर्व कालांच्यामध्ये पाहू शकता.'

'होय. दधिची ऋषीच त्याचे साक्षी आहेत.' अशा या परुच्छेप मुनींच्या सहवासाचा ज्यांना ज्यांना लाभ झाला त्या सर्वांनाच जीवन कृतकृत्य झाल्यासारखा आनंद झाला. पूर्वजन्म, जन्म आणि पुनर्जन्माचे रहस्य ते सहज उलगडून दाखवीत.

कोठल्या मोठया सत्राच्या प्रसंगी ते गेले तर आपल्या गोड आवाजात इंद्र अग्नि आदी देवतांची स्तुती गात. त्या स्तुतिगानात आपल्या जन्मांतरीच्या अनुभवांच्या कथा पण गुंफीत ते म्हणत, 'हे देवराज इंद्र, आणि अग्निमहाराज, स्तुतिस्तोत्रे रचून मी तुम्हाला मदत करतो. तुमच्या स्तुतिस्तोत्रामागे कित्येक पूर्वींच्या ऋषींचा महिमा आहे ते मी चांगल्या प्रकारे जाणतो.

अथर्वा कुलात जन्मलेले दध्यंग–अथवा दधिची, किंवा त्याहूनही पुरातन अ अंगिरा मुनि, त्यांच्याच कुलांतील प्रियमेध ऋषि त्याचप्रमाणे मेधावी कण्व प्रजापति धरित्रीचे पुत्र, त्रिगुणातीत अत्रि ऋषि हे कित्येक जन्म धारण करूनही जन्म मरणाच्या पर रहातात.

पृथ्वीवरच्या सर्व मानवांना जन्म देणारे मनु ज्यांना आदिराज म्हणतात त तर या ऋषिवरांच्याही आधी होऊन गेले.

हे सर्व ऋषी माझे जन्मांतरीचे सहकारी आहेत. माझे अनेक जन्मांचे रहस्य ते जाणतात. कारण सर्व दिव्य ऋषिवर जन्मोजन्मीचे सहकारीच आहेत. ते जन्मोजन्मीचे सहचर्य पाळून नव्या दिव्य आत्म्यांचा सहकार मिळवीत राहतात.

दिव्य वाणीच्या योगाने या परस्परसंबंधाचे सूत्र जोडले जाते. सहोदरासारखे आमचे पुरातन संबंध या स्तुतीच्या योगाने दृढ होऊन देवांशीही आमचा संबंध जोडला जातो.

★★

# ८ / अंतरातला प्रकाश

**(ऋग्वेद प्रथम मंडल)**

पूर्वी होऊन गेलेल्या अंगिरा ऋषींना दोन पुत्र होते. मोठ्या पुत्राचे नाव बृहस्पति. त्यांचा जन्म आकाशात झाला म्हणून त्यांना सदसस्पति असेही म्हणतात. ते देवांचे गुरू होते म्हणून 'गणपती' या नावाने प्रसिद्ध आहेत.

दुसऱ्या पुत्राचे नाव उचथ्य. उचथ्य म्हणजे वेद–वाणी. वेदांचे गायन करणारे ते उचथ्य ऋषी मोठे वेदपाठी होते. त्यांचा जन्म धरणीवर झाला होता. आणि पृथ्वीची कन्या ममता ही त्यांची सहचारिणी होती. बृहस्पतींचा विवाह आकाशाची कन्या तारा हिच्याशी झाला होता.

उचथ्यांची पत्नी ममता हिच्या पोटी पुत्र जन्माला येण्याची लक्षणे दिसू लागली. बृहस्पतींना जन्माला येणाऱ्या त्या पुत्राचे भविष्य दिसून आले की मुलगा प्रतापी आणि बुद्धिवान होईल. त्याचा पिता वेदपाठी असला तरी भावार्थापर्यंत तो पोचत नाही. मात्र वेदवाणीचा उच्चार करतो. परंतु त्याचा पुत्र वाणीबरोबरच अर्थही जाणणारा असा होणार आहे. हा मोठाच सुयोग होय. असा विचार करून ते ममतेकडे गेले. मोठ्या दिरांचा याप्रमाणे अवचित आलेले पाहून ती बावरली परंतु बृहस्पतींनी तिला आपल्या येण्याचे कारण सांगून धीर दिला.

अद्याप जन्मालाही न आलेल्या ममतेच्या तेजस्वी पुत्राने आपल्या काकांना विरोध करून म्हटले,

'आपण आकाशात विहार करणारे देवांचे गुरू असाल आणि भावार्थात रमत असाल. पण तुमच्या त्या भावार्थाशी मला कर्तव्य नाही. तुमचे ज्ञान विज्ञान तुमचे तुम्हालाच लखलाभ होवो. मी ऋषी उचथ्य आणि ममतेचा पुत्र, धरणीला जाणणारा आहे. त्या धरणीच्या पोटात दडलेली भांडारे मला जाणून घ्यावयाची आहेत.'

अद्याप जन्मालाही न आलेल्या त्या बालकाची ती वाणी ऐकून बृहस्पतींना आश्चर्य वाटले आणि ' हा मूर्ख मुलगा माझ्या ज्ञानाची याला पर्वा नाही ' म्हणून रागही आला. त्या रागाच्या भरात ते म्हणाले, ' अरे आंधळ्या पोरा ! देवानाही दुर्लभ अशा माझ्या ज्ञानाचा तू तिरस्कार करतोस ? जा-अज्ञानाच्या घोर अंधारातच तू गटांगळ्या खात रहा ! '

योग्य समयी ममतेच्या पोटी पुत्र जन्माला आला. तो प्रतापी व बुद्धिमान होता. पण त्याची दृष्टी हरपलेली होती. डोळे उघडे पण दृष्टीवर पांढरे पापुद्रे आलेले. काळी बुबुळेच त्या डोळ्यात नव्हती ! म्हणून त्याचे नाव दीर्घतमा ठेवले. दृष्टी नसली तरी त्याची काया कांचनासारखी शुद्ध आणि तेजस्वी होती. देवानाही जिंकून घेईल असे सुंदर प्रतापी रुप होते.

दीर्घतमाला सकाळ, संध्याकाळ चारी प्रहर सारखेच होते. हातात एक काठी घेऊन तो एकटाच फिरत राही. त्याला डोळे नसले, तरी त्याचे कान फार तिखट होते. जरासा आवाज झाला तरी त्याचे कान तो पकडीत. कोठलाही वास त्याला लगेच येई. नदीवरून येणारे वारे त्याला दिशा सांगत आणि सूर्याची किरणे त्याला स्पर्श करून सकाळ आहे की सायंकाळ ते सांगत.

डोळे नव्हते त्यामुळे अर्थातच पाहण्याची कृतीही नव्हती. तो ध्यानासाठी बसे त्यावेळी त्याला अंतरात दडलेले काहीतरी जाणवू लागे. काळ्या काळ्या सावल्याच आत आहेत असे प्रथम वाटले. पण हळू हळू त्या सावल्या आकार धारण करू लागल्या. ते आकार मोठे सुरेख होते. त्यातून देवमूर्ती साकार झाल्या. त्यांचे वर्णन करणारी वाणी त्याला स्फुरू लागली. त्याचे अंतर्चक्षू उघडत होते !

अंतरात प्रकटणाऱ्या देवांचे वर्णन मन करीत होते. मनातले तोंडून बाहेर पडत होते आणि दीर्घतमा मंत्रद्रष्टा ऋषी होत होता ! प्रज्ञाचक्षू उघडल्यामुळे वेदवाणी त्याच्या अंतरात उगम पावत होती आणि त्याच्या गोड आवाजात बाहेर पडत होती. त्या दिव्य साम गायनाने प्रकृती प्रसन्न होत होती. आईचे मन आनंदाने भरून येत होते. आपल्या पुत्राला ती मांडीवर बसवून प्रेमाने कुरवाळी तेव्हा ते ऋषी तिला प्रेमभराने म्हणत, ' तू माझी माता, ममता आणि मी तुझा पुत्र दीर्घतमा. पण आंधळा नाही हं. मी प्रज्ञाचक्षू ! '

आश्रमातील ऋषी अरणीची सुकी लाकडे आणून ती एकमेकांवर घासून अग्नी प्रकट करीत. लाकडावर झाकलेल्या वस्त्रावर ठिणग्या उडलेल्या दिसल्या की आनंदाने ते गाऊ लागत, ' ज्योति प्रकटली. देव आले.

ते ऐकून बालऋषी आनंदमुग्ध होऊन टाळया वाजवी. नाच लागे. अग्नीच्या ज्योतीचे स्वागत करून तिची स्तुती गाऊ लागे.

हे देव ! हे अग्निमहाराज ! तुम्हाला यज्ञाच्या वेदीवर बसवलेले आहे. वेदी हेच तुमचे घर. तुमचे जन्मस्थान. पाणी आणि दर्भ यांच्या साह्याने, ते घर निर्मल, पवित्र केलेले आहे आणि स्वच्छ वस्त्राने ते झाकलेले आहे. मूल्यवान वस्तू वस्त्राखाली झाकूनच ठेवतात. ज्याप्रमाणे वेदीवर तुम्ही प्रकट होता त्याचप्रमाणे हृदयातही ज्योत तेवू लागते. माझ्या हृदयात ती ज्योत प्रकटू द्या. चेतना आणि प्रकाश पसरू द्या.

हे अग्नि, अरणी तुमच्या माता. आमचे तन, मन आणि धन हे तुमचे अन्न. वर्षावर्षाने तुम्ही मोठे होता तसे आमचे जीवन पण वाढत जाते. आहुती ग्रहण करुन ज्वाला जशा वरवर चढतात तसेच आमचे जीवन तुमच्या कृपेने वाढत राहते, उर्ध्वगामी होते.

अग्निदेव हा आमचा आवडता स्नेही आहे आणि त्याची सर्व कार्ये आम्हाला प्रिय अशी आहेत. त्या अग्नीला प्रसन्न करण्यासाठी वाणीचे अनन्य प्रकार आम्ही रचतो. अग्निदेव जन्मताच आकाश व्यापून टाकतो. त्या अग्नीचा निवास आमच्या हृदयात आहे. त्याच्यामुळेच आम्हाला चेतना आणि स्फूर्ती मिळते.

दिव्य दृष्टीच्या योगाने ऋषींना आत्मज्ञान प्राप्त झाले होते. त्यांचे मन आतून अत्यंत दृढ होते. पण अंध असल्यामुळे त्यांना परस्वाधीन व्हावे लागे. ज्ञान कितीही अगाध असले, तरी डोळयाखेरीज साराच काळोख ! डोळे माणसाला स्वतंत्र मार्गाने नेऊ शकतात स्वतःच्या इच्छेप्रमाणे डोळस माणूस कोठेंही जाऊ येऊ शकतो. आपली पराधीनता दूर करण्यासाठी ऋषींनी स्तुती केली आहे–

'हे अग्निदेव ! माझी अवस्था तरी पहा. तुमच्या तेजस्वी प्रकाश किरणांना तुम्ही सांगा, 'हा दीर्घतमा ममतेचा पुत्र आहे. त्याला डोळयांनी दिसत नाही तुम्ही त्याचे रक्षण करा.' तुमची किरणे दुरुन येऊन आमचे रक्षण करोत. त्यांचे संरक्षण लाभले की कोणी आमचे वाकडे करू शकणार नाही.

मला जाळून टाकण्यासाठी दहा दहा वेळा अग्नि पेटवण्यात आला. मला चारी बाजूंनी बांधून खोल खडयात टाकून दिले. नदीत बुडवण्याचाही प्रयत्न दासानी करून पाहिला. पण हे देव तुमच्या कृपेने माझ्यावर आईसारखी पाखर घालून त्या आरिष्टातून मला वाचवले. माझ्या सेवकांनी माझी गठडी बांधून उंच पर्वतावरुन खाली फेकून दिली होती. त्रैतन नावाच्या दासाने तलवारीने माझी छाती फाडून डोकेही उडवले होते. पण तुमच्या कृपेने मी वाचलो आणि त्या दुष्टाचाच नाश झाला.'

याप्रमाणे दीर्घतमा ऋषींच्यावर देवांनी कृपेचा सतत वर्षावच केला. सविता नारायणाने त्यांच्या अंतरात प्रकाश ओतला अश्विनी कुमारांनी त्याचे शरीर निरोगी राखले. ते अत्यंत्य बुद्धिमान आणि मंत्रद्रष्टे होते. त्यामुळे त्यांना नवेनवे विचार स्फुरत व त्यांच्या तोंडून नव्या ऋचा शब्दरूप घेऊन बाहेर पडत.

दीर्घतमा ऋषींना अनेक आपत्तींना तोंड द्यावे लागले. त्यामुळे ते नेहमी सावध राहात. तरीही आळस, प्रमाद कधीमधी घडे व त्यांची दशा होई.

एक दिवस असेच घडले. रात्रींच्या वेळी ते गाढ झोपले असता सेवकांनी त्याना एका पेटीत बंद करून ती पेटी वहात्या नदीत फेकून दिली.

सकाळ झाल्यावर नजीकच्या राज्याचा राजा अंगराज आपल्या राण्यांच्या बरोबर गंगेवर स्नानासाठी गेला असता त्याच्या दृष्टीस ती पेटी नदीच्या प्रवाहावर तरंगताना पडली. त्याने ती खेचून आपल्या नावेत घेतली व उघडली तो आत ऋषिराज कोंडलेले !

राजा ऋषींना आपल्या राजवाड्यात घेऊन गेला व स्वत: त्यांची सेवा करू लागला. राजा निपुत्रिक होता. ऋषींची कृपा झाल्यास आपल्याला पुत्र होईल या भावनेने त्याने आपल्या राणीस ऋषींची सेवा करण्यास सांगितले. पण राणीने कामचुकारपणा करून स्वत: न जाता उशिफ नावाच्या आपल्या दासीला पाठवून दिले. ऋषी अंध असले, तरी प्रज्ञाचक्षू होते. त्यांना हा प्रकार कळला होता. त्यांनी दासीवर कृपा करून तिच्याशी विवाह केला. आणि मंत्रप्रभावाने तिच्या पोटी पुत्र जन्मला. तो जन्मत:च मंत्रद्रष्टा होता. अंगराजाने त्यालाच आपले युवराजपद दिले. त्याचे नाव कक्षिवान मातेच्या नावावरून त्याला औशिक आणि पित्याच्या नावावरून दैर्घतमस् असेही म्हणत.

कक्षिवानाला युवराजपद देण्यापूर्वी अंगराजाने त्याला अध्ययनासाठी गुरुकुलात पाठवले. गुरुंची परमकृपा प्राप्त करून थोड्याच काळात त्याने उत्तम विद्या ग्रहण केली. गुरुच्या घरून विद्याधन घेऊन तो परतला. वाटेत रात्र पडली असता एका बगीच्यात तो झोपला. त्या प्रदेशाचा राजा स्वनय याच्या तो दृष्टीस पडला. ऋषीकुमाराला उठवून तो आपल्या बरोबर घेऊन गेला. त्याचे रुप, गुण, विद्या, वय वगैरे पाहून प्रसन्न होऊन त्याने आपली गुणी कन्या त्याला दिली. सुंदर पत्नी व तेजस्वी विद्या व अपार धन घेवून आलेल्या पुत्राला पाहून पिता दीर्घतमा व अंगराज प्रसन्न झाले.

स्वनय राजाने दिलेल्या दानाचे वर्णन करताना कक्षीवान् सांगू लागले, सकाळ होताच राजा स्वनय माझ्याकडे आले व माझा आदर सत्कार करून

त्यांनी मला कन्यादान व संपत्तिदान दिले. राजाच्या जवळ अनेक गायी, घोडे व सुवर्णाचे रथ होते मी त्यांच्याकडे मात्र एक अतिथी म्हणून गेलो होतो. माझे रूप गुण पाहून त्यांनी मला दान दिले त्यावेळी हे तात, मला तुमचे स्मरण झाले. ही सारी समृद्धी तुमच्या चरणी धरण्याची तीव्र इच्छा झाली. ती आज पूर्ण झाली. दान देणाऱ्या दात्याचे धन, साधन, आयुष्य आणि कीर्ती सदैव वाढतच राहते.'

कक्षीवान पितृभक्त होता. पालक पिता अंगराजाने त्याला आपले राज्य दिले. तो राजा झाला. परंतु आपल्या अंध पित्याची सेवा करण्यात त्याला फार आनंद वाटे. राज्य कारभारामध्ये त्याचा बराच वेळ जाई. त्यामुळे संपादन केलेली दिव्य विद्या तो विसरू लागला. विद्येबाबतची त्याची उपेक्षा पाहून मंत्रद्रष्टया पित्याने आपल्या प्रेमळ वाणीने त्याची कान उघाडणी केली. ते म्हणाले, 'पुत्रा, ही धन, संपत्ती काहीच कामाची नाही. विद्या हेच आपले खरे खुरे धन. ते धन सावधान राहून सांभाळायला हवे.' पित्याची ही शिकवण त्याला मनोमन पटली. तो नम्रता पूर्वक म्हणाला,

'तात, राज्य सांभाळताना विद्या विसरलो हे योग्य तर नाहीच. पण मी आता काय करू ? आपण माझे वडील आणि गुरूही आहात. मला यातून मार्ग सुचवा ?'

प्रज्ञाचक्षू पित्याने त्याला अश्विनी कुमारांची प्रार्थना करण्यास सांगितले. कक्षीवान राजा ऋषीही होताच. त्याने आळस सोडून विविध छंदाची रचना करून अश्विनी कुमारांची स्तुतिस्तोत्रे रचली. सूक्तांतील ऋचा म्हणता म्हणता ऋषींना अनेक प्रसंग आठवू लागले. अश्विनी कुमारांनी प्रसन्न होऊन लोकांना नानापरींनी साह्य केले होते विसरली गेलेली विद्याही त्याला फिरून प्राप्त होऊ लागली होती. त्याचाही उल्लेख त्याने आपल्या ऋचांत केलेला आहे.

त्या पितृभक्त ऋषींना स्वत:च्या पित्याचे विस्मरण कसे बरे होईल ? त्यांनी माझ्या पित्याला दृष्टी द्यावी अशी स्पष्ट मागणी न करता एका अंध राजकुमाराला त्यांनी पूर्वी केलेल्या चक्षुदानाचे स्मरण आपल्या प्रार्थनेत करून दिले आहे.

मंत्रद्रष्टया पित्याने पुत्राची भावना जाणून त्याला जवळ बसवून सांगितले, " वत्सा, माझ्या डोळ्यांतील तेज माझ्या जन्माआधीच निमाले आहे. पण अंतरीचे दिव्य दर्शन करणारे प्रज्ञाचक्षू देवांच्या कृपेने मला लाभले आहेत. आता मला चर्मचक्षूंची आवश्यकता नाही. देव माझ्यावर प्रसन्न आहेत. त्यांनी अनेकांची हरपलेली दृष्टी परत दिली तशी मी मागितली असती तर माझीही दृष्टी मला सहज लाभली असती. परंतु माझ्या दीर्घ आयुष्यात मी शिकलो की बाहेरचे डोळे

बंद आहेत म्हणून मला आत्मज्ञान देणारे आतले डोळे उघडले. म्हणून मी प्रसन्न आहे. ज्याला अंतरातला प्रकाश उमगत नाही तो डोळे असूनही आंधळाच असतो.

पुत्रा, अंतरीच्या प्रकाशात मला चौदा लोक आणि सात भुवने दिसत आहेत उंच आकाशात उगवणारा सूर्यदेव सर्व प्रजांचा पालक असून आरोग्य प्राप्तीसाठी सर्व मानव त्याला भजतात व ऋत्विज यज्ञात त्याचे आवाहन करतात.

आकाशाखालच्या अंतरिक्षात सूर्याचा मधला भाऊ जो वायू त्याचा वास आहे. तो सर्वांचा प्राणदाता आहे. सूर्याचा तिसरा भाऊ अग्नी असून त्याचा वास पृथ्वीतलावर आहे. यज्ञाच्या वेदीमध्ये तुपाच्या आहुतीने तो प्रदीप्त होतो. आदि प्रजापती या सर्व देवांचा पिता आहे. सूर्याची सात किरणे हे त्याचे सात पुत्र आहेत.'

'प्रजापति आदिपिता आहे हे सर्व ऋषी जाणतात. पण त्यांच्या जन्माआधी कोणत्या देवाचे अस्तित्व होते ? ' तुम्ही स्थूल आहा की सूक्ष्म, कार्य आहा की कारण ?' अशी पृच्छा करणारा कोणता मानव त्यांच्याकडे गेला होता ?'

'खरे पाहता संसार हा सनातन वृक्षासारखा आहे. त्याचा आदि जन्म आणि मूळ कारण कोणी पाहिलेले नाही. त्या वृक्षावर दोन पक्षी रहातात. त्या दोघांची गती आणि योग एकसारखे आहेत. त्यामुळे ते दोघे सखे- मित्र आहेत. त्यांतील एक पक्षी संसाराचे परिपक्व फळ चाखतो आणि सुख-दुःखांचा अनुभव घेतो. दुसरा पक्षी ते फळ चाखीत नाही व तो अनुभवही घेत नाही. हे दोन पक्षी कोणते बरे ? एक जीवात्मा- जो संसारात गुंतला आहे आणि दुसरा परमात्मा. जो निर्लेप आणि निराकार आहे.'

आपल्या हृदयातून ऋचा स्फुरतात म्हणून आपल्याला लोक ऋषी असे म्हणतात. आपल्या हृदयाच्या परम आकाशात परमेश्वर वास करतो. मंत्राचे रहस्य जाणून न घेता केवळ बाहेरची दृश्ये पाहून जे कवितेसारख्या ऋचा रचतात त्यांचे कल्याण त्या ऋचांच्यामुळे कसेबरे होईल ? ऋचांचे मूळस्थान प्रणवनाद ॐकार असून त्याच्या ठायी सर्व देवतांचा वास आहे. हे ज्यांना कळते त्यानाच ऋचांचे मर्म उमगते.

आपल्या हृदयाच्या गुंफेत चार प्रकारच्या वाणीचा वास आहे. नाभीच्या खाली वाणीचे मूळ कारण- ॐकारनाद-वसतो. त्याला परावाणी म्हणतात नाभि आणि हृदय यांच्या मधल्या भागांत वाणीचे सूक्ष्म बीज आहे त्याला पश्यंती म्हणतात. हृदयापासून कंठापर्यंतच्या भागात विचारांच्या सूक्ष्म रुपाचे वाणीरुप आहे त्याला मध्यमा म्हणतात. वाणीची ही तीन रुपे शहाणे, आत्मज्ञानी

लोक जाणतात. सर्वसामान्य लोक चौथी वैखरी वाणी बोलतात. वैखरीची स्थूल रुपे माणसांच्या कानापर्यंत जाऊन पोचतात.

आकाशात आदित्य सूर्यनारायण तळपतो. तो एकच देव असा आहे की ज्या रुपाची कल्पना करावी त्या रुपात तो दिसतो. इंद्र, मित्र, वरुण अथवा अग्नी ही देवांची वेगवेगळी नावे आहेत सोनेरी पंख असलेला आकाशात उडणारा गरुडही त्याच देवाचे एक रुप आहे. शहाणी माणसे देवांच्या या विविध रुपांचे दर्शन घेऊन त्यांचे वर्णन करतात.

सर्व देवांनी संसार यज्ञाचा आरंभ केलेला आहे. देव स्वतःच अग्नी आहे व हवीही आहे. आवाहन करणारा मंत्रही तो स्वतःच आहे. पूर्वकाली देव हे मानवच होते. त्यांनी या यज्ञाहून वेगळा दुसरा यज्ञ सुरू केला. त्याच्या योगाने हे साध्य देव सिद्ध झाले. उत्तम झाले. आपणही त्याचप्रमाणे यज्ञातील ऋचांचे पठण करून सिद्ध होऊन जीवनाचे कल्याण साधावयाचे आहे.

हे पुत्रा, तू ऋषी आहेस, ऋषिराज आहेस. परंतु जोपर्यंत अंतरातल्या आत्मारामाला ओळखले नाहीस तोवर जीवन निरर्थक आहे. माझ्या हृदयात जागलेले हे आत्मज्ञान मी तुला दान करीत आहे. माझे जीवन त्याच्या योगाने सिद्ध, सफळ झाले आहे. मी स्वतः धन्य झालो आणि आता या संसाराचा मी निरोप घेतो. हरिः ॐ ! हरि ॐ !

दीर्घतमा ऋषी अत्यंत वृद्ध झाले होते. दुसऱ्या कोणाचे साह्य घेतल्याखेरीज त्यांना उभेही राहाता येत नव्हते. पण आत्मबळाच्या योगाने ते आपले आपण उठून उभे राहिले व काठी टेकीत, खडावांचा आवाज करीत निघून गेले.

त्यांची दिव्य वाणी आणि अद्‌भूत् व्यवहार पाहून कक्षीवान आश्चर्यचकित होऊन पहात राहिले होते. पित्याला जाताना पाहून 'हे पिता, हे तात', म्हणत ते त्यांच्या मागून धावू लागले. पण दूर दूर जाणारे ते ऋषिवर्य अदृश्य झाले.

मंत्रमुग्ध कक्षीवान राजा परत फिरला. त्याच्या राण्या, दास-दासी, मुले-बाळे सारे त्याची वाट पहात होते. संसाराच्या त्या माया-ममतेत तो पुन्हा गुरफटून गेला. परमश्रेष्ठ ऋषीवर पित्याचा उपदेश त्याने आपल्या हृदयात साठवला होता. त्यांच्या जीवनातील एक एक घटना आठवताना राजाच्या डोळ्यात आनंदाश्रू भरून येत. जन्मभर त्यांनी भोगलेल्या कष्टांचे स्मरण होवून अंगावर काटा येई. पण लगेच त्यांचे शद्ब आठवत.

'पुत्रा, विपत्ती हा माझा गुरु आहे. संकटाच्या कृपेनेच माझी आतली दृष्टी उघडली आणि माझे आंधळेपण सफल झाले.

राजर्षी कक्षीवानाने जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत अश्विनीकुमारांची स्तुती प्रार्थना केली. अंती अश्विनकुमार त्याला आपल्या दिव्य रथात बसवून दिव्यलोकी घेवून गेले.

★★

# १ / सांधिदूताचे साहस

(ऋग्वेद प्रथम मंडल)

'अगस्त्य मुनींच्या विषयी सर्वांनी जाणून घ्यावे असे आहे.'

'अर्थातच. आपल्या त्या गुरूदेवांची काय शिकवण होती ?'

'ते सांगत, बाबारे, घे ती कुदळ आणि शेतात जाऊन काम कर, काम करणाराच्या मुठीत लक्ष्मी र्‍हाते. एकीकडे शेती होते आणि प्रजा व गुराढोरांचे हितही साधले जाते.'

'त्यांचे हे अनुभवसिद्ध बोल आहेत हे खरे. पण शेतीवर कष्ट करायला गेलो की विद्याभ्यास राहील बाजूला. त्याचे काय ?'

'गुरुदेवांनी या शंकेचेही निरसन केलेले आहे. आपल्या मनाचा कुदळीप्रमाणे उपयोग करून अंतःकरण खोदून त्यातून विद्येचे पीक काढावे. लक्ष्मी आणि विद्या दोन्हीही माणसाने मिळवल्या पाहिजेत. सकाळी उठून स्वाध्याय करावा. दुपारी शेती करावी. कामातून रिकामा वेळ मिळेल तेव्हा अध्ययन करावे. याप्रमाणे अभ्यास आणि श्रम दोन्हीही एकाच वेळी करता येतात.'

'पण लोक तर असे समजतात की श्री व विद्या यांचे पटतच नाही. जीवनात या दोन्हीचा संयोग साधणे शक्य नाही.'

'पण आपल्या गुरुदेवांनी स्पष्ट सांगितले आहे की आळशी लोकांच्या अशा गोष्टी ऐकू नयेत. माझे स्वतःचे उदाहरण पहा. मी दोन्ही कामे उत्तम रितीने केलेली आहेत. लक्ष्मीपासून 'ल'कार घेतला की पृथ्वी वश होते आणि विद्येचा 'व'कार मिळवला की अंतरीच्या आकाशात प्रकाश पसरतो. अशा प्रकारे पृथ्वी व वायू यांचा संयोग साधावा.'

आणि हीच गुरुदेवांच्या जीवनाची परमसिद्धि आहे. त्यांच्या नित्यनियमांत

हा संयोग प्रत्यक्ष दिसून येतो. सकाळच्या प्रहरी ध्यानस्थ बसून ज्यावेळी ते मंत्रोच्चार करतात तेव्हा त्यांच्या ठिकाणी सात्विक मंत्रद्रष्टचा ऋषींचे दर्शन होते. ऊन वर चढले की हाती कुदळ घेऊन ते कामाला लागतात त्यावेळी ते उग्र, शेतकऱ्यासारखेच दिसतात.

आपल्या एका सहाध्यायाने गुरुदेवांच्या या अनुपम सिद्धीचे वर्णन एका ऋचेमध्ये केले आहे.

'आपले गुरुदेव अगस्त्य मुनी कुदळ घेऊन जमीन खोदू लागतात त्यावेळी त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांच्या साऱ्या कामनाच फळाला येतात. प्रजाजनच काय पशूदेखील त्यांना मदत करू लागतात, आणि शेतीमध्ये त्यांना परमसिद्धी मिळते,

ऋषिवर्यांनी केलेल्या स्तुतिप्रार्थनेने प्रसन्न होऊन देव त्यांना शुभ आशीर्वाद देतात आणि त्यामुळे त्यांच्या हृदयातून विद्येचे नवे नवे उन्मेष बाहेर पडतात. याप्रमाणे जीवनाची ही दोन्ही अंगे त्यांनी साध्य करून घेतली आहेत. आपले मंत्रदृष्टे गुरुदेव कणखर शेतकरीही आहेत.

सह्याद्रि– विंध्याद्रीच्या उत्तरेला अगस्त्य मुनींचे गुरुकुल होते. तेथे अनेक शिष्य जीवन सिद्धी देणारी विद्या मिळवण्यासाठी येत. ऋषींच्या अद्भुत जीवन व्यवहाराविषयी चर्चा, विचार करीत. आणि त्यामुळे आनंदित होत. उग्र नावाच्या एका शिष्याने गुरुंच्या दिनचर्येचे निरुपण एका ऋचेत केले होते. त्यांच्या दिनचर्ये प्रमाणे त्यांची जन्मकथाही मोठी विलक्षण आहे. त्याविषयीही जाणून घेताना विद्यार्थ्यांना ती कथा रसप्रद वाटत असे. आणि त्यांच्या तोंडून ती ऐकल्यावर आपोआपच उद्गार निघत. 'गुरूदेवांचे सारेच अद्भुत !'

त्यांची जन्मकथा मोठी चमत्कारपूर्ण आहे.

मित्र आणि वरुण दोघेही मोठे प्रसिद्ध देव. त्यांची रूपे व नावे वेगळी. पण रहात नेहमी बरोबर. रात्री तेवणाऱ्या सौम्य अग्नीच्या रूपाला वरूण असे नाव असून दिवसा प्रज्वलित झालेल्या अग्निला मित्र म्हणतात. रात्रीची देवता वरुण आणि दिवसाचा देव मित्र. दिवस आणि रात्र जसे भिन्न असूनही अभिन्न तसेच हे दोन्ही देव. वेगळे असून एकच.

रात्र सरत आली होती. उषेचा उदय अजून व्हावयाचा होता. काही ऋषी जागे होऊन प्रभात स्तोत्रे म्हणू लागले होते. त्याप्रसंगी सामगानही होई. रात्री पवित्र जलाने भरलेले कुंभ अग्निशाळेत आणून ठेवलेले होते.

त्या उत्तर रात्रीच्या शेवटच्या प्रहरी मित्र व वरुण या दोन्ही देवता अग्निशाळेत एकत्र आल्या. त्याचवेळी अचानक आकाशातून तेजस्वी, रुपवती

उर्वशी खाली उतरली आणि क्षणमात्र चमकून परत अदृश्य झाली. तिचे अपूर्व रुप पाहून दोन्ही देव आकर्षित झाले. उर्वशी नाहीशी झाली व त्या देवांच्या आकर्षणाचे तेज त्यांनी तेथील कुंभात ओतले. त्या कुंभामधून दोन अत्यंत सुंदर व तेजस्वी ऋषी प्रकट झाले. एक आपले गुरु अगस्त्य व दुसरे मुनिवर वसिष्ठ.

उत्तर रात्रीच्या सहा घटका म्हणजे ब्राह्ममुहूर्त. संसारी माणसे त्यावेळी झोपलेली असतात. परंतु ब्रह्मज्ञानी ऋषींच्या ध्यानधारणेची ती अमूल्य वेळ असते. संसारात गुंतवून ठेवणारी पापे 'अग' म्हणजे न सुटणारी असतात. त्यांना आपल्या ज्ञानबलाने विरल करून उडवून देणारे ते 'अगस्त्य.' आणि इंद्रियांना वश राखणारे ते वसिष्ठ.

आणि ही गोष्ट खरीच आहे. कारण अगस्त्य मुनी रोज सकाळी लवकर उठून ज्ञानसाधना करीत आणि दिवसभर शेती करीत. अभ्यास आणि व्यवहार दोन्ही बाजूंनी ते निपुण होते. त्यांच्या शिष्यांचे भाग्यच की त्यांच्यासारख्या गुरुंची सेवा करण्याची व त्यांच्याकडून शिकण्याची संधी त्यांना मिळाली होती.

'गुरुदेव अगस्त्यांच्या जीवनातील सर्वच घटना मोठ्या अद्भूत आहेत. देवराज इंद्र व मरुतांचा जो संवाद झाला तो प्रसंग गुरुदेवानीच एका सूक्तात वर्णन केला आहे.

देवराज इंद्र हा सेनापती व मरुत् हे त्याचे सैनिक. त्यांच्यामधील संवादाची ही कथा गुरुदेवांनी वर्णिली आहे. त्या संवादाची पूर्व भूमिका मांडताना गुरूदेवांनी म्हटले आहे. 'सेना व सेनापती यांच्यात एकमेकाशी मिळून मिसळून रहाण्याची भावना असणे राष्ट्राच्या रक्षणासाठी आवश्यक आहे. त्या दोघात जर कुरबूर झाली, वाकडे आले तर त्यांचा राष्ट्राचा व नाश होतो. इंद्र देवांचा राजा आणि सेनापती. परंतु त्याचे सैनिक जे मरूत् त्यांच्याशी त्याचा प्रत्यक्ष परिचय नव्हता. त्याचप्रमाणे मरुतांच्यापैकीही कोणी इंद्राला ओळखत नव्हते. युद्धभूमीवरच त्यांचा संबंध येई. युद्ध संपले की, ते आपल्या वाटेने निघून जात.

पण एकदा रस्त्यात त्यांची भेट झाली. अलकापुरीहून देवराज इंद्र आपल्या दिव्य रथात बसून एका यज्ञासाठी निघाले होते. सात-सात जणांच्या टोळ्यांत विभागलेले, गणवेशातले मरुतही बाहेर निघाले होते. त्या सर्वांचे रूप, गुण आणि आकार पाहून इंद्राला ते आवडले. त्यांना थांबवून देवराजाने विचारले,

'अहो, तुम्ही सर्वच एकसारखे बलिष्ठ सैन्यासारखे दिसणारे कोण आहा ? कोठून आलात ? कोठे निघालात ? तुम्ही साक्षात मरुतांच्यासारखेच दिसत

आहात. कोण्या भाग्यवान ऋषींनी आपल्या यज्ञासाठी तुम्हाला बोलावले आहे बरे ?'

दिव्य रथामध्ये बसलेल्या इंद्राचे ते बोलणे ऐकून मरुत थांबले. त्यांनी इंद्राला ओळखले नाही. त्यांना वाटले इंद्राच्या बोलावण्यावरून देवसभेत आलेले कोणी ऋषी इंद्राच्या रथात बसून परत भूलोकावर चालले असावेत, व ते आपली स्तुती करीत आहेत. म्हणून त्यांनी संकोचाने विनयपूर्वक विचारले,

'हे दिव्य मूर्ती ! देवराजाच्या रथात बसलेले आपण प्रत्यक्ष देवराज तर नाही ना ? आपल्या बोलण्यावरून आपण कोणी ऋषिदेव आहात असे वाटते. कारण देवराज याप्रमाणे एकटे कसे बरे बाहेर पडतील ? त्यांच्या आजूबाजूला इतर कितीतरी देव व सैनिक त्यांच्या रक्षणासाठी असायला हवे. आणि आपल्या-बरोबर तर कोणीच दिसत नाही.

याप्रमाणे अगदीच एकटे आपण कोणीकडे जात आहा ? आपण जर देवराज असाल तर आम्ही आपल्याला प्रणाम करतो. आम्ही आपले सैनिक मरुत आहोत आपण आज्ञा केल्यास आपल्या रक्षणासाठी आम्ही आपल्याबरोबर येतो. हे घोडे आणि हा दिव्य रथ इंद्राचाच आहे हे आम्ही जाणतो. आपली इच्छा असेल याप्रमाणे करायची आमची तयारी आहे.'

मरुतांचे हे भाषण ऐकून इंद्र संकोचून गेला. एकदा त्याला वाटले मरुत रस्त्यात भेटले आहेत तर त्याना घेऊन जावे हेच योग्य. पण लगेच मनात अभिमान जागा झाला. ऋषींच्या यज्ञात याना काय म्हणून घेऊन जाऊ ? ऋषींनी स्तुती गाऊन मला आवाहन करून बोलावले आहे. हवि, भेट पूजा वगैरे यज्ञात ते देतील. तेथे या सैनिकांचे काय काम ?

असा विचार करून इंद्र म्हणाला,

'असे पहा, युद्धाच्या वेळी मी सेनापती असतो. त्यावेळी माझ्या सेना मागे पुढे असतात. पण आता मी चालला आहे ऋषींच्याकडे यज्ञाला. यज्ञात ते माझीच स्तुती करतात. माझ्या गुणांचा महिमा गातात व मला भेटपूजाही अर्पण करतात. म्हणून यज्ञाला जाण्यासाठी मी एकटाच निघालो आहे. तुमच्या धारणेप्रमाणे कोणी शत्रू मार्गात आल्यास सैनिक असलेले बरे. पण माझे वज्र शत्रूना पुरे पडण्यासारखे आहे आणि माझे घोडेही मध्ये कोठे न थांबता वाऱ्याच्या वेगाने जाणारे आहेत. म्हणून मला सैनिकांची आवश्यकता वाटत नाही. मी सरळ यज्ञ मंडपात जाऊन पोचेन.

हे गर्विष्ठ, अहंकाराने भरलेले भाषण ऐकून मरुतांना वाटले, हा देवराज

इंद्र असणे शक्यच नाही. हा कोणी गर्वाचा पुतळा दिसतो आहे. एकटा जात असेल तर जावो. असा विचार करून ते म्हणाले, ' हे देव तुम्हाला जर एकटे असहाय वाटत नसेल व सैनिकांची आवश्यकता भासत नसेल तर जशी आपली इच्छा. आमचे घोडे तर तयारच आहेत. ज्यांना मदत हवी असेल त्यांना ती करायला आम्ही सिद्धच आहोत. ऋषींनी बोलावल्यावरून आपण यज्ञासाठी जात आहात तर आम्हालाही घेऊन गेलात तर भेट .पूजेचा लाभ आम्हाला पण मिळेल. आमच्याही मनात तशी आशा असते.

आता तुम्ही म्हणता की कोणाच्या साह्याची तुम्हाला जरूर नाही पण खरे पाहता आमच्या बळावरच तुम्ही स्वर्गात राहता. परोपकार हे आपले काम आहे. आम्ही तुमचे काम करतो. तुम्ही आमचे करावे.'

मरुतांचे हे भाषण कठोर व तेजस्वी होते. सर्वोच्च अधिकार असलेल्या सेनापतीने ते कसे सहन करावे ? त्याला सरळ यज्ञमंडपात मानापानाने जावयाचे होते. मरुतांना बरोबर नेल्यास भेटपूजेत त्यांनाही भाग द्यावा लागला असता इंद्राला ते नको होते. त्याने उद्दामपणे उत्तर दिले,

' मरुतांनो, मी एकटाच आहे. सर्वव्यापी आहे. माझे ओज व बळ सर्वगामी आहे. माझ्या मनातील सर्व धारणा तात्काळ पुऱ्या होतात. माझ्या भावना उग्र असून माझ्या यातनाही तीव्र, तेजस्वी आहेत. ज्या ज्या धनसाधनाची इच्छा होईल ते ते तत्क्षणी मला मिळते. मी सर्व श्रेष्ठ इंद्र असून मीच ईश्वर आहे. मनात येईल ते पार पाडण्यास मी समर्थ आहे.

मरुतांना स्वतःच्या सेनापती इंद्राविषयी पूर्ण आदर होता, सैनिकांच्या मनात सेनापतीविषयी मानच असतो. त्याचप्रमाणे आपल्या सैनिकांचा मान ठेवणे हे सेनापतीचे कर्तव्य आहे. सर्व मानपान तो एकटाच भोगू पाहतो त्यावेळी अनिष्ट परिणाम झाल्याखेरीज कसा राहील ? आणि या प्रसंगी तर सैनिकांनी सेनापतीस ओळखलेच नव्हते. तरीही इंद्राच्या रथात बसलेला जर तो इंद्रच असेल तर त्याची आदरपूर्वक सेवा करण्याची तयारी त्यांनी दाखवलीच होती व त्याची सर्वोपरिताही त्यांना मान्य होती. म्हणून त्यांनी म्हटले, ' आपण स्वतः खरेच देवराज इंद्र असाल तर तुमच्या सामर्थ्या विषयी अथवा प्रभावाविषयी बोलणेच नाही. आपल्या सारखा पराक्रमी आणि प्रतापी देव झाला नाही, होणारही नाही. आपण जन्मतःच दिव्य असून अनेक पराक्रम व दिव्ये केलेली आहेत. त्यांची तुलनाच होणे शक्य नाही.'

याप्रमाणे मरुतांना इंद्राबद्दल अहोभाव, वाटत होता. इंद्राच्या मनातही

मरुतांविषयी आदर होता. परंतु त्यावेळी इंद्र ऋषीच्या यज्ञासाठी जात होता व सैनिकांना बरोबर नेण्याची त्याला इच्छा नव्हती.

अशा विपरीत प्रसंगी सेनापती व सैनिक समोरासमोर भेटले होते. व वरीलप्रमाणे शब्दांची बोलाचाली होऊन मने दूषित झाली व ते आपआपल्या वाटेने निघून गेले. त्यानंतर देवराज इंद्र आपल्या अनेकविध कामामध्ये हा सारा प्रकार विसरून गेले.

परंतु आपल्या घरी परतलेल्या मरुतांना आपल्या सेनापतीने केलेला अपमान वारंवार आठवत राहिला. व वेळ आल्यास इंद्राला साह्य न करण्याचा निर्धार त्यांनी करून टाकला. असुर अथवा अशाच शत्रूशी युद्धाचा प्रसंग आल्यावरच सेनापतीला सैन्याची जरुर पडते पण स्वर्गात असा काही प्रसंगच उदभवला नाही व सारे काही सुरळीत चालले होते. जगातल्या व्यवहारातही हेच दिसून येते. सुखशांतीच्या वेळी सेना व सेनापती यांची जरूर नसते त्यामुळे समाजाला ते भार रुपच वाटत असतात.

मरुत यामुळे आतल्या आत अस्वस्थ झाले. स्वर्ग वा पृथ्वी कोठेच त्यांची जरूर कोणाला भासत नव्हती. त्यांचा संताप वाढतच चालला. अंतरिक्षात काही कामकाज नसताना इकडे तिकडे हिंडता फिरताना आपसातच कुरबुरी होऊ लागल्या. एकमेकांशीच ते भांडू लागले. त्यामुळे त्यांच्या अनियमित हालचालींनी वादळे होऊ लागली. झंझावातामुळे समुद्र खवळून गेला. व सारे त्रैलोक्य भयभीत झाले.

काय घडत होते व त्यासाठी कोणता उपाय योजावा हे कोणाला सुचेनासे झाले. लोकांना भयमुक्त करण्यासाठी ऋषींनी देवराज इंद्राची स्तुती करून त्यांना विनवले. इंद्राने आपल्या सैन्याला म्हणजेच मरुतांना युद्धासाठी सज्ज होण्याचा आदेश दिला. पण हा आदेश ऐकणार कोण ! निरोप घेऊन जाणारा देवदूत सांगत आला. ' महाराज स्वत: मरुतच आपल्या विरुद्ध ठाकले आहेत.'

हे ऐकून इंद्राला मोठे आश्चर्य वाटले. माझीच सेना विग्रह करीत आहे ? त्यांना कोणी चढवले ? कोणी फितवले ! हे प्रश्न मनात आले नाहीत तोच वीज चमकली तसा तो जुना प्रसंग इंद्रराजाला आठवला. त्याने तत्काल निर्णय घेतला व देवदूताला सांगितले.

' मरुतांचे साह्य मला घ्यायचे नाही. मी एकटाच युद्ध करीन. माझे हे वज्र दिव्य रथ व तेजस्वी घोडे एवढेच पुरे आहेत.'

असा निश्चय करून देवराज स्वर्गातून अतरिक्ष लोकांत उतरला. सेनापतीला

रणांगणात येताना पाहून मरुतांना आनंद झाला. त्यांना युद्धाची खुमखुमी होती. पण शत्रूच नव्हता ! म्हणून आपसात भांडणे करून सेनापतीला त्रास देण्यास त्यांनी सुरुवात केली होती. याप्रमाणे सेना व सेनापती यांच्यातच युद्ध जुंपले. मग लोकांनां सुखशांती कशी लाभावी ? सेना व सेनापती दोघेही बलवान. दोघेही हट्टाला पेटून जिवावर उदार होऊन लढू लागले. त्रैलोक्यात युद्धाचे तांडव सुरू झाले. वनात रहाणाऱ्या रानटी हत्तींच्या भांडणांत वृक्षवेलींचा नाश व्हावा तशातली गत झाली. लढता लढता इंद्र अंतरिक्षातून पृथ्वीवर उतरला व पृथ्वीवरही युद्ध जुंपले. युद्धात दोन्ही पक्ष सारखेच होते. दोघेही जिंकत होते आणि हारतही होते. पण त्यांना सोडवायचे कोणी हा मोठा प्रश्न होता.

युद्ध सुरू झाले की लोक शांततेची इच्छा करू लागतात व अंती काहीही उपाय योजून शांती प्रस्थापित करतात. युद्ध म्हटले की त्याला विराम हा असतोच.

जय म्हणा वा पराजय म्हणा–पण इंद्र स्वर्गात निघून गेला व मरुत् पण आपआपल्या जागी गेले. युद्धाचे दुष्परिणाम भोगल्यावर देखील मरुतांना शांतता रुचत नव्हती आणि देवराजही त्यांच्याशी संधी करण्यास तयार नव्हता. त्यामुळे त्यांच्यात वारंवार लहान मोठी युद्धे होत. त्रैलोक्यातील सर्व लोक त्यामुळे त्रासून गेले. ऋषीमुनींनी युद्ध न करण्याविषयी मरुतांना विनवून त्यांची स्तुतीप्रार्थना केली. ते प्रसन्न झाले. परंतु इंद्र त्यांना त्रास देत होता. त्याला वारण्यासाठी ऋषींनी त्याचीही प्रार्थना केली. इंद्राने त्यांना अभय दिले नि मरुतांनी परत उचल खाल्ली.

याप्रमाणे दोन्ही पक्ष एकमेकाची कुरापत काढून लढत होते. स्वर्गातील देवही युद्धाला कंटाळून गेले. त्यांची सुख शांती तर नाहीशी झालीच, पण स्वर्गावर कोणी आक्रमण केले तर साह्य कोण करील, ही काळजीही त्यांना वाटू लागली. व शांतीसमाधान करण्यासाठी त्यांनी एक सभा बोलावली. सर्व लोकांचे प्रतिनिधी त्या सभेत आले होते. ऋषिमुनि पण होते. त्यांत आपले गुरुदेव अगस्त्य पण होते.

त्या देव सभेत सर्वांनी विचार केला की देवराज इंद्र व देवसेनेचे मरुत दोघांनी आपआपले पक्ष रचले आहेत. ते पूर्वीप्रमाणे एक झाले तरच युद्ध थांबेल. व शांतता प्रस्थापित होईल. पण हे सत्य त्यांना समजावून कोणी सांगायचे ? हे साहस कोण करील ? देवांपैकी कोणाला धैर्य होत नव्हते कारण दोघांच्याही उग्र स्वभावाची त्यांना चांगलीच माहिती होती. ऋषीमुनी दोघांचीही प्रार्थना

करून दोघांनाही प्रसन्न ठेवीत होते. परंतु त्यांच्या स्पर्धेचा अंत कसा आणावा ते त्यानाही कळेना. युद्ध करणे सोपे. पण संधी घडवून आणणे कठीण !

आपल्या गुरुदेवांवर देवराज पण प्रसन्न होते आणि मरुतांचीही त्यांच्यावर पूर्ण कृपा होती इतर ऋषीना ते माहीत होते. त्यानी आग्रहपूर्वक गुरुदेवांना आपले प्रतिनिधी म्हणून पुढे केले व दोन्ही पक्षात शांतता स्थापन करण्याविषयी त्याना विनवले.

आपले गुरुदेव प्रेमाला सहज वश होणारे आहेत. ऋषीच्या आग्रहाला मान देऊन त्यांनी संधीदूताचे काम स्वीकारले व ते सरळ अमरावतीला इंद्राच्या भवनात जाऊन पोचले.

त्या सज्जन महर्षीना येताना पाहून इंद्राने प्रसन्नतेने त्यांचे स्वागत केले, 'यावे मुनिवर ! आज या बाजूला कसे काय येणे झाले ?'

ऋषिराज सरळ स्वभावाचे. त्यानी इकडचे तिकडचे काही न बोलता लगेच देव व ऋषी यांचे मनोगत इंद्राला स्पष्ट सांगून मरुतांशी संधी करण्याबद्दल त्याला सांगितले.

ते ऐकून इंद्राला राग आला. त्याने स्पष्टच सांगून टाकले. 'हे पहा अगस्त्य, तुम्ही ऋषी आहात. मंत्रद्रष्टे आहात, हे मान्य. तुम्ही स्तुती प्रार्थना करून आवाहन केले असता तुमच्या यज्ञासाठी येणे हे माझे कर्तव्य आहे. परंतु आमच्या आंतरिक गोष्टीत तुम्ही मध्ये पडू नये हे योग्य. व्हायचे तेव्हा योग्य ते होईल.

इंद्राचे हे कडक भाषण ऐकून गुरुदेवांना राग आला. पण विचारपूर्वक तो गिळून ते तेथून निघाले व मरुतांच्याकडे गेले. देवांनी त्यांच्यावर संधिदूताचे काम सोपवले होते. ते करावयास हवेच !

गुरुदेवांना आपल्या दारी येताना पाहून मरुतांना मोठा हर्ष झाला, त्यांनी आनंदभराने त्याना उचलून घेतले, वाऱ्याच्या लाटांवर झोके दिले, हसत हसत गुरुदेव म्हणाले,

'हे मरुत देवांनो, तुमच्या हिंदोळ्यावर मी झोके का घेत बसू ? माझी किती तरी कामे अर्धवट पडून राहिली आहेत. माहीत आहे ?'

गुरुदेवांचे भाषण ऐकताच मरुतांनी झोका थांबवला व त्यांची क्षमा मागितली.

'आम्हाला आपल्या कामांचे विस्मरण झाले याबद्दल क्षमस्व. पण आम्हाला स्मरण व्हावे तरी कसे ? कारण आम्हाला कामच काय ? लढावे नि लढाई नसेल तेव्हा झोके घेत बसावे ! आमच्याजोगे काही काम आहे काय ?'

मरुतांचे हे नम्र भाषण ऐकून गुरुदेवांनी त्यांना इंद्राबरोबर सख्य करण्या-

विषयी सांगितले. ते ऐकताच त्यांचे रुप पार बदलून गेले आणि वाऱ्याच्या एकाच फटक्यात त्यांनी ऋषींना त्यांच्या आश्रमात नेऊन टाकले.

मरुत तरी काय करणार? त्यांना युद्धाशिवाय काही कळतच नव्हते. गुरुदेव विचारांत पडले. देवांच्या आणि ऋषींच्या आग्रहाला वश होऊन त्यांनी संधिदूताचे काम तर स्वीकारले पण येथे दोघांपैकी एकाही पक्षाला शांती स्थापण्याची इच्छा नव्हती. एक अक्षर ऐकण्याची तयारी नव्हती. लढ नाहीतर लढणारा आण अशीच दोन्ही बाजूंची मनोदशा होती तेथे कोठला संधी नी कोठले समाधान!

खूप विचार करुन शेवटी गुरुदेवांनी एक साहस करण्याचा निर्णय घेतला. काम फार कठीण होते. पण स्वीकारलेले काम करायलाच हवे ना?

गुरुदेवांनी एक मोठा सामयाग करण्याचा संकल्प केला. त्यासाठी सर्व ऋषींना व देवांना आधीच बोलावून घेतले. ऋषि परोपकारी वृत्तीचे असल्याने त्यांना पूर्ण सहकार लाभला. यज्ञासाठी गायत्री देवी एक विशेष प्रकारची सोमलता घेऊन आली. ती घोटून त्यांतून सोमरस काढला आणि त्याचे कुंभ भरले. इंद्राला सोमरस फारच प्रिय. आणि मुख्यतः त्यालाच प्रसन्न करावयाचे होते.

आकाशात संचार करीत असलेल्या मरूतांना सोमरसाचा वास येताच ते खाली उतरले. मरुतांना या प्रमाणे अवचित आलेले पाहून देव आणि ऋषी विचारात पडले. पण गुरुदेवांना आनंद झाला. त्यांनी मरुतांचे उत्तम रितीने पूजन केले. आणि आसनांवर बसवून सोमरस पाजला. मरुत सोमरसाचे सेवन करून प्रसन्न झाले.

स्वर्गामध्ये इंद्राला हे कळताच तो दिव्य रथात बसून हातात वज्र घेऊन यज्ञ मंडपात जाऊन पोचला. स्वतःच्या वाट्याचा सोमरस मुनींनी मरुतांना दिला म्हणून तो रागावला होता. पण याप्रसंगी स्वतः काय करावे ते मात्र त्याला सुचत नव्हते.

गुरुदेव चतुर आणि निर्भय असल्याने त्यांनी पुढे होऊन इंद्राचे हात जोडून स्वागत केले. आणि विनंतीपूर्वक हाताला धरून सिंहासनावर बसवले. इतर ऋषीही इंद्राची स्तुति स्तोत्रे गाऊ लागले. आणि ऋषिंनी देवराजाला सोमपानाचे आमंत्रण दिले.

ऋषिंच्या स्वागतामुळे देवराजाचा क्रोध बराच शांत झाला होता. पण मरुतांना सोम पाजला हे त्याला आवडले नव्हते. त्याने विचारले, 'माझा सोमरस कोठे आहे? माझ्या आधी हे मरुत येऊन तो पिऊन गेले. त्यांना कोणी बोलावले?'

सारेच फिसकटते की काय अशी परिस्थिती निर्माण झाली. पण अगस्त्य विचार पूर्वक बोलले.

'शांत व्हावे देवराज. सोमरस नवीन काढायला कितीसा वेळ लागणार ? आणि मरुत काही परके थोडेच आहेत ? तुम्ही त्यांचे सेनापती आणि ते तुमचे सैनिक. त्यांच्यामुळे तर तुम्हांला 'मरुत्वान इंद्र' म्हणून ओळखतात. आणि तुमची सेवा करण्यास ते सदैव तत्पर आहेत, होय ना मरुद्‌गणांनो ?' ऋषिंनी सरळ मरुतांनाच प्रश्न केला. सोमपानाने शांत झालेल्या मरुतांची सद्‌बुद्धी जागृत झाली होती. इंद्राविषयी मनात असलेली आदराची भावनाही जागी झाली होती. त्यांनी हात जोडून इंद्राला वंदन केले व ऋषींच्या म्हणण्याला आपली संमती दर्शवली. पण इंद्राचे त्यामुळे समाधान झाले नाही. मरुतांविषयीची नावड त्याच्या मनात खोलवर रुजली होती. समोर उभ्या असलेल्या मरुतांच्याकडे पाहून तो गरजला,

'खोटया नाटया गप्पा काय मारता ऋषीवर ! माझा सोमभाग तुम्ही संपवून टाकला आहे. उद्याच्या गोष्टी उद्या. आज जे झाले ते होऊन गेले ! माझ्यासाठी तुम्ही सोमयज्ञाचा संकल्प केला. पण हे मरुत् माझ्या आधीच येथे आले आणि हे अगस्त्या ! माझ्या बंधूसारखा, मित्रासारखा तू–तू ही वैऱ्याची करणी केलीस ! केवढे हे धाडस तुझे !'

इंद्र रागारागाने बोलत होता. पण त्या रागाच्या भरातदेखील ऋषीबरांविषयीचा प्रेमादर होता. तो जाणून गुरुदेवानी नम्रतेने त्याला विनवले, 'आपण म्हणता ते खरेच आहे. मी तुमचा बंधू आहे, सखा आहे आणि मी वैऱ्याचे नाही पण मित्राचेच काम केलेले आहे. हे मरुत् तुमचे वैरी नसून मित्रच आहेत. तुमचे सैनिक आहेत. सैनिकांची केलेली भेट–पूजा सेनापतीच्याच चरणी रुजू होते. हे मरुत तुमचेच आहेत. तुम्ही त्यांचा स्वीकार करा.

गुरुदेवांच्या या बोलण्याचा योग्य तोच परिणाम झाला. इंद्राचा रोष पूर्णपण नाहीसा झाला. गुरुदेवांनी प्रसन्नतापूर्वक ऋत्विजांना सांगितले, 'यज्ञवेदीला लवकर सजवून सिद्ध करा. अग्नी प्रज्वलित करा. सोमरसाचे कुंभ भरा. देवराज इंद्राला प्रसन्न करा. मरुतांना त्यांच्याजवळ बसवा.'

देव आणि ऋषी आनंदीत झाले. गुरुदेवानी इंद्र व मरुतांना एकत्र आणून एके जागी बसवून सोमपान करविले. सेना व सेनापतीचे सख्य होऊन त्रैलोक्यात सुखशांती नांदू लागली.

★ ★

# १ / भक्त व भगवान

(ऋग्वेद द्वितीय मंडल)

कैलासासारख्या उत्तुंग पर्वतांचा तो प्रदेश होता. त्या पर्वत शिखरांवर देवांची वस्ती होती आणि खाली खोल पाताळ लोकात दानव राहात. तसे पाहता दानव व मानव दोघे प्रजापतीचे पुत्र. पण वेगवेगळ्या मातांच्या पोटी ते जन्मले. दनूचे पुत्र ते दानव व मनूचे मानव. आपआपल्या आईच्या स्वभावाप्रमाणे त्यांच्या स्वभावात वैशिष्ट्ये उतरली होती. दानव स्वतःच्याच सुखासाठी झटत. त्यासाठी ते दुसऱ्याना पीडा देत. मानव स्वतः जगत व दुसऱ्यानाही जगवण्यासाठी धडपडत.

मानवांचा वैन्य नावाचा राजा त्यावेळी राज्य करीत होता. त्याला इन्द्रयाग करण्याची इच्छा झाली. त्याने आपल्या प्रजाजनांना बोलावले व सर्वांना यज्ञासाठी मदत करण्यास सांगितले. दानवांच्या कानी हे वृत्त जाताच त्यांनी मागणी केली. 'राजा, तुझ्या यज्ञाचा हविर्भाग देवाना नाही, पण आम्हाला मिळाला पाहिजे. जर देवाना बोलावले तर आम्ही हा यज्ञ होऊ देणार नाही.'

वैन्य राजाने ऋषीना बोलावून त्यांचे मार्गदर्शन मागितले. ऋषींनी सांगितले. 'राजन, दानव आपले भाऊच, पण ते निर्दय आणि स्वार्थी आहेत. ते मात्र स्वतःच्या देहाचे पोषण करणारे आहेत, यज्ञ हा सर्वांच्या कल्याणासाठी करावयाचा असतो. इन्द्र वगैरे देव परोपकारी आहेत. यज्ञात त्यांचेच पुजन करावे. अशा प्रसंगी दानवांना हविर्भाग देणे योग्य नाही.

राजन्, आपण यज्ञाला आरंभ करा. देवराज इंद्राला आवाहन करा. दानवांनी विघ्न आणले तर त्यावर आम्ही उपाय शोधून काढू.'

राजाने ऋषींची प्रार्थना केली. 'काही करा. पण माझा यज्ञ अपुरा राहू देऊ नका.'

त्या ठिकाणी जमलेल्या ऋषीमध्ये गृत्समद ऋषीही होते. त्यांनी यज्ञाचे होतेपण स्वीकारले, विधिपूर्वक यज्ञाचा आरंभ करून ऋचा गाऊन त्यांनी इंद्राची स्तुती केली व देवराजाला यज्ञस्थळी येण्याचे आवाहन केले. त्याप्रमाणे देवेन्द्र यज्ञाच्या मंडपात उपस्थित झाला.

यज्ञाच्या जागी इंद्र आलेला आहे हे दानवांना कळताच त्यांचे दोन नेते धुनि व चुमुरी मोठमोठ्याने गर्जना करीत मंडपात घुसू लागले. कारण दानव मानवांना आपले भाऊ मानीत. पण देवांशी त्यांचे वैर होते.

'कोठे आहे तो इंद्र ? आणा त्याला इकडे, तो आमचा वैरी आहे, त्याला यज्ञाच्या जागी राहू देणार नाही. काढा त्याला बाहेर.' असा त्या दानवांचा आरडा ओरडा चाललेला ऐकून वैन्य राजा घाबरून गेला. आता हा यज्ञ पूर्ण कसा होईल ? देवराजाखेरीज यज्ञ करायचा कसा ? सर्वांनी गृत्समदाकडे धांव घेतली.

गृत्समदाने त्यावर उपाय सुचविला. 'देवराज येथेच रहातील. मी इंद्राचे रूप घेऊन बाहेर जातो. म्हणजे दानव माझ्या मागे लागतील. तोवर बाकीचे ऋषी यज्ञ पूर्ण करतील.'

ऋषी स्वतः मंत्र द्रष्टे होते. मंत्रसामर्थ्याने त्यांनी इन्द्राचे रुप धारण केले व ते दानव होते त्या बाजूस गेले. त्यांना येताना पाहून ते दानव आनंदाने ओरडू लागले.

'आला, आला, इन्द्र आला ! मारा त्याला.' दानवांच्या भीतीने पळाल्या-सारखा हा वेषधारी इंद्र पळू लागला. त्याच्या मागून ते दानवही त्याला पकडण्या-साठी निघाले.

'हा पकडला.' म्हणत ते जवळ आले की, ऋषी त्यांना हुलकावणी देऊन दूर पळत. असे करता करता ते बरेच दूर निघून गेले.

इकडे यज्ञ मंडपात इंद्राच्या उपस्थितीत यज्ञ चालू झाला. पण त्या ठिकाणी दुसरीच अडचण उपस्थित झाली. यज्ञाचे होतापद ऋषी गृत्समदांच्याकडे होते. त्यांच्या निमंत्रणामुळे इंद्रराज तेथे आले होते. आणि आता ते ऋषी स्वतः इंद्राचे रूप घेऊन मांडवातून निघून गेले ! आता होत्याखेरीज यज्ञ कसा करावयाचा ?

त्यातून तोड काढण्यासाठी इंद्राने सुचवले, 'हे ऋषींनो पूर्वी देवयाग होत त्यावेळी देवांच्या होत्याचे काम मी करीत असे. या यज्ञात तुम्ही माझी होत्याच्या जागी स्थापना करा. म्हणजे मी यज्ञ पुढे चालू करतो.

इंद्राचे हे बोलणे ऐकून सर्वजण प्रसन्न झाले. गृत्समदांची होत्याच्या जागी

स्थापना झालेली होती. तेव्हा दुसरे कोणी त्या जागी बसू शकत नव्हते. पण इंद्र जर गृत्समदांचे रूप घेऊन त्या जागी बसला व ऋषींनी रचलेली सूक्ते म्हणून त्यांने जर यज्ञ केला तर काहीच हरकत नव्हती. असा विचार करून त्यांनी इंद्राला विनंती केली,

'देवराज, आपण आपल्या इच्छेप्रमाणे कोणतेही रूप धारण करू शकता तरी या वेळी आपण होत्याचे पद घेतले तर इंद्रासन मोकळे राहील. तरी आमची प्रार्थना आहे की आपण गृत्समद ऋषींच्या रूपाने त्यांच्या जागी बसावे म्हणजे कोणतीच अडचण येणार नाही.'

ऋषींची ही विनंती मान्य करून इंद्राने गृत्समद ऋषींचे रुप धारण करून अग्निचे आवाहन करण्यासाठी ऋषींनी रचलेल्या ऋचा गाण्यास सुरुवात केली.

'हे अग्नि ! हे नृपति ! या यज्ञात भाग घेणाऱ्या माणसांची प्रार्थना आहे की या यज्ञाचे आपण रक्षण करा. हे देव, आपली रुपे विविध असून जन्मही अनेक आहेत. अरणीची लाकडे एकमेकांवर घासली असता तेजाच्या ठिणग्या निघून त्यातून आपण प्रकट होता व ज्वालांनी प्रदिप्त होता. हे आपले पृथ्वीवरचे रूप. आकाशात ढग भरून आले असता त्या पर्वतासारख्या घनराजीमध्ये घर्षण होवून वीज चमकू लागते. जलदेवतेने निर्माण केलेले हे आपलेच रूप. आकाशात उगवणारा सूर्य हे आपलेच स्वरुप आहे. या प्रमाणे वनात दावानल, सागरात वडवानल, शरीरात जठरानल यांच्या रुपाने आपणच प्रकट होता.

हे अग्निदेव ! यज्ञाच्या प्रसंगी होता तुमची स्तुती करून तुम्हाला भेटपूजा अर्पण करतो. यज्ञासाठी येणे आपल्यालाही फार आवडते. ऋतूंच्या क्रमानुसार आपले वेगवेगळे यज्ञ केले जातात. यज्ञाचे यजमान आणि ब्रह्माही आपणच आहात. आपण साक्षात यज्ञरुप आहा.'

ऋषीरुप धारण करून या ऋचा म्हणत असता इंद्राच्या दिव्य दृष्टीपुढे त्या ऋचांचे रहस्य स्पष्ट होऊ लागले–पृथ्वी, अंतरिक्ष व आकाश हे तीन लोक. स्वर्गाचा सूर्य, अंतरिक्षाचा इंद्र–वायु व पृथ्वीचा अग्नी हा देव मानला जातो. पण ही तीन नावे व रुपे वेगळी भासली तरी त्यातील मूळ तत्व एकच आहे अग्नीचे जन्म व विविध रुपे दाखवली पण वस्तुतः अग्नी सर्वत्र आहे, सर्वव्यापी आहे. मग तो सर्वत्र का प्रकट होत नाही ? कारण प्रकट होण्यासाठी साधन लागते. इंधन लागते. आधार हवा असतो. अरणींचे इंधन मिळताच तो प्रज्वलित होतो. ढगांच्या गडगडाटाने वीज निर्माण होते.

आकाशात अदिती माता सूर्याला जन्म देते. याप्रमाणे कारण मिळताच अग्नी प्रकट होतो. पण एरवी तो सर्वव्यापी, अजन्मा निराकार असतो !

इंद्र मंत्राचे विवेचन करू लागला. ते ऐकण्यासाठी ऋषिगण त्याच्या आजु-बाजूस जमले. इंद्रही आनंदाने एकामागून एक मंत्र म्हणत त्यावर भाष्य करण्यात रंगून गेला तेव्हा यज्ञाच्या ब्रह्म्याने पुढे होऊन विनंती केली.

'हे होता ! अग्नीचे आवाहन करण्यासाठी आपण ऋचा म्हणा.' तेव्हा कोठे इंद्राला आपण होता असल्याचे स्मरण झाले. व त्याने ऋचा म्हणण्यास सुरुवात केली, 'हे अग्नी सत्तावन पदार्थांत श्रेष्ठ जो इंद्र तो आपणच असून ज्याच्या पराक्रमाची वर्णने गायली जातात तो विष्णूही आपणच आहात. धन-साधन देणारे ब्रह्मदेव आपणच असून आपणच विधात्याची शक्ती आहात वरुण, मित्र, अर्यमा, सूर्य ही आपली अंश रूपे असून त्या सर्वांसह आपण यज्ञाच्या स्थळी यावे.'

ऋचा म्हणताना इंद्राचे मन आनंदाने भरून आले. मंत्राचे रहस्य पुढील मंत्रांतून ऋषींनी स्पष्ट केलेले होते. म्हणून तर ज्ञानी लोक म्हणतात की ऋचा ऋचेच्याच साह्याने कळते. मंत्राचे रहस्य मंत्रातूनच उलगडले जाते. तेव्हा मंत्रावर वेगळे भाष्य करण्याची आवश्यकता उरलीच नाही होता अस्खलित ऋचा म्हणू लागला, 'हे अग्नी ! यजमान तुम्हाला पित्याच्या ठिकाणी मानून वेगवेगळ्या यज्ञ प्रसंगी आमंत्रण देतात. तुम्ही येता आणि तुमचा प्रवेश होताच चेतना स्फुरु लागते. म्हणून तर शूर पुरुष तुम्हांला बंधुरुप मानतात. तुमची सेवा, पूजा. करणाऱ्या लोकांची त्यांच्या पुत्राप्रमाणेच तुम्हीही सेवा करता. समाजाची सह-कार्याने करण्याची कामे करतांना तुम्हाला लोक 'सखा' म्हणून पाचारण करतात.

या ऋचा गाता गाता इंद्राला एक वेगळेच ज्ञान झाले. देव एकच. पण वेगवेगळ्या रुपात लोक त्याला ओळखतात, पूजतात, असे का ? तर जसा ज्याचा भाव तशी त्याची सिद्धी. ज्या भावनेने देवाची पूजा करावी त्याप्रमाणे देवाचे दर्शन घडते. म्हणून देवाची विविध रुपे–बोलता बोलता मनन करण्यासाठी किंचित काळ थांबून इन्द्राने पुढील ऋचा म्हणावयास सुरुवात केली. 'हे दिव्य अग्नि ! देवमाता अदिती म्हणजे तुम्हीच. तुम्हीच यज्ञाची भेट यजमानाला देता. देवताचे आवाहन करण्यासाठी ऋचांचे गायन करणारी देवी भारती हे आपलेच रुप आहे. ऋतुक्रमानुसार रुप बदलणारी इला–पृथ्वी, आणि वृत्राचा नाश करण्यासाठी इन्द्राला मदत करणारी नदी सरस्वती ही देखील तुझीच रुपे आहेत.

गृत्समदाने रचलेली ही सूक्ते गाता गाता इंद्र स्वतःला विसरून गेला. तो स्वतः खरोखरीच मृत्समद ऋषीच जणू होता. अशा तन्मयतेने तो गात होता·

'हे देव अग्नि ! ऋत्विज तुमची स्तुति स्तोत्रे गात आहेत. शहाणे व ज्ञानी यजमान त्या ऋत्विजांना गायी, घोडे व इतर दान-दक्षिणा देत आहेत. दानाची ही प्रेरणा देणारे देव तुम्हीच असून ऋत्विजांच्या ठायीही तुमचाच वास आहे. त्यामुळे दान घेणारे व देणारे तुमचेच अंश असून तुमच्या कृपाप्रसादाने उत्तम ज्ञान प्राप्त करून सभेत तुमच्या उदारतेची स्तुतिस्तोत्रे गात आहेत.'

अग्नीचे सूक्त पूर्ण झाले. इंद्र त्यावर मनन करू लागला. त्याचे रहस्य त्याला उमगले. गायी, घोडे वगैरे साधने उद्यमाच्या योगाने कोणाही माणसाला मिळू शकतात. त्यासाठी दैवी कृपा कशाला हवी ? तर दिव्य गाय ही वाणी असून दिव्य अश्व हा प्राणाचे प्रतीक आहे. देवाच्या कृपेने मिळालेली दैवी संपत्ती आत्मदर्शनाचा आनंद देते. आत्मज्ञानी जेव्हां भेटतात तेव्हा भौतिक संपत्तीचा महिमा रहात नाही. त्याजागी दैवी संपत्तीचीच प्रतिष्ठा असते.

सूक्त पूर्ण होताच ऋत्विज उठून उभे राहिले. दुपार झाली होती. सकाळ पासून यज्ञ कर्मात गुंतलेले ऋषी अल्पाहार घेण्यास बसले. त्यांनी 'होत्या' सही बोलावले.

'ऋषिवर चला ! विचार वायूने पोट थोडेच भरते ? सूक्तांनी तहान भूक भागत नाही. चला, आमच्या पंक्तीस बसून भोजन घ्या.'

इंद्र ऋषि वेषात होता. ऋषिकर्मे पण करावयास हवी. एरवी देव अमृताच्या दर्शनाचेच तृप्त होतात. पण ऋषींना जीवननिर्वाहासाठी अल्पाहार घ्यावा लागतो.

ऋषींच्या पंक्तीस हे 'ऋषिवर' पण बसले. भोजनात विविध फळे व मुळे होती. जेवणाच्या शेवटी ताक वाढण्यासाठी आणले. इंद्राला ते फार आवडले. तो विचारू लागला, 'हे काय आहे ? याचा स्वाद काही वेगळाच आहे. आणि हे पचायला पण हलके आहे. सोमरस व तुपाच्या आहुती पचनाला जड. तुम्ही हा पदार्थ मला कधीच दिला नव्हता.'

'खरे आहे, ऋषींनी उत्तर दिले. 'ताक हे आमचे भूलोकीचे अमृत !' इंद्राला ताक कोण देणार बरे ? म्हणून तर म्हणतात, 'तक्रं शक्रस्य दुर्लभम्।'

'पण हे ताक–तक्र नसून तारक आहे ! उष्णताशामक असून अन्न पाचन करणारे आहे.'

अशा सुखसंवादात दुपार गेली. माध्यंदिन सवन व संध्याकाळच्या तिसऱ्या सवनाची सूक्ते मृत्ससद ऋषींनी रचली होती ती इंद्राने होत्याच्या स्थानी बसून गायली व इंद्राला आवाहन करून परत इंद्राचे स्थानही घेतले व यजमान आणि अध्वर्युने अर्पण केलेला हविर्भागही स्वीकारला.

तथापि राजा वैन्य व इतर ऋषींना यज्ञमंडपातून इंद्राचे रुप घेऊन गेलेल्या गृत्समद ऋषींच्याविषयी चिंता वाटतच होती.

o o o

धुनि व चुमुरी दोघे दानव इंद्राच्या मागे लागले होते. इद्राचे रुप घेतलेले ऋषी त्यांच्या हातून सुटण्यासाठी धावत होते. पहिल्यांदा ते पाताळाच्या दिशेने धावले. पण तो तर दानवांचाच देश. तेथे त्यांचे रक्षण कोण करणार ? तेथून ते वरील प्रदेशाकडे जाऊ लागले. पण त्यांना कोणीच थारा देईना. त्यामुळे ऋषी खरोखरीच भयभीत झाले. त्यांनी रुप इंद्राचें घेतले होते. पण आत ते मानवच राहिले होतें. खरे पहाता इंद्र हा अजर-अमर. त्याला कोण काय करू शकणार होते ? त्याच्याशी शत्रुत्व करण्याचा प्रयत्न करणारांचा नाश निश्चितच होता. पण हा आत्मविश्वास अंतरात जागृत झाला तर तो इंद्र. तो देव. एरवी इंद्राचे रुप अथवा स्थान मिळाले तरी ते निरर्थकच. ऋषींनी इंद्राचे रुप धारण केले. पण इंद्राचा भाव त्यांच्या मनात जागला नाही. 'मी इंद्र आहे. अजेय आहे.' अशा आत्मविश्वासाच्या अभावी ऋषींना भीती वाटू लागली. 'मीं मर्त्य मानव. हे दानव मला मारून टाकतील.' हे गृहीत धरल्यामुळेच ते पळत सुटले होते. शेवटी पळता पळता ते थकून गेले आणि निरुपाय होऊन एका जागी बसले.

ते दोघे दानव त्यांच्या जवळ येऊन पोचताच ऋषी म्हणाले, 'मला पकडू नका. मारू नका. मी इंद्र नाही !'

'काय म्हणतोस ? मग तू आहेस तरी कोण ?' त्या दानवांनी रागाने विचारले.

'मी ऋषी आहे. गृत्समद ऋषी. तुम्ही इंद्राला ओळखत नाही ! तो परम तेजस्वी आहे !' ऋषी सांगू लागले. इंद्राचे नाव ऐकून दानव गोंधळल्यासारखे झाले. ते पाहून व इंद्राच्या नावाचा उच्चार झाल्यामुळे ऋषींना थोडा धीर आला.

दानवांनी सांगितले, 'आम्ही अद्याप इंद्राला पाहिलेले नाही. त्याच्या विषयी आम्हांला काही माहिती नाही. तो देव आहे की दानव, की मानव आहे काहीच आम्ही जाणत नाही.'

'इंद्र कोण आहे, तो किती पराक्रमी आहे हे जाणून घेण्याची तुम्हाला इच्छा आहे ?' ऋषीनी विचारले, आता त्यांना भय कसे ते वाटत नव्हते.

'इंद्राची माहिती असलेली बरी' असा कपटी दानवांनी विचार केला. त्यांच्या तावडीत सापडलेले ऋषी आता सुटण्यासारखे नव्हते. तेव्हा इंद्राविषयी जाणून घेण्याची मूक संमती त्यांनी दर्शवली. व ऋषीनी इंद्राचे पराक्रम वर्णन करणाऱ्या ऋचा गाण्यास सुरुवात केली.

'हे बंधूनो, जन्मतःच इंद्राने देवांच्यात प्रथम स्थान मिळवले त्या मनस्वीने मोठ मोठे पराक्रम करून देवांचं नाव शोभवले होते. त्याच्या एकट्याच्या ठायी अनेक सैनांचे बळ साठवलेले आहे. पृथ्वी व आकाशलोकात त्याच्या नावाचा मोठा धाक आहे.

फार पूर्वी ही पृथ्वी अस्थिर होती, डगमगत होती. ती इंद्राने आपल्या बाहुबलाने स्थिर केली. भूपृष्ठावर अस्ताव्यस्त पसरणाऱ्या पर्वतांवर नियंत्रण घातले. अंतरिक्षाच्या कक्षा विस्तारल्या व आकाशाला अधांतरी टिकवून धरले. हें सारे त्या इंद्राचे पराक्रम.

सप्तसागरांचे तुंबलेले पाणी त्यानेच मोकळे केले. दोन पाषाणांच्या मध्ये सुप्त असलेला अग्नी त्यानेच प्रथम प्रकट केला. तीन्ही लोक जे नश्वर होते त्यांना इंद्राने कालमर्यादा घालून दिली. चांगली कामे करणाऱ्यांना उत्तम पद देऊन अधम कामे करणाऱ्यांना त्यानेच खाली ओढले.

इंद्राचे पराक्रम ज्यांना माहीत नाहीत तेच त्याचा द्वेष करतात. परंतु मी तुम्हाला त्याचे गुण व पराक्रम प्रत्यक्ष दाखवून त्याचे प्रतापी अस्तित्व सिद्ध करून दाखवले. बंधूनो, तुम्ही त्याची ओळख करून घ्या. इंद्राला न जाणणारे वीर रणात विजयी होत नाहीत. म्हणून पराक्रमी योद्धे इंद्राचे साह्य मागतात. इंद्राशी तुल्यबल असा योद्धा आजवर झालेला नाही. भले भले शूर वीर त्याला शरण आलेले आहेत.

त्याच्या अद्‌भुत पराक्रमाची एक कथा मी सांगतो. शंबर नावाचा एक योद्धा इंद्राशी युद्ध करीत होता. तो लपून छपून हल्ले करी. इंद्र समोर आला की तो पर्वताच्या गुंफेत लपून राही. काही केल्या तो सापडत नसे. त्याच्या या मायाजालातून त्याला कोणी जिंकू शकत नव्हते. असे चाळीस शरद गेले. पण शेवटी इंद्राने त्याचा नाश करून जगाला भयमुक्त केले.

हे बंधूंनो, जे कोणी इंद्राची स्तुती करून त्याला यज्ञ प्रसंगी बोलावून सोमरस अर्पण करतात, भेट–पूजा करतात व त्याच्या साक्षीनं परोपकाराची कामे करतात त्या सर्वांना इंद्र दीर्घायु करून त्यांचे रक्षण करतो.'

ऋषी मोठ्या आनंदाने इंद्र स्तुती करीत होते. स्तुतिगान करता करता त्यांच्या मनातील भीती समूळ नाहीशी झाली. त्यांना अजूनही कितीतरी पराक्रमांचे वर्णन करावयाचे होते. पण एकाएकी ते दानव शस्त्र उगारून ओरडू लागले.

'अरे कपटी ब्राह्मणा, तू इंद्र नाहीस हे आता आम्हाला निश्चित कळले आहे. तुझ्या बोलण्यावरून आता खरा इंद्र कसा आहे ते आम्ही सहज शोधून काढू पण त्यापूर्वी तुझा नाश करायला हवा.'

दानवांच्या हातून सुटणे आता शक्यच नव्हते. पण इंद्राचा महिमा गातांना ऋषी निर्भय झाले होते. त्यांनी इंद्राची मनोमन प्रार्थना केली, 'हे इंद्रा, माझी हाक ऐकून धाव घे. माझ्यावर येऊ पहाणारे संकट भयंकर आहे. माझ्यावर दया कर. हे पराक्रमी देवश्रेष्ठा, आमच्या सारख्या ऋषींनी केलेल्या स्तुतिमुळेच तुझे माहात्म्य वाढते. अर्थात तुझ्या रहस्यमय पराक्रमाचा थांग अद्याप कोणाला लागलेला नाही. हे पूज्य देवा ! तुम्ही यापूर्वी अनेक पराक्रम केलेले असून पुढेही कराल. तुमचे यशोगान ऋषींनी आपल्या स्तोत्रात गायिलेले आहे. तुमच्या वज्राच्या साह्याने माझे रक्षण करा. तुमचे दिव्य अश्व या दिशेला वळवा.

★★

# २ / कर्म हाच धर्म

(ऋग्वेद द्वितीय मंडल)

'भगवन्! प्रभूने या विश्वाची रचना केली या विधानाला प्रमाण आहे काय?'

'आहे तर! विश्व आहे आणि विश्वात प्रभू आहे हेच मोठे प्रमाण आहे सर्जन व सर्जक दोघे एकच आहेत. अविभाज्य आहेत. प्रकृतीमध्येच प्रजापती पण सामावलेला आहे.'

'भगवन्! ही विधाने ज्ञाते समजू शकतील. पण आम्हाला समजेल अशी उदाहरणे द्याल काय?'

'वत्सा! मला हे रहस्य कळले ते जाळे बांधणाऱ्या कोळ्याकडे पहाता पहाता कळले. कोळी जाळे बांधण्यासाठी धागे कोठून आणतो. आपल्याच कायेतून तो ते धागे निर्माण करतो. त्यांचे उभे आडवे तणावे रचतो आणि आपले जाळे विणून काढतो. आपण स्वत: विणलेल्या जाळ्यात तो तेच पांघरून सुखाने झोपतो. खरे ना?'

'होय. कोळ्याची ही करणी आम्हाला सहज समजण्यासारखी आहे.'

'तुम्हाला वाटेल कोळी हा एक किडा-जंतू. पण कोळी माझा गुरू आहे असे मी मानतो. तो प्रजापती आहे. स्वत: रचलेल्या विश्वात स्वत: प्रवेश करून तो रहातो. सूर्य पहाता ना? तोही प्रजापती आहे. स्वत:च्याच किरणांच्या जाळ्यात तो स्वत: प्रवेशतो.'

'कोळी आणि सूर्य दोघांचीही उदाहरणे कळण्यासारखी आहेत. पण विश्वाचे वस्त्र पांघरून प्रभु झोपला आहे असे म्हणता येईल काय?'

'उदाहरण समजून घेण्यापुरते घ्यावयाचे. वर वर पाहिले तर काहीच समजणार नाही. पण जरा खोलवर विचार करून आत डोकावून पाहिले तर रहस्य समजेल.'

'भगवन् ! आपण डोळे मिटून ध्यान धरता. आपल्या आत पण एखादे विश्व आहे काय ?'

'डोळे मिटले की दिसेनासे होते. सुरुवातीस समोर केवळ अंधारच असतो. त्या अंधारात दिवा लावला की प्रकाश पडतो.'

'अंतरात प्रकाश पाडणारा दिवा कसा लावायचा, भगवन् ?'

'डोळे मिटले की मन स्थिर होते. स्थिर झालेले मन एकाग्र होऊन मनन करू लागते. त्यामुळे अंतरीचे गूढ समजू लागते. त्यालाच ज्ञान म्हणतात. वारंवार अभ्यास व मनन केल्याने ज्ञानाचा दिवा चेततो व अंतरातील विश्वाचे दर्शन घडते.'

'भगवन् ! आपण अनुभवलेला असा एखादा प्रसंग वर्णन करून सांगाल काय ?'

'अवश्य. लहान मोठे अनेक अनुभव मी घेतले आहेत. त्यातील एक प्रसंग मी तुम्हाला सांगतो–

माझे डोळे मिटलेले होते. मिटल्या डोळ्यांनी मी माझ्याच शरीराकडे पहात होतो. सरोवरात आपले प्रतिबिंब आपल्याला दिसावे तसेच माझे शरीर मला दिसत होते. पण ती काया वेगळ्याच प्रकारची होती. आकार शरीराचाच पण त्याला डोळे, नाक, कान काही नव्हते. हे शरीर कोणते बरे ? मी मनन करू लागलो. खोलवर विचार करता करता आपलेच जाळे अंगावर घेऊन बसलेला कोळी आठवला. किरणांच्या जाळ्यात प्रकाशणारा सूर्य आठवला. हे शरीरही सूक्ष्म जाळ्यासारखेच आहे तर– आणि त्या जाळ्यात हा कोण बरे झोपलेला आहे ? दिसले ! समजले ! तो होता माझा प्रभु, माझा अंतर्यामी, माझा जीवात्मा !'

'म्हणजे भगवन् ! आपण जीवात्म्याचे दर्शन घेतले तर ?'

'वत्स ! जसा ज्याचा भाव तसे त्याला दर्शन घडते. हा सारा जादूचा खेळ आहे. माझा प्रभु विश्व रचतो. आणि त्याच्याशी खेळत बसतो. तसाच जीवात्मा. तोच ही काया घडवतो आणि स्वतः त्यातच रहातो. कधी कधी असे घडते. आणि कधी नाही.'

'हे सूक्ष्म शरीर कशाचे असते बरे ?'

'मला वाटते आपल्या स्थूल शरीरात जे ज्ञान तंतूंचे जाळे पसरलेले आहे त्या तंतूंचेच हे शरीर विणलेले असावे. आपला प्रभु. प्राणवायु त्या शरीराचे संचालन करतो. म्हणून त्याला सूत्रात्मा असेही म्हणतात.'

'प्रभु आपला सूत्रधार आहे. त्याच्या इच्छेप्रमाणे तो आपल्याला नाचवतो. आपली जीवनदोरी त्याच्या हाती आहे असेच ना?' एकाने विचारले.

दुसरा एक शिष्य संतोषपूर्वक म्हणाला, 'गुरुदेव, आपण जे सांगितले ते आम्हाला पटले. आपल्या स्थूल शरीराच्या आत सूक्ष्म शरीर असून ते ज्ञानतंतूंच्या ताण्यावाण्याने विणलेले आहे हे रहस्य आज आम्हाला कळले.'

दुसऱ्या एका शिष्याने विचारले, 'आश्रमात रहाणारे ऋषी व त्यांचे शिष्य झाडांची साले काढून त्यांची वल्कले शरीरावर धारण करतात. कित्येकजण लोकरीची वस्त्रे घालतात. आपल्या आश्रमात आपण कापसाचे सूत काढून कपडे विणतो. हा कापूस कशापासून होतो?'

'झाडावर फुलणाऱ्या फुलातून कापूस निघतो. पण हे फूल इतर फुलांहून वेगळे आहे. इतरांच्या सारखा सुगंध नसला तरी या फुलात बरेच गुण आहेत. या फुलाला पिंजले की त्यातून कापूस निघतो. त्याला कातले की त्यातून तंतू निघतात. तंतू मागावर घालून विणले की त्यांचे वस्त्र तयार होते.'

'पिंजण, कातण ही सारी साधी, सरळ कामे आहेत. नाही?'

'तसे पहाता कोणतेच काम सोपेही नाही आणि अवघडही नाही. कामात मन रमले पाहिजे. जेव्हा माझे मन वस्त्र विणण्यात एकाग्र होते, तेव्हा ते काम सोपे, सरळ होते. पण मन लागत नसले की सूत वारंवार तुटू लागते. कातण, पिंजण करता करता मला एक कविता सुचली आहे.'

'आम्हाला ती कविता ऐकायला मिळेल?'

'ऐका. कवितेचा भावार्थ असा आहे–रात्र जाते आणि उषा येते. या दोघी मोठ्या कुशल विणकर आहेत. एकीच्या जवळ काळा धागा असून दुसरी जवळ शुभ्र तंतू आहे. त्यांचे विणकाम अव्याहत चालू आहे. त्यांच्या धाग्यात एकही कच्चा धागा नाही, त्यांनी विणलेले सुंदर वस्त्र पवित्र यज्ञ कार्यात वापरले जाते.'

'भगवन्, कातण पिंजणा सारखी कामे स्त्रीयांना चांगली जमतात नाही?'

'पुरुष शेती करतात. स्त्री घरात राहून कातते, विणते, सायंकाळी सूर्य आपला किरणांचा पसारा आवरून घेतो. आणि आपले विणकाम दुसऱ्या दिवशी

परत सुरू करतो. रिकाम्या वेळात पुरुष मागावर बसतो आणि स्त्रिया सूत गुंडाळण्याची वगैरे कामे करतात.'

'सूत वारंवार तुटू लागले की आपण काय करता?'

'माझे काम स्तुती करण्याचे आहे. मी देवांना म्हणतो, माझे धागे कच्चे राहिले, तुटू लागले तर ते योग्य होणार नाही. माझे सूत तुटू देऊ नका.'

'मग देव तुम्हाला मदत करतात?'

'अर्थात जो कोणी उद्योग करतो त्याला देव निश्चित साह्य करतात. आळशी, निरुद्योगी माणसांना देव तरी कशी नी काय मदत करणार बरे?'

'सूत कातण्यात त्रुटी राहून ते कच्चे राहिल्याने तुटते. हो ना?'

'खरे आहे, पण सूत मागावर घेण्या आधीच पारखून घ्यायला हवे कातण्यात चूक असली तर विणणाऱ्याचा उपाय कसा बरे चालेल? म्हणून विणणाऱ्याने स्वतःच कातले पाहिजे. कातणे व विणणे दोन्ही कामे एका हाती व्हायला हवीत.'

'पण भगवन्! अशा कामात वेळ नेल्याने आपल्या ध्यान धारणेत, उपासनेत विघ्न येणार नाही का?'

'वत्सा! ही कामे माझ्या मते ध्यान धारणेहून वेगळी नाहीत. माझे काम हीच माझी भक्ती. हीच माझी उपासना. देवाजवळ माझे हेच मागणे आहे.

'हे प्रभो, माझी वृत्ती तुझ्यात लीन होवो. तुझ्या ठायीच ती सतत राहो, माझे ध्यान भंग न पावो: मी तुझे स्तुतिगान रचीत आहे. त्यातील प्रत्येक पदाची रचना निर्दोष होवो. छंदाचा भंग न होवो, अशी काळजी देवा तूच घे.'

★★

# ३ / ऋतुक्रमानुसार

(ऋग्वेद द्वितीय मंडल)

गृत्समद ऋषी ध्यानयोगी होते आणि त्याचबरोबर उद्यमीही होते. ते आपल्या शिष्यांना सांगत, ' स्वत: परिश्रम करा. मी आळशासारखा बसून खाईन व दुसऱ्याने माझ्या भाकरीसाठी कष्ट करावे असा विचार पण मनात येऊ देऊ नका. संसारात सुख कधी शोधून मिळत नाही जो हाताने काम करतो त्याला सुख लाभते.

ही टकळी मला माझ्या गुरुच्या स्थानी आहे. ती घेऊन मी कातायला बसलो की मन एकाग्र होऊन ध्यान लागते. त्यातून वेळ मिळाला तर मी मागावर बसतो. सुताचे धागे मोजून आकडे लावून वीण तयार करतो. त्या कामामुळे अंकशास्त्र व गणिताचे ज्ञान होते.'

ऋषींचा बाहेरच्या ज्ञान विज्ञानाशी फारसा संबंध येत नसे कारण त्यांची वृत्तीच अंतर्मुख होती. कापड विणताना धागा कच्चा लागला की ते त्याला ' ओतु ' म्हणत आणि पक्क्या सुताला तंतू. हीच नावे ते आपल्या देवस्तुतीतही घालीत ' हे प्रभो, माझा तंतू ज्याप्रमाणे तुटत नाही. त्याप्रमाणे माझ्या अंतरीच्या वृत्तीही तुझ्या ठायीच एकसूत्र राहोत असा माझ्या मनाचा योग तुमच्या कृपेने साधो.'

याप्रमाणे वस्त्राच्या उभ्या आडव्या धाग्यांचा मेळ घालता घालता ऋषींनी मनाचाही मेळ घातला होता. मागावर बसून ते सुताचें धागे मोजून लावीत. एक ते नऊ, दहा, वीस. मग दशकांचा गुणाकार करीत. तुटलेलें धागे सांधता सांधता त्यांना गुणाकाराची रीत सांपडली. या प्रमाणे काम करता करता सहज ज्ञान झाले.

तथापी ऋषी कोणी मोठे गणित शास्त्री झाले नाहीत. कारण त्यांना अंतर्मुख होऊन रहाणेच आवडत होते. पण ज्ञान काही झाकून थोडेच रहाते? इंद्राची

स्तुती करता करता त्यात त्यांनी अंकाचा उल्लेख सहज केला. 'हे इंद्र देवा, आम्ही यज्ञाला सुरुवात केलेली आहे. हा यज्ञ म्हणजे एक रथ आहे असे आम्ही मानतो. सकाळ पासून कितीतरी वेगवेगळया वस्तु त्यासाठी जमा होत आहेत. नवी स्तुतिगाने रचली जात आहेत. रथाची जणू चार चक्रेच असे ऋत्विज येथे बसलेले आहेत. रथाला जोडलेल्या घोडयांच्या लगामासारखी त्रिविध वाणी येथे उच्चारली जात आहे. सकाळी खालच्या स्वरात, दुपारी मध्यम व सायंकाळी उच्च स्वरात तिचा घोष होतो. रथाच्या सात घोडयांच्यासारखे सात छंद आहेत. दहा खिळयां-सारखी दश ग्रहांची पात्रे आहेत. या रथात रथी यजमान असून सारथी ब्रह्मा आहे. असा हा रथ आम्ही तुमच्यासाठी सिद्ध केला आहे.'

या ऋचांमध्ये यज्ञाला रथाची उपमा देऊन त्यात एक, तीन, चार, सात-व दहा या अंकाना गुंफून त्यानंतरच्या ऋचांत एक, दोन, तीन या प्रमाणे संख्या आलेली आहे.

यज्ञाला रथाची उपमा देऊन एकम्‌ची गणना केली. नंतर इंद्राला रथांत बसून यज्ञभूमीवर येण्यासाठी निमंत्रण देण्यासाठी म्हटलेल्या ऋचेत,

'हे देव श्रेष्ठ इंद्रा, आम्ही तुला आमच्या यज्ञात भाग घेण्यासाठी बोलावीत आहो. या यज्ञप्रसंगी तुमच्यासाठी सोमरस तयार केलेला आहे. तुम्ही आल्याने आमच्या धनसाधनात भर पडणार आहे. तरी तुम्ही त्वरित यावे. त्यासाठी आपल्या रथाला दोन दोन, चार चार, सहा सहा, आठ आठ, दहा दहा, अश्व जोडून यज्ञभूमीवर यावे.

'हे देवराज, तुमचे सोमपात्र येथे सिद्ध आहे. सोम आपल्याला फार प्रिय आहे. तरी आता त्वरेने यावे. रथाची गती वाढावी म्हणून शक्य तितके अश्व आपण रथाला जोडा. एकम्‌ची संख्या पुरती वाटत नसेल तर दशकांच्या संख्येने अश्वांची संख्या वाढवा. दहा, वीस, तीस, चाळीस, पन्नास, साठ, सत्तर, ऐंशी, नव्वद, शंभर–शंभर घोडे रथाला जोडून अतिवेगाने आपण येण्याचे करा.'

ऋषी याप्रमाणे सहज सरळ संख्यांची गणती करीत होते. त्याच सहजतेने ते निसर्गातील पदार्थांचे निरीक्षण करीत. दोघे अश्विनीकुमार सदैव एकमेकां-बरोबरच रहातात. त्यांच्या या युगुल भावाचे सकौतुक दर्शन करता करता संसारातली इतर युगुलेही त्याना दिसू लागली. त्यांच्या युगुल गीत नावाच्या स्तुति-सूक्तातील आठांपैकी शेवटच्या ऋचेत ते म्हणतात–

'हे अश्विनीकुमारांनो, या यज्ञप्रसंगी ऋचागान करून धुंद झालेले ऋषी व वीर पुरुष तुमचे गुणगान करणाऱ्या मंत्रांची स्तोत्रे रचून तुम्हाला बोलावीत आहेत. ती ऐकून आपण उभयता प्रसन्न होऊन यज्ञास यावे.'

शेवटच्या ऋचेतील स्तूतीचा संबंध जोडून ऋषी पहिल्या ऋचेपासून उपमांची मालिका रचतात.

'हे अश्विनींकुमारांनो, सोमरस काढण्यासाठी खल व बत्ता दोघांची गती कामी लागते. त्याप्रमाणे आपण दोघेही शीघ्र यज्ञस्थानी या. फळांच्या भाराने वाकळेल्या वृक्षाच्या डहाळीवर गरुडांची जोडी झेपावते त्या प्रमाणे आमच्या समृद्ध यज्ञात आपण सहभागी व्हा. यज्ञात ज्याप्रमाणे गाणारा उद्गाता व स्तुती करणारा होता, एकमेकांसह स्तोत्र, व शास्त्र उच्चारतात, ज्या प्रमाणे दोन राजांचे संधिदूत जनपदात एकमेकांसह वावरतात त्या प्रमाणे आपण उभयता एकमेकां बरोबर यज्ञाला यावे.

'दिवस उगवण्या पूर्वीच दूर रणसंग्रामाला जाणारे शूर वीर तयार होऊन बरोबर बाहेर पडतात, पुष्ट झालेले मेंढे एकमेकाशी झुंज घेत खेळतात, दोन सुंदर सख्या सारखाच शृंगार करतात, दंपती प्रेमाने आपली कामे एकमेकांच्या साहचर्याने करतात त्या प्रमाणे तुम्ही दोघांनी मिळून यज्ञाला यावे.

'एखाद्या सुंदर पशूची दोन्ही शिंगे रंगवून सजवतात. किंवा घोड्यांच्या दोन्ही खरी एकदम गळतात अथवा रात्रीच्या विरहानंतर चक्रवाक-चक्रवाकी ज्या आतुरतेने भेटतात, दोन पराक्रमी योद्धे जसे वेगाने रणाकडे धाव घेतात त्याच आतुरतेने तुम्ही यज्ञस्थानी धाव घ्यावी.'

'वेगाने वहाणाऱ्या नदीत दोन नावा एकमेकीजवळ येऊन नदी पार करतात, रथाची दोन चाके एका गतीने धावतात, चक्राचा आस आणि व्यास ज्या प्रमाणे जोडले जातात, शिकारी कुत्रे एक सारख्या गतीने शत्रूंवर तुटून पडतात, आणि ज्या प्रमाणे दोन कवचे जोडली गेली की शरीराचे रक्षण करतात त्या प्रमाणे तुम्ही आमचे पालन करा.

'हे अश्विनी कुमारांनो, वाऱ्याच्या वेगवान प्रवाहासारखी अथवा वेगाने वहाणाऱ्या नद्यांच्या प्रमाणे आपली गती वेगवती आहे. डोळे दोन पण दृष्टी एक असावी त्याप्रमाणे आपण दोघे असून एकच आहात. दोन हात व दोन पाय ज्या प्रमाणे शरीराला मदतरुप आहेत त्याप्रमाणे तुम्ही उभयतांनी आम्हाला साह्यभूत होऊन उत्तम धन घेऊन यावे.'

'ओठ दोन असले तरी त्यांची हालचाल होऊन त्यांतून मधुर वाणी प्रकटते, मातेचे स्तन दोन असून ते बाळाला पुष्टी देतात, दोन नाकपुड्यांची सरळ नासिका मुखाची शोभा वाढवते, दोन कान एक स्वर ग्रहण करतात, त्या प्रमाणे आपण दोघांनी मिळून आम्हास सुख द्यावे.'

'दोन हात एकत्र झाले की शक्ती निर्माण होते, दोन मेघ एकत्र आले की त्यांतील जल–वायु आणि वारी मिसळले जाऊन पृथ्वीवर पाऊस पडतो. शस्त्राला चाकावर चढवले की धार येते त्याच प्रमाणे हे देवांनो मी तुमचे स्तुतिगान रचले आहे. त्यांत स्तोत्र व शास्त्र दोन्हींचा समन्वय झाल्याने वाणीला तेज चढले आहे.'

प्रत्येक ऋतु मध्ये होणारे परिवर्तन पाहून या ऋषींना काही वेगळाच आनंद होई. ऋतूंमध्ये पहिला क्रम कोणाचा? कोणता ऋतू उत्तम? असे प्रश्न त्यांच्या मनात उठतच नसत. त्यांच्या दृष्टीने प्रत्येक ऋतू स्वतःची नवी हवा घेऊन येतो· प्रत्येक ऋतुची देवता वेगळी असते. प्रत्येक देव आपआपल्या स्वभाव धर्मानुसार आपल्याला सुख देत असतो.

सामान्यतः हिवाळा, उन्हाळा व पावसाळा असे तीन ऋतु मानले जातात' प्रत्येक ऋतूचे चार महिने. त्याप्रमाणे चातुर्मासांची गणना करतात. वर्षाचे बारा महिने नक्षत्रानुसार नक्की केलेले असून त्यावरून राशिचक्राची गणना करता येते. गृत्समद ऋषी गणितात कुशल होते. खगोलशास्त्राची प्रमेये सोडवताना त्यांना फार आनंद होई

प्रत्येक ऋतुमध्ये होणाऱ्या परिवर्तनास अनुकूल असा आहार विहार असला तर माणसाला त्यापासून सुख लाभते. त्यादृष्टीने ऋषींनी प्रत्येक ऋतुची देवता निश्चित केलेली दिसते. इंद्र हा देवांच्यात प्रथम. वसंत ऋतूची देवता इंद्र. मधु-वसंताबरोबर माधव त्याप्रमाणे इंद्राबरोबर मरुत्. देवांचा कारागीर त्वष्टा. त्याच्याबरोबर शुक्र ग्रीष्म असतो. ग्रीष्माचा ताप शुची वाढवणारा–त्या उष्णतेचा देव अग्नी. त्यानंतर नभ व नभस्य यांचा इंद्राशी संबंध जोडून अरुण व मित्र या देवांचे अधिष्ठान वर्षा ऋतूत. त्याचप्रमाणे हिवाळ्याचे हेमंत व शिशिर. उन्हाळ्याचे वसंत व ग्रीष्म. पावसाळ्याचे वर्षा, शरद अशी हवामानाप्रमाणे गणना केली आहे. केवळ हवामानाची परिवर्तने पाहून नव्हे तर मानव हिताचा विचार करून त्यांनी ऋतुचे वर्गीकरण केलेले आहे. शिशिर व वसंताला जोडणारा माधव, मरुतांच्या वावटळीपासून आपले रक्षण करतो. ग्रीष्म वर्षा याना जोडणारा शुक्र, वर्षा-शरदाचा संयोग साधणारी शुची, नवरचना करणारा त्वष्टा व स्फूर्ती व चैतन्य देणारा देव अग्नी ही मानवी जीवनातील हितकारी तत्वे आहेत. शरद-हेमंत व शिशिराचा मेळ असला की वर्षा ऋतुमुळे होणारे अनिष्ट परिणाम दूर होतात.

ऋतूंचे हवामान लक्षात घेऊन साधे सरळ जीवन जगणाऱ्यांना सर्वच ऋतु सुखदायी असतात. हवेतील परिवर्तनामुळे तन-मनाची हानी झाली तर रक्षण करण्यास देवता तत्परच असयात. त्या देवांची स्तुती व प्रशंसा मानवाला मार्ग-दर्शक ठरण्यासारखी आहे. ही उपदेशवाणी, ही बोधनचने मानवाला सावधान करणाऱ्या दीपस्तंभासारखी आहेत. ★★

# ४ / चंद्र व चकोर

(ऋग्वेद द्वितीय मंडल)

ते एक मोठे तत्वचिंतक ऋषी होते. आपल्या आश्रमांतील कामाची त्यांनी व्यवस्थित वाटणी केलेली होती. स्वतःचे काम ते अतिशय नियमितपणे करीत. व इतरांच्या कामावर लक्ष ठेवीत.

गेले काही दिवस ऋषी कसल्या तरी विचारात पडले होते. शिष्यांशी बोलणेही कमी झाले होते. त्यांची झोपण्या उठण्याची वेळही बदलली होती. त्यांच्या नियमित नित्यक्रमात खंड पडला होता. इतका की रोज तिथी बदलावी तसा त्यांचा दिनक्रम बदलत होता. त्यांच्या जवळचे दोन चार शिष्य हे परिवर्तन लक्षपूर्वक पहात होते. पण गुरुना त्याबद्दल विचारावे कोणी व कसे ? दोन चार महिने असेच गेले.

एका संध्याकाळी ऋषी बाहेरच्या ओटयावर बसले होते. त्यांच्या मुखावर आनंद स्पष्ट दिसत होता. त्यांना जे जाणून घ्यायचे होते ते कळल्यासारखा संतोष झालेला दिसत होता. त्यांचे शिष्य ही संधी साधून त्यांच्या जवळ गेले व प्रणाम करून हात जोडून उभे राहिलें.

'या. या सौम्य शिष्यांनो, तुम्ही आपण होऊन आलात हे बरेच झाले. नाहीतर मीच तुम्हांला बोलवावे असा विचार करीत होतो.' गुरु प्रसन्नतेने म्हणाले.

'आज्ञा करावी भगवन्. आमचे काय बरे काम होते ?' एका शिष्याने विनयाने विचारले.

'बरेच दिवस एक रहस्य जाणून घेण्याचा प्रयत्न मी करीत आहे. त्या विषयी बरेच काही मला कळले आहे. अर्थात त्याविषयी संपूर्ण ज्ञान केव्हा होईल कोण जाणे !'

'भगवन्, आपण आम्हाला नेहमीप्रमाणे पुत्र, वत्स, शिष्य, बंधो याप्रमाण न बोलावता आज 'सौम्य' का म्हटले बरे? हे संबोधन नवीन आहे.'

'होय. माझ्या लेखीही ते नवेच आहे. तुमचा संबंध सोम–म्हणजे चंद्र याच्याशी निकटचा आहे. चंद्र आणि सूर्य यांच्या परस्पर संबंधाविषयी मी गेले कित्येक दिवस विचार करतो आहे.

'आपल्या गणनेप्रमाणे सूर्य रोज सकाळी उगवतो व सायंकाळी मावळतो· पण चंद्राचा उदयास्त सूर्यासारखा नियमित नाही. आज पौर्णिमा आहे. आकाशात पूर्ण चंद्र उगवला आहे. त्याचे दर्शन सहजरितीने होत आहे. ही पौर्णिमा–राका हिची मी स्तुती करतो. कारण तिच्यामुळे आपल्याला कितीतरी साधने उपलब्ध झाली आहेत. तुम्ही पराकमी वीर पुरुष आहात. राका दीर्घ आयुष्य देणारी आहे.

'हे भाग्यशाली राका! विविध रुपे व सुंदर मतीसह आपण यावे. आमच्या तन-मन धनाचे पोषण करावे.

'आज पौर्णिमा आहे. सोळाही कला एकवटून पौर्णिमा विकसित झाली आहे. उद्यापासून त्यातील एकेक कला कमी होत जाईल. त्याचबरोबर उदयाला उशीर होत जाईल. हा वद्य पक्षातील क्रम. शुद्ध पक्षात कला रोज वाढत जाईल व उदयाची वेळही लवकर येईल. पौर्णिमेनंतरचा पक्ष तो वद्य पक्ष. अमावास्या हा त्या पक्षातील शेवटचा दिवस. त्या दिवशी चंद्राची एकच कला असते. पण ती दिसत नाही. प्रतिपदेसही त्याचे दर्शन होत नाही. अमावास्येनंतरचा पक्ष तो शुद्ध पक्ष. कित्येकदा पंधराच्या ऐवजी चौदाव्याच दिवशी अमावास्या येतें. त्यावेळी रात्रीच्या शेवटच्या प्रहरी चंद्राचे दर्शन होते.

'पूर्ण विकसित चंद्र बिंबाने शोभणारी राका व चंद्र दर्शनाला जोडलेली 'सिनीवाली' अमावास्या यांचा यज्ञ प्रसंगी संयोग होतो. त्या दोन्ही तिथींना. 'कुहू' असे म्हणतात. आपल्या जीवन यज्ञांतही चढत्या पडत्या स्थितीचा असाच संगम होतो. कलांचा हा क्रम अव्याहृत चालूच आहे.'

'भगवन् चंद्रांच्या कला कमी होण्याचे काय बरे कारण?'

'कारण चंद्राला स्वतःचा प्रकाश नाही. चंद्र सूर्याचा प्रकाश घेऊन त्याच्या किरणांचे परावर्तन करतो. सूर्य व चंद्र या दोन ग्रहांच्या मध्ये आपली पृथ्वी आहे· किरणांच्या परावर्तनामुळे आपला खूप लाभ झालेला आहे. आपण सर्व धरित्रीची संताने आहोत उंच आकाशात प्रकाशणाऱ्या सूर्यापासून आपल्याला पोषण मिळते

म्हणून आपण त्याला पूषन् म्हणतो. चंद्र सूर्याच्या प्रखर किरणांना सौम्य, शीतल करतो म्हणून आपण त्याला सोम म्हणतो.'

भगवन् आपल्या यज्ञात आपण सोम व पूषा या देवतांचे पूजन करतो. या दोन्ही देवता एकदमच येतात असे आपण त्यांचे वर्णन केलेले आहे. ते देव म्हणजेच चंद्र व सूर्य काय ?'

'निसर्गत: विरोधी दिसणारी तत्वे असतील त्यांचा समन्वय साधून त्यांतून आपला लाभ करून घेणें हेच मानवी जीवन, म्हणून तर आपण जीवनाला 'यज्ञ' म्हणतो. यज्ञात पौर्णिमेची राका व अमावास्येची सिनीवाली एक होऊन कुहू रूपानें येतात त्याच प्रमाणें रात्र व दिवस यांचा समन्वय, ऋतु ऋतूंचा संगम होत असतो. जीवनयज्ञात पूषा व सोम, सूर्य व चंद्र यांनी एक होऊन यावे अशी आपण प्रार्थना करतो.'

'भगवन्, चंद्राला आपण सोम म्हटले. सोमरसाशी त्याचा काही संबंध आहे काय ?'

'होय. तेच मला सांगायचे आहे. चंद्र व सोम एकच आहेत हेच रहस्य मला कळले आहे. तिथीनुसार कमी जास्त होणाऱ्या कलांचा संबंधही समजून घेण्या सारखा आहे.'

'भगवन्, आम्ही असे ऐकले आहे की एक सोमवल्ली असते तिला पौर्णिमेच्या दिवशी पंधरा पाने असतात. वद्य पक्षातील प्रत्येक दिवशी तिचे एक एक पान गळते व शुद्ध प्रतिपदेपासून तिला रोज एक नवे पान फुटते आणि पौर्णिमेला परत पंधरा पाने होतात. हे खरे आहे काय ?'

'एका दृष्टीने ही गोष्ट सत्य आहे. चंद्र हाच सोम म्हटल्यावर चंद्राची कला म्हणजे सोमाचीही कला. हे रहस्य उमगले तर ही गोष्टही कळण्यासारखी आहे.'

'भगवन्, तर मग सोमाचे रहस्य आम्हाला समजावून द्याल काय ?'

'असे पहा, चंद्राचा संबंध आपल्या मनाशी आहे. चंद्र शीतल आहे तर मन, सौम्य आहे. अभ्यास केला तर हे कळून येईल. सूर्याची किरणे किती तीक्ष्ण आणि उष्ण असतात. चंद्र ती किरणे अंगावर घेऊन त्यांचे परावर्तन करतो. सूर्याची किरणे सरळ आली तर वृक्ष-वनस्पती त्याच्या उष्णतेने जळून जातील. पण चंद्राने परिवर्तित केलेल्या सौम्य तेजाने वनस्पतींना जीवन मिळते. चंद्राचे सौम्य चांदणे सर्वांना सुखद वाटते.'

'भगवान्, चकोर नावाच्या पक्षाविषयी आम्ही ऐकले आहे. त्याची भूक व तहान चंद्राच्या चांदण्याशिवाय भागतच नाही हे खरे आहे का ?'

'सोमवल्लीचे रहस्य आहे तसेच या चकोराचेही. आपल्या जीवनाचाच विचार करा म्हणजे ते कळेल. मातेच्या गर्भात रहाणाऱ्या जीवाचे पोषण कोण करते? माता खारट, आंबट, तिखट, तुरट, वगैरे रसांचा आहार घेते. त्या सर्वांचे सार घेऊन गर्भ पोसला जातो. ते सार म्हणजे सोमरस. सूर्याची प्रखर किरणे अंगावर घेऊन चंद्र, वृक्ष-वनस्पतींचे पोषण करतो. तो चंद्र मातेसारखा असून गर्भातील जीव चकोरासारखा असतो. म्हणून गर्भाला सौम्य सोमरसावर ज्याचे पोषण होते असा- म्हटले आहे.'

'भगवन् आपण सांगितले ते सहज समजण्याजोगे आहे. चंद्र आणि चकोर सोम आणि सोमवल्लीं, ही उदाहरणे जीवनात उपयोगी ठरण्याजोगी आहेत त्याचप्रमाणे पौर्णिमा, अमावास्या, शुद्ध व वद्य पक्ष, सूर्य व चंद्र यांचा परस्पर संबंध जाणून घेतल्याने मोठाच लाभ होण्यासारखा आहे. या सर्वांवरून एक गोष्ट कळून येते-सूर्य हा पूषन्-आपले पालन करणारा पिता असून, चंद्र हा सोम-अमृतपान करविणारी माता आहे.

'चंद्र व सोम याना ऋषी देव मानतात. सोमाच्या ठायी मातेची करुणा आहे. तोही पालन करणारा पिताच आहे. पण त्याच्या ठिकाणी असलेल्या करुणे-मुळे भक्त त्याला माता म्हणतात. हा भावार्थ यातून निघतो.

'आपण या दोन्ही देवांची स्तुती करू या.'

'हे सोम आणि पूषन्-आपण उभयता आमच्या धन साधनांचे जनक व जनेता आहात. त्याचप्रमाणे आकाश व पृथ्वीचेही आपणच जन्मदाते आहा. आपण प्रकट होताच सकळ लोकांचे रक्षण करता. देवानी अमृतरस देण्यासाठी आपले निमित्त योजलेले आहे.

'हे सोम व पूषन्-आपण सोमरस देणारे आहा. आपल्या कृपेने वर्षाचे चक्र फिरत रहाते. त्यात बारा महिन्यांच्या बरोबर एक अधिक मासही आहे. विषुववृत्ताच्या दोन्ही बाजूने अयनाच्या गतीनुसार आपले रथ चालतात. आमच्या मनाला विजयी करून आपले रथ म्हणजे आमचे मनोरथ होय.'

'हे सोम आणि पूषन्! आपण दिव्य देव आहात पूषा सूर्य आकाशात राहून सर्व भुवनांचे दर्शन करण्यासाठी रथावर आरूढ होऊन फिरत असतो. सोम-चंद्र हा पृथ्वीवरील सर्व पदार्थांचा निर्माता आहे. पूषा-सूर्य आमच्या बुद्धीला पोषण देतो तर चंद्र-सोम हा जीवनाचा पोषक आहे.'

'वस्तुतः सोमरसाचा प्रेरक चंद्र असून बुद्धितत्वाचा पोषक सूर्य आहे. म्हणून

तर सर्व देवांची माता अदिती म्हटली जाते, विश्वांतील सर्व प्राणिमात्रांना अनुकूल राहून ती मातेप्रमाणे त्यांचे पालन करते.'

'या स्तुतिसूक्तांत ऋषीनी अदिती मातेचे स्मरण करून खरोखरीच मातेच्या करूणेला नमन केले आहे. मातृभावानेच चंद्रमा अमृताची वर्षा करतो. विश्वातील औषधी वनस्पती चंद्राकडून सोमरस घेऊन पुष्ट होतात, 'चंद्रोदय झाला की चोचीने चांदण्याचा घोट घेऊन मी अमृताचा स्वाद चाखीन' अशा भावनेने चंद्रांच्या वाटेकडे डोळे लावून बसलेल्या चकोराची तहान चंद्राखेरीज कोण बरे भागवू शकेल ; चंद्राच्या जवळ जाण्याची शक्ती त्या पाखरांजवळ नाही. पण भक्ताच्या अंतरीची हाक ऐकून देव त्याच्याकडे धाव घेतो, त्याप्रमाणे चंद्रच चकोराकडे येतो व त्याची तहान भागवतो.

'चंद्र किरणांचा आस्वाद घेतल्यावर चकोर संतोषाने जो आनंदोद्गार काढतो तो ऐकणारा कोणी कवी असतोच ना ?ऋषींची वाणी सोमरसासारखीच गोड आहे. त्यांच्या ऋचा अमृतासारख्या गोड शब्दार्थाने काठोकाठ भरलेल्या आहेत. यज्ञाला सुरुवात झाल्यावर आपल्या मधुर छंदातील ऋचा ते म्हणू लागले की इंद्रादी देव आपल्या आसनावर त्या ऐकण्यासाठी येऊन बसत. त्याच प्रमाणे यज्ञाची पूर्णाहुती झाल्यावर ऋत्विज स्तुतिवचनानी देवांचा सत्कार करून त्यांना निरोप देत.

पूर्णाहुती झाल्यावर आनंदात मग्न झालेले ऋषी नेहमीच्या अभ्यासाने ऋचा म्हणत रहात. गृत्समद ऋषी असेच एकदा ऋचा म्हणत असता इंद्राला त्या ऐकण्याची इच्छा झाली. पण पूर्णाहुती होऊन निरोप घेतल्यावर परत कसे जायचे ? म्हणून त्याने चातकाचे रूप धारण केले व ऋषींची वाणी तो लक्षपूर्वक ऐकू लागला.

चातक रुपाने आलेल्या इंद्राची ऋषीना ओळख पटताच त्यांना अतिशय आनंद झाला. शेजारी बसलेल्या यजमानाला ते सांगू लागले, 'हे पुण्य शालीन् ! हा शकुनि पक्षी या प्रमाणे येथे येऊन बसला आहे हा फार चांगला शकुन आहे. त्यातून हा दिव्य कपिंजल पक्षी आहे– आपला इष्ट देव इंद्रच आहे म्हणाना !'

'ऋषीनी त्या पक्षाला आदराने संबोधून म्हटले, 'आनंद विभोर होऊन वारंवार मधुर शब्द करीत असलेल्या शकुनवंत चकोरा ! आमच्या अंगणात तू आल्याने आमचे निश्चित मंगल होईल. तुझे हे हितकारी कार्य सामान्यांना समजत नाही. शकुनी शुभ शकुन करून स्वतःचे व इतरांचेही कल्याण करतो. कर्णधार ज्याप्रमाणे प्रवाहातील खडकांपासून वाचवून नावेला सुरक्षितपणे पुढे नेतो. त्याप्रमाणे तुझा शब्द आम्हाला उत्तम मार्ग दाखवीत आहे.'

'हे चकोरा, गोड शब्द बोलत आजुबाजूला वरखाली, इकडे तिकडे फिरत रहा. पण उडताना मात्र सावधान रहा, कोणी श्येन अथवा गरुड झडप घालून तुझा घात करणार नाही ना, कोणी पारधी बाण तर मारणार नाही ना ह्याची काळजी घे, या दक्षिणेकडे बसून तू मधुर शब्द बोल.'

'बंधो, शकुनि ! आमच्या गृहशाळेच्या उजव्या बाजूने येऊन गोड गोड बोल. तुझा शकुन मंगलकारी आहे.'

ऋषींची ही स्तुतिवचने ऐकून चकोर आनंदित होऊन आपण इंद्र आहोत, हे विसरून गोड आवाजात मंगल गीत गाऊ लागला. ते ऐकून ऋषी स्तुती करू लागले.

'ऐका ऋत्विजानो ! आपण स्तुती गातो त्याचप्रमाणे हा चातक पक्षीही गीती गात आहे, होता स्तुति करतो व उद्‌गाता गीती गातो पण हा पक्षी दोन्हीही प्रकारे गातो आहे !'

'हे चकोरा ! उद्‌गात्याप्रमाणे सामगान करीत, होत्यासारखे स्तुतीचे शंसन पण तू करीत आहेस ! खरोखरीच उत्साहीत होऊन घोडे ज्याप्रमाणे फुरफुरतात,' त्याप्रमाणे तुझा शब्द ऐकून आमचा उत्साह मनात मावेनासा झाला आहे. आम्ही सर्व मूक होऊन तुझाच शब्द ऐकण्यासाठी आतूर झालो आहो. आमच्या आजुबाजूला उडत रहा. मधुर गीत गात रहा. सारंगीची तार खेचल्यावर जसा मधुर सूर निघतो त्या प्रमाणें गोड स्वरात मंगल शब्द करीत रहा.'

★★

# ५ / जीवन– एक यज्ञ

(ऋग्वेद तृतिय मंडल)

महर्षी विश्वामित्र मंत्रद्रष्टे ऋषी होते त्यांनी विविध अनुभवांच्या द्वारे ज्ञान संपत्तीची भांडारे मिळविली होती. अनुभवांती त्यांनी एक निर्णय घेतला होता. ऋषीने एका जागी स्थायी निवास करू नये. स्वत:चे स्थान, स्वत:चा आश्रम म्हटला की माया, मोह आलाच. आणि त्या मागून त्या शिवाय इतरांच्या बद्दल वैरभाव पण आलाच.

पूर्वाश्रमी ते मोठे चक्रवर्ती सम्राट होते. राज्यपदाचा अनुभव घेऊन त्यांना कळून चुकले होते की राज्य मिळाल्याने गर्व होतो. राज्य सोडून ते गंगेच्या काठी तप करू लागले. त्यांच्या कठोर तपस्येने इंद्राचे आसन डळमळू लागले व त्यांचा तपोभंग करण्यासाठी इंद्राची माया मेनका तेथे जाऊन पोचली. ऋषींनी तिचा स्वीकार केला. जीवनाचा एक वेगळाच अनुभव घेतला पण तपोबल त्यात नाहीसे झाले. ऋषींनी 'काम' जिंकून परत सात्विक तपाला सुरुवात केली चराचराबद्दल शत्रुभाव सोडून मित्रभाव मनात निर्माण व्हावा अशी त्यांची सात्विक साधना होती.

गंगा किनारी त्यांचा आश्रम होता. प्राणिमात्राच्या ठायी असलेला मित्रभाव जागवून, वन्य पशुपक्षी, वृक्षवेलींशी देखील त्यांनी मैत्री साधली व त्यांचा निरोप घेऊन ते तेथून निघाले.

ऋषी एकटे, एकाकी भारताची यात्रा करीत होते. फिरत फिरत ते रमणीय सिंधुप्रदेशात आले. तो देश त्यांना आवडला. एका निर्जन पर्णकुटीत ते राहू लागले.

त्यांचे नाव सर्वांना माहीत होते. ज्ञान विज्ञान व अनुभवांची भांडारे त्यांच्या जवळ भरपूर भरलेली होती. या विद्याधनाची विशेषता अशी की ते खर्चून टाकले तर वाढते, त्याचा संचय केला तर नाश पावते. असे हे अद्‌भूत

धन ! ऋषींनी वास केला त्या जागी पहाता पहाता मोठे विद्याधाम निर्माण झाले. दूरदूरच्या प्रदेशांतून जिज्ञासू माणसे तेथे येऊ लागली ऋषींच्या पावलांनी पुनीत झालेल्या त्या सुंदर भूमीवर 'मंगल भवने' बांधली जाऊ लागली. त्या प्रदेशात अन्नधान्य आणि पाणी यांची सुबत्ता होतीच. आता वसतीही वाढू लागली. पर्ण-कुटीचा आश्रम आणि आश्रमाच्या परिसरात मोठे विश्व विद्यापीठ निर्माण झाले.

तो आश्रम म्हणा, विद्याधाम म्हणा की विद्यापीठ– त्याचे कुलपती होते महर्षी विश्वामित्र. कोणाही मानव पुत्राला तेथे प्रवेश हवा असेल तर त्याची प्राथमिक कसोटी घेतली जाई. त्या कसोटीतून पसार झाल्यावरच त्याला प्रवेश मिळे. एरवी कोणीही थोडे दिवस तेथे येऊन रहात. विहार करीत. त्याना कसलेही बंधन नसे. पण प्रवेश मिळालेल्या शिष्यांना मात्र विद्याधामात राहून नियमांचे पालन करून तेथील कामात सहभागी व्हावे लागे.

पण असे कृपापात्र ऋषी फार थोडे होते. वर्षाकाठी एखाद्या ऋषीला निवासात प्रवेश मिळे. पण अशा सन्निष्ठ सुचरित ऋषींची संख्याही हळू हळू वाढू लागली. आश्रमाचे संचालनही तेच करू लागले. महर्षी दूरदूरच्या प्रदेशात धर्मकार्यासाठी जात. बरेच दिवस रहात. पण आश्रमाची कामे व प्रणालिका निर्विघ्न चालत. महर्षींची प्रेरणा मार्गदर्शक होती.

त्या विद्याधामात वास करणारे ऋषी चतुर व विविध कला-शास्त्रात निपुण होते. कोणाला वास्तु शिल्पादि शास्त्रे अवगत होती तर कोणी ज्ञान–विज्ञानाच्या शाखांत पारंगत होते, तर कोणी संगीतविद्येचे उपासक तर कित्येक नीतिशास्त्रात प्रवीण होते. महर्षी स्वत: तर अनुभवांच्या बळाने अनेकविध विद्यात पारंगत होते. आश्रमांतील सर्व ऋषींवर त्यांचे प्रेम होते. त्यांच्याशी मिळून मिसळून विनोद गोष्टी करताना त्यांना संकोच वाटत नसे. त्यांची शिकवण होती–

'मित्रांनो, हे विश्व फार मोठे आहे, विशाल आहे पण त्याचा विस्तार मोठा असला तरी भाव मात्र एखाद्या पक्षाच्या घरट्यासारखा आहे. त्या एवढ्याशा नीडात पक्षी, माता, पिता व पिल्ले रहात असतात. सूर्योदय होताच सारी उडून जातात. घरटे रिकामे होते. रात्र होताच परत सर्वजण त्या घरट्यात निवाऱ्यासाठी येतात.

'माणूस माणसासारखा झाला तर सारे विश्वच त्याचे मित्र होऊन जाईल. वैराची, शत्रुत्वाची भावना नाहीशी होऊन प्रेमभाव निर्माण होईल. आपला आश्रम ही विश्वाचीच प्रतिकृती आहे व सगळे आश्रमवासी हे 'विश्वामित्रच' आहेत.

महर्षींची ही भावना अधिक स्पष्ट व्हावी म्हणून एका शिष्याने त्यांना

विचारले, 'भगवन् ! विश्वामित्र हे तर आपले विश्वविख्यात नाव ! त्या नावाचा अधिकार आम्हाला कसा बरे प्राप्त होईल ?

'बंधो !' विश्वामित्र म्हणाले, 'माझे नाव आहे कौशिक गाधिन. पण जीवनांत वेगवेगळे अनुभव घेऊन मी एक रहस्य समजून घेतले ते हे की, विश्वातील चराचर हे मित्रत्वाच्या भावनेने भरलेले आहे. प्रत्येकाच्या ठिकाणी असलेला गुण ओळखून त्याची स्तुति-पूजा करावी. दोषभाव असेल तो दूर करावा. तुम्ही सर्व वेगवेगळ्या विद्या व कलामध्ये कुशल आहात. व त्यात प्राविण्य मिळवीत आहात, ते योग्यच आहे. पण ज्या विद्येमुळे मनात रागद्वेष निर्माण होतो, वाढतो ती विद्या काय कामाची ? '

'भगवन् रागद्वेष कशामुळे निर्माण होतो ?'

'मानवाची ती दुर्बलता आहे. मानवामध्ये अग्नीचा वास आहे. त्यामुळे तर उष्मा, चेतना, साहस, प्रेरणा व सामर्थ्य हे त्याला मिळते. त्यासाठी त्या अग्नीला सतत 'समिद्ध' प्रज्वलित ठेवणे आवश्यक आहे. काही कारणाने अग्नी जर मंद झाला, जीर्ण अथवा शिथिल झाला तर माणूस दुर्बल होतो, अशक्त होतो. आळस, प्रमाद वगैरे दोष त्यांच्यात येतात व त्यातूनच राग-द्वेष निर्माण होतात.'

'भगवन् ! अंतरातील अग्नी मंद पडू नये यासाठी काय करावे बरे ?'

'प्रत्येकाने काही ना काही कामात व्यस्त रहावे. मनात येणाऱ्या विचारांना आचारात उतरवण्यासाठी तत्परतेने हातपाय हलवावे. केवळ विचारात मग्न असलेली माणसे प्रमादी होतात. आणि केवळ आचार करणारी विचार शून्य माणसे शिथिल होतात.

खरे म्हणाल तर जीवन हा एक यज्ञ आहे. त्या यज्ञात सर्वच देवता सहभागी होत असतात. त्यात सर्वप्रथम अग्नीचे स्थान आहे. प्रत्येक जण आपआपल्या परीने अग्नीचे भजन पूजन करीत असतो व त्यायोगें नित्य नवी स्फूर्ति व चेतना मिळते.

'भगवन्, अग्नीचे आवाहन करण्यासाठी कोणती स्तोत्रे म्हणावीत ?'

'कोणा यजमानाला मोठा सोमयाग करावयाचा असतो तेव्हा तो प्रथम ऋत्विजांना त्यासाठी आमंत्रण पाठवितो. ज्या दूताकरवी निमंत्रण पाठवले जाते त्याला 'सोम प्रवाक्' असे म्हणतात. दूत ऋत्विजांच्याकडे जाऊन त्याना विनंती करतो.' 'हे भगवन् सोमशर्मा नावाचे यजमान सोमयाग करू इच्छितात. त्याप्रसंगी आपण ऋत्विज म्हणून यावे.'

सोमयागाचें आमंत्रण ऋत्विजाला मोठे आनंददायी वाटते. ते या शुभ आमंत्रक सोमप्रवाकाचा आदरसत्कार करतात.

याप्रमाणे ऋत्विजांना यज्ञाचे आमंत्रण दिल्यानंतर अग्निदेवाला आमंत्रण द्यावयाचे. सोमप्रवाकाबरोबर हे आमंत्रण पाठवताच अग्नीची स्तुति केली जाते. 'हे अग्निदेव! या जीवनयज्ञात यजन करण्यासाठी ताजा सोमरस काढावयास हवा. माझी भावना हाच सोमरस असून त्या भावनेचे प्रेरक आपणच आहात, तुमच्या कृपेने मी सोम-वाहक झालो. त्यात प्रमाद वा आळस होऊ नये अशी शक्ती मला द्या. या यज्ञात जे देव येतील त्यांचे यजन-पूजन योग्यरितीने करू शकेन अशी स्फूर्ती मला द्या. सोम वाटण्यासाठी ज्याप्रमाणे दोन पाषाण लागतात. त्याप्रमाणे हा सोमयाग पार पाडण्यासाठी मला बळ द्या.

'हे अग्निदेव! हा काही माझा पहिलाच यज्ञ नाही. आम्ही आजवर अनेक यज्ञ केलेले आहेत. आमची वाणी वृद्धी पावो. ऋत्विजांनो, समिधा व आहुती देऊन तुम्ही अग्नीला प्रदीप्त ठेवा. जीवनयज्ञ अखंड चालू ठेवावा व विविध प्रकारे स्तुती, वाणीव्यवहार चालावे म्हणून तर देवांनी ऋषींच्यावर कृपा करून त्यांना दिव्यदर्शन दिले. त्यांच्याच प्रेरणेमुळे कविता-ऋचा रचल्या गेल्या. त्याच ऋचांचे गान करून देवांची स्तुती करावी अशी ऋत्विजांची इच्छा आहे.

'हे अग्निदेव, आमच्या यज्ञकर्मांसाठी ज्याप्रमाणे देवांची प्रेरणा लाभली त्याचप्रमाणे आमच्या जीवनयज्ञाचाही प्रारंभ होत आहे. विचक्षण ज्ञानीजनांनी त्याचे दर्शन केलेले आहे. त्या विद्वानांनी आपली स्तुती करताना म्हटले आहे, 'अग्नीने जन्मतःच पृथ्वी व आकाश यांचे सुख साधले आहे. त्याने देवांना चेतना व मानवांना स्फूर्ती दिली आहे. अंतरिक्षांतील जलमातृकांच्या पोटी तुमचा जन्म झाला. तुमचे ते दर्शनीय बालरुप देवांनी व ज्ञानीजनांनी प्रत्यक्ष पाहिले आहे. तुम्ही देव व मानव या उभयतांचे सरळ मनाचे उदार बंधू-मित्र आहात.'

'आपला जन्म होताक्षणी अंतरिक्षातील सप्त जलदेवतांनी आपल्याला ओटीत घेतले. आपले सुंदर तेजस्वी रुप त्यांच्या अंकावर शोभू लागले. ज्याप्रमाणे शिंगरू जन्मतःच अश्विनी त्याचा सांभाळ करू लागते त्याप्रमाणे जलदेवता आपल्या जन्मानंतर लगेच आपले लालनपालन करू लागल्या. आपल्या त्या नवजात रुपाचे दर्शन ज्ञानीजनांना घडले होते.

जन्मतःच अग्नीच्या स्वच्छ व शुद्ध तेजाने अंतरिक्ष उजळून गेले. अग्नी झाकलेला रहात नाही. पण जलदेवतांनी आपल्या पदराखाली त्याला झाकून घेतले आहे. आश्चर्य हे की जलाच्या संयोगाने अग्नी विझला नाही की अग्नीमुळे जलाची वाफही झाली नाही. या सात चीरतरुण जलदेवता अंतरिक्षात एकत्र रहातात. या सातीजणी एकाच उदरात अग्नीला धारण करतात.

पाण्यातून प्रकटणाऱ्या अग्नीची किरणे विविध रुपात चमकतात. अग्नीमुळ पुष्ट झालेल्या जलदेवता कामधेनूप्रमाणे सर्वांना प्रेमामृत देत असतात. पृथ्वी व द्यौ या अग्नीच्या माता आहेत.

'हे अग्नी तुमचा जन्मदाता पिता बलवान असून मूर्तिमंत प्रेरणा व चेतनेचे प्रत्यक्ष स्वरूपच आहे. त्यामुळे तुमच्या किरणांतून आम्हाला स्फूर्ती मिळते, जीवनाला गती मिळते. तुम्ही प्रसन्न झाला की मेघातून पर्जन्य धारा वर्षू लागतात. अंतरिक्षातील वायू हे तुमचे सहचारी असून जलदेवता आपल्या जवळ रहातात.'

अंतरिक्षातील विशाल प्रदेशात सात जलदेवतांनी मिळून अग्निदेवाचे लालन पालन केलेले आहे. त्या सात जलमातृकांच्या ठायी अग्नीचा सुप्त वास आहे.

'हे अग्निदेव तुम्ही जगताचे जनक पण तुम्हाला धारण करणाऱ्या माता या जलदेवता आहेत. तुम्ही मानवांचे रक्षणहार आहात. रणसंग्रामात जेव्हा वीरांच्या साह्याला तुम्ही धावून जाता तेव्हा तुमच्यावर आक्रमण करण्यास कोणी धजत नाही.

'अहो तुमचा जन्म जलदेवीपासून झाला त्याचप्रमाणे तुमचा अवतार औषधी वनस्पतीपासूनही झाला. अरणीच्या काष्ठात तुमचा वास आहे. ऋत्विज अरणीचे मंथन करून अग्नी प्रकट करतात. जन्मतःच तुम्ही वेगाने वाढू लागता. तुमच्या नित्य समिद्ध स्वरूपाची प्रेरणा मिळावी म्हणून देव व ज्ञानी जन तुमची स्तुती व प्रार्थना करतात.'

अपार व अगाध अशा या सागराच्या ठायी वडवानल होऊन अग्नी वसत आहे. हा अग्नीचा तिसरा अवतार. सूर्याची किरणे, विजेचे चमकणे, अग्नीच्या ज्वाला ही सारी त्याचींच विविध रूपे होत. अंतरिक्षातील जलात, अरणीच्या लाकडात समुद्राच्या लाटात व हृदयाच्या गुंफेत सुप्त असलेला अग्नी हा मानवमात्राचा मोठाच आधार आहे.

'हे अग्निदेव, फडकत रहाणाऱ्या विजयध्वजाप्रमाणे आमच्या यज्ञस्थळी येऊन आम्हांला प्रेरणा द्या. यामुळे इतर देवांना पण या ठिकाणी येण्याची प्रेरणा होईल. ऋषिगण तुमची स्तुति स्तोत्रे रचून गात आहेत. त्या मागे असलेल्या भावनेनुसार तुम्ही त्यांच्या कामना पूर्ण करा. तुमच्या बरोबर येणारे इतर देवही आमच्या इच्छा पूर्ण करोत.

'हे अग्नि नारायणा, माणसांच्या अंगणात आपण रोज येता. मानव तुमच्या नानाविध रुपांचे स्मरण करून तुमची स्तुती करतात. ऋत्विज तुपाची आहुती देऊन तुमच्या स्वरुपाला विशेष समिद्ध करतात. खरे पहाता मानवांना विविध प्रकारची स्फूर्ती व प्रेरणा आपल्या कडूनच मिळते. तुमचा प्रवेश होताच आळस,

प्रमाद, राग, द्वेष आदी अवगुण दूर होतात. आमची गती, स्फूर्ती व प्रेरणा वाढवणारे तुम्हीच असून तुम्हीच आमचे जीवन धन व मनोबल आहात.'

'हे अग्निनारायण, तुम्ही पुरातन पुरुष आहात. तुमचे अनेक अवतार झाले असून तुम्ही जे अनेकानेक पराक्रम केलेले आहेत ते केवळ अगणित आहेत. आम्ही ऋषी तुमचा महिमा व तुमच्या दिव्यरुपांचे वर्णन गात असतो. तुमचे पराक्रम विख्यात असून तुमच्यासारखी लोकहिताची कामे दुसऱ्या कोणीच केलेली नाहीत. म्हणून ती कामे अपूर्व आहेत.'

जन्मोजन्मी तुम्ही 'जात वेदा' आहा. अर्थात् विश्वमानवाच्या हिताची प्रेरणा आपल्याद्वारे आपोआप मिळत रहाते. तुम्हीच आमची चेतना आहात. तरी या सोमयागाच्या प्रसंगी येऊन आम्हाला प्रेरणा द्यावी.

'विशाल विश्वाच्या विद्याधामात एकत्र जमलेले आम्ही सर्व ऋषी विश्वामित्र आहोत. हे देव, तुम्ही प्रत्येकाच्या हृदयात चेतना जागवून सर्वांना प्रेरणा द्यावी. तुमच्या सुमतीच्या आधारावर या जीवनयज्ञाला आरंभ केला आहे. दीर्घकाल चालणाऱ्या या सोमयागात तुमचे साह्य आम्हाला मिळो. तुमच्या कृपेने शिथिलता, प्रमाद, आळस दूर होवोत.'

'हे नारायणा, जीवनयज्ञाची ज्वाळा सदा प्रदीप्त राहो. त्या यज्ञात आपण प्रत्यक्ष प्रकट होऊन आपला प्रेरक शब्द आम्हाला ऐकू द्यावा. तुमच्या कृपाप्रसादाने भूमीचा विस्तार होऊन आमच्या वाणीस सामर्थ्य प्राप्त होईल व आम्ही विजयी होऊ.'

याप्रमाणे ऋषी कौशिक गाधीन् विश्वाचे मित्र झाले आहेत व सर्वांना ही मैत्रीची प्रेरणा देत आहेत. जीवनातील एक महान सत्य ते सांगतात,

मित्राच्या दृष्टीने विश्वाकडे पहा. सारे विश्व आपल्या हितासाठीच खपत आहे. विश्वात वसणाऱ्या अग्नीच्या प्रेरणेनुसार कार्य करीत रहा. तुमच्या अंतरातील अग्नीला सदा जागृत ठेवा. तो पुरातन पुरुष जीवनात नित्य नवीन कार्य करीत आहे.'

★★

# ६ / दहा हातांचे बळ

(ऋग्वेद तृतीय मंडल)

पुण्यसलीला गंगा–यमुनांच्या तीरावरचा तो प्रदेश. अरण्यात ऋषिमुनींचे आश्रम होते जीवनाच्या निर्वाहासाठी अन्न वस्त्र व निवारा ते स्वतःच निर्माण करीत. स्वाश्रयातून जे मिळेल त्यात आनंद मानून घेत.

ऋषींच्या कुटुंब परिवाराबरोबरच गुरुकुलातील शिष्यही आश्रमात रहात. ते गुरुपरिवारातीलच होऊन रहात. गुरू व गुरुपत्नी अग्नीची पूजा करीत. विद्यार्थी व इतर कुटुंबीय त्यांना साह्य करीत. त्यांची सेवा करीत. दर पंधरा दिवसांनी यज्ञ होत. दर महिन्याला मोठा यज्ञ उत्सव होई.

ऋषी विश्वामित्रांचा एक आश्रम त्या परिसरात होता. तप व्रत व ध्यान धारणेसाठी त्याना एकांत अनुकूल वाटे. ऋषी अथवा विद्यार्थी आल्यास ते थोडा वेळ त्यांना भेटत. दूर प्रदेशातून कोणी आल्यास घडीभर सत्संग करीत व प्रेमपूर्वक सर्वांना निरोप देत.

अरण्यातील तपस्व्यांना महर्षींविषयी मोठा आदर वाटे. हे ऋषी लहान मोठे यज्ञ वारंवार करीत. त्या प्रसंगी देवांना भेट–पूजा अर्पण करीत. सहकार्याने सेवेची कामे पार पाडीत. त्या प्रसंगी लहान मोठ्या चर्चा सभा होत. मत मतांतरामुळे एक निर्णय घेणे बहुधा जमत नसे. ते सर्व आप आपल्या मताप्रमाणे चालत. वेगवेगळ्या देव–दैवतांची पूजा करीत. पण हे देव वेगवेगळेच आहेत की एका देवाची ती भिन्न रूपे आहेत या विषयी त्याच्यांत एकमत होत नव्हते. निश्चित निर्णय त्यांना घेता येत नव्हता.

देवांविषयीचे रहस्य जाणून घेण्यासाठी काही ऋषी विश्वामित्रांच्याकडे गेले. महर्षींनी त्यांना सरळ भावाने सांगितले.

'तुम्ही सर्वजण आलात हे बरे केलेत. कारण दहांच्या हाती जे बळ असते

त्या योगाने यज्ञ यागासारखी मोठी कामे पार पडतात. एकट्या दुकट्याच्याने अशी कामे होत नाहीत. परस्परांची आणि देवांचीही मदत त्यासाठी आपल्याला मिळत असते. अग्नी, इंद्र, मित्र, वरूण, पूषा, अर्यामा, अदिती ही सारी एकच देवाची विविध रूपे आहेत.

'भगवन् ! यज्ञाच्या वेळी आपण अग्नीला प्रथम बोलावतो. अग्नी हा एक देव की दुसऱ्या एखाद्या देवाची विभूती ?'

'जो नर स्वतःच्या स्वार्था व्यतिरिक्त इतरांची कामे करतो त्याला समाजात मान मिळतो. प्रतिष्ठा मिळते असे अनेक नर एकत्र झाले की ते समाजाचे नेतृत्व करतात. त्याना 'वैश्वानर' असे म्हणतात. अग्नी प्रकट होताच आपल्या तेजाने त्रैलोक्य उजळून टाकतो. हितकारी कार्य करणाऱ्या अग्नीला सर्व देव साह्य करतात. अग्नी हा 'वैश्वानर' आहे.'

हे ऋषिवरांनो आपण जें मोठमोठे यज्ञयाग करतो त्यांचा द्रष्टा व नेता अग्नी आहे. वैश्वानर अग्नी हा देवांचा पुरोहित आहे. यज्ञात दिलेल्या भेटी तो देवांना पोचवतो. म्हणूनच कवी त्याला जातवेदा असे म्हणतात.

ज्ञानी जन वैश्वानर अग्नीची तीन रुपे जाणतात. मानवाना नवी प्रेरणा देणारा अग्नी यज्ञकुंडात समिद्ध होतो ते त्याचे एक स्वरुप. त्या ठिकाणी प्रकट होऊन तो सर्वांचे हित करतो. अंतरिक्षात चमकणारी वीज व आकाशात उगवणारा सूर्य ही त्याचीच दुसरी दोन रुपे होत.

'यज्ञाचा अग्नी अत्यंत बलवान आहे. पूर्वी तो स्वर्गात वास करीत होता. त्रैलोक्यात संचार करणाऱ्या वायुदेवाने त्याला पृथ्वीवर आणले व मानवाच्या जीवनयज्ञात त्याची प्रतिष्ठापना केली. त्या वायूनेच अंतरिक्षात वीजेचे रूप प्रकट केले.

आकाशात प्रकाशणारा सूर्य सर्व पदार्थांचे ज्ञान करून देतो. सूर्याच्या ठायी असणारा अग्नी पृथ्वीवर उतरुन माणसाना जागे करतो. नवी नवी कामे करण्याची प्रेरणा देतो.

ज्ञानी व कविजन अग्नीचे वास्तविक स्वरुप चांगल्यारितीने ओळखतात. जीवनयज्ञाचा प्रेरक असा वैश्वानर अग्नी हा प्रकाशक आहे. केतु आहे. यज्ञशालेचे मुख्य साधन असून ती दिव्य ज्योती आहे. आपण करतो त्या यज्ञयागाचा तो पालक पिता आहे. स्तुतिस्तोत्रे रचणाऱ्या कवींचा प्राण-प्रेरक असुर आहे. यजन करणाऱ्या ऋत्विजांची कामना पूर्ण करणारे ते इष्ट साधन आहे.

अग्नी स्वतः ज्ञानी व कवी आहे. मानवी हित साधणाऱ्या कविजनांना तो

प्रेरणा देतो. त्याचे यजन-पूजन करणाऱ्या यजमानांचे तो पालनपोषण करतो. पिता-पुत्राचे पालन करतो, त्याप्रमाणे अग्नी सर्वांचे पालन करतो.

'भगवन्! आपण आम्हांला अग्नीच्या विविध रुपांचे रहस्य समजावून सांगितले. पण अग्नी हा एक मुख्य देव व इतर देव त्या तत्वाच्या विभूती आहेत किंवा कसे ते रहस्य आम्हांला सांगावे.'

'हे ऋषीनो आपल्या कार्याची प्रेरक देवता अग्नी आहे, हा भाव आपल्या मनात निर्माण झाला की त्याच्या प्रत्येक प्रवृत्तीविषयी आपल्याला प्रेम वाटू लागेल. आत्मीयता वाटू लागेल. रात्र संपते आणि उषेचा उदय होतो अग्नी प्रकट होतो. यज्ञशालेची दारे उघडून जणू दोन दिव्य होते अग्नीला आवाहन करून समिद्ध करतात. अग्नी शरीराला ताजेतवाने करून स्फूर्ति व चेतना देतो. अग्नी रथामध्ये बसून स्वर्ग लोकातून येत असता त्याच्यासह इतर देव पण येतात. यज्ञ प्रसंगी त्या सर्वांचे दर्शन घडते. इला, सरस्वती व मही अग्नीसह येतात. देवांचा कलाकार त्वष्टा येतो. या सर्वासह येणारा अग्नी विशेष प्रिय वाटतो. अनेक ऋषीनी त्याची सूक्ते रचली आहेत.

अग्नी हा एकटा रहाणारा देव नाही. त्याच्या बरोबर समिध, बर्हि, शालेची दारे, रात्र व उषा, दोन दिव्य होते, भारती, इला, सरस्वती, देवत्वष्टा, वनस्पती या सर्व देवता येतात.

कोणा कवीच्या मनात प्रश्न निर्माण झाला, 'रात्रीचा अंधार दूर करणाऱ्या उषेला जागे कोणी केले ?' त्या प्रश्नाचे निराकरण करतांना ऋषी म्हणाले,

'सकाळी लवकर उठण्याची प्रेरणा देणारा अग्नीच होय. तो सर्वांचाच प्रेरक आहे. ज्ञान ज्योती प्रकट करून कवींना तो नानाविध गोष्टी दाखवतो अज्ञानाच्या आवरणाने बंद झालेली हृदयाची कवाडे तो प्रदीप्त होताच उघडून टाकतो.

'हे ऋषीनो व कवि जनानो अग्नि समिद्ध झाला की तो आपल्या सर्वांच्या-सहवास करतो आपल्या जीवन यज्ञात त्याच्यामुळे चैतन्य येते. तो इतर अनेक देवतांना आपल्या बरोबर घेऊन येतो. परंतु आपल्या जीवनयज्ञाचा तो मुख्य प्रेरक देव रात्रीही जागा असतो. रात्रीच्या त्याच्या रुपाला 'वरुण' म्हणतात, दिवसाच्या प्रकाशात समिद्ध होणाऱ्या अग्नीला 'मित्र' म्हणतात. रात्रंदिवस आपल्या शरीरात प्राण, चैतन्य जागवणारा मंद वायु हा अग्नीच आहे. सूर्य हा आपल्या जीवनयज्ञाचा होता असून वरुण जातवेदा, मित्र अध्वर्यु व अग्नी पुरोहित आहे. गुरूस्वरुप अग्नी हा एकच असून कार्यसंबंधास अनुरुप अशी त्याची वेगवेगळी नावे, रुपे व गुण आहेत.

आपण ज्या भावनेने त्याची आराधना करतो त्यास अनुरुप असे रूप तो धारण करतो. कवी ज्या स्वरुपाचे स्तुतिगान गातात त्या रुपाने तो यज्ञाच्या स्थळी येतो. आपल्या जीवनाचा तो पावक व शोधक देव आहे.

'अग्नीची अनेक रुपे व अनेक अवतार आहेत. आकाश हा त्याचा पिता असून धरित्री त्याची माता आहे. ज्ञानी जन त्याला मातरिश्वा म्हणतात. कारण अरणींच्या मंथनातून तो प्रकट हो तो तेव्हा अरणीत तो असतो. काष्ठात राहून तो श्वास घेत असतो. अंतरिक्षात तो वायुरुपाने वसतो. तेव्हा अंतरिक्ष ही त्याची माता असते. आकाशात उदय पावणाऱ्या सूर्याची द्यौ ही माता आहे. याप्रमाणे मातरिश्वा त्रिविध रुपात दर्शन देतो सूर्य वायू व अग्नी.'

'अग्नी ही महान् देवता असून आपल्या तेजाच्या बळावर अग्नीने आकाशाला अधांतरी तोलून धरले आहे. आकाशात प्रकाशणाऱ्या नक्षत्रात सूर्य हा श्रेष्ठ असून अंतरिक्षात वायू हा श्रेष्ठ आहे तर पृथ्वीवर यज्ञशालेतील अग्नी श्रेष्ठ आहे.'

'हे अग्निनारायणा ! आम्ही सर्व ऋषी यज्ञभूमीवर एकत्र जमून परस्परांच्या साह्याने तुमचे यजन–पूजन करीत आहो. आपले स्तुतिगान गाऊन आपल्याला उपायन, भेट–पूजा, अर्पण करीत आहो. आमच्यावर कृपा करून आमची वाणी तेजस्वी करावी. आमची धरती समृद्ध करावी. आमच्या प्रजेला दीर्घायु द्यावे. आमच्या यज्ञात आपली सुमती आम्हाला प्राप्त व्हावी. तिच्या योगाने राग द्वेष सोडून परस्पर सहकार्याने समाजकल्याणाची कामे आम्ही करीत राहू.'

★★

# ७ / अखिल विश्वाच्या कल्याण यज्ञामध्ये

**(ऋग्वेद तृतीय मंडल)**

हिमालयाच्या पायथ्याशी उत्तरापथ प्रदेशात ऋषी विश्वामित्रांचा एक आश्रम होता. राज्य सोडून त्यांनी एकांतवास स्वीकारला होता. शुद्ध साधनाने घडवलेले जीवन उत्तम होय. पण साधन शोधण्यात वा ते शोधल्यावर शुद्ध करण्यातच कित्येकांचे जीवन संपून जाते. फार थोडया माणसाना योग्य साधन सांपडते अशा लोकांच्या सूचने प्रमाणे चालणाऱ्या इतरांचेही कल्याण होते. कल्याण मार्गाने जाण्याची इच्छा असणारांना मार्गदर्शन करावे हे ज्ञानीजनांचें कर्तव्य आहे. त्यामुळे एकांतवासासाठी येऊन राहिलेल्या ऋषींच्या भोवती नेहमी आश्रम निर्माण होई. व साधनेच्या मार्गाने जाणारे इतर ऋषी तेथे राहू लागत.

जीवनात कोठलीच साधना कधी निष्फळ होत नाही. विश्वामित्राने राज पदावर असताना प्रजेचे कल्याण केले, ऋषी झाल्यावरही इतरांचे भले करण्याची वृत्ती त्यांच्या ठायी होतीच. आणि म्हणूनच त्यांचे आश्रम विद्याधाम होऊन जात असत.

आश्रमातील कित्येक ऋषींनी महर्षींना गाधीकुलातील राजाच्या रूपात पाहिलेले होतें. हे ऋषी पण कुशिक वंशातीलच होते. साम्राज्याच्या वृद्धीसाठी राजाची आज्ञा मानून त्यांनी युद्धेही केलेली होती. राजाने राज्य सोडलें व तो उत्तरापथात आश्रमात जाऊन राहिला तेव्हा त्याच्या मागून कुशिक गोत्राचे इतर राजेही जनपद सोडून आश्रमात येऊन राहिले होते.

साधनेसाठी एकांतवास स्वीकारलेल्या त्या महार्षींचे दर्शन करून त्या निवृत्त राजांना संतोष होई. दूर दूरच्या प्रदेशातून इतर ऋषीही या आश्रमात निवासासाठी येऊ लागले. पण कौशिक ऋषी सहज भावाने आधी पासूनच तेथे रहात होते.

पहिल्यांदा जो राजा होता तोच आता साधनेचा मार्ग दाखवणारा गुरूही होता. कौशिकांनी आश्रमाच्या व्यवस्थेचे काम संभाळले होते दूर देशांहून दुसरे साधक आश्रमात येऊ लागले तस तशी आश्रमाच्या प्रवृत्तीही वाढू लागल्या. चार दोन ऋषी असले तर कष्ट करुन साधना करु शकतात. परंतु अनेक साधक जमले की एक ऋषिसमाज होतो. व त्या समाजाच्या निर्वाहासाठी धन-साधनांची व्यवस्था करावी लागते. कौशिक ऋषींनी त्या सर्व व्यवस्थेचा भार आपल्यावर घेतला होता. व विश्वामित्रांच्या प्रभावाने विकसित होणारा आश्रम सुरळीत चालला होता.

ऋषींच्या मनात एकदा विचार आला. आपले गुरुदेव निवृत्तिपरायण असले तरी आश्रमाच्या प्रवृत्ति दिवसेंदिवस वाढतच आहेत. महर्षींच्या नावाची कीर्ती दूरवर पसरत आहे व त्यामुळे साधक सगळीकडून येत आहेत. तरी गुरुदेवांच्या नावाची प्रतिष्ठा वाढेल असा एखादा उत्सव आपण करावा. राजपद सोडून त्यांनी जीवनाची परम सिद्धी ज्या दिवशी मिळवली तो दिवस सर्व आश्रमवासियांच्या दृष्टीने परम मंगल आहे. त्या दिवशी उत्सव करावा अशी सूचना घेऊन ते महर्षींच्याकडे संमती मागण्यास गेले. तेव्हा महर्षींनी त्यांना पहिला प्रश्न विचारला.

'कौशिक ऋषिनो, आपण सर्व राज्य सोडून वनात येऊन राहिलो. अडचणी-तून मार्ग काढून आपण आपले जीवन निर्मळ, शुद्ध करावयाचे आहे. हो ना? उत्सव करायचा म्हटला की त्यासाठी अनेक साधन मिळवावी लागतील. त्यासाठी येणाऱ्या प्रवासी, अतिथींची सोय करावी लागेल. त्यांना उपहार द्यावा लागेल. आश्रमात त्यासाठी कोणतीच संपत्ती वा समृद्धी नाही. ती तुम्ही कोठून आणाल?'

'भगवन्! तुमच्या पुण्य प्रभावाने आम्हांला काही कमी पडणार नाही. आपले नाव आले की संपत्ती सहज मिळेल. आपण संमती मात्र द्या. बाकी सर्व आम्ही संभाळून घेऊ.'

'बंधूंनो! माझे पहिले नाव होते कौशिक. गाधि राजाचा मी पुत्र होतो. राज्य आणि नाव दोन्ही सोडून दिल्यावर 'विश्वामित्र' हे नाव मला देवाच्या प्रसादाप्रमाणे लाभले आहे. देवांचा देव जो वैश्वानर अग्नी जो कोणी सत्यमार्ग आचरतो त्याला सदैव साह्य करतो. जीवनाच्या त्या प्रेरक देवाला आवाहन करुन स्तुती करून, प्रसन्न करून आपणास प्राप्त करुन घ्यावयाचा आहे.

वैश्वानर हा माझा प्रेरक देव आहे तो प्रदीप्त होऊन समाजाला प्रेरणा देतो. मातरिश्वा रुपाने तो अंतरिक्षातील मेघांना प्रेरणा देतो. बृहस्पतीरुपाने स्वर्गातील देवाना तो प्रकाश देतो. आपण केलेली स्तुती तो ऐकत असतो म्हणून

त्याला 'श्रोता' असेही म्हणतात. प्रेरणा दणारा म्हणून 'विप्र' म्हणतात आणि विलंब केल्यावाचून तो येतो म्हणून त्याला अभ्यागत असेही नाव आहे. अशा त्या वैश्वानराचा महिमा आपण गावयास हवा.'

'भगवन्! वैश्वानर, मातरिश्वा-आमचे सारे काही तुम्हीच आहा. विश्वाचे कल्याण करण्याची प्रेरणा आम्हाला तुमच्याकडूनच लाभली. म्हणूनच तुमचे 'विश्वामित्र' हे नाव आम्हाला शिरसामान्य आहे. त्या नावाच्या प्रतिष्ठेचाच मंगल दिन आम्हाला साजरा करायचा आहे.'

'हे कौशिक ऋषींनो, तुमच्या लोककल्याणाच्या भावनेचा मी स्वीकार करतो. सर्वांठायी एकच आत्मा आहे. या दृष्टीने पाहिले असता त्रैलोक्यात प्रकाशणारा अग्नी हे माझेच रुप आहे. आत्मदर्शनाची जागृत दृष्टी लाभल्यावर कोठलाच भेदभाव उरत नाही.

'एकदा प्रजाजनांनी मला राज्यपद दिले होते. आज तुम्ही मला गुरुपद देत आहा. आणि साधनेच्या मार्गाने आपल्या आश्रमाचा विकास होतो आहे. पण तुम्हाला एका गोष्टीचे स्मरण करून देणे आवश्यक आहे. वैश्वानर रुपात वसणाऱ्या अग्नीचे दर्शन मला लाभले ते राज्याचे उपाध्याय भृगू ऋषी यांच्या अनुग्रहाने. तेही येथेच रहात आहेत. तरी या यागाच्या प्रसंगी त्यांना मुख्य करून त्यांच्या प्रेरणेप्रमाणे आपण यज्ञयाग करू.'

गुरुदेवांच्या आज्ञेप्रमाणे मंगल दिन साजरा झाला. त्या उत्सवाबरोबरच इतरही अनेक यज्ञयाग त्या ऋषींनी केले. आचार्यपदी भृगु ऋषी-गुरूंचेही गुरू-विराजमान झाले होते.

आश्रमात झालेल्या या मंगल उत्सवाची कीर्ती देशोदेशी जाऊन पोचली. ज्ञान आणि विज्ञानाची सिद्धी प्राप्त करून घेण्यासाठी अनेक साधक आश्रमात येऊन राहिले होते. त्यांना कोठल्याही प्रकारे काही कमी पडू नये म्हणून कौशिक ऋषी उत्तम व्यवस्था ठेवीत होते.

ऋषी विश्वामित्र उदारचरित होते. त्यांच्या आश्रमात जसे साधक येत त्याचप्रमाणे सामान्य माणसेही येत. लहान, मोठा, सिद्ध वा साधक सर्वांचेच तेथे अगत्यपूर्वक अतिथ्य केले जाई. सर्व आश्रमवासी सारखेच होते. त्यांच्यात कोठलाही भेदभाव नसे.

° ° °

ऋषींच्या त्या आश्रमात एक दिवस एक मोठे अतिथी येऊन उतरले. मद्र देशाच्या पिजवन राजाचा युवराज सुदास आपल्या पित्याच्या संकलिपत सोम

यागासाठी कुशल पुरोहिताच्या शोधासाठी फिरत असता विश्वामित्रांच्या आश्रमात येऊन पोचला. ऋषींचे दर्शन घेतल्यावर त्याला आनंद झाला. या महर्षींनी आपले आमंत्रण स्वीकारून पुरोहितपदाचा स्वीकार केला तर सोमयाग सर्वार्थाने सफल होईल.' अशी श्रद्धा त्याला वाटू लागली. कौशिक ऋषींच्या जवळ त्याने आपले मनोगत बोलून दाखवले.

पण ज्याने राजपद सोडून दिले त्याला पुरोहित पद घेण्याविषयी कसे सांगावयाचे ? ही शंका दूर करून घेण्यासाठी ते सर्व जण त्यांचे पुरोहित जे भृगु ऋषी त्यांच्याकडे गेले त्यांनी त्या प्रश्नाचे लगेच निराकरण केले व सांगितले.

'ज्या मुळे लोकहित साधत असेल असेच काम महर्षी स्वीकारतील. आपण त्यांनाच विचारु.'

भृगूंच्यासह कौशिक ऋषी विश्वामित्राकडे गेले. युवराज सुदासाचे मनोगत त्यांनी ऋषीना सांगितले. ते ऐकून विश्वामित्र हसून म्हणाले, 'जर प्रवृत्तीच करायची तर राज्य कशाला सोडलें असते बरे ? पुरोहितपदी गुरुदेव असणें हेच योग्य आहें. आपण आपल्या यागाच्या प्रसंगी त्यांच्यावरच ते कार्य सोपवलें होतें.'

भृगूंनी त्यावर विनयपूर्वक म्हटलें, 'ऋषिवर, आपल्या आश्रमाची व्यवस्था हे कौशिक पहातात. आश्रमाचा विस्तार वाढतो आहे. त्याकरिता निर्वाहाची धन धान्यादी साधनें जमा करायला हवो. त्यासाठी जर कोणी साह्य करणारा भेटला तर ते साह्य स्वीकारायला हवे. आपण राजपद सोडले हे खरे. पण लोककल्याणाचा मार्ग काही सोडलेला नाही. एकांतवास स्वीकारल्यावरही आपण दैवी संपत्तीचे साधन केलेच ना ? शिवाय आपण केलेली स्तुती देवांना प्रिय आहे. तरी आपण युवराज सुदासाचे आमंत्रण स्वीकारावे हे योग्य आहे.'

गुरुंच्या आग्रहास मान देऊन ऋषीनी युवराज सुदासाचे आमंत्रण स्वीकारले. कौशिक ऋषीही त्यांच्या बरोबर जाण्यास सिद्ध जाण्यास सिद्ध झाले.

युवराज सुदासाबरोबर सामानसुमानाने लादलेल्या गाड्या, रथ, हत्ती, घोडे, व असंख्य सैनिकही होते. वाटेत द्रोन नद्यांचा संगम झालेला होता त्या जागी ते सर्व जाऊन पोचले. सर्व साधन सामुग्री घेऊन त्या नद्या पार करणे जवळ जवळ अशक्यच होते. लहान सहान होड्या त्या प्रवाहाच्या वेगात टिकण्यासारख्या नव्हत्या. व मोठ्या नावा मिळण्यासारख्या नव्हत्या.

युवराज सुदास निरुपाय आणि निराश होऊन किनाऱ्यावर बसून राहिला. महर्षींनी त्याला आश्वासन देऊन म्हटलें.

'हे बंधो, जेथे सर्व लौकिक उपाय थकतात तेथे दैवी उपाय शोधावा लागतो. नदी ही लोकमाता आहे. आपण तिची प्रार्थना करून तिला प्रसन्न करून घेऊ या.'

आणि विश्वामित्रांनी त्या नद्यांची स्तुती करून त्यांना उद्देशून म्हटले, 'हे सरितांनो, तुमच्या मधील एकीचे नाव विपाट् असून दुसरीचे शुतुद्री आहे. विपाट् दोन्ही बाजूच्या तीरांचे विपाटन करणारी (धुवून नेणारी) असून शुतुद्री आपल्या खळखळात उंच चढणाऱ्या तुद्र (तरंग–लाटा) समूहासह वहाणारी आहे. आम्हा मानवांच्या उन्नतीसाठी तुम्ही आमच्या माता झटत असता.

'तुम्ही दोघीही गिरिकंदरांत जन्म घेऊन. जन्मताच सागराला भेटण्याची तीव्र इच्छा झाल्यामुळे वेगाने त्याच्या दिशेने धावत आहात. रणसंग्रामासाठी धावणाऱ्या अश्विनीसारखा तुमचा वेग आहे. रणमदाने फुरफुरणाऱ्या अश्वांसारखा तुमच्या प्रवाहाचा ध्वनी आहे.

'चरण्यासाठी गेलेंण्या शुभ्र गाई संध्याकाळ होताच गोशाळेकडे धाव घेतात व आपल्या भुकेल्या वासरांना प्रेमाने चाटू लागतात त्या प्रमाणेच तुम्ही आपल्या तीरावरील वृक्ष वनस्पतींना, वन–उपवनांना व प्रजाजनांना जलपान करवीत आहा.

हें लोकमातानो, तुम्ही प्रकृतीच्या नियमांच्या आधीन आहात हे मी जाणून आहे. देवराज इंद्राची आज्ञा प्रमाण मानून तुम्ही सागराच्या दिशेने धावत आहात. मी ऋषी विश्वामित्र, तुमच्या तीरावर आलो आहे. तुम्ही दोघीही सारख्याच वेगाने समुद्र संगमासाठी जात आहात. पण हे मातानो, गाय आपल्या वत्साला प्रेमाने चाटण्यासाठी उभी रहाते त्याप्रमाणे क्षणभर थांबून तीरावरील आपल्या प्रजेला प्रेमाने जवळ करा.'

ऋषींनी केलेली स्तुती ऐकून त्या दोन्ही नद्या जणू चैतन्यमय देवताच असाव्यात तशा थांबून प्रसन्नरूपाने महर्षींबरोबर बोलू लागल्या, त्या म्हणाल्या,

'हे ऋषिवर! देवराज इंद्राच्या आज्ञेनुसार आम्ही संचार करीत आहो व सागरापर्यंत जाऊन पोचण्याचा आम्हाला आदेश आहे. तीरावरील भूमीला पाणी पाजून तृप्त करणे हे आमचे काम आहे. निसर्गाने आमच्यावर सोपवलेल्या कामाची अवगणना करून प्रवाह थांबवणे आम्हाला शक्य नाही. हे बुद्धिशाली ऋषिवर, आम्हाला आपण का बरे थांबवून धरले आहे?'

'हे विश्वामित्र, देवराज इंद्राने वज्राच्या साह्याने प्रथम वृत्राचा नाश केला व नंतर नद्यांच्या प्रवाहासाठी पाट काढून त्यांना त्यांचा मार्ग आखून दिला. याप्रमाणे देवेन्द्राने आम्हाला सागरापर्यंत नेऊन पोचवले. आम्ही सर्व

नद्या देवश्रेष्ठाच्या आज्ञेत आहो. तरी हे ऋषिवर आम्ही नियम मोडून थांबणे योग्य आहे काय ?'

सरितांनी केलेली इंद्राची स्तुती ऋषिवरांनी पुढे चालवून म्हटले, खरोखरीच सर्व प्रवाहांचा नियंता. अहिसारख्या शत्रूचा नाश करणाऱ्या देवेंद्राचा पराक्रम अतुल्य आहे. त्याच्या अद्‌भुत सामर्थ्याची आम्ही मानव मनःपूर्वक स्तुती करतो. समाजाच्या विकासाच्या आड येणाऱ्या विघ्नांचा आणि अवरोधांचा नाश तो देवश्रेष्ठ आपल्या वज्राने करतो. त्या परमश्रेष्ठाच्या इच्छेनुसारच तुम्ही नद्या वहात आहा हे मला माहीत आहे. '

ऋषींचे हे बोलणे ऐकून त्या नद्या म्हणाल्या,

' हे विश्वामित्र, आपणच आम्हाला थांबायला सांगितले ना ? आता आपली प्रार्थना विसरू नका. तुम्ही यज्ञप्रसंगी देवांची स्तुती करून त्यांना आवाहन करून त्यांच्याशी संवाद कराल त्यावेळी आपल्या या संवादाचे स्मरण असू द्या. नाहीतर या नद्या एखाद्या प्रमत्त पुरुषासारख्या आमचे न ऐकता चालत्या झाल्या ' असे म्हणू नका. तुमच्या शब्दासाठी आम्ही थांबलो आहोत.'

पुरुष प्रमत्त असतो पण स्त्री-हृदय स्वभावतःच कोमल असते हे जाणवल्याने ऋषी म्हणाले,

' हे सरितानो, तुमचा आणि आमचाही पालनकर्ता पिता देवेन्द्र आहे. त्यामुळे तुम्ही आमच्या भगिनीच आहात. हे प्रवासी फार दूरवरून आलेले असून त्यांच्याबरोबर हे अनेक रथ, गाडया वगैरे आहेत. यज्ञासाठी आम्हा सर्वांना पैलतीरावर जावयाचे आहे तरी थोडा वेळ प्रवाह थोडा खालून वर संथ वाहू द्या म्हणजे आम्हाला पलिकडे जाता येईल.'

अतिशय वेगाने खळखळ वहाणारी शुतुद्रु व किनारा तोडून इतस्ततः वहाणारी विपाट् नदी संथपणे वाहू लागली आणि ऋषी विश्वामित्र व युवराज सुदास यज्ञाची सामुग्री घेऊन त्या नद्या ओलांडून सुखरुप पैलतीरावर गेले. ऋषींनी त्या सरितांना धन्यवाद देऊन म्हटले,

' प्रेमळ भगिनींनो, आमच्या विनंतीला मान देऊन तुम्ही आम्हाला जी अनुकूलता करून दिली त्यामुळे माझ्याबरोबर आलेले भरतजन आपल्या साधनसामुग्रीसह तरून गेलें. जेव्हा जेव्हा भारतवासी देवराजाच्या प्रेरणेने तुमच्या तीरावर येतील तेव्हा त्यांनाही तुम्ही अशाच अनुकूल होत रहा.

' हे नद्यांनो माझ्याबरोबर आलेलें हे भरतजन आपल्या मार्गाने पुढे जात आहेत. माझ्या मतीप्रमाणे मी तुमची स्तुती केली. आता तुम्ही सुखाने वहात रहा.

व तीरावरच्या प्रदेशात जलसिंचन करून त्याला अन्नधान्याने समृद्ध करा. तुमच्या मार्गाने वहात तुम्ही सागराला जाऊन मिळा.'

° ° °

ऋषि विश्वामित्र व युवराज सुदास यज्ञयागाच्या साधनासह येऊन पोचलेले पाहून राजा पिजवन व त्याचे प्रजानन आनंदित झाले. सर्व प्रजा सुखी व समृद्ध व्हावी, राष्ट्रात सर्वत्र शुभ वृष्टी व्हावी अशा उत्तम संकल्पाने महायागाला आरंभ करण्यात आला. यज्ञाचा यजमान म्हणून युवराजाची स्थापना केली. पर्वा पर्वा-प्रमाणे मेघमालांचे हार रचणारे पर्वत व त्यांच्यावर नियंत्रण ठेवणारा देवराज इंद्र या उभयतांची स्तुती करून त्यांना आवाहन करण्यात आले. ऋषी विश्वामित्रांनी त्यांची स्तुती केली. 'हे देवराज इंद्र व हे पर्वत तुम्ही उभयता आपआपल्या विशाल रथांवर आरूढ होऊन या यज्ञ स्थळी येण्याचे करा. वीरत्व धारण करणाऱ्या बलिष्ठ पुत्र व पौत्रांना व साधन संपत्तीलाही आपल्यासह घेऊन यावे. आमची स्तुती व भेटपूजा स्वीकारून आम्हा सर्वांना आनंद द्यावा.

'हे इंद्र देव आमच्या यज्ञासाठी येऊन तुम्ही घटकाभर विश्रांती घ्या. आम्हाला माहीत आहे की आपण गृहस्थाश्रमी असून स्वर्गात आपल्या गृहिणी-बरोबर आपण रहाता. त्यामुळे जास्त रहाण्याविषयी आम्ही आपल्याला आग्रह करीत नाही. हा सोमरस आपल्यासाठी काढून ठेवलेला आहे. ऋत्विज गोड शद्वात तुमची स्तुती करीत आहेत. आमच्या दारी आपल्या रथाचे घोडे आपण सोडावेत त्यांच्यासाठी ठेवलेली दाणावैरण त्यांना खाऊ द्यावी.

हे अध्वर्यु, आमच्या या सूचनेचा आपण स्वीकार करावा व यजमानास आसनावर बसण्यास अनुज्ञा द्यावी. या महायागासाठी भोज कुलातील क्षत्रीय राजें, अंगिरा कुलातील मेधातिथी वगैरे ऋषी व भरत कुलातील लोक आलेले आहेत. त्या सर्वांच्या प्रोत्साहनाने प्रेरित होऊन मी विश्वामित्र हा याग करीत आहे.'

अध्वर्यूने आज्ञा देताच ऋत्विज स्तुतिवचने गाऊ लागले ऋषी विश्वामित्रांच्या उदारतेमुळे त्यांच्याबद्दल सर्वांच्या मनात आदराची भावना होती. त्यामुळे स्तुतीच्या मंगलाचरणातच ते म्हणाले, 'या महायागाचे पुरोहित ऋषी मिश्वामित्र हे कठीण तपश्चर्या करून महर्षी झालेले आहेत. युवराज सुदासाबरोबर येताना विपुल यज्ञसामुग्रीसह विपाट आणि शुतुद्री या नद्या पार करण्याचे अवघड काम ऋषींनी त्या नद्याना प्रसन्न करून त्यांचा वेग थोपवून धरून पार पाडले आहे.'

नंतर ऋत्विजांनी इंद्राचा महिमा गाणारी स्तोत्र म्हटली. ती ऐकून देवांचा राजा इंद्र प्रसन्न होऊन यज्ञाच्या जागी आला व म्हणाला, ' हे ऋत्विजानो हंसांचा समुदाय ज्याप्रमाणे मधुर कंठाने गात असतो त्याचप्रमाणे सोमरस भरीत असता उद्गाते स्तुतिगान करीत आहेत. होता श्लोकाचे पाठ करीत आहे. सुदास राजाच्या सोमयागाचा अश्व दिग्विजय करण्यासाठी मोकळा सोडण्यात आलेला आहे. यज्ञ कर्मात विघ्न आणणाऱ्या वृत्र वगैरेंचा मी निःपात केलेला आहे तेव्हा भारताच्या या उत्तम भूमीवर यज्ञ निर्विघ्नपणे पार पडेल.

यज्ञाच्या पवित्र कामासाठी ज्यांनी साह्य केले नव्हते त्यांच्याही धन साधनाची शुद्धी व्हावी म्हणून मनात विशेष प्रयोग योजून ऋषींनी देवराजाची स्तुती करून म्हटले, ' हे देव श्रेष्ठा, जी माणसे लोभी आहेत त्यांचे धन व साधन लोकहितासाठी उपयोगास येत नाही. नास्तिक माणसे खा प्या व आनंद करा. या वृत्तीने मदोन्मत्त होऊन रहातात. त्यांच्या गाईचे दूध, तूप यज्ञासाठी देत नाहीत. अशा कृपणांचे धन तुम्ही हरण करा. कुपात्रांच्या जवळ असलेली साधन सामुग्री सुपात्रांच्या हाती सोपवा. म्हणजे तिचा विनियोग लोकांच्या कल्याणासाठी होईल.'

ऋषींच्या या प्रयोगाने नास्तिक व कृपणांची मतीही शुद्ध झाली व त्यांनी आपले धन–साधन प्रेमपूर्वक यज्ञास अर्पण केले.

महायागाच्या पूर्णाहुतीच्या प्रसंगी युवराज सुदासास अवभृथ स्नानासाठी जलाशयावर नेण्यात आले. त्या प्रसंगी ज्या रथामध्ये त्याला बसवले त्या रथाच्या प्रत्येक भागात चैतन्य निर्माण व्हावे म्हणून ऋत्विजांनी प्रार्थना केली.

' रथाला जोडलेल्या अश्वांनो तुम्ही स्थिर गतीने आमच्या यजमानाला घेऊन जा. चाकांना नियंत्रित करणारी धरी दृढ राहो. हे ईषा–दंड–तू अभंग रहा व अश्वांना पीडा देऊ नको. धरी अथवा दंडातील सर्व खिळे नीट ठेवून देवांचा राजा इंद्र या रथाचे रक्षण करो. सतत गतिमान असणारी चक्रे सुरक्षित ठेवण्या साठी हे रथा तू सचेत रहा.'

ऋत्विजांच्या या स्तुतिवचनांच्या घोषात तो रथ चालू लागला. जलाशयावर जाऊन युवराज सुदासाने रथातून उतरून यज्ञाची उरलेली सर्व सामुग्री व संपत्ती प्रजाजनांना वाटून टाकली व स्वतः अकिंचन झाला.

या प्रमाणे राजाचा यज्ञ सफल करून दक्षिणारुपाने मिळालेली साधन संपत्ती घेऊन कौशिकजन व ऋषी विश्वामित्र आपल्या आश्रमात परतले. विपुल साधने मिळाल्याने आश्रमाचा विकास व प्रगती सरळपणे होऊ लागली. ★ ★

# ८ / समाज–जीवनाचा मानदंड

(ऋग्वेद तृतीय मंडल)

'हे भरतजन हो, आपले सहकारी आदित्यजन हा देश सोडून स्वर्गात गेल्याचे आपल्याला कळले काय?'

'खरे की काय? आदित्यजन पुण्यशाली होते. किती व्रते, केवढे तपाचरण केले होते त्यांनी!'

'व्रत आणि तप केल्याने स्वर्ग थोडाच मिळतो? या अरण्यात असे पुण्यशाली ऋषिमुनी काही थोडे का आहेत? आदित्यांना कोणत्या उपायाने स्वर्ग लाभला ते माहीत आहे?'

'छे छे ते सर्व स्वर्गाच्या मार्गाने गेले. आम्हीही त्यांच्या मागून जाण्याचा प्रयत्न केला. परंतु मार्गावर त्यांची कोठलीच खूण दिसेना. त्याना अनुसरणाऱ्या इतरांनी स्वर्गात पोचू नये या हेतूने मार्गावरील सर्व चिन्हे त्यांनी नाहीशी केली असे आम्ही ऐकले.'

'तर मग आता काय करावे? स्वर्ग प्राप्तीसाठी उपाय तर शोधलाच पाहिजे. एरवी येथे पडून राहिल्याने आपला उद्धार थोडाच होणार आहे? तहान भूक येथे रोज सतावते. चिंता आणि संताप तन मनाची स्फूर्ती नाहीशी करतात. जीवनात स्वारस्यच उरत नाही.'

'अगदी खरे! आणि आपल्याला उपाय सापडत नसेल तर मार्गदर्शन करण्यास समर्थ अशा गुरूंचा शोध आपण करायला हवा.'

'हे तुम्ही ठीक सुचवले. जवळच्याच अरण्यात एक ऋषी आले आहेत. तसे ते एकटेच आहेत. बहुतेक वेळ मौन पाळतात. कोणी भेटण्यासाठी किंवा मार्गदर्शना-साठी गेले तरी थोडक्यातच काय ते सांगतात. माझा एक मित्र त्यांच्या दर्शनासाठी

जाऊन आला. परिचयांती त्याला कळले की महर्षींचे मूळ नाव कौशिक गाधिज. पूर्वाश्रमी ते उत्तरापंथाचे चक्रवर्ती राजे होते. पण विश्वाची मैत्री साधण्यासाठी सर्व संग त्याग केलेल्या त्या ऋषींना विश्वामित्र असे म्हणतात.'

'पण जप तपात मग्न राहून मौन पाळणारे हे महर्षि आपल्याला काय मार्ग दाखवणार ?'

'ते एकांत प्रिय असले तरी मानवाबद्दल त्यांच्या मनात प्रेमभाव आहे. सर्वांच्या मैत्रीची इच्छा मनात असणारे ते ऋषी आपल्याला निश्चित मार्गदर्शन करतील.'

दक्षिणापथातील एका आश्रमात काही भरतजन जमले होते. आदित्यजन त्यांच्याच शेजारी रहात. त्यांनी अनेक पुण्यकर्मे करून स्वर्ग प्राप्ती करून घेतली होती. स्वर्गांत रहाणारे देव अजर व अमर असतात. व त्या लोकी जाणारे पुण्यात्मे सर्व प्रकारे सुखी होतात. असे अलौकिक सुख मिळवण्याची इच्छा कोणाला बरे होणार नाही ?

ते सर्व भरतजन ऋषींच्याकडे गेले व विनम्र होऊन आपली स्वर्ग मिळवण्याची कामना त्यांनी व्यक्त केली. ते ऐकून ऋषींनी त्यांना उत्तर दिले.

'हे भरत जन हो, आदित्य स्वर्गांत गेले हे उत्तमच झाले म्हणायचे. पुण्यशाली आत्मे स्वाभाविकच स्वर्गात जातात. परंतु मला मात्र स्वर्ग मिळावा अशी इच्छा नाही. मला या भारतातच स्वर्ग निर्माण करण्याची इच्छा आहे. जे लोक स्वर्गात गेले ते आपल्या मार्गावरील खाणाखुणा पुसून गेले आहेत. तेव्हा आपल्याला नवा मार्ग शोधणे प्राप्तच आहे. आपण असा याग करू या की जो आपल्या अध्वाचे (मार्गाचे) रक्षण करील. या अध्वर यज्ञासाठी सर्वांचा सहकार आपल्याला लाभेल व मानव जातीचा गौरव वाढेल.'

'ऋषिवर, आपल्या भूमीवरच जर स्वर्ग निर्माण झाला तर त्याहून अधिक उत्तम ते काय असणार ? आपल्या आज्ञेप्रमाणे आम्ही सर्वच सहकार्य करू. आपण देशोदेशीच्या प्रतिनिधींना आमंत्रण पाठवू, या अध्वर यज्ञाच्या रचनेसाठी आम्ही काय काय करावे ते सांगा. या यज्ञासाठी उदार व समृद्ध यजमानही हवा. त्यासाठी आपण कोणाचे नाव सुचवता ?'

'आपल्या या यागात एक यजमान नसेल पण येणारे सर्वच प्रतिनिधी मिळून हा यज्ञ करतील. जे ऋत्विज होत्याचे काम करतील तेच गृहपती असतील व ते सर्व यजमानही असतील.

या महायज्ञात एका मानदंडाची-यूपाची रचना करावयाची आहे. तो मानदंड हा आपला राष्ट्रध्वज समजला जाईल. चार दिशांचे चार कोपरे हे त्याचे

आश्रय स्थान असेल. आपण तो यूप उचलून रोवायचा व त्यावर ध्वजा चढवायची. आपल्या सहकार्याचे प्रतिक असा तो यूप हा अध्वराचा मानदंड असतो. समाजाचे जीवन जितके उन्नत होईल तितका लवकर स्वर्ग निर्माण होईल. राष्ट्रध्वज हे उन्नत जीवनाचे प्रतीक आहे.

यज्ञाचे यजमान, गृहपती अथवा समाजाचे नेते म्हणा, सर्व मिळून या यूपाचे पूजन करतील. आपण सर्व त्याला वंदन करू. राष्ट्राच्या शक्तीचे गौरव चिन्ह, समाजाच्या समृद्धीचे प्रतीक असा हा यूप असेल.

हा वनस्पति यूप आमचा अध्वर हा जीवनयज्ञ आहे. उत्तम प्रकारे जीवन जगून आम्हाला देव व्हावयाचे आहे. परोपकार हे आमच्या जीवनाचे साधन आहे. आम्ही सर्व मिळून उत्तम प्रकारे जगू हाच आमचा साधन-मधु, हेच आमचे आज्य (तेज) आहे. परोपकाराचा लेप आम्ही या यूपावर चढवीत आहो. आपण आमच्या जीवनात कोमलता निर्माण करा. यावेळी आपण या भूमीच्या अंकावर विश्रांती घेत आहात. अध्वर-यागाला सुरुवात होताच आपली ध्वजा उंच आकाशात डोलू लागेल.

हे यूप-तुम्ही धरणीवर असा वा उंच स्वर्गाला टेकण्याइतके उन्नत असा आमच्या जीवनाचे मानदंड होऊन आम्हाला प्रतिष्ठा प्राप्त करून द्या. आमच्या अध्वर प्रसंगी अग्रणी नेत्याला प्रथम समिद्ध करावयाचे आहे. हवन कुंडातील अग्नीही त्याचे प्रतीक आहे. अग्नीच्या समोरच्या पूर्वेच्या बाजूस यूपाची स्थापना करू.

हे यूप, आमच्या जीवनाला प्रदीप्त करतील. आमच्या ठिकाणी शौर्याची वृद्धी होईल अशी साधने आम्हाला द्यावी. आमचे पुत्र, पौत्र पशुधन व इतर साधनसंपत्ती आपल्या बरोबरच समृद्ध करावी. प्राणिमात्राला तहानभूक असह्य झाली की ते पापाचरण करण्यास तयार होतात. लोभ आणि लालसेमुळे त्यांची मती भ्रष्ट होते. तरी तहान भुकेची पीडा आम्हाला ग्रासणार नाही व आमचे जीवन सफल होईल असा आशीर्वाद, आम्ही तुमचे पूजन करून तुमच्याजवळ मागतो. मानवी जीवन विशेष समृद्ध व्हावे म्हणून आम्ही हा यूप उभारीत आहो. हे यूप, तुम्ही सदैव वाढत रहा व आमचे भाग्यही वाढते करीत रहा.'

ऋषि विश्वामित्रांच्या आदेशाप्रमाणे भरतजनांनी महायागाला आरंभ करून यूपाची यथासांग रचना केली. आता ऋत्विजांची योजना करावयाची. त्यासाठी सर्वांना एकत्र कसे आणावे ? भरतांनी मुनिवरांना विचारले, 'येथील आश्रमात देशोदेशीचे ऋषी तपस्वी आहेत. तेच सर्व ऋत्विज होतील.'

'असे आहे तर मला त्या ऋषींचा परिचय करून द्या.' विश्वामित्र प्रेमपूर्वक म्हणाले.

'मुनिवर, हे देवश्रवा आणि हे देववात. हे याच प्रदेशातले भरजन असून अग्निनारायणाचे उपासक आहेत. हे ऋषिवर प्रजापति. प्रत्यक्ष वाणी ही त्यांची जन्मदात्री असल्याने त्यांना वाच्य प्रजापती म्हणून सर्व ओळखतात, विश्वेदेवाची उपासना करून त्यांनी सर्व देवांना प्रसन्न करून घेतले आहे.'

विश्वामित्रांना प्रजापति हे नांव परिचित वाटल्याने त्यांनी त्यांच्याकडे पुन पुन: पाहिले. तेव्हा ते ऋषी त्यांना प्रणाम करून म्हणाले, 'भगवन आपण जेव्हा उत्तराखंडात उपासना करीत होता तेव्हा आपली सेवा करण्याचे सद्भाग्य मला लाभले होते. आपण मला विश्वाविषयी उदार भाव ठेवण्याची शिकवण दिली. त्यामुळे माझी दृष्टी विशाल झाली. मी आपल्याला गुरुपदी मानतो व स्वतःला वैश्वामित्र प्रजापति म्हणवतो. माझ्या मातेमुळे मला वाच्य प्रजापति असेही म्हणतात. उत्तराखंड सोडून मी दक्षिणापंथात येऊन राहिलो आहे.'

'बंधो, प्रजापति, तुला येथे पाहून मला आनंद होत आहे. सर्वांचे हित साधण्याचे कौशल्य तुझ्या ठायी आहे.'

'आणि ऋषिवर या वृद्ध तपोधन महर्षींचाही परिचयही आपल्याला असेलच. याचे नाव 'गाधी कौशिक' यांनी अनेक यात्रा केल्या असून वर्षानुवर्षे तप व व्रताचरण केले आहे. आता त्यांनी याच आश्रमात निवास केलेला आहे.'

'गाधी कौशिक' हे नाव ऐकताच ऋषिवर विस्मयाने म्हणाले, 'हे तर गाधिराज! माझे पितृदेव! महाराज आपण इकडे कसे?'

'वत्सा!' तो वृद्ध तपस्वी म्हणाला, 'हा सारा तुझाच प्रताप. राजपद सोडून तू ऋषिपद मिळवलेस. तुझ्याच विशेष तपश्चर्येमुळे मलाही ऋषिपद मिळाले. नारानण अग्निच्या मूलतत्वाचे मला दर्शन घडले आहे.

'तात! ऋषिरूपात तुमचे दर्शन घेऊन मी धन्य झालो. भरतजनांनी समाजाच्या कल्याणासाठी या महायागाचा संकल्प केला आहे तो आपल्या शुभभावनेने सफल झाल्याखेरीज रहाणार नाही.'

'मुनिवर, हे दोन तपस्वी काश्मीर देशाहून आलेले आहेत. हे दोघेही एकाच कुलातील आहेत. परंतु त्यांची विद्यापरंपरा भिन्न आहे.'

'या कत ऋषींना मी ओळखतो!'

'भगवन् मी तर आपलाच आहे. आपण राजपद सोडून पूर्वप्रदेशात तपश्चर्या करीत होता त्यावेळी आपल्या वाणीच्या आकर्षणाने मी आपला शिष्य झालो.'

दुसऱ्या ऋषींनी स्वतःच आपला परिचय करून दिला.

'भगवन्, मीही काश्मीर सोडून पूर्वप्रदेशात येऊन राहिलो आहे. आपल्या समागमाचे भाग्य मला अद्याप लाभले नाही. परंतु मी आपल्या गुणांचा चहाता आहे, पूजक आहे माझे नाव कात्य उत्कील. वरुण देवाचे उपासनाव्रत मी माझ्या बंधूकडून, कत ऋषींच्याकडून घेतले आहे.'

'आणि हे ऋषभ ऋषी हेही आपल्याला गुरू मानतात.'

'अरे! माझ्या ऋषि जीवनाच्या प्रारंभकाळी, राजपद सोडून ऋषि होण्याचा मी प्रयत्न करीत होतो त्या वेळी यांची प्रथम भेट झाली. आणि ते माझ्या जवळ राहिले म्हणण्यापेक्षा मी त्यांच्याजवळ राहिलो असे म्हणणेच अधिक उचित होईल! खरे ना?'

'गुरुदेव, हा आपला विनय आहे! जीवनाचे विशाल दर्शन घेण्यासाठी लागणारी उदार दृष्टी मला आपल्या कृपेने लाभली. त्या दिव्य दृष्टीच्या योगानेच मी अग्निनारायणाचे दर्शन घेतले आहे.'

'अहो! सात ऋत्विज तर आपल्याला येथेच मिळाले आहेत. ते विविध देशांचे प्रतिनिधी असून या यज्ञाचे ते गृहपती यजमान असतील. त्यांना या यागाचे योगाने जी रिद्धी-सिद्धी प्राप्त होईल ती सर्व राष्ट्राची असेल.'

अध्वराच्या सर्व लहान मोठ्या कामांचे संकलन करण्यासाठी अग्रणी नेत्याची निवड करावयाची होती. यजमान ऋत्विजांच्या यज्ञ कर्मात कोणतेही विघ्न आड येऊ नये व त्यांना निश्चितपणे अनुष्ठान करता यावे यासाठी योग्य अशा अग्रेसर नेत्याचे वर्णन करताना विश्वामित्र म्हणाले, 'पुरोहित अग्नी ज्या प्रमाणे देवकार्य समिद्ध करतो त्याप्रमाणे आपला नेता प्रजाजनांना समिद्ध करणारा हवा. त्याचप्रमाणे तो तेजस्वी, सर्व लोकांत संचार करून सर्वांचे सहकार्य मिळवणारा व स्वतःसारख्याच उदार परोपकारी व्यक्तींना शोधून काढणारा व दुसऱ्या तेजस्वी पुरुषांच्या कार्याला उत्तेजन देणारा हवा. यज्ञासारख्या परमार्थाच्या कामी तो प्रणेता असावा, अध्वरासारख्या यागात तो अग्रेसर असावा. सर्व प्रकारच्या लोकांत मिसळणारा असला तरी स्वतः श्रेष्ठ महारथी व विशेष पराक्रमी असावा. त्याची प्रतिभा तेजस्वी असावी. तो स्वतः देवासारखा परोपकारी असून दुसऱ्या देवचरित सुजनांना बोलावून आणणारा असावा. अग्नी व वायू जातवेदा होऊन सर्व कार्य पार पाडतात त्या प्रमाणे तो कर्तृत्ववान असावा, सर्व प्रकारच्या लोकांचे मन जाणून त्यांचे मनोरथ पूर्ण करणारा असावा.

या सर्व गुणांनी पूर्ण अशा मगध देशाच्या राजा पुरुवसूची निवड अग्रणी

नेता म्हणून केली. त्याने आपली सर्व संपत्ती अध्वरासाठी देऊन टाकली. व स्वतः यज्ञ सेवक होऊन काम करावयास सुरुवात केली.

प्रथम ज्या यूपावर संस्कार करून तो सिद्ध करण्यात आला होता त्याला उचलून यज्ञाच्या मध्यभागी स्थापन करावयाचा होता.

राजा पुरुवसूने सर्वांची संमती घेऊन त्या यूपास टेका दिला. ऋषी विश्वामित्र व सात ऋत्विजांनी त्या यूपाची स्तुती केली.

'हे प्रतिष्ठित यूप, ज्या धरणीवर आपली रचना झाली त्या धरणीपासून उंच, उन्नत फडकत रहा. समाजजीवनाला उन्नत करण्यासाठी आम्ही या महायागाचा आरंभ केलेला आहे. त्याचा संदेश तुम्ही दूर दूरपर्यंत पोचवा. आम्हाला उदार बुद्धी देऊन आमच्यात परोपकाराची वृत्ती जागृत होईल अशी कृपा करा. जीवनाला विकसित व उन्नत करणारी साधन संपत्ती आम्हाला द्या.

हे यूप, आठही दिशांनी आम्ही आपल्याला सजविले आहे व रंगबेरंगी वस्त्रानी भूषविले आहे. एका साधारण वृक्षापासून आपला जन्म झाला. पण जन्मतःच लोककल्याणाच्या संकल्पाने आपण उंचच उंच होत गेला आहात.

आपण आमच्या जीवन यज्ञाचे प्रेरक व्हावे या भावनेने येथे जमलेले धीर, वीर, कविजन, ऋत्विज व प्रजाजन सर्वजण मिळून तुम्हाला उंच चढवीत आहेत.

हे ऋत्विजानो या यूपाचा जन्म धरणीच्या पोटी झाला. पण नित्य वाढत जाणारा हा दंड आकाशाला जाऊन भिडला पाहिजे. त्यासाठी आपण सावधान राहून सतत कार्य करावयास हवे.

आपल्या या महायज्ञात सहकार्य करण्यासाठी वेगवेगळ्या समाजाचे प्रतिनिधी येथे आलेले आहेत. आपले पशुधन व साधनसंपत्ती वाढवण्यास उपयुक्त अशी प्रदर्शने येथे भरवलेली आहेत. या महायागाचा अग्रणी नेता यूपास उंच चढवीत आहे.

यूपाचा महिमा वर्णन करताना अग्रेसर राजा पुरुवसु म्हणाला, 'हे यूप ! आपण आमच्या राष्ट्राचे प्रतीक आहात. आपली प्रतिष्ठा वाढेल अशी कार्ये करण्याच्या इच्छेने सर्व समाजाचे प्रतिनिधी या ठिकाणी जमलेले आहेत. त्यांची अशी भावना आहे की स्वर्ग या भूमीवरच निर्माण झाला पाहिजे. पृथ्वीवर राहून दैवी जीवन जगावे अशी त्यांची इच्छा आहे. अशा या समाजाच्या प्रत्येक पुरुषाच्या जीवनाच्या मानदंडाचे स्थान आपण आहा. त्यांच्या शुद्ध जीवनाच्या प्रखर धारेने आपली घडण झालेली आहे. या महायागाच्या प्रसंगी या यूपासह दुसरेही यूप उभारून समाजाच्या व राष्ट्राच्या विविध प्रवृत्तींची प्रेरणा प्राप्त करून घ्यावयाची आहे.

नांगरलेल्या शेतात दाणे पेरले की विपुल धान्य पिकते. त्याप्रमाणे येथे रोवलेल्या यूपांच्या योगाने दिव्य परोपकारी कार्याची प्रेरणा आम्हाला मिळत राहील.

या मुख्य यूपाच्या ठायी सर्व देवता वास करीत आहेत. बारा आदित्य, अकरा रुद्र, आठ वसू, त्रैलोक्यातील देव, बृहस्पती इंद्रादी देवदेवता यूपात समाविष्ट असून होते व उद्गाते त्यांची स्तुतिगीते रचून गात आहेत व त्यांना आवाहन करीत आहेत.

या मुख्य यूपासह इतर अनेक यूप या जागी उभे केले आहेत. देशोदेशींच्या विविध साधन संपत्तीची व पशु पक्षांची प्रदर्शनेही येथे भरलेली आहेत. वेग वेगळ्या स्थानी असलेले यूप चित्र विचित्र वस्त्र, पताका व पुष्प पत्रांनी सजवलेले आहेत अंतरिक्षात हंसाची मालिका शोभावी वा स्वर्गात देवांची उडती विमाने दिसावीत त्या प्रमाणे उंच आकाशात फडकणारे हे ध्वज स्वर्गाचा मार्ग स्पष्ट करीत आहेत.

हे महायूप, शत शत यूपांच्या सह आपण उंच उंच जा. प्रजाधन व पशुधन मिळवून आम्हीही हजारो मार्गांनी उन्नती प्राप्त करून घेऊ अशी प्रेरणा आम्हांला द्यावी.

तुमची घडण तीक्ष्ण धारेच्या कुऱ्हाडीने झाली आहे त्या प्रमाणे कठीण तप व व्रताने आमचे जीवन घडत जावो, आमच्या सद्भाग्याचा उदय होवो. त्या योगाने साक्षात स्वर्ग पृथ्वीवर अवतरो. या भावनेने आम्ही तुमची प्रतिष्ठा करीत आहो.

या प्रमाणे यूपाची प्रतिष्ठा केल्यावर ऋषी विश्वामित्रांनी सात होते व इतर ऋत्विज सर्वांना देवांची स्तुति करण्यास सांगितले. ऋषभ, कात्य, कत, कौशिक, देवश्रवा, देववात व वाच्य प्रजापति या सात होत्यांनी देवांचे आवाहन करून स्तुति केली.

'हे इंद्र व अग्नि, आपण आमच्या या महायागासाठी स्वर्गातून पृथ्वीवर यावे. आम्ही उत्तम प्रकारचा सोमरस शुद्ध करून आपल्यासाठी पात्रात भरला आहे, तो आपण ग्रहण करावा. तुम्ही उभयता आमचे मित्र आहात. आमच्या जीवन यज्ञाचे सहायक आहात. तुमच्या प्रेरणेनेच या यागाचे कार्य चाललेले आहे. समाजाच्या जीवनात अडथळे आणणारे, समाजाची प्रगति अवरोधणारे कुटिल व स्वार्थी असतील त्यांचा नाश करून सज्जनांच्या कार्याला गति द्या.'

सात होते देवांची स्तुति करु लागले. त्या स्तुतिची पहिली ऋचा प्राणाला,

दुसरी नेत्रांना, तिसरी अपानाला, चौथी वाणीला, पाचवी मनाला, सहावी श्रोत्रांना व सातवी पुत्रांना व पशुंना बल प्राप्त करून देणारी आहे. या ऋचा म्हणून झाल्यावर होत्यांनी सात जागी अग्निची स्थापना केली. या ऋचांच्या उच्चाराने भूलोकी वसणारा अग्नि, अंतरिक्षातील इंद्र, व स्वर्गातील सूर्यसमाज जीवनात ज्योतिप्रमाणे प्रकट होऊन प्रेरणा देतात.

अध्वर यागाच्या निमित्ताने देशोदेशीचे तत्वज्ञानी, कवि व विचारक एकत्र जमले होते. त्यांच्या चर्चासभा, संसद व समिती आयोजित केल्या होत्या, त्यांतील एका सभेत चर्चा होत होती.

'आपल्या होत्यांपैकी देवांच्या रहस्यमय गुप्त मार्गांना शोधून काढील असा तत्वज्ञानी कवि कोण असावा ? स्वर्गातील देव अधांतरी लोंबकळणाऱ्या नक्षत्रासारखे असावेत काय ? देवांच्या परोपकारी कार्यांची माहिती कोणाला आहे ?'

'आकाश आणि पृथ्विच्या रहस्यांना जाणणारी कविजनांची दिव्य दृष्टि सूर्यासारखी स्पष्ट आहे. पूर्वी द्यावा व पृथ्वि दोन्ही लोक एकच होते. पण कालांतराने पक्षांची नीडे वेगळी होतात त्याप्रमाणे हे दोन लोक वेगळे झाले. तथापी त्यांच्या मध्ये स्नेहाचा एक तंतू त्यांना बांधणारा आहे. हे दोन्ही लोक आपल्या कर्तव्य कर्माला सदैव जागणारे आहेत. कारण ते जाणून आहेत की दोन माता मिळून संतानाचे पालन पोषण करतात. त्याप्रमाणे द्यावा व पृथ्वी या दोघी प्राणिमात्राच्या जन्मदात्र्या आहेत. द्युलोक, इंद्रादि देवांना व पृथ्वी लोक सरिता, सागर वगैरेना धारण करणारा आहे.'

'हे ज्ञानीजन हो, सविता नारायणाने पूर्वी देवांच्या हितासाठी केलेल्या दिव्य यज्ञात भाग घेतला होता. त्या प्रसंगी असुरांच्याबरोबर झालेल्या युद्धांत त्याचा एक हात गमावला होता. इंद्रादि देवांनी विश्वकर्म्या त्वष्टयाला बोलावून सोन्याचा हात करून त्या जागी बसवला होता. आपल्या महायागांतही आत्मार्पण करणारांना देव नवीन अंगे देतात. देवांचा कलागुरू त्वष्टा आपल्याला कायाकल्पाच्या योगाने नवजीवन देतो.'

'इंद्र, वरुण, अग्नि वगैरे देव अनेक आहेत. परंतु त्यांचे प्रधान प्राणतत्व (असुरत्व) सारखेच श्रेष्ठ आहे. ते सर्वच देव समाजाचे ऐक्य साधून प्रजाजीवनाची उन्नति करणारे आहेत.'

विशेषेकरून स्वर्गात रहाणारे बारा आदित्य वर्षाच्या बारा महिन्यांचे अधिष्ठाते असून प्रत्येक ऋतुमानाप्रमाणे ते लोककल्याण करीत असतात. सूर्याच्या बारा राशीतून फिरणारी नक्षत्रे प्रजाजीवनाला सुखी करणारी आहेत.'

सात होत्यांनी स्तुति गान केल्यानंतर ऋषींनी गायत्री छंदात रचलेले उत्तम मंत्र उच्चारून म्हटले, 'आम्ही सर्व मानव सविता नारायणाच्या वरेण्य (श्रेष्ठ) भर्गास आमच्या हृदयाच्या पात्रांत धारण करीत आहोत. सविता नारायण आम्हाला विविध धारणांची प्रेरणा देऊन नवचैतन्य देतो.'

विश्वामित्र ऋषींना ज्या गायत्री मंत्राचे दर्शन झाले होते त्या गायत्री मंत्रास वेदमाता समजतात व त्या मंत्राने आजवर लाखो करोडो मानवांना नवी प्रेरणा दिलेली आहे.

या प्रमाणे विश्वामित्र ऋषींनी सर्व मानवांना प्रेरणा देणाऱ्या महायागाचा आरंभ करून या पृथ्वीवर स्वर्ग निर्माण केला. इतर सर्व यागांची पूर्णाहुति होते. परंतु या महान जीवनयज्ञाला पूर्णाहुति नाही. तो अखंड चालूच आहे व त्या यागाचे प्रतीक असा राष्ट्रध्वज अनंत काल फडकत राहून सर्वांना नवी प्रेरणा देत आहे.

★★

# ९ / भविष्याचा चिंतक

( ऋग्वेद चतुर्थ मंडल )

'हे देवांनो, पितरांनो, ऋषिनो, माझ्या कल्याणासाठी मी अेक महायाग करीत आहे. आपण सर्वांनी या प्रसंगी यावे असे मी स्तुतिपूर्वक आवाहन करीत आहे.

'ऋषिवर! या सर्वांना बोलावून त्याना देण्यासाठी आपल्या जवळ काय आहे बरे? येथे हविही नाही आणि आहुती देण्यापुरते तूपही नाही, भेट पूजेचे कोठलेही साधन नाही. अशा या दरिद्री घरी बोलावून कोणी येत असते का?'

'तू म्हणतेस ते सर्व अगदी खरे आहे. पण देवी, आज माझ्याजवळ काहीच नसले म्हणून काय झाले? उद्यांचा दिवस माझ्यासाठी विपुल धनसाधन घेऊन उगवणार आहे!'

'देव, तुम्ही केवळ तुमच्या मनातल्या तरंगातच गुंग आहा. नियमित अन्न व पाणीही तुम्हाला मिळत नाही. शरीर पार वाळून गेलेले आहे. ही वस्तुस्थिती असताना तुम्ही गोष्टी मात्र जीवन विकासाच्या आणि प्रगतीच्या करता! हे दुर्भिक्ष्य आता किती दिवस चालणार आहे?'

'देवी! तुला माझ्या सुकलेल्या कायेची काळजी वाटते आहे. पण मला तुझ्याविषयी चिंता वाटते आहे. तुझी तर नुसती हाडेच राहिली आहेत. इतकी तू वाळून गेली आहेस. मला माझ्या साधनेच्या नादात या दारिद्र्याची सवय होऊन गेली आहे. पण तुला मात्र ही गरिबी खायला उठली आहे. यावर आता काही उपाय केलाच पाहिजे.'

'तुम्हाला उपाय कसचा सापडतो भगवन! तुम्ही आपल्या स्वप्नातच दंग आहात! मी बाहेर जाते तेव्हा इतर ऋषिपत्न्या मला घालून पाडून बोलू लागतात. मला विचारू लागलात, 'अग तुझा हा पति असे करतो तरी काय?

शिळे पाके शिजवल्यासारखी घाण सारखी सुटत असते. देवांना आणि पितरांना तो म्हणे तसलाच हवी अर्पण करीत असतो! त्या घाणीने साऱ्या आश्रमाची हवा दूषित होते. तुझ्या त्या पतिदेवाला जरा समजावून सांग बाई!'

'देवी! माझ्या जवळ जे आहे ते मी देवांना आणि पितरांना अर्पण करतो. त्यांत अनिष्ट असे काय आहे? ऋषिने पुण्याचे साधन केले असले, त्यांची भेट पूजा शुद्ध असली तर तिचा सुगंध पसरेल. मी माझे जीवन शुद्ध व्हावे म्हणून यज्ञ करीत आहे. माझी पापे या यज्ञात जाळून भस्म करीत आहे. लोभ, लालसा, भूक, तहान हेच सारे मी अग्नीला अर्पण करीत आहे आज माझ्या ठायी असलेल्या सर्व वासनांची आहूती देऊन त्यातून मला उद्यांचा प्रकाश निर्माण करावयाचा आहे. ऋषि व ऋषिपत्न्यांना ही उद्यांची गोष्ट कशी बरे पटेल? माझे हे म्हणणे त्यांना न पटणारे म्हणून तर त्यांना घाण येते! पण देवी, ज्यांचा भविष्यकाल सुधारला त्यांचे जीवन सफल होते. आज माझ्या जवळ साधन सामुग्रीची कमतरता आहे हीच माझी वासना नाही का? या वासनेचा हवि अर्पण करून मला शुद्ध व्हावयाचे आहे. माझा हवि देव निश्चित स्वीकारतील.'

'भगवन् माझे जीवन आपल्याच जीवनाशी निगडित झालेले आहे. आपण भविष्याची साधना करीत आहांत त्यांत मीही सहभागी आहे. पण तुमची स्तुति-वचने ऐकून देव तुमचा हवि घेण्यासाठी येथे येतील असे मला वाटत नाही. धन धान्यांनी समृद्ध अशा भेटी स्वीकारण्यासाठी जाण्याचे सोडून ते येथे कसे येतील?'

'देव धनधान्याचे नाही पण भावाचे भुकेले आहेत. त्यांना आपल्या सारखी भूक तहान थोडीच लागते? ऋषिमुनी जे अनेक यज्ञ करतात त्या ठिकणी घडीभर जाऊन देव लगेच परत जातात. पण माझा हा महायज्ञ जन्मभर चालणारा आहे. जोवर माझ्या सर्व वासना नाहीशा होत नाहीत, माझी साधने शुद्ध होत नाहीत तोवर देव कसे येतील?'

'आपली भावना खरोखरीच फार उच्च आहे. आपल्या जीवन साधनेची सहचारिणी म्हणून मी काय काय करावे ते सांगा.'

'देवी, तुझे सहकार्य मला मिळत आहे म्हणूनच माझी साधना चाललेली आहे. उलट माझ्यामुळे जगात तुझी अवहेलना होते आहे हे मलाही कळत का नाही? व्यवहारी लोक तुझा अपमान करतात तो गिळून तू सारे सहन करतेस हे कमी का आहे?'

ऋषि रहूगणाचा पुत्र गौतम आर्ष द्रष्टा होता, त्याचा पुत्र वामदेव याळाही कुलपरंपरेने आर्ष दर्शनाचा लाभ झाला होता. परंतु त्याची जीवनसृष्टीच

वेगळी होती. यज्ञयागात देवाना देण्याच्या भेटी वेगळ्या आणि स्वतःच्या जीवनात वापरण्याची साधन संपत्ती वेगळी असावी हा भेदभाव त्याना मान्य नव्हता. जीवन जगण्याची रीतच् त्याना बदलून टाकायची होती.

त्याना वाटे, यज्ञ करण्याची इच्छा असेल तर साधने गोळा करावी लागतात याचाच अर्थ यज्ञ ही जीवनाहून अेक वेगळी प्रवृत्ती आहे. मी अशा यज्ञाला मानीत नाही. माझे जीवन हाच माझा यज्ञ. जन्म झाला त्या क्षणी हा यज्ञ सुरू झाला असून अेकेका दिवसाची आहुती त्याला दिली आहे. जीवनच भेटपूजा म्हणून अर्पण केले असून मी देवांची स्तुती करून त्याना आवाहन करीत आहे.

आणि केवळ माझ्याच जन्मापासून या यज्ञाचा आरंभ झाला असे नसून सृष्टि निर्माण झाली हाही यज्ञच आहे. अग्नि, इंद्र वगैरे देव यज्ञच करीत आहेत. अगिरा वगैरे पितर यज्ञ कर्मच करीत असून सोम, सूर्य, आकाश, पृथ्वी सर्वच महायज्ञ करण्यात मग्न नाहीत काय ?

खरोखर आत्मसमर्पण करण्यासाठी आरंभलेला यज्ञ जीवन व्रत घेऊन केलेला यज्ञ, आत्म बलिदान देण्यासाठी केलेला यज्ञ हाच खरा यज्ञ. त्या यज्ञात साध्य हेच साधन होऊन जाते. त्यालाच आत्मयज्ञ म्हणतात. तोच श्रेष्ठ यज्ञ होय.'

अशा प्रकारच्या जीवन यज्ञात भाग घेण्यासाठी ऋषि अग्निला आवाहन करीत होते व अंगिरा नामक पितरांचे स्मरण करीत होते. ' हे अग्निदेव, इंद्रादि देवांच्या स्पर्धेत आपण नित्य पुढे असता त्याप्रमाणे या माझ्या जीवन यज्ञात आपण प्रथम यावे व येतांना इंद्रादि देवांना बरोबर घेऊन यावे अशी मी प्रार्थना करतो. मर्त्य मानवांच्याकडे येणारे तुम्ही देव अजर, अमर, आहात. या पृथ्वीलोकावर पूर्वी अंगिरा नामक पितर वास करीत होते. स्वतःचा जीवन-यज्ञ याप्रमाणेच करून ते अग्निशी एकरुप होऊन गेले होते. स्तुतिरुप वाचेचे मूळ स्वरुप हरवले होते ते त्यांनी शोधून काढले. कामधेनू सारख्या वाणीचे मूळ स्वरुप त्यांना उमगले होते. त्यांनी साता साताच्या संख्येत गायत्री छंद, अति जगती सारखे विशेष छंद आणि कृति सारखे दीर्घ छंद रचले. त्या दिव्य वाणीसह त्या पितरांना मी यज्ञासाठी आवाहन करतो.

हे अग्निदेव, रात्री वा दिवसा तुमची स्तुति करणाऱ्या यजमानाकडे त्याच्या यज्ञासाठी तुम्ही धाव घेता. सारथी जसा घोड्यांच्या बऱ्या वाईट संवयी जाणतो त्या प्रमाणे तुम्हीं मानवांचे पुण्य, पाप, ज्ञान, अज्ञान वगैरे बरे वाईट गुण जाणून आहा. आम्ही साधे, सरळ जीबन जगणारीं माणसे आहोत. आमच्या जीवनांतील त्रुटि दूर करून आमच्या यज्ञासाठी आपण येऊन पोहचावे.

अग्नि व अंगिरा यांना आवाहन करून मग ऋषि देवराज इंद्राला आमंत्रण देऊन म्हणाले, 'हे, देवराज इंद्र, मी, वामदेव तुमची स्तुति करीत आहे. माझ्या प्रेरक बुद्धिचे तुम्ही संरक्षण करा. माझ्या जीवन संग्रामात मला साह्य करा. तुम्हीच माझे रक्षण कराल अशा श्रद्धेने मी आपल्याकडे पहात आहे. तुमच्यासाठी सर्वत्र मधुर सोमरस भरला जातो. तुम्ही सर्व साधन संपत्तीचे स्वामी आहात. सर्व प्रजाजनांचे पालन पोषण तुम्हीच करता. तुमच्या कृपेने प्राप्त झालेल्या धनातूनच यजमान हवि व भेट पूजा अर्पण करतात. पण माझ्याजवळ कोणतेच बाह्य साधन नाही हे देवेन्द्र, अश्वरुप प्राणांना घेऊन आपण माझ्या यज्ञासाठी यावे, म्हणून मी नव नवी स्तोत्रे रचून आपली स्तुति करीत आहे. ज्ञानी, भक्त व सामान्य जन सर्वचजण एकाच प्रकारे तुमचे पूजन करतात. स्वतःच्या जीवनाचाच होम करणारा माझ्यासारखा कोणी क्वचितच असेल. तरी माझ्या या लोकविलक्षण यज्ञासाठी सोमासह आपण येऊन पोहोंचावे.

हे सोमराज– तुमचे सेवन करून इंद्राने जलप्रवाह मुक्त केले आहेत. तुमच्या सहकार्याने देवेन्द्राने असुरांचा नाश केला व सप्तसिंधूचे प्रवाह मुक्त केले.

हे वायुदेव, देवांच्यात गतिविषयी स्पर्धा झाली त्यावेळी आपला क्रम प्रथम होता. तेव्हा त्याच द्रुत गतीने माझ्या यज्ञासाठी सर्वांत आधी आपण येऊन पोहोंचावे. इन्द्राच सारथ्य तुम्हीच करता. तेव्हा इन्द्रासह आपण यावे.

हे बृहस्पति महाराज, तुमचा निवास स्वर्गात खूप दूर आहे. परंतु तुमचे गतिशील अश्व तुम्हाला येथे त्वरित घेऊन येवोत. मंत्रब्रह्माच्या अधिष्ठात्या बृहस्पतींचा जन्म महाज्योतीवरील ॐ ओंकार धामाच्या वरील व्योम प्रदेशात झालेला असून ते सात सात छंदांच्या योगाने, सात ज्योतींच्या यज्ञप्रकाशात अज्ञान दूर करतात.

हे इंद्र व बृहस्पती माझे जीवन तुमच्या योगाने समृद्ध होवो.

हा सविता नारायण स्वतः सर्व व्यापक आहे. परंतु त्याचे नांव, रुप, लोक स्थान वगैरे तीन प्रकारांनी प्रसिद्ध आहेत. सत्यलोक, इन्द्रलोक व प्रजापति लोक अशा स्वर्गातील तीन लोकांत त्याचा वास आहे. वायु विद्युत् व वरुण ही अंतरिक्षातील त्याची तीन रुपे आहेत. भूर्लोक, भूवर्लोक व स्वर्लोक ही तीन त्याची उदयस्थाने असून त्या सविता देवाची तीन व्रते आहेत. तो उष्णता देतो. तेव्हा उन्हाळा, पाऊस पाडतो तेव्हा पावसाळा व थंडी पडते तेव्हा हिवाळा अशा त्रिविध ऋतूंत मानवी हिताची कामे करणारा सविता देव माझ्या जीवन यज्ञात मला दिव्य प्रेरणा देवो अशी माझी प्रार्थना आहे.

यज्ञाला येणारे देव अनेक आहेत. पण माझी प्रार्थना ऐकून लगेच धाव घेणारा देव कोण बरे ? माझी भावना ओळखून याप्रमाणे येणारे देव आहेत. आश्विनीकुमार. हे देवांनो, आपण सदैव एकमेकाबरोबर असता तसेच उभयतां बरोबरच यज्ञाला यावे व मला प्रेरणा द्यावी. हे अश्विनीकुमारांनो, प्रकाश किरणे पसरत हा सूर्य आकाशांत वर वर चढू लागला आहे. त्याच्या प्रकाश मंडलावर चढून तुमचा रथ माझ्या अंगणात येवो. नीरस झोलेले माझे जीवन तुमच्या आगमनाने मधुर होवो.'

तपस्वी वामदेवाने याप्रमाणे गोड स्तुति करून अनेक देवांना आपल्या जीवन यज्ञासाठी बोलावले. सहन केलेल्या कष्टांचे, दु:खांचेच साधन करून त्यांनी तो यज्ञ चालवला होता.

ऋषिपत्नी देवी उशतीने आपल्या पतीला पूर्ण सहकार्य देऊन त्याचे व्रत उत्साहाने चालवले. भट्टीत ज्याप्रमाणे सोने तावून सुलाखून निघते त्याप्रमाणे ती दोघे तपाच्या आगीत स्वत:चे जीवन शुद्ध करीत होते. लहान मोठे अनेक यज्ञ सुरू करून पुरे करण्याची सामान्य प्रक्रीया वामदेवांनी सोडून दिली होती. जीवन-भर अव्याहत चालणाऱ्या जीवन यज्ञाचा त्यांनी संकल्प केला होता. त्यांच्या यज्ञांत दीर्घकाळ येण्याची देवांची तयारी न्व्हती. म्हणून ऋषींनी बाह्य देवतांच्या जागी अंतरांत वसणाऱ्या देवांना जागवावयाचे ठरवले. स्वर्गात वसणाऱ्या इंद्राचे तत्व कायेतही वसत असते. त्याचप्रमाणे अग्नि, चंद्र, सूर्य, आकाश आणि पृथ्वी सर्वच तत्वांचा अंश कायेत सामावलेला आहे. तप व व्रताचरणाने जीवन शुद्ध करण्याचा अवघड व घोराचा मार्ग स्वीकारुन ऋषि त्या कसोटीतून पार पडले होते. त्यामुळे त्यांच्या अंतरातील दैवी तत्वे जागृत झाली. त्या तत्वांनी स्वर्गातील देवांनाही आवाहन केले. तेव्हा इंद्र सुंदर श्येन पक्षाच्या रुपाने ऋषींच्या आश्रमाच्या अंगणातील एका झाडाच्या फांदीवर बसून मधुर स्वराने गाऊ लागला.

तपश्चर्येच्या प्रभावाने वामदेवांना दिव्य दृष्टि प्राप्त झाली होती त्यांनी श्येन रुपातील देवराजास तात्काळ ओळखले व त्याची स्तुति करून त्यांस आंत येण्यास विनवले.

इंद्रदेव प्रसन्न होऊन प्रगट झाले व ते त्या आश्रमात गेले. त्यांच्या मागून देव पुरोहित अग्निने प्रवेश केला व त्या दोघाना त्या जागी गेलेले पाहून स्वर्गातील इतर विश्वदेव पण त्यांच्या मागून गेले.

सुकलेल्या झाडावर सोमरसाची अमृतवृष्टी होऊन त्यांना नवी पालवी फुटावी त्याप्रमाणे ऋषींच्या कष्टमय दरिद्री जीवनात देवतांनी प्रवेश करताच

त्यांचे जीवन प्रफुल्लित झाले. सोमरसाचे पान करणारे देव जेथे वास करतात तेथे तहान, भूक, लोभ, लालसा, दुःख, दारिद्रय कसे बरे टिकू शकेल ?

ऋषींनी केलेला जीवन यज्ञ या प्रमाण अजर अमर झाला. आत्मयजनाच्या त्यांच्या भावनेनें भविष्य कालाचा विचार करणाऱ्या अनेक ऋषींना नवी प्रेरणा दिली.

★★

# १० / नवल वर्तले

ऋषि वामदेवांचे जीवन अद्‌भुत होते. त्यांचा जन्म पण विलक्षण रितीने झालेला होता. मातेच्या गर्भात असतांना त्यांना तीन जन्माचे ज्ञान प्राप्त झाले होते. त्याचप्रमाणे अग्नि, इंद्र वगैरे देवांच्या अनेक जन्मांविषयी पण माहिती त्यांना मिळाली होती. पूर्व जन्मीचे ते एक योगभ्रष्ट ऋषि होते. राहून गेलेल्या एखाद्या वासनेमुळे त्यांना परत जन्म घ्यावा लागला होता. म्हणून त्यांनी आपल्या जीवनाचा यज्ञ करून त्यांत वासनांचा हवि देण्याच व्रत घेतले होते व या प्रकारे तें जीवन्मुक्त झाले होते.

अखिल चराचरात एकच आत्मा असून तो लीलेपुरती अनेक शरीरे धारण करतो हेच अंतिम सत्य आहे. हे ज्ञान ज्याला झाले तो आत्मरूप पावतो व विश्वातील मुनी, देव, मानव व ऋषि सर्वांच्या ठायी त्याला आत्मरुपाचे दर्शन होऊ लागते.

समान ज्ञान व समान स्वभाव असला की मैत्री होते. या न्यायाने पुरुकुत्साचा पुत्र त्रसदस्यु मोठा तत्वज्ञानी होता. त्याचा व वामदेवाचा परिचय होता. पिता पुरुकुत्साला त्याच्या शत्रूंनी पराजित करून कारावासात ठेवले होतें. त्याची राणी सप्तर्षींना शरण गेली. त्या राणीच्या पोटी पराक्रमी राजकुमाराचा जन्म झाला होता. त्याला सप्तर्षिनी विद्या दिली होती. त्याने शत्रूंशी युद्ध करून आपल्या पित्याला बंधमुक्त केले. त्याचे नाव ऐकताच चोरांचा थरकाप होई म्हणून त्याला त्रसदस्यु असे म्हणत. तो स्वतः एक उत्तम राज्यकर्ता होता. राष्ट्रात ऐक्याची भावना निर्माण करून प्रजाजनांना त्याने प्रेमवश करून घेतले होते.

राजा त्रसदस्यु व ऋषि वामदेव यांचा परिचय दृढ होऊन त्यांची गाढ मैत्री झाली होती.

सर्वसामान्यपणे माणसाचा जन्म होतो त्याहून अगदी विलक्षण रितीने श्येन पक्षाच्या रुपाने मातेच्या मांडीपासून स्वतःचा जन्म झाला असल्याची रहस्यमय

गोष्ट ऋषींनी आपल्या मित्राला सांगितली. तेव्हा राजाला ते जन्मरहस्य जाणून घेण्याबद्दल कुतुहल निर्माण झाले.

ऋषींनी त्याची जिज्ञासा पूर्ण करून सांगितले, ' हे राजा, मी जेव्हां मातेच्या गर्भात होतो तेव्हा मला जन्म जन्मांतरीचे ज्ञान झाले. जन्मोजन्मी मी किती अद्‌भुत पराक्रम केले होते. पण या कायेची माया अशी प्रबळ की दुसऱ्यांचें भलें करण्या ऐवजी स्वतःचे भले करून घेण्याची वृत्ति जाईना. खरे म्हणजे कायेला चंदनासारखी झिजवायला हवी. अगरुसारखी जाळून काढायला हवी. तरच तिचा सुवास पसरेल. पण या कायेवर आपली एवढी माया ममता का ? मातेच्या उदरांत असतांना मी याचेच चिंतन करीत होतो. विचार करता करता मला कळून चुकले की मातेच्या उदरातून निर्माण झालेल्या शरीराला माया व ममता जखडून टाकतात. त्या मार्गाने संसारात प्रवेश केलेल्या जिवाला माया बांधून ठेवते. परमार्थापासून परावृत्त करते.

हे रहस्य मला उलगडताच मी निश्चय केला की या सामान्य मार्गाने मला जगात प्रवेश करायचाच नाही. मग जन्म घ्यायचा कसा या विचारात मी पडलो.

माझ्या निश्चयाने पीडित झालेली माझी माता देवमाता अदिती व देवराज इंद्राला शरण गेली. त्या दोघांनी मला माझ्या निश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला.

देवराजाने त्या गर्भवासांतील ऋषिची समजूत घालून म्हटले, " हे ऋषि ! मातेच्या उदरातून बाहेर येण्याचा मार्ग सुगम व सरळ आहे. त्या परंपरागत मार्गाचे कोणी उल्लंघन करीत नाही. मोठमोठे विश्वदेव त्याच मार्गाने जगांत आले. मग मानवांनी त्याप्रमाणे जन्म घेतला तर त्यात अनिष्ट ते काय ? ज्या मातेच्या उदरात तुझे पालनपोषण झाले तिला तुझ्या विलक्षण निर्णयामुळे पीडा होऊन ती मरण पावेल. तरी तू हा घोर अपराध करू नकोस."

त्यावर ऋषि म्हणाले, " हे देवराज, या सर्वसामान्य मार्गाने मी जन्म घेणार नाही. हा मार्ग संसाराच्या दुःखांना बंधनांनी जखडून टाकणारा आहे. मी जन्म घेण्यासाठी दुसरा मार्ग शोधून काढला आहे. आता यावर तुमचे म्हणणे असेल की सर्वजण अनुसरतात तोच मार्ग योग्य आहे तर तुमची मान्यता तुम्हालाच लखलाभ होवो. पूर्वजन्मी मी अनेक विशेष कार्ये केली आहेत आणि या जन्मीही करावयाची आहेत. रूढ परंपरेशी मला झगडायचे आहे. हे युद्ध मला एकाकी राहून लढावयाचे आहे. माझ्या मातेला क्लेश होणार नाहीत अशारीतीने मी तिच्या मांडीतून बाहेर पडेन. मातेच्या पीडेचा विचार हे देवेन्द्रा तुम्ही तरी केला

होता काय ? देवमातेलाच विचारून पहा. वर्षानुवर्षे तिच्या उदरात राहून तुम्ही स्वत:च तिला किती कष्ट सहन करायला लावले बरे ? थोडयाच महिन्यात मी माझ्या मातेला मुक्त करीन.'

देवराज इन्द्र यावर काहीच उत्तर देऊ शकला नाही. देवमाता आदिती त्याला म्हणाली, 'हे ऋषि, इन्द्र काही स्वत:च्या इच्छेने गर्भात राहिला नव्हता. त्याला स्वत:ला मुक्त होण्याचीच इच्छा होती. पण गर्भद्वार फारच कठीण होते. त्यामुळे त्याचा निरुपाय झाला होता. स्नेहवश होऊन मी ते द्वार मोकळे केले व इन्द्राचा जन्म झाला. जन्मत:च त्याने इतके अद्‌भुत पराक्रम केले की त्याची तुलनाच होऊ शकत नाही.

अंतरिक्षात पाण्याचे प्रवाह अडवले गेले होते त्यांचे अवरोध दूर करून इन्द्राने ते प्रवाह मुक्त केले. मोठमोठया नद्या व जल प्रपात इन्द्राची निरंतर स्तुति गात आहेत.

इन्द्रांनेही परंपरेच्या विरुद्ध जाऊन कित्येक मोठी मोठी कामे केलेली आहेत, असेही तू म्हणशील. पण त्याचेही उत्तर ऋषींनी पूर्वकालीच देऊन ठेवलेले आहे. इन्द्राने पराक्रम केले ते परोपकारासाठी केले. त्यामुळे कित्येकदा त्याला सहनही करावे लागले. त्याच्या शरीरावर सोमरस फुटून निघाला होता. त्याच्या हातून ब्रह्महत्या घडली होती व गुरुचा अपमानही झाला होता. परंतु त्याला त्या पापातून मुक्त करण्यासाठी वहात्या नद्यांनी तो दोष स्वत:वर घेऊन देवराज इन्द्राची निर्दोषता सिद्ध केलेली आहे. तरी हे ऋषि तू इन्द्राला दोष देऊ नको.'

अदितीची ही प्रेमपूर्ण वात्सल्यवाणी ऐकून ऋषिनी तिची स्तुति करून म्हटले, 'हे इन्द्र या देवमातेने मूर्छित झाल्यामुळेच तुमचा त्याग केला पण कुषवा राक्षसीने तर तुम्हाला फेकूनच दिले होते. जल देवीनी तुम्हाला सुख दिले व राक्षसीवर तुम्ही विजय मिळवला हे सत्य आहे. व्यस नामक राक्षसावर तुम्ही प्रहार केला त्या आधी त्याने आक्रमण करण्याचा प्रयत्न केला होता नंतर तुम्ही त्याचे प्राण हरण केले. या आपल्या पराक्रमाच्या कथा प्रसिद्ध आहेत.'

हे राजा, या प्रमाणे मी इन्द्राची स्तुति केली तरीही देवराज प्रसन्न झाले नाहीत कारण मी त्यांच्या आज्ञेप्रमाणे जन्म घेण्यास तयार नव्हतो. माझा निश्चय बदलण्याची शक्यता दिसत नाही असे पाहून देवमाता व देवराज तेथून निघून गेले.'

'ऋषिवर! मातेच्या उदरात आपण किती काळ पर्यंत राहिलात? व नंतर कशा प्रकारे जन्म घेतला?'

'राजन् मी मातेच्या उदरात होतो तरी तिला त्यामुळे त्रास होत नव्हता व मला आत्मज्ञानाच्या योगाने बाहेर आलो काय किंवा गर्भवासात राहिलो काय सारखेच होते.'

'भगवन्, आपल्या आत्म्याविषयीच्या प्रत्यक्ष अनुभवाविषयी मला सांगाल काय?'

'ज्या प्रमाणें सूर्य प्रकाशताच त्या दिशेच्या कोना कोपऱ्यास उजळून टाकतो त्याप्रमाणे आत्मज्ञान होताच जन्मजन्मांतरीच्या गोष्टी मला स्पष्ट कळू लागल्या दिशा व देशाच्या मर्यादा संपत गेल्या व मला सारे दृश्य स्वच्छ दिसू लागले.

सृष्टि निर्माण झाली तेव्हा प्रजापतिने आपल्या देहापासून मनुभगवान निर्माण केला. मानवांचा तो मूळ पुरुष. त्या मनुच्या ठायी माझा आत्मा वास करीत होता. दुसऱ्या युगाच्या प्रारंभी तो विवस्वान सूर्य होता. त्याच्यापासून सूर्य वंशाची उत्पत्ती झाली. तो सूर्य हे माझेच आत्मस्वरुप. अंगिरा, बृहस्पति, भृगु, अत्रि वगैरे तपोधन ऋषींच्या काळी दीर्घतमस् नावाचे एक महर्षि होऊन गेले. त्यांचा पुत्र कक्षिवान ऋषि मोठा बुद्धिशाली व सिद्ध पुरुष होता. ते माझेच एक स्वरूप होते. इंद्रासारखाच पराक्रमी, इंद्राच्या बरोबरच ज्याचे स्थान होते तो अर्जुनी मातेचा पुत्र कुत्स, भृगु वंशातील कवि उशनस् ही ही माझीच रूपे असून त्या त्या अवतारांत मी अनेक मंत्रांचे दर्शन केले. अशा प्रकारे तटस्थ वृत्तीने राहून गर्भवासात असतांना मी माझ्या आत्म्याची विविध रूपे पहाण्याचा अभ्यास करीत होतो.

स्वर्गीत घडलेली एक घटना मी पाहिली होती. तिचे स्मरण मला अद्याप आहे. मनुला सोमयाग करावयाचा होता. पण सोमवेल स्वर्गातच उगवत असे. सोमपाल नांवाचे देव त्या दिव्य वल्लीचे रक्षण करीत असत. त्यावेळी अत्यंत गतिशील व सुंदर अशा श्येन पक्षाचे रुप धारण करून अत्यंत वेगाने मी स्वर्गलोकात जाऊन पोचलो. मला पाहून सोमपाल चकित व भयभीत झाले. त्याचा लाभ घेऊन मी सोमरस हस्तगत करून पृथ्वीवर आणला व मनूला त्या दिव्य रसाचे दान केले. त्या सोमरसाच्या योगाने हजारो सोमयाग या पृथ्वीवर होऊ शकले.

मातेच्या उदरात असतांना मी माझ्या अनेक जन्मांविषयी जाणून घेतले. ज्याप्रमाणे मनु व इतर ऋषिंचे वंश परंपरेने चालत आले आहेत त्याचप्रमाणे अग्नि

इंद्र वगैरेंचेही वंश चालत आहेत. त्याविषयी पण मला माहिती आहे. कारण माझ्या आत्मरुपाने त्या सर्व वंशात जन्म घेतलेला आहे.

गर्भदशेत असूनही मला कोणतेच बंधन नडत नव्हते. ज्याप्रमाणे दुर्गाच्या लोखंडी कडचा दुर्गपालाचे रक्षण करीत असतात, त्याप्रमाणे शेकडो देहांच्यात हा आत्मा वास करून चुकला होता. त्या सर्वाहून वेगळचा अशा आत्मस्वरुपाचे या अनेक देहांनी रक्षण केले होते. तेव्हा गर्भवासात राहुन विश्वाच्या विराट रुपाचा साक्षात्कार मी सुखाने करीत होतो. ज्यावेळी मला वाटले की माझा गर्भवास आता संपलेला आहे तेव्हा भी एका सुंदर श्येन पक्षाचे रूप घेतले व माझ्या मातेला थोडी देखील पीडा होणार नाही अशा रीतीने मी तिच्या उजव्या कुशीत एक छिद्र पाडून त्यांतून बाहेर पडलो. मातेची माया ममता मी तिच्या गर्भातच ठेवली होती. त्यामुळे या जिवाला कोणतेही आवरण कधी नडले नाही. म्हणूनच सामान्य माणसे जे करू शकत नाही ते मी सहज करतो. मी या जन्मी दारिद्याचे पूजन करून वासना, लोभ व लालसा पचवून टाकली आहे. माइया इच्छेनुसार मी जगतो व आत्मदर्शनाचा आनंद उपभोगतो.'

'भगवन्, तुम्ही स्वत: 'वामदेव' आहा. तेव्हा जे रुप वरणीय' वाटेल ते तुम्ही धारण करु शकता. या जगांत आनंदाने राहू शकता. प्रकृतिची माया तुम्ही जिंकली आहे आणि तरीही तुम्ही वारंवार जन्म घेता. त्या जन्मजन्मांतराचे ज्ञान तुम्हाला असून तुम्ही जुन्या रुढी मोडल्या आहेत. इंद्रादि देवांच्या इच्छेची पर्वा न करता नवे मार्ग तुम्ही स्वीकारले. शोधले. व शुद्ध स्वरुपाला जाणून घेऊन आपले जीवन परोपकाराचे साधन मानून आपण जगत आहा. जीवनातील क्लेश, कलह, तहान भूक, लोभ लालसा, यामुळे माणसे दु:खी होतात. पराजित होतात. तुम्ही त्या सर्व वासनांचाच हवि अर्पण करुन त्यांना शुद्ध रुप दिले आहे.'

आत्मज्ञानी ऋषी वामदेवांच्या तोंडून जन्मजन्मांतरीच्या रहस्यांची कथा ऐकून त्रसदस्युचे मन प्रसन्न झाले. ऋषींचा निरोप घेऊन राजा आपल्या राजधानीस परतला. पिता पुरुकुत्साने आपले राज्य युवराजावर सोपवून तो स्वत: आपल्या राणीसह वनात जाऊन राहिला. राजा त्रसदस्यु पण वामदेवाप्रमाणेच तत्वज्ञानी होता. त्याने उत्तम प्रकारे राज्य कारभार करून प्रजाजनांचे प्रेम प्राप्त करून घेतले होते. परोपकाराची अनेक कामे करुन देवांना प्रसन्न करुन कल्याणकारी कृत्यांनी पितरांनाही संतुष्ट केले होते.

राजा त्रसदस्यु आदर्श मंत्रद्रष्टाही होता. त्याने स्वत:च्या भावने प्रमाणे राष्ट्राची स्थापना केली. स्वर्ग हे देवांचे राष्ट्र मानले जाई. व भारत हे मानवांचे

राष्ट्र समजत. राजाने या भारताला स्वर्गाप्रमाणेच परिपूर्ण भूमीची समृद्धी प्राप्त करून दिली. राष्ट्रीय भावना व आत्म्याची एकरुपता यांचे स्वत:ला घडलेले दर्शन सूक्तांत गुंफून त्याने आपल्या प्रजाजनांना उपदेश केलेला आहे.

'मी एक क्षत्रिय राजा आहे. पण समस्त विश्वाच्या जीवनाशी माझे जीवन एकरुप झालेले आहे. सामान्यत: दोन राष्ट्रे या विश्वात आहेत असे समजले जाते. देवांचा स्वर्ग व मानवांचा भारत. ज्या प्रमाणे माझे प्रजाजन माझ्याशी समरस आहेत त्याच प्रमाणे स्वर्गातील देवही माझे निकटचे संबंधी आहेत. त्यामुळे देव व प्रजाजन हे एकाच राष्ट्रांतील आहेत अशी माझी भावना आहे. देवांचे शासन वरुणाच्या हाती आहे तर माझ्या प्रजाजनांचा शास्ता शेतकरी आहे. त्या दोघांच्या सत्तेला मानणारे देव व प्रजाजन माझ्या या राष्ट्र जीवनाच्या यज्ञात मला सहकार्य देत आहेत.

मी स्वत: राजा वरुणच आहे. कारण देव ज्या प्रमाणे वरुणाचे शासन मानतात, प्रजाजन शेतकऱ्याची सत्ता मानतात. त्याच प्रमाणे वरुण व शेतकरी दोघेंही माझे प्रतिनिधित्व मान्य करतात.

मी देवराज इंद्राचेच स्वरुप आहे. वरुण हेही माझेच रूप आहे. विशाल गंभीर आकाश व पृथ्वी एकाच राष्ट्ररुपाने मी धारण करतो. देवराज इंद्राच्या रुपाने मी जलप्रवाह मुक्त करून सगळीकडे पाणी पुरवतो. सूर्य रुपाने मी आकाश व्यापून टाकतो. प्रवाहाना व्यवस्थित रूप देताना मी ऋताचा पूजक देव होतो, तोच आदितीचा पुत्र आदित्य. परमेश्वर रुपाने मी सर्वव्यापी आकाशाचे तीन भाग पाडतो. माझ्या आत्मरुपानेच विश्वातील त्रैलोक्याची रचना केलेली आहे. कोठल्याही देवाशी माझी तुलनाच होऊ शकणार नाही. माझ्यासाठी यजमान सोमरस गाळीत आहेत मला प्रसन्न करून घेण्यासाठी ऋत्विज मंत्रांचे शंसन करीत आहेत. व माझी स्तुती गात आहेत आणि मीही इंद्र व वरुण यांची स्तुती करीत आहे !

माझा पिता, राजा पुरुकुत्स शत्रूच्या कारावासात असताना माझी माता सप्तर्षीना शरण गेली होती. ते सात महर्षी माझे पालक पिते आहेत. इंद्राने ज्या प्रमाणे वृत्राचा नाश केला त्या प्रमाणे शत्रूचा नाश करणाऱ्या कुमार त्रसदस्युला–म्हणजे मला–राणीने जन्म दिला.

सप्तर्षीनी दिलेल्या प्रेरणेनुसार राणीने इंद्र व वरुण यांना प्रसन्न करून घेतले होते. मातेने त्या देवांना हवि अर्पण करून नमन केले होते व त्या देवांनी

प्रसन्न होऊन दिलेल्या पुत्र त्रसदस्युचा पराक्रम इंद्रासारखा व कांति वरुणासारखी होती.

हे इंद्र व वरुण, तुम्हाला धन साधन अर्पण करुन आम्ही संपन्न करीत आहो. आमचे भेट पूजन स्वीकारुन देव आनंदात राहोत. आम्ही दिलेले अन्न स्वीकारून आमच्या गाई पुष्ट व तुष्ट होवोत. तुम्ही उभयता देव, शत्रूंचा नाश करुन आम्हाला जिचा कधी नाश होत नाही अशी सर्व धन साधन देणारी, सुंदर कामधेनू द्यावी, अशी आमची प्रार्थना आहे.

राजा त्रसदस्युने या प्रमाणे राष्ट्राची भावना व्यक्त करुन आपले तत्वज्ञान सफल केले. प्रत्यक्षात उतरवले. प्रजाजनांना सुखी करून त्यांनाही आत्मरुपाचा परिचय करवून शाश्वत सुखशांती मिळवून दिली.

ऋषि वामदेव तत्वज्ञानी होते, तसेच व्यवहार चतुरही होते. शेती हे जीवन निर्वाहाचे उत्तम साधन आहे हे ते जाणून होते. क्षेत्र हा शब्द शरीर व शेत हे दोन्ही अर्थ धारण करणारा आहे हे त्याना माहीत होते. जमीन आणि शरीर दोन्हीही संस्कार झाले की परोपकारी कामे करण्यासाठी उपयोगी पडतात. शेतकरी जसा शेताचा धनी असतो तसा आत्मा शरीराचा धनी असतो. शरीराला सुखी करणारा देव इन्द्र आहे. शुन व सीर हे जरी दोन वेगवेगळे देव असले तरी शरीराचे पोषण करणारा सुखदायी आत्मा हा एकच 'शुनाशीर' आहे.

जो आत्म्याला ओळखतो त्याची सर्वच कामे सफल होतात. शेती करणाऱ्याचे मुख्य साधन नांगर असून बैल त्याचे खरे सहकारी असतात. मेघ हा त्याचा इष्ट देव व नांगरलेली जमीन–सीता–ही त्याची माता असते. शेती हे स्वार्थ व परमार्थ दोन्ही साधून देणारे साधन आहे. ऋषि वामदेवानी क्षेत्र व क्षेत्रपतिचा महिमा गाताना म्हटले आहे–

'आमच्या शरीराचा क्षेत्रपति ईश्वर आहे. मग तो रुद्र असो, इन्द्र असो वा सूर्य असो, आमच्या सर्व सुखसोयी, धन-साधन, संस्कार व घडण सारे ईश्वराच्याच हातात आहे. क्षेत्रपतिच्या साह्यानेच आम्ही हिताची कार्ये करू शकतो व परमार्थांच्या मार्गावर प्रगती साधू शकतो. ज्याप्रमाणे शेतीसाठी गाय व घोडा आवश्यक साधने आहेत, त्याप्रमाणे शरीराला वाणी व प्राण आवश्यक आहेत. त्यांच्या पोषणामुळे शरीराची मशागत उत्तम होते.

हे क्षेत्रपति देव, कामधेनू ज्याप्रमाणे मधुर दुधाने धन साधनाची वृद्धि करते त्याचप्रमाणे शरीर क्षेत्रांत कामधेनूप्रमाणे वसणारी आमची वाणी आमच्या

मनोकामना पूर्ण करो व आमच्या जीवन यज्ञाला संस्कार देणारे इंद्र, वायु, सूर्य वगैरे देव आमचे शरीर–क्षेत्र समृद्ध करोत.

वनस्पति आम्हाला सुखदायी होवोत. जलप्रवाह व अंतरिक्ष आमच्यासाठी मधुमान असो. क्षेत्रपतिची आमच्यावर कृपादृष्टि असो. सर्व देव आमच्या जीवनाला हिंसेपासून दूर ठेवोत व क्षेत्रपतिच्या निर्देशाप्रमाणे आमचे जीवन सुखाने व्यतीत होवो.

नांगर फिरवणाऱ्या बैलाप्रमाणे आमच्या जीवनाला देव उन्नतीच्या मार्गाने नेत राहो. आमचा नांगर जमीन योग्य रितीने नांगरो व आमचे सहकारी उत्तम सहकार्य करणारे असोत. नांगराचे फाळ व बैलांचे कासरें बळकट असोत.

हे शुन–(सुखकारी) सीर– (स्निग्ध) तुम्ही इंद्र असा, वायु असा, अग्नि असा वा सूर्य असा, आमचा आत्मदेव एक शुनासीर, ईश्वरच आहे. तो आमचे शरीर उत्तम राखून आमच्या शेतावर अनुकूल वृष्टि करतो. हे ईश्वर आमच्या जीवनांतही आपण स्नेहसिंचन करीत रहा.

अत्यंत सौभाग्य व सुखसमृद्धीने वृद्धि पावणारी आमची माता सीता, (नांगरलेली जमीन) तूच आमचे सर्वस्व आहेस. आम्ही सर्व क्षेत्रपाल तुला वंदन करतो. तूच आमची भाग्य विधात्री असून, फलदायी माता आहेस.

हे देवराज इंद्र, आमच्या सीता मातेवर आपली निरंतर कृपा असो. हे सूर्य देव आमची भूमी आपल्या कृपेने फलद्रूत होवो. आमची भूमी कामधेनूप्रमाणे आम्हाला उत्तम धन देणारी व आमची प्रगती करणारी असो.

शेतीची साधने शेताचे हित साधेल अशा प्रकारे काम करतात. आमचे सहकारी रोज नांगर जोडून फिरवतात. हे मेघराज आपण आमच्या शेतावर अनुकूल वृष्टि करावी. शुनासीर देव हो, आमच्या क्षेत्राचे उत्तम पालन पोषण करा. त्या योगाने उत्तम शेती होईल. उत्तम जीवन घडेल.

हृदयांत उचंबळणाऱ्या महासागराचे दर्शनही ऋषिंना झालेले आहे. त्याचे वर्णन करताना ते म्हणतात, 'या अथांग सागरावर लाटा मागून लाटा उसळत येताना मला दिसत आहेत. तरंगाची ही माला मानवाचे परम हित साधणारी आहे. मातेने जर मनात आणले तर या सागराच्या दिव्य तरंगा तरंगातून प्रेरणा घेऊन ती आपले जीवन ऋत सभर करु शकेल. हा सागर गूढ, रहस्यमय असून त्याला घृत–दिव्य–ज्योति असे नाव आहे. देवांची जिव्हा आणि अमृताची नाभि या सागराच्या ठायी आहे.'

कवि हृदयाच्या या ऋषींनी यज्ञ म्हणजे समाज जीवनाचे प्रतिक मानलेले आहे. भिन्न स्वभावाचे यजमान आपला स्वार्थ विरूसन सर्व कल्याणाच्या भावनेने या यज्ञासाठी एकत्र आलेले त्यांना दिसतात.

' या विशाल यज्ञ महोत्सवात आम्ही सर्व यजमान घृत नांवाच्या दिव्य पदार्थाची स्तुति करीत आहो. ती दिव्य ज्योति आमचा मार्ग उज्वल करो. आम्ही तिला दिव्य आहुति व स्तुति अर्पण करीत आहो. या यज्ञाला विशाल मार्गदर्शन करणारे ब्रह्मदेव आमची ही मधुर वचने ऐकून आपली चार चार उन्नत मस्तके धारण करून आमचे समाज जीवन समृद्ध करो.

यज्ञकुंडात समिद्ध झालेला अग्नि हा महाश्रेष्ठ वृषभ आहे. मानवी शरीरात तो शब्द रुपाने प्रवेशतो आणि जेव्हा तो वाणी रुपाने प्रगटतो तेव्हा त्याला चार मुखे, तीन पाय व दोन मस्तके असून सात हात आहेत व तीन जागी त्याला बांधलेले आहे असे त्याचे रुप दिसते. 'वृषभ अग्नि ' यज्ञ कुंडात मधुर शब्द करीत मानवाच्या नाभिस्थानात शब्दब्रह्म रुपाने प्रवेश करतो.'

ऋषिनी अग्निच्या विविध रुपांचे वर्णन करतांना म्हटले आहे,

' हे आराध्य देव ! तुमच्या विशाल, उदार, व तेजस्वी धामात सर्व विश्व, लोक व भुवने सामावून गेलेली आहेत. अंतरिक्षात विजेच्या रुपाने अग्नि दर्शन देतो व समुद्रात तो वडवानल असतो. रानावनात तो दावानल आहे तर मानवी शरीरात तो जठराग्निच्या रुपाने वास करतो. ज्ञानी जनांच्या अंतःकरणात सदैव वृद्धि पावणारा ज्ञानाग्निही तोच आहे. समस्त अग्निदेवाला प्रदिप्त ठेवणारी ती गुप्त घृत धारा हृदयातील भावनेच्या उर्मी प्रमाणे व्यापक व गतिमान आहे.

★ ★

# १ / परिसाचा स्पर्श

(ऋग्वेद पंचम मंडल)

या नवलाईच्या सृष्टीची जडण घडण होत होती. एकाच प्रजापतीच्या पोटी भिन्न स्वभावाचे असुर आणि देव जन्माला आले होते. एकाच पित्याचे पुत्र असूनही स्वभाव, कर्मात असे अंतर का पडावे याचा विचार ज्ञानी माणसे नेहमी करीत असतात. आस्तिकानी प्रत्येक युगाचा भेद स्वीकारला आहे. आणि पूर्वी होती तशीच सृष्टी प्रजापतीने फिरुन घडवली. या वेदवाक्याला त्यांनी संतोषपूर्वक प्रमाण मानले आहे.

प्रजापतिला ऋषी निर्माण करण्याची इच्छा झाली. त्यासाठी तीन वर्षपर्यंत चालणारा एक महायाग त्याने आरंभला. त्यांचा तो यज्ञ सफल व्हावा म्हणून साध्य देव व विश्वेदेव येऊन पोचले. प्रजापति यज्ञदिक्षा घेत असताच वाणीशक्ती देवतेच्या रुपाने तेथे प्रकटली व महायागास प्रारंभ झाला.

प्रजापति स्वतःच यज्ञ करीत होते. वरुण देव, व कला सौंदर्याची साक्षात् मूर्तीच अशी वागीश्वरी देवी यांच्या परस्पर आकर्षणातून निर्माण झालेल्या तेजाची वायुदेवानें यज्ञात आहूति दिली.

अग्निमधून ज्या 'अर्चि' ज्वाला निघत होत्या त्या ज्वालातून तेजःपुंज अशी एक ऋषिमूर्ती प्रकट झाली. ज्वालांनी लपेटलेले त्यांचे शरीर व त्या कायेत एकजीव झालेले तेज–भर्ग यामुळे त्या ऋषिवर्यास सर्वजण भृगु म्हणू लागले.

तेजज्वाला शांत झाल्यावर अग्निकुंडात रसरसणारा अंगार राहिला त्यातून निर्माण झालेल्या ऋषिंना अंगिरा असे नांव मिळाले.

वागीश्वरी–भारतीला तिसऱ्या पुत्राची इच्छा झाली व तिने प्रजापतीला त्याप्रमाणे सांगितले. त्यावर प्रजापतीने म्हटले, 'हा पहा, हा तुझा तिसरा पुत्र

'अत्र-तृतिय: ।' आणि खरोखरीच त्या यज्ञभूमीवर सूर्य व अग्नि यांचे तेज ज्याच्या ठिकाणी एकवटले होते असा वागीश्वरीचा पुत्र प्रगटला. तेच अत्रि ऋषि.

याप्रमाणे यज्ञाच्या अग्नि-अर्चितून भृगु, अंगारातून अंगिरा व यज्ञकुंडाखालील यज्ञभूमीतून अत्रि ऋषि निर्माण झाले.

अत्रि ऋषींचा जन्म भूमीपासून झाला म्हणून त्यांना भौम व प्रजापतींच्या म्हणण्यावरून अत्र मधील अ व तृतिय मधील त्रि याप्रमाणे अत्रि हे नांव प्राप्त झाले. त्यांचे गुण, कर्म व तेज भृगु व अंगिरा यांच्या प्रमाणेच अतुलनीय होते.

तपोनिधि अत्रि ऋषींचा विवाह कर्दम प्रजापतिची कन्या अनसूया हिच्याशी झाला.

ऋषि सृष्टीच्या निर्माण काळातील प्राचीनतम ऋषींपैकी अत्रि हे एक आहेत. हिमालयात सुदुधा गोमतीच्या पवित्र तिरावर असलेल्या विशाल गुरुकुलाचे ते कुलपती होते.

अत्रि ऋषींचा जन्म यज्ञभूमीवर झाला तसा अग्निचाही जन्म त्याच ठिकाणी झालेला आहे. ऋषिंना स्वत:च्या ठिकाणी अग्निचा साक्षात्कार झाला होता. त्यामुळे ते अग्निशी एकरूप झाल्यासारखे होते. अग्निच्या ख्यातिबरोबरच त्यांचीही कीर्ति वाढत होती.

अत्रि ऋषींच्या ठिकाणी एक अद्‌भुत दिव्य शक्ति होती. त्यांना दिव्य स्वरुपांत मंत्रांचे दर्शन होई. मंत्र मूर्तिमंत होऊन त्यांच्या जवळ वास करीत. इतर ऋषिंच्या ठायी त्या मंत्राचे आरोपण महर्षि अत्रि करू शकत. त्यांच्या या प्रकारच्या दिव्य प्रभावामुळे आकर्षित होऊन अनेक ऋषि तपस्वी, विद्यार्थी, अभ्यासी, ज्ञानी, विज्ञानी, त्यांच्या गुरुकुलात निवास करीत.

परिसाचा स्पर्श होताच लोखंडाचे सोने होते त्याप्रमाणे अत्रि ऋषींचा सहवास घडताच त्यांच्या संगतीने इतर ऋषीही अत्रिच होऊन जात. भिन्न भिन्न नाम रुप, गुण घेऊन आलेले ऋषी मुनी आप आपले नाम, रुप संभाळून रहात, तथापि त्यांच्या ठिकाणी दिव्य मंत्राचा संचार होताच ते अत्रि होऊन जात.

गुरुकुलात रहाणारे अत्रि व आत्रेय अत्रि मुनींना पित्याच्या जागी मानीत. अत्रि हे त्यांचे मंत्रदाते गुरुही होते. गुरुंचे मंत्रदर्शन ही त्या समग्र गुरुकुलाची सामायिक संपत्तीच होती.

ऋषींना अग्निच्या ठायी स्वस्वरुप दिसे. अग्निची स्तुती करतांना ते आनंद-विभोर होऊन जात. देवराज इंद्राचे शौर्य आणि पराक्रम वर्णन करतांना तर ते

भान हरपून जात. शेजारी असलेल्या एखाद्या शिष्याचा हात धरून त्याच्या ठायी इंद्राचे आरोपण करून इंद्रस्तुति गाऊ लागत. इंद्राला सोम अतिशय प्रिय म्हणून ते स्वत: पर्वत शिखरे धुंडाळून सोमलता शोधून आणीत व आपल्या शिष्यांना सोमरस काढण्याची प्रक्रिया शिकवीत. सोमरस सिद्ध होताच इंद्र तेथे उपस्थित होई व सर्व अत्रिकुल त्याला आग्रहपूर्वक सोमरस अर्पण करी.

'यावे यावे. देवराज इंद्र ! हा सोमरस आपण स्वीकारावा. आद्रिच्या पाषाणावर वाटून वाटून हा चमकता रस आम्ही विधिपूर्वक काढला आहे. आपण सोमाचे स्वामी, सोमपति, या सोमरसाचे आपण पान करावे. आपल्या कृपेने सर्व फळांच्यात रस निर्माण होतो. सर्व प्रकारच्या वृत्र-शत्रूंचा आपण नाश करता. आमच्या जीवनाला झाकळून टाकणाऱ्या तत्वांनाही आपण दूर करावे. आपण सर्व रसांचा वर्षाव करणारे आहा. आपल्या सहकारी मरुतांच्यासह या सोमरसाचा स्वीकार करावा.'

याप्रमाणे दिलेले आमंत्रण स्वीकारून पहिल्या प्रात: सवनाच्या वेळी आलेल्या देवराजाचे स्वागत करून अत्रि म्हणतात–

'देवश्रेष्ठ ! पहा तर खरे. या ग्रावा-पाषाणातूनही सोमरस कसा पाझरतो आहे. सोमलता रसरशीत आहे. ती वाटीत असताना तिचा मादक सुवास सगळी-कडे पसरतो आहे. पात्रात भरलेला हा सोमरस स्वत:च जणू वर्षणशील झाला आहे. वृत्र-शत्रूंचा संहार करणाऱ्या देवराजा तुम्हीही वृषन्-वर्षणशील असून तुमचे सहकारी मरुत ही वर्षा करणारे आहेत. त्यांच्यासह या सोमरसाचा स्वीकार करून सोमपान करावे.

हे वज्रधारी इन्द्र, आपल्याला सोमरसाचे पान करण्यासाठी आम्ही भाव-पूर्वक आमंत्रण देत आहो. कारण आम्हीही आपल्याप्रमाणेच वर्षणशील आहो. आमच्यावर कोसळणाऱ्या अनेकविध संकटांपासून आमचे संरक्षण करा. तेवढ्या-साठी आम्ही अनेक-विध प्रकारे आपली स्तुति करीत आहो. आमची ही स्तुति वचने वर्षणशील सोमरसाच्या चमकत्या बिंदुसारखी आहेत. त्यांचा आस्वाद घेण्यासाठी हे वृत्रसंहारक इंद्र देव, आपण मरुतांना घेऊन सत्वर येऊन पोचावे.'

याप्रमाणे प्रात: सवनाठी इंद्राला आवाहन करीत. त्यानंतर दुपारी माध्यंदिन सवनासाठीही फिरून स्तुतिपूर्वक आमंत्रण देत. सकाळी सोमरस भरपूर असे. दुपारीही तो चांगला ताजा असे. पण संध्याकाळच्या तृतिय सवनाच्या वेळी सोम शिळा झालेला असे. रस काढताना सोमवल्लीच्या चोथ्यात 'ऋजीषात'

पाणीही घालावे लागे. तेव्हा सोमपानासाठी कदाचित देव येणारही नाहीत अशी शंका मनात आल्याने माध्यंदिनसवनाच्या आमंत्रणाबरोबरच संध्याकाळचे आमंत्रणही देत व देवराजास विनंती करीत.

'अहो! आपल्या सोमयागात आलेला देवामध्ये श्रेष्ठ असा देवांचा राजा इंद्र आपल्या ऋजीष–सोमरसाचाही स्वीकार करणार आहे. त्याने वज्र धारण केलेले असून त्याचे ते प्रतापी शस्त्र सोमरसाप्रमाणे पराक्रमाचा वर्षाव करणारे आहे. अत्यंत वेगाने चालून येणाऱ्या शत्रूंना ते रोखून धरते. देवराज अत्यंत बलिष्ठ असून वृत्रघ्न आहे. सोमरसाचा स्वीकार करण्यासाठी महानुभाव इंद्र या ठिकाणी आले असून माध्यंदिन सवनाची सोमपात्रे त्यांच्यासाठी भरलेली आहेत. आपल्या वेगवान रथात बसून इंद्र येत आहे.

या प्रमाणे मध्यान्हीच्या वेळी अत्रि इंद्राला सोम अर्पण करीत असता अचानक विजा चमकू लागल्या. अकाली कडाडणाऱ्या विजा पाहून अत्रि सावध झाले व पाहू लागले तो स्वत:च्या तेजाने बिजेसारखे चमकणारे कित्येक देव स्वर्गातून आश्रम भूमीवर उतरत होते.

आमंत्रण आवाहनाशिवायच उपस्थित झालेला तो दिव्य समुदाय पाहून अत्रि महर्षिना मोठे आश्चर्य वाटले. ते देव अत्यंत भयभीत झालेले दिसत होते. विनय-पूर्वक हात जोडून ते महर्षिना म्हणाले,

'ऋषीवर, आपल्याला मंत्राचा साक्षात्कार झालेला आहे. म्हणून आम्ही आपले साहृय मागण्यासाठी आज येथे आलो आहो.'

विजेप्रमाणे चमकणाऱ्या त्या दैदीप्यमान देवांचे तेज ओसरू लागले. शोकाची काळी छाया त्यांच्यावर पसरली होती. महर्षि अत्रीनी त्यांना नमन करून विनय-पूर्वक विचारले.

'हे स्वर्गस्थ देवांनो, आपल्याला कोणाचे बरे इतके भय वाटत आहे? असे कोणते संकट आपल्यावर कोसळले आहे? माझ्या मंत्र शक्तिच्या योगाने मी आपल्यासाठी काय करू बरे?'

ऋषींचे हे अभय वचन ऐकून देवांनी उत्तर दिले, 'महाराज, स्वर्भानु नावाचा एक राक्षस आहे. त्याने सांप्रत स्वर्गावर आक्रमण केले आहे. असुर वेळो-वेळी आक्रमण करतात. पण स्वर्भानु हा अत्यंत प्रचंड व विशाल आहे. त्याने सूर्य मंडळासच घेरा घातला आहे. त्याने सूर्याचा ग्रास घेतला तर त्रैलोक्यावर संकट कोसळेल. म्हणून त्या संकटाचे निवारण करावे अशी विनंती करण्यासाठी आम्ही तुमच्याकडे आलो आहो.'

देव हे सांगत असतांच सूर्यास ग्रहणाचे वेध लागले. महर्षि अत्रिंना या प्रसंगाची पूर्व कल्पना होती. त्यांनी देवांना धीर देऊन इंद्रासह आसनावर बसण्यास सांगितले.

आकाशात सूर्यास पहाता पहाता खग्रास ग्रहण लागले. सगळीकडे अंधार पडला. आकाशाचे भूषण, देवांचा दिव्य चक्षु असा सूर्य नारायण, औषधी वनस्पतींचा पिता, प्राणिमात्रांची प्रेरणा शक्तीच असा तो सविता नारायण–त्याचाच लोप झाला तर सर्वत्र रोगराई व संकटेच कोसळायची !

सूर्यग्रहण हा एक निसर्गक्रमात घडून येणारा अपघात आहे. अत्रिंनी गणितांच्या साह्याने त्याची पूर्वसूचनाही दिलेली होती. त्याचप्रमाणे त्याच्या निवारणाचाही विचार केलेला होता.

त्यांनी एक वर्षपर्यंत चालणाऱ्या संवत्सर यागाचा संकल्प केला होता. चैत्र महिन्यात या यागाची सुरुवात झाली. भाद्रपदात त्याचा मध्य व फाल्गुन मासांत पूर्णाहुति होणार होती. वर्षाचे दोन भाग, अयन, उत्तरायण व दक्षिणायन. व दोन संपात वसंत संपात व शरद संपात. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत व शिशिर असे सहा ऋतु. बारा मासांचे बारा शुक्ल व बारा कृष्ण असे चोवीस पक्ष. या गणनेप्रमाणे संवत्सर याग होत होता. त्या यागाच्या बरोबर मधल्या दिवसास विष्पुवान असे नांव असून त्याच दिवशी सूर्य ग्रहण होते. अत्रि महर्षिनी तीन सवनांच्या बरोबर सूर्य ग्रहण सुटावे म्हणून चौथ्या सवनमंत्राचा उपयोग करण्याचे ठरवले. आणि त्याच वेळी स्वर्गांतील देव भयभीत होऊन त्यांच्याकडे आले.

महर्षींनी आपल्या मंत्रशक्तीच्या प्रभावाने स्वर्भानु–राहूची मलीन माया दूर केली. सूर्य मुक्त होताच त्रैलोक्यातील प्राणिमात्र मोहमायेतून मुक्त झाले. अत्रि महर्षिच्या दिव्य प्रभावाचा अनुभव घेऊन देव स्वर्गात परतले.

ते देव निरोप घेऊन गेल्यावर बाकी राहिलेल्या तृतिय सवनासाठी अत्रिगणांनी इंद्राला परत आमंत्रण दिले. या आमंत्रणाचे वेळी महर्षि अत्रींनी स्वर्भानूची माया दूर करून सूर्याला दृष्टि प्राप्त करून दिली असा निर्देश या ऋचात आहे. दुसऱ्या सवनाच्या वेळी जे इंद्रस्तवन केले होते त्या चार ऋचांच्यानंतर पुढील पाच ऋचा आहेत.

'हे सूर्यनारायणा, असुर जातीच्या स्वर्भानु नावाच्या राक्षसाने जेव्हा आपली माया पसरून तुम्हाला अंधकारात बुडवून टाकले तेव्हा त्रिभुवनात अंधार

पसरला होता व अनोळखी प्रदेशात येऊन पडलेला यात्रिक ज्याप्रमाणे गोंधळून सैरावैरा हिंडू लागतो त्याप्रमाणे सर्व भुवनातील लोक मूढ होऊन गेले होते.

या सूर्यग्रहण प्रसंगी देवराज इंद्र अत्रिमहाराजांच्या यज्ञमंडपात उपस्थित होते. म्हणून त्याप्रसंगी स्वर्भानूची माया दूर करण्याविषयी महर्षींनी देवराजाचीच स्तुति करून त्यास विनवले, 'हे देवराज इन्द्र, आकाश पाताळ व तीनही भुवनांना स्वर्भानूची माया व्यापून राहिली आहे ती दूर करणाऱ्या देवेन्द्रा, घोर अंधारात सापडलेल्या सूर्याला ऋषिश्रेष्ठ अत्रींनी चौथ्या मंत्राचा दिव्य प्रयोग करून मायेतून मुक्त केले.

स्वर्भानूच्या पाशातून मुक्त होताच सूर्यनारायण आकाशात प्रगट झाले त्यावेळी मध्यान्हकाळ पुरा झाला होता व सूर्य मावळण्याची वेळ झाली होती. मावळतीच्या कडेवर सूर्यबिंब लाल लाल दिसत होते. इकडे अत्रि महाराजांच्या यज्ञभूमीवर तृतिय सवनाचा अग्निही तसाच लाल लाल प्रकाशत होता. जणू सूर्य व अग्नि एकमेकात मिसळूनच गेले होते. अग्निशी एकरूप झालेल्या सूर्य नारायणाने स्वतःला मुक्त करणाऱ्या ऋषिवर अत्रींची स्तुति करून म्हटले.

'हे अत्रि महाराज, तुम्ही माझे रक्षण केलेत. त्यामुळे मी आता तुमचा आप्त संबंधी अथवा मित्र झालो आहे. स्वर्भानु राक्षसाचे व माझे काही वैर नव्हते. परंतु विशाल आकाशात भ्रमण करून त्याला असह्य भूक लागल्यामुळे मला अन्न समजून तो गिळू पहातो. तरी तुम्ही त्याच्या पासून माझे रक्षण करावे. तुम्ही दिवसाचे राजे 'मित्र' व रात्रीची देवता 'वरुण' दोन्हींचे स्वरूप आहात. सत्याचे रक्षण करण्याचा संधियोग आपण केलेला आहे. तरी या उभय शक्तीच्या योगाने माझे रक्षण करा.'

सूर्य ग्रहण सुटल्यानंतर तिसऱ्या सवनाची तयारी झाली. नव्या शुद्ध केलेल्या खलबत्त्यांत सोमवल्लीच्या ऋजीष पाणी घालून वाटून, पिळून काढलेल्या सोमरसाची पात्रे भरली व इंद्राची स्तुति करताना ऋषिजन सूर्य मुक्तीच्या प्रसंगाचेही वर्णन करू लागले.

'अहो ! पहा पहा. आपल्या महर्षि अत्रींनी ब्रम्हद्याचे पद घेऊन प्रायश्चित्ताचे सवन कर्म केले. आता फिरून सोम वाटण्यास सुरुवात झाली. आपण सर्व देवांची स्तुति स्तोत्रे गात पूजा करून हवि, आहुति अर्पण करून नमस्कार करु या. स्तुति व स्तोत्रांच्या साधनांनीच महर्षि अत्रि मुनींनी सूर्य नारायणाच्या चक्षु मंडलास आकाशांत त्यांच्या स्थानी स्थापित केले. त्यांच्या मंत्र प्रभावामुळे देवराज इंद्राने स्वर्भानु राक्षसाचे मायाजाल दूर करून आकाशात सूर्य मंडळाची यथावत स्थापना केली.'

या ठिकाणी देवराज इंद्र स्वतः उपस्थित होते. अत्रिमहाराजांच्या मंत्राचा प्रभाव त्यानी प्रत्यक्षच पाहिला होता. आणि तरीही उदार मनाने अत्रि सारे श्रेय इंद्राला देत होते व त्याचीच स्तुति करीत होते. ते पाहून इंद्र म्हणाले,

'खरोखरीच असुरांचा प्रतिनिधी स्वर्भानु अंधाराने सूर्याला झाकू पहात होता. परंतु तुम्ही सर्वांनी सोम यागाचे अनुष्ठान करून इन्द्राला सूर्याचा लाभ करून दिला आहे. अत्रिच्या मंत्र प्रभावानेच केवळ हे साध्य होऊ शकले. इतर कोणीही मुनी हे कार्य करू शकले नसते.'

सूर्यग्रहणाच्या प्रसंगामुळे ऋषि व देव यांच्यात परस्पर सहानुभूतीची भावना व्यक्त झाली आहे. देवराज इंद्राने तृतीय सवनाचा सोम ग्रहण केला त्यावेळी संध्याकाळ झाली होती. अत्रि अग्निहोत्राची आहुती देण्याची सिद्धता करू लागले. रात्री होणाऱ्या अतिरात्र यागाची तयारीही झाली होती. अग्निहोत्राचा इष्टदेवही इंद्रच. देवराजाने त्या वेळी उपस्थित रहावे अशी स्तुतिपूर्वक विनंतीही करावयाची होती. त्याप्रमाणे स्वतःची आगळी भावना व्यक्त करून अत्रिगणांनी अग्निची स्तुति केली. सूर्याची मुक्तता करावी अशी प्रार्थना करून त्याप्रसंगी सहकार्य देण्याबद्दल इंद्राला विनवले.

अग्निचे स्तवन करणारे बुध व गविष्ठर, वसुश्रुत, ईष, गय, सुतंभर, धरुण पुरु, द्वित, वव्री, प्रयस्वान, सस, विश्वसामा, विश्वचर्षणि, गौपायन, बंधु, वसूयव व कन्या विश्ववारा हे सर्व ऋषि अत्रिच्या सामयागाचे ऋत्विज होते. अत्रिच्या सहवासाने ते सर्व अत्रि होऊन अग्नीची स्तुति करू लागले.

एका अत्रिने अग्निचे वर्णन 'नवजात बालकासारखा सुंदर' असे करुन तो लपून बसला आहे असे म्हटले. तर एका ऋषिला तो लपून बसलेल्या राजकुमारासारखा वाटला आहे. त्यांच्या मते अग्नि व सूर्य एकच आहेत. स्वर्भानुच्या मायापटलाने त्याला लपवले आहे.

या अत्रिगणांच्या मनात एक शंका निर्माण झाली. तो दूर करून घेण्यासाठी ते सर्व महर्षि अत्रिच्याकडे जाऊन, त्यांना विनयपूर्वक नमस्कार करुन विचारू लागले,

'महाराज हे घडले तरी कसे? तेजाने तळपणारा भानू आणि अंधार माया पसरणारा स्वर्भानु हा विरोध कशासाठी?' बाल सुलभ असे प्रश्न त्या शिष्य गणांच्या मनात उठत. तसेच हे सर्व अत्रि संवेदनशील कविमनाचे आहेत. त्यांच्या मनात कोमल भावना तरंग उठत. निसर्गातील सौन्दर्य व माधुर्याचा

आस्वाद घेण्यात ते गुंग होत. त्यांची दृष्टी स्नेहपूर्ण असे. अशा त्या भावनाशील शिष्यांना निसर्गप्रेम समजावून देतांना महर्षि अत्रि सांगू लागले,

'हे अत्रिनो निसर्गामध्ये हे परस्पर विरोधी भाव आहेतच. मधुर वृक्षाला विषारी वेल विळखा घालून बसलेली आपण पहातोच ना? अग्निचा स्वभाव उग्र पण परिणामी तो मधुर आहे. जेथे सुमति तेथेच दुर्बुद्धिही आढळत नाही काय? त्याच प्रमाणे आकाशात भानु आहे तेथे स्वर्भानुही अपरिहार्य आहे. प्रकाशाचा तो विरोधी आहे. भानूला ग्रासून टाकणारा आहे.

सूर्यग्रहण हा निसर्गातील एक अपघात आहे. ही क्रमानुसार नियमित घडणारी घटना नाही. तुम्ही सर्वजण ऋषी आहात. मंत्रद्रष्टे आहात. परंतु चित्त सावध ठेवले नाही तर अंधार तुम्हालाही ग्रासल्या वाचून रहाणार नाही. संसाराच्या बंधनात तुम्हीही सापडून फसाल.

अज्ञानी असलेली माणसे या प्रमाणे फसली तर त्यांच्यावर दया करावी हे योग्य. पण ज्ञानी पुरुषांच्या बाबतीत त्यांना ग्रासून टाकणाऱ्या घटना अपघात असतात. पृथ्विलोकावर अंधाराच्याच गर्तेत पडलेले अनेक देश आहेत. पण त्यांचा विचार क्वचितच कोणाच्या मनात येत असेल. परंतु आकाशात तळपणाऱ्या सूर्यावर अंधाराचे अतिक्रमण होताच, आपण मंत्र प्रभावाच्या योगाने स्वर्भानुचे मायाजाल दूर केले त्याच प्रमाणे आपल्या अंतर्यामी जो ज्ञात रुप आत्मा आहे त्याला जर कोणी स्वर्भानु ग्रासू लागला तर त्याला तात्काळ दूर केलें पाहिजे. त्यासाठी आपल्या जीवन यज्ञाचे अग्निकुंड सतत प्रदिप्त ठेवले पाहिजे. त्यासाठी देवराज इंद्राला सोमरस अर्पण करायला हवा आहे. विश्वेदेव व मरुतांची उपासना करावयास हवी. मित्र आणि वरुण, अश्विनी कुमार, वरुण पर्जन्य, सविता, उषा आदि देवतांची स्तुति करून त्यांना आपल्या या संवत्सर महायागासाठी आवाहन केले पाहिजे व आपले जीवन त्यायोगे समृद्ध केले पाहिजे.'

याप्रमाणे ज्ञानाग्नि चेतवून महर्षि अत्रींनी सर्व ऋषिना सतेज केले. त्यांच्या मनातून जाणे अंधार दूर होऊन नवे तेज प्रगट होत असल्याचा त्यांना अनुभव झाला. सूर्यग्रहण क्वचित होते परंतु आपल्या अंतर्यामी तेजाला ग्रासणाऱ्या अज्ञानापासून दूर रहाण्यासाठी नेहमीच सावध रहावयास हवे हा महर्षिनी दिलेला दिव्य मंत्र त्यांच्या मनात काही नव्याच उर्मि निर्माण करीत होता. त्या अत्रिगणांच्यापैकी पहिल्या दोन ऋषिनी- बुध व गविष्ठर यांनी- अग्निची स्तुति करून म्हटले,

'अहो! ऋषिनी अर्पण केलेल्या समिधांच्या योगाने अग्नि प्रज्वलित

झाला आहे. घराकडे धावत येणाऱ्या गाईप्रमाणे अग्निचे दर्शन करण्यासाठी उषा धावत आली आहे. आकाशात सूर्याचा उदय होताच अग्नि विशेष तेजस्वी झाला आहे. खरे पहाता अग्नि हा स्वतःच भानुमान आहे. यजन करणाऱ्याच्या भावनेनुरुप तो समिद्ध होतो. माझे सहकारी गविष्ठर ऋषि स्तोत्र रचीत आहेत. आम्ही सर्व आत्रि अग्निला वंदन करून त्याचे स्वागत करीत आहो.

वृषाजान नांवाच्या ऋषिंना अग्नि हा कोणी राजकुमार असून राणीने त्याला लपवून ठेवले आहे अशी कल्पना मनात येऊन ते म्हणाले,

"हे चालणार नाही. हे युवती अग्निकुमारास तू का बरे लपवून ठेवीत आहेस ? माता आवू अरणि त्याला गर्भामध्ये धारण करून त्याचे रक्षण करते. पण तू मात्र त्याला कोंडून ठेवीत आहेस. तू त्याला मुक्त कर.'

दिव्य मंत्रबल असलेल्या वृषजान ऋषींची वाणी ऐकून अग्नि प्रगट झाला व पिशाच्चिनी राणी त्याला पकडण्यास सरसावतांच ती जळून भस्म झाली. ते पाहून सर्वजण वृषजान ऋषींचा महिमा गाऊ लागले.

सर्व लोकांचे रक्षण पोषण करणाऱ्या अग्निला विरोधी बळानी रोधून ठेवण्याचा प्रयास केला. परंतु अत्रिरुप वृषाजानांच्या मंत्रबलाने अग्नि मुक्त झाला. निंदा करणारे निंदक सुखेनैव निंदा करोत. त्यानी केलेली निंदा त्यानाच त्रासून टाकील. अग्निकुमाराचे रक्षण करणे हे आमचें कर्तव्य आहे."

अग्नि अपहरणाची कथा या ठिकाणी दिलेली आहे.

त्र्यरुण हा इक्ष्वाकु वंशातील राजा होता. वृषाजान हा त्याचा पुरोहित होता व मित्रही होता. एकदा मित्रत्वाच्याभावाने वृषाजान राजाच्या रथाचे सारथ्य करीत असता त्या रथाखाली चेंगरून एक ब्राह्मणाचा कुमार मरण पावला. वृषाजानाला अत्रिच्याद्वारे दिव्य मंत्राची शक्ती मिळालेली होती. त्या शक्तिच्या योगाने त्याने त्या कुमारास सजीवन केलें. परंतु अपघाताचा दोष वृषाजानावरच येत होता, म्हणून त्याने पुरोहितपद सोडून दिले व तो अरण्यात जाऊन राहिला.

पुरोहित जाताच त्याच्या मागून राज्यातील अग्निही निघून गेला. कोणाच्या घरात चूल पेटेना. अन्न शिजेना. प्रजाजनानी राजाला विनवले. राजाने पुरोहिताला विनंती करून राजपुरोहिताच्या जागेवर परत आणले.

राजपुरोहितानी अग्निच्या रोषाचे कारण शोधून काढले. राजाची एक राणीच पिशाच्चिनी होती व तिने अग्निला कुमाररुप करून लपवून ठेवले होते. अत्रिच्या मंत्रप्रभावाने ती राणी जळून भस्म झाली व अग्नि तिच्या बंधनातून मुक्त झाला.

अत्रिवृषाजानांनी अग्निला समिद्ध करून प्रजाजनांना उपदेश केला. 'जे नास्तिक इंद्राला मानीत नाहीत, त्याची स्तुति पूजा करीत नाहीत, त्यांच्यासाठी अग्नि कसा बरे समिद्ध होईल ? मी स्तुतीस्तोत्रांच्या योगानेच हा अग्नि चेतविलेला आहे.

तुम्हाला माहीतच आहे की पिशाच्चिनी जळून भस्म झाली त्यावेळी अग्नि ज्वाला तिला जाळून शांत झाल्या होत्या. ही पिशाच्चिनी म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून आपल्या ठायी असलेली नास्तिक बुद्धीच होय. अग्निची स्फूर्ति व चेतना यानी पूर्ण अशी श्रद्धा तिच्या कामास येत नाही.'

या ठिकाणी आराधनेसाठी इंद्र व अग्निला एकरुप मानले आहे. इंद्रावर ज्यांची श्रद्धा नाही त्यांना अग्निची प्राप्ति होत नाही. लोकांनी श्रद्धेने अग्निची पूजा करावी असे सांगताना ईष नांवाचे आत्रेय म्हणतात,

'हे मित्र गण, हे ऋत्विजांनो अग्निसाठी हविची सद्धिता करा. त्याला प्रसन्न करून घेण्यासाठी त्याची स्तुति करा. अग्नि कोठे आहे, असा निरर्थक प्रश्न करू नका. या वेळी तो माता अरणीच्या ठायी आहे परंतु अत्रिनी आपल्या दिव्य मंत्र शक्तिने त्याला शोधून काढले आहे.

हे अग्निदेव, आम्ही सर्व प्रजानन तुझी स्तुति करीत आहो. सर्व ऋत्विज एकत्र जमून होम-हवन करीत आहेत. आपण स्वत: या स्थळी प्रगट होऊन त्या सर्वांना रत्नांची समृद्धि देत आहात. होय तुम्ही आमच्या हृदयाच्या गुंफेतच लपून रहाता. परंतु जेथे जेथे साधा का होईना पण यज्ञ होतो, आहुति दिली जाते तेथे आपण दिव्य रूपाने प्रगट होता.'

गय आत्रेय स्तुतिच्या शेवटी आपल्या स्वतःच्या नांवाचा उल्लेख करतात. तर सुतंभर आत्रेय समिद्ध अग्निची स्तुति करून त्याला आपल्या यज्ञास येण्याचे आवाहन करतात.

'आमच्या सर्व कार्यात सिद्धि मिळवून देणाऱ्या अग्निदेवा, आपण आमच्या यज्ञ कुंडात प्रगटावे. नि:स्वार्थि माणसे घरोघरी अग्निच्या उपासनेचा प्रचार करतात. यजमानाने दिलेला हवि अग्नि सर्व देवांना पोचवतो. अग्नि हा देवांचा दूत होऊन प्रगटतो यज्ञाचे संकल्पबल वाढवणाऱ्या अग्निची पूजा व भजन भक्त मोठ्या प्रेमाने करतात.'

भानु-प्रकाश-जागृत करून स्वर्भानु- प्रकाशाला झाकून टाकणारा अंधःकार दूर करण्यासाठी अत्रि प्रार्थना करून अग्निला प्रसन्न करून घेत आहेत. वसुश्रुत, सुतंभर व धरुण हे तर यागाचे ऋत्विज आहेत. त्यांच्या बरोबर अग्निची स्तुति

करताना पुरु आत्रेय म्हणतात. ' या यज्ञात भानु-प्रकाश उपस्थित होवो. या हेतूने अग्निदेवाला आम्ही हवि अर्पण करीत आहोत. हे अग्नि आपणही या सूर्याला तेज-प्रकाश द्यावा. आम्ही मानव अग्निला मित्र मानून स्तुतिवचनांची भेट त्याला अर्पण करीत आहोत.'

द्वित ऋषींचा पुत्र मुक्तवाह आत्रेय स्तुतिवचनात आपले नाव गुंफून म्हणतो ' हे अग्नि महाराज, मी आत्रेय द्विताचा पुत्र, आपल्याला मुक्त-शुद्ध व सिद्ध केलेला हवि अर्पण करण्यासाठी आलो आहे. म्हणून ऋत्विज मला मुक्तवाह म्हणत आहेत. हे अग्नि आपला प्रकाश नित्य प्रज्वलित राहो त्यासाठी सोमरसाची आणि स्तुतिवचनांची संतत धार मी धरीत आहे.'

त्याचप्रमाणे आत्रेय वव्री स्वतःची अवदशा दूर करण्यासाठी अग्निला विनवीत आहे. प्रयस्वान नावाचे आत्रेय बंधू, सस, विश्वसामा, विश्वचर्षणी आणि वसूयु हे सर्व आत्रेय अग्निची स्तुति करून प्रकाश, स्फूर्ती व चेतना प्राप्त करुन घेत आहेत.

' आम्ही सर्व अत्रि स्तुति स्तोत्रांच्या योगाने प्रकाशाची वृद्धि करुने मधुर वाणीने अग्निला आलंकृत करीत आहोत.

या सर्व आत्रेयांच्या बरोबरच अत्रि कुलाची कन्या विश्ववारा सर्व पापनाशक वाणीच्या साह्याने अग्निची स्तुति करताना म्हणते, ' अग्नि जेव्हा समिद्ध होतो तेव्हा अंतरिक्षात तळपणाऱ्या सूर्याचे तेज वाढते व उषा विस्तीर्ण होते. नमनपूर्वक स्तुतिवचनांनी भरलेली वाणी आणि धृताने भरलेली आहुती विश्ववारा होऊन अग्निच्या समीप जात आहे.

हे अग्नि देव, आमच्या कुलाचे भाग्य सतत वाढत राहो. या कुलांतील पति पत्नींचे संबंध स्नेहमय रहावेत अशी प्रेमाची ऊब आपल्या कृपेने आम्हांला लाभो.

या सर्व ऋषिवरांच्या सहकार्याने सुरु केलेल्या महायागाच्या नेत्या प्रमाणे भौम अत्रि काम करीत आहेत. अनेक राजे व प्रजाजनही त्यासाठी झटत आहेत· पुरु, अनु, द्रुहु, तुर्वसु व यदु या हिमालयाच्या पायथ्याशी वसणाऱ्या पंच जाती. त्या सर्वांचे सार्वभौम प्रतिनिधी अत्रि ' पाच जन्य ' या नावाने ओळखळे जात. सर्व राजे व प्रजा त्यांना सारखाच मान देत.

महर्षि अत्रिच्या या व्यापक प्रभावामुळे प्रभावित झालेल्या देवराज इंद्राने त्यांच्याशी सख्य केले. अग्नि व अत्रि यांच्यात जशी एकरुपता होती तशीच इंद्र व अत्रि यांच्यात राजा व महाराजा यांच्यासारखी समानता होती. इंद्र हा देवांचा राजा होता तर अत्रि ऋषिराज होते. ' महाराज ' होते.

त्र्यरुण, त्रसदस्यु, भारत, अश्वमेध, ऋणंचय, रौशम, रथविति, तरन्त, पुरुमीढ, राणी शशीयसी, या सर्वांनी महर्षि अत्रिंना उत्तम प्रकारचे दान दिलेले आहे. दान व स्तुति स्वीकारतांना महर्षि आभारवश झालेले आहेत त्यांच्या ठायी दिव्य अशी मंत्रशक्ति असली तरी सामान्य व्यवहारासाठी उपयोगी पडणारी साधने अन्न वस्त्र व धन लोकांच्या कडूनच महर्षिना मिळत असे. उलट लोकांना सुख समृद्धि व स्वराज्य सिद्धी मिळावी म्हणून महर्षि इंद्र व मित्रावरुण यांच्या सहकार्यासाठी त्यांची प्रार्थना करीत.

संवत्सर महायागाच्या प्रसंगी इंद्राची स्तुती करताना देव राजाबरोबरच विश्वेदेव, मरुत, मित्रावरुण, अश्विनीकुमार वगैरे देवांचीही स्तुति केलेली आहे. भौम, अत्रि सहित इतर अत्रिगणांची स्तुतिरचना सरळ व भावपूर्ण अशी आहे.

शक्तिगोत्राच्या गौरिवीति नामक ऋषिंनी इन्द्राचा महिमा वर्णन करतांना म्हटले आहे, ' हे देवश्रेष्ठ, मानवांनी केलेल्या या महायागात मरुतांनी तीन तेजस्वी तत्वे धारण केली आहेत. पृथ्वीवर अग्नि, अंतरिक्षात वायु व आकाशात सूर्य. या तीन देवतांच्या योगाने त्रैलोक्य प्रकाशत आहे. देवराज इंद्र मरुतांचे हे कार्य पहात आहे. महर्षि अत्रि महाराज हेही आमचे कार्य देवराजाप्रमाणेच पहात आहेत.'

बभ्रु, अवस्यु व गातु या तिघांनी महायागासाठी आलेल्या इन्द्रराजाच्या बहुविध पराक्रमाचे वर्णन केले. प्राजापत्य, संवरण व आंगिरस प्रभुवसु हेही या महायागाचे ऋत्विज असून हा याग सर्वांच्या कल्याणासाठी असल्याचे त्यांनी आपल्या स्तोत्रांत सांगितले आहे. प्रभुवसु म्हणतात, ' हे देवराज ! चारी वर्ण व पंचजन सर्वांचे आपण रक्षणकर्ते आहांत. आपण आमचे होऊन या महायागासाठी या. आमची मधुर स्तोत्रे तुमच्या दिव्य स्वरूपास अनुसरून असोत. '

दिवस उगवल्यावर अग्नि विशेष तेजाने तळपू लागतो. उषेचे सौम्य तेज व सूर्याचे तेजस्वी किरण यांचा सुयोग साधून महायागाच्या सवन कार्याचा आरंभ होतो. तो दिवस मोठा मंगल असतो. यागाची सुरुवात, ' आम्ही देवराज इंद्रासाठी सोमरस तयार करींत आहो ' अशा मंगल वचनांनी होते.

देवराज इंद्राच्या उपस्थितीत भौम अत्रि महायागाची प्रक्रिया समजावून सर्व ऋत्विजांच्या सहकार्याची प्रशंसा करीत आहेत. स्वर्गीय रथातून इंद्र व इंद्राणी यांना उतरतांना पाहून अत्यंत हर्षित होऊन अत्रिगण म्हणतात—

' अहो, पहा पहा ! इन्द्रराजाच्या पावलाकर पाऊल टाकीत इन्द्राणी पण आपल्या यज्ञ मंडपात येत आहे. देवराज हात धरून तिला रथातून उतरवीत आहे.

आता आपल्या यागात कसलीच उणीव राहिली नाही. आपल्या सर्व इच्छा परिपूर्ण होऊन विपुल अन्नधान्य व धन-संपत्तीने आपली भांडारे भरून जातील.'

ज्या यजमानांच्या यज्ञमंडपात प्रवेश करून इन्द्र दही व सोमरसाचा स्वत: स्वीकार करतो त्या भाग्यवान यजमानाचे सर्व दु:ख दुर होते. अशा राजाच्या प्रजाजनांचा योगक्षेम सरळ व उत्तम रितीने चालतो.

खरोखरीच ज्याला सूर्याचा स्नेह प्राप्त करून घ्यावयाचा असेल, अग्निची कृपा मिळवण्याची इच्छा असेल त्याने प्रथम इन्द्राला सोमरस अर्पण करावयास हवा. कारण देवामध्ये श्रेष्ठ अशा इन्द्राने सूर्याला संकटातून सोडवले आहे व अग्निस प्रज्वलित ठेवणाराही तोच आहे. फार काय सूर्य व अग्नि ही त्याचीच रुपे आहेत.

हे चित्रविचित्र रुप धारण करणाऱ्या देवराजा, आम्हाला जे काही देण्याची इच्छा होईल ते संकोच न ठेवता आपण द्या. आम्ही आपले आत्मीय जन आहोत. आपल्या हातानी भरभरून धन, साधन, संपत्ति आपण आम्हाला द्यावी.'

सूर्य ग्रहण सुटले व अग्निही तेजाने तळपू लागला. सर्व देव भयमुक्त झाले. स्वत:चे काम झाल्यावर त्या विश्वेदेवांनी निरोप मागितला. अत्रिनी त्या सर्वांचा विशेष आदरसत्कार करून स्तुतिपूर्वक सोमरस अर्पण केला. त्या योगाने सर्वच देव प्रसन्न झाले.

भौम अत्रींनी सहकार्याच्या भावनेने विश्वेदेवांची स्तुति केली आहे. ऋत्विज काश्यप अवत्सारांनी पण देवस्तुति केली. त्या स्तुति सूक्तात अवत्सार, विश्ववार सदापूण सुतंभर या ऋषींच्या नावाचा निर्देश करून मित्रत्वाची भावना व्यक्त केली आहे. या ऋषी मंडळीनी साध्या, सरळ शब्दात म्हटले आहे, 'हे विश्वेदेवांनो आम्हांला जे प्रत्यक्ष दिसते तेच आम्ही शब्दांत व्यक्त करून तुमची स्तुति करीत आहो. दुसऱ्या कोणी म्हटलेलें वा सांगितलेले परत म्हणून आम्हांला कोणाचे अनुकरण करावयाचे नाही. सर्व देव आमच्या इच्छा सफल करतात.'

'हे देवांनो, खरी गोष्ट अशी आहे की जे देव आमच्यासाठी जागृत असतात त्यांची स्तुति आमच्या ऋचांतून केलेली आहे. जागृत देवतांनाच आमची सामगाने पोचतात. सोमरसाने भरलेल्या या पात्रांत साक्षात सोम देवताच वास करीत आहे. त्या सोमाचेही म्हणणे आमच्याच प्रमाणे आहे. जागत्या देवांच्यासाठीच सोमरसाचा उपयोग केला जातो.'

'अग्नि हा सर्व देवतांच्या मध्ये सतत जागृत देव आहे. रात्रंदिवस जागत्या

अग्निची स्तुति आमच्या ऋचातून केली आहे. आमची सामगीतेही अग्नि ऐकतो व आमच्या सोमरसाची पात्रेही त्याच्यासाठी सदैव भरलेली आहेत.'

प्रतिक्षत्र, प्रतिभानु व प्रतिप्रभ असे समानशील, सारख्या स्वभाव धर्माचे अत्रि व आत्रेय स्वस्ति विश्वेदेवांची या प्रमाणे स्तुति करून सर्वांच्या कल्याणासाठी प्रार्थना करीत आहेत.

' आम्हां सर्वांचे स्वस्ति कल्याण करावे. पूषा व द्यावा पृथ्वि, शोभायमान ज्ञानाच्या योगाने आमचे कल्याण करोत. वायु व सोम या देवांची आम्ही स्वस्ति कल्याणासाठी प्रार्थना करीत आहो. सोम हा सर्व लोकांचा जीवनरस आहे. देवांचा गण–पति जो बृहस्पति त्याला आम्ही स्वस्ति कल्याणासाठी विनवीत आहो. तो देवगुरू आमच्या दिव्य मंत्राचे रक्षण करो. माता अदितीचे अरुणादि बारा पुत्र आमचे कल्याण करोत.

★★

# २ / मंत्र दर्शनः जीवनाची परमसिद्धी

( ऋग्वेद पांचवे मंडल )

अत्रि महाराज परम तपस्वी होते. मुनि होते. मंत्र द्रष्टे होते. त्यांनी मंत्रांना साक्षात मूर्त रूपाने साध्य करून घेतले होते. त्यांचे जीवनच मंत्रमय होऊन गेले होते. त्यांनी आपल्या गुरुपदी मंत्राचीच प्रतिष्ठापना केली होती. त्यांच्या मनात मंत्रांविषयी अहोभाव होता.

'गुरुंची सेवा, पूजा करून त्यांच्या कडून ज्ञान प्राप्त करून घ्यावे. गुरुकरवी साधारण कामे करून घेऊ नयेत. मंत्र मूर्त रूपाने दर्शन देत असले तरी सामान्य कामासाठी त्याचा उपयोग करू नये. मंत्र विश्वकल्याणासाठी आहेत. सर्वांच्या हितासाठी, परपीडा दूर करण्यासाठी मंत्राचा उपयोग करावा.' अशी ऋषींची उदार मति त्यांच्या मंत्राची दिव्यता वाढवीत होती.

मंत्राच्या आकर्षणामुळे देशोदेशीचे ऋषि, तपस्वी व विद्वान शिष्य अत्रींच्या गुरुकुलांत येऊन रहात.

योग, व्रत, तप व साधना करणाऱ्यांना मंत्रांचा अधिकार प्राप्त होतो. अशा तपस्व्यांना महर्षि अत्रि मंत्रदान करीत. ज्याप्रमाणे महर्षिना मंत्रदर्शन होई त्याच प्रमाणे अशा तपस्व्यांनाही होई. तेही मंत्रद्रष्टे होत. अत्रि होत. गुरुकुलांत असे अनेक अत्रि मंत्रदर्शनाचा लाभ घेऊन आपले जीवन सार्थकी लावीत.

अर्चनानस हा अत्रि महाराजांचा पुत्र होता. तोही पित्या सारखाच तपस्वी व मंत्रद्रष्टा होता. त्याचा पुत्र श्यावाश्व हा देखील आपल्या पित्यासारखा व पितामहास शोभणाराच होता. गुरुकुलाच्या शीतल छायेत राहून त्याने आगम निगमाचे ज्ञान प्राप्त करून घेतले होते. त्यावरून त्याच्या उज्वल भवितव्याची प्रतीती होण्यासारखी होती.

एका सायंकाळी राजा रथवीति आश्रमात येऊन पोचला. कुलपति अत्रि महाराजांनी त्याचा यथोचित सत्कार केला व त्याच्या आगमनाचे कारण विचारले. राजा नम्रतापूर्वक प्रणाम करून सांगू लागला–

'भगवन्, हिमालयाच्या अंकावर खेळणाऱ्या गोमती नदीच्या काठी राजा दर्भाचे राज्य आहे. मी राजा दर्भाचा पुत्र असून माझ्यावर राज्याचा भार सोपवून महाराज दर्भ वनात निघून गेले. मी धर्म समजून प्रजेचे पालन करतो व पित्याने ठेवलेली संपत्ति हा प्रजेचा निधी आहे असे मानून तिचे रक्षण करतो. ही संपत्ती सध्या बरीच वाढली असून तिचा विनियोग धर्मकार्यासाठी करावा अशी माझ्या प्रजेची भावना आहे.'

'राजन्, ही भावना खरोखरीच मोठी पवित्र आहे. यज्ञयाग केल्याने सर्व लोकांचे कल्याण होऊन दैवी संपत्ति त्यामुळे प्राप्त होते. तुझ्या या संकल्पाला माझा आशीर्वाद आहे.'

महर्षी अत्रींनी केलेली ही प्रशंसा ऐकून राजाने हात जोडून प्रार्थना केली' 'आपण स्वत: आमच्या यज्ञासाठी यावे व सर्वांना आशीर्वाद द्यावे.'

महर्षि अत्रींनी आपला पुत्र अर्चनानस् याला बोलावून राजाबरोबर जाण्यास सांगितले. राजाने अर्चनानस् ऋषींना प्रणाम केला. महर्षींच्या सारखेच तेही अत्यंत तेजस्वी होते. ते आपला पुत्र श्यावाश्व याला घेऊन राजासह गोमती नदीच्या किनारी यज्ञभूमीवर गेले.

कुश व दर्भांच्या योगाने तो प्रदेश पवित्र झालेला होता. वड, पिंपळ, उंबर, पळस इ. वृक्षांची शीतल छाया सर्वत्र होती. प्रजेतील प्रमुख पंचजन पुढे झाले व त्यांनी सर्वांच्या मदतीने यज्ञ मंडप उभारला. पंचसंस्कारांनी ती भूमि पवित्र करून घेतली. यज्ञाची वेदि यथासांग रचून मंत्रोच्चार करून अरणींच्या मंथनातून अग्नि प्रकट करण्यात आला. राजा व राणी उभयतांनी थाळीमध्ये ठेवून त्याला कुमाराप्रमाणे पात्र संस्कार करून नंतर महावेदीवर समिद्ध अग्नीची प्रतिष्ठा केली. तुपाची आहुति देऊन त्यास विशेष प्रज्वलित केले. अग्निच्या साक्षीने सोमवेली खरलांत घालून सोमरस काढण्याचा विधी करून सोमपात्रे भरून देवराज इंद्राला अग्निसह आवाहन करण्याचे स्तुतिमंत्र म्हणावयास सुरुवात केली.

राजा व राणी उभयतांनी यज्ञाची दिक्षा घेतली होती. ऋत्विजांच्यासह ते दोघे यज्ञकार्यात गुंतले. राजकन्या यशस्वती सेवा करीत होती. राज सेवकांच्या प्रमाणेच ती सर्व ऋत्विजांच्या सेवेसाठी तत्पर होती. तिच्या पवित्र भावनेने सर्व ऋत्विज अत्यंत प्रसन्न होत.

यज्ञाच्या पूर्णाहुतिच्या प्रसंगी राज्यांतील पंचजन एकत्र जमले होते. राजा व राणीने आचार्य आर्चनानस् व इतर सर्व ऋत्विजांना विपुल दान देऊन संतुष्ट केले व त्यांचे आशीर्वाद मिळवले. सर्व प्रजाजनांच्या सहकार्याने महायाग सफल संपूर्ण झाला.

यज्ञाचा समारंभ नदीच्या काठी करण्यात आला होता. मुख्य राजधानी तेथपासून थोड्या अंतरावर होती. राजाने यज्ञानंतर आदरपूर्वक ऋषींना राज-भवनात येण्याचे आमंत्रण दिले. अणि पिता-पुत्राने राजाचे आतिथ्य स्वीकारले. राजकुमारी यशस्वती त्यांची सेवा करीत होती. ऋषीना या सेवाभावी सुशील कन्येविषयी आदर वाटू लागला होता व ऋषिकुमाराच्या मनात आकर्षण निर्माण झाले होते. परंतु यज्ञाच्या पवित्र वातावरणात इतर विचार अनुचित वाटल्याने सर्वांनी त्या बाबत मौन स्वीकारले होते.

राजभवनांत त्या दोन्ही तरुण मनांत यौवनसुलभ भावना निर्माण होण्यास अनुकूलता होती. राजा रथवीति राज्य कारभाराचे काम आटोपून अतिथींच्या दर्शनासाठी आला त्यावेळी ऋषि अर्चनानस् व कुमार श्यावाश्व उपवनात नित्यकर्म करण्यासाठी गेले होते. चपल ऋषिकुमार पूजापाठ आटोपून परत फिरला तेव्हा महाद्वारात त्याची व राजाची भेट झाली. यज्ञाच्या वेळी त्यांचा चांगला परिचय झालेला होता व परस्पर मैत्रीची भावना होती. त्यामुळे त्यांच्या बोलण्या चालण्यात स्वाभाविकच मोकळेपणा होता. तेव्हा ऋषिकुमाराला लगबगीने परततांना पाहून राजाने त्याला विचारले, ' हे काय ? वडिलांना उपवनातच सोडून इतक्या घाईने परतला ?'

' राजन् ! हे आहे राजभवन. येथे नेहमी सावध रहावे लागते. पिताजींना उपवनच बरे वाटते. पण मला राजभवनाचे आकर्षण वाटणे साहजिकच नाही कां ?'

' ऋषि कुमार ! राजवाड्यातली समृद्धि ही अगदी सामान्य आहे. आपल्या मंत्र साधनेपुढे तर ती काहीच नाही. पण कुमार, येथे आपल्याला काही असुख नाही ना ?' राजाने सौजन्याने विचारले.

' येथे ? येथे असुख... आपली आज्ञा असेल तर माझी एक कामना– जी या ठिकाणी राहिल्यामुळे निर्माण झाली आहे ती सांगतानाही मला संकोच वाटत आहे.'

राजा रथवीति चतुर होता. सारे ओळखूनच त्याने पिता पुत्रांना राजधानीत मानाने आणले होते. पण दिव्य मंत्राच्या वातावरणात जन्मापासूनच वावरणाऱ्या

कुमाराला संसार व्यवहारापासून अलिप्त राहण्याची इच्छा असली तर आपली मागणी वाया जाईल अशी भीति त्याच्या मनात होती. ऋषिकुमाराचा मनोभाव त्याला लगेच उमगला. तो विनयाने म्हणाला, 'कुमार! तुम्ही तर आमचे स्वजनच आहांत. आपली इच्छा असेल ती मोकळ्या मनाने सांगा.'

'राजन, आपल्या कन्येने माझे चित्त हरण केले आहे! आपल्याला उचित वाटत असेल तर आपली कन्या आपण मला द्यावी.'

राजा यावर कांही उत्तर देणार तोच ऋषि अर्चनानस् येऊन पोचले. आपला पुत्र व राजा दोघेच एका बाजूला बोलत असलेले पाहून त्यांनी प्रसन्नतेने विचारले, 'ओहो! दोघेजण कोठली रहस्यमय मंत्रणा करण्यात गुंग झाला आहांत?'

'भगवन्' राजाने प्रणाम करून म्हटले, 'कुमाराला या राजभवनाची ओढ लागली आहे. त्यांनी माझ्याकडे एक मागणी केली आहे. काय ती सांगू काय?'

'राजा, त्याची मागणी काय ती मला माहीत आहे! त्या योगाने आपला परस्पर संबंध दृढ होईल अशी भावना माझ्याही मनांत आली आहे. आपल्याला ही कशी काय वाटते?'

'भगवन्, आपली भावना उचीतच आहे. यांत शंका नाही. पण मला या बाबतीत राणीलाही विचारावयास हवे.'

राजाने त्या पिता पुत्रांचा निरोप घेतला. व ते उभयता ऋषि रात्रीच्या शीतल छायेत झोपून गेले.

राजा रथवीति कुशल होता. तर त्याची राणी त्याच्याहूनही चतुर होती. महायागाची पूर्णाहुती झाल्यावर ऋत्विज निरोप घेऊन आपआपल्याला आश्रमाकडे परत फिरत–हा स्वाभाविक, सामान्य व्यवहार. परंतु ऋषि व ऋषिकुमार यागानंतर राजभवनात अतिथ्य स्वीकारण्यासाठी आले, व राजकुमारीही त्यांच्या सेवेत व्यस्त रहात होती याचे मर्म राणीने तात्काल ओळखले होते. पण राणीही योग्य वेळेची वाट पहात होती. राजाने ऋषिकुमाराची मागणी तिच्या समोर मांडली त्यावर ती म्हणाली, 'राजन्, कुमार सर्व दृष्टीनें योग्य आहे. तो विद्वान आहे, गुणी आहे, उदारचरित् आहे. पण त्याच्यात एक वैगुण्य आहे, तो ऋषि नाही! त्याला अद्याप मंत्रदर्शन झालेले नाही.'

'पण तो ऋषिकुमार आहे. त्याचे वडील आणि आजोबा मोठे ऋषि-महर्षि आहेत. तेव्हा परंपरेने हाही ऋषीच नाही का? राजाने समजावण्याचा प्रयत्न केला.

पण राणीला ते मान्य नव्हते. ती म्हणाली,

'राजन्, धन, साधन, संपत्ती ही परंपरेने वारसाला मिळते. पण विद्या आणि संस्कार अंतरातच जागावे लागतात. पित्याने भोजन केले तर पुत्राला ज्याप्रमाणे संतोष होणे शक्य नाही, त्याप्रमाणे पित्याचे ऋषिपद पुत्राला लाभणे शक्य नाही. आपण स्वत: राजर्षि आहात, माझे वडीलही राजर्षि आहेत. आपली कन्या राजर्षिला नाही तरी ऋषीला देणे उचित नाही का ? ती राजमाता नाही झाली तरी वेदमाता झाली तर तिच्या जीवनाचे सार्थक होईल. कोठल्याही मातापित्यांची अशीच कामना असणे स्वाभाविक आहे. मंत्रदर्शन हीच जीवनाची परमसिद्धी आहे.

राजाला राणीचे म्हणणे पटले. त्याने अतिथी पितापुत्रांना आदरपूर्वक, मानपान ठेवून वागवले. परंतु ऋषिकुमाराची कामना पूर्ण करणे त्याला शक्य नव्हते. अर्चनानस् ऋषींनी त्याविषयी फिरून विचारल्यावर राजाने त्याना नम्रतापूर्वक म्हटले.

'भगवन्, या विषयात माझ्याहून राणीची मती विशेष आहे. आपण ऋषी आहात. आपले पूज्य पिताश्री पण ऋषी आहेत. पण आपल्या पुत्राला अद्याप ऋषिपद प्राप्त झालेले नाही, मंत्रदर्शनाशिवाय जीवनाला अर्थ काय बरे ?' .

यावर ऋषी काही बोलू शकले नाहीत. राणीचे मत त्यानाही मान्य होते. त्यांच्या पुत्राने सर्व विद्यात पारंगतता मिळवली होती हे खरे. पण मंत्रांचे दिव्य दर्शन घेण्याचे भाग्य त्याला लाभले नव्हते. ऋषी निरुत्तर झाले.

ऋषिकुमाराच्या कानावर ही गोष्ट गेली. त्यानंतर त्याला त्या राजभवनांत रहाणे अवघड वाटू लागले. ती रात्र कशीबशी काढून दिवस उगवतांच त्या पितापुत्राने राजाचा निरोप घेतला. राजाने दिलेली विपुल संपत्ति घेऊन ते दोघे आपल्या आश्रमात जाऊन पोंचले.

'वत्स, या गुरुकुलात येणाऱ्या प्रत्येक अधिकारी शिष्याला माझ्या संगतिच्या प्रभावामुळे मंत्रदर्शन झालेले आहे. तुझ्या पित्याने आपल्या स्वत:च्या पुरुषार्थाच्या बळावर तो अधिकार मिळवला आहे. संपत्ती, धनधान्य वारस पुत्रांना मिळते. पण मंत्रदर्शनाचा अधिकार त्याप्रमाणे मिळत नाही. ज्याच्या अंत:करणात मंत्र जागतो त्याचे जीवन धन्य होते. तू एकान्तसेवन कर. व्रत व नियमांचे पालन करून तपश्चर्या कर. तुला माझा आशिर्वाद आहे. मंत्र म्हणजे साक्षात् गुरु स्वरुप आहे. त्याची कृपा झाली की तू निश्चित ऋषि होशील.'

महर्षि अत्रि महाराज खरोखरीच पारसमण्याप्रमाणे होते. त्यांचा प्रभाव काही विलक्षणच होता. तो प्रभाव जाणणारे सारेच ऋषि झाले. तथापि अत्यंत

जवळचा असा श्यावाश्व मात्र ऋषिपद मिळवू शकला नव्हता ! पारसमणि फडक्यात बांधून ठेवला तर त्याचा स्पर्श तो जवळ असला तरी कसा होईल ? मात्र प्रेमामुळे महर्षिच्या पुत्रालाही मंत्रदर्शन झाले नव्हते. त्यासाठी त्याला स्वत: तप करावे लागले होते. त्याचप्रमाणे आता त्यांच्या पुत्रालाही तो मार्ग घेणे भाग होते.

ऋषिकुमार श्यावाश्व गुरुकुल सोडून निघाला. हिमालयाच्या एका कंदरेत राहून त्याने उग्र तप करण्यास सुरुवात केली. कडक नियम व व्रत पाळून त्याचे शरीर पार सुकून गेले. तपाच्या योगाने त्याच्या सुकलेल्या कायेत नव्या चैतन्याचा संचार झाला.

अत्यंत रमणीय असा प्रभातकाल होता. उषेची दिव्य प्रभा क्षितिजावर फाकली होती. उंच पर्वताच्या शिखरावर ऋषिकुमार उभा होता. रात्रीचा अंधार भराभर मावळत होता तसेच त्याच्या मनावर असलेले अज्ञानाचे पटल पण दूर होत होते. नवी उब, नवी स्फूर्ति जाणवत होती. अंतर व बाह्य या मधला भेद नाहीसा होत होता. अभेदाच्या भूमिकेवरून त्याला सारे वेगळेच दिसू लागले. आकाशातून उतरणाऱ्या दिव्य मूर्ती पाहून तो मुग्ध झाला. तो आपल्याशीच विचार करू लागला. हळू हळू त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडू लागले.

' हे दिव्य मूर्तींनो, तुम्ही सर्व कोणी श्रेष्ठ परोपकारी देव मूर्ती आहांत असे वाटते. तुम्ही कोण ? मला सांगाल काय ? एकामागून एक तुम्ही धरणीवर उतरत आहात. खूप दुरून आलात असे वाटते.

आणि इतक्या दुरून असे एकटे का बरे चालत आहात ? तुमची वाहने, तुमचे अश्व कोठे आहेत ? घोड्यांचे लगाम, पर्याण (जीन) कोठे आहेत ? घोड्यावर स्वार होऊन त्यांच्या गतिचे नियंत्रण करणारे तुम्ही आज असे लगबगीने पायी चालत कोठे निघाला आहात ?

आणि हे काय ? जसे शीघ्र गतिने आलात तसेच परतण्याची पण घाई करीत आहात ? तुमच्या हातात चाबूक चमकत आहेत व दुसऱ्या हातात लगाम ओढून धरलेलीही दिसत आहेत. तुम्ही सर्व कोण ? तुमचे नाम, रूप मला सांगाल काय ? तुम्ही परोपकारी दिसता. तुमची कांति उगवत्या सूर्यासारखी, तळपत्या अग्निसारखी तेजस्वी आहे, त्यावरूनही तुमचा परिचय होण्यासारखा आहे.'

याप्रमाणे श्यावाव विचार करीत असताच त्या मूर्ति अदृश्य देखील झाल्या. सात भ्रातांच्या ओळीत चालणारी, रूपाने व आकाराने सारखी दिसणारी,

सारखीच वेषभूषा केलेली ती रूपडी विजेच्या वेगाने तेथून पसार झाली. त्यांची ओळख तात्काल जरी पटली नाही तरी थोडा वेळ विचार करताच एकाएकी मनाची कवाडे उघडली. दिव्य प्रभा फाकली. त्याला स्पष्ट कळून चुकले,

'ओहोहो–हे तर मरुद्गण माता रोदसी व पिता रुद्र यांचे ते पूत्र. माझ्या कल्याणासाठी ते येथे उतरले होते. पण मग ते असे एकाएकी परत का बरे गेले ?'

आनंदातिशयाने ऋषिकुमार रोमांचित झाला होता. साक्षात् मंत्र दर्शन झाल्याचा हर्ष त्याला झाला होता. तो आपल्या गुंफेत परतला. पण तेथे त्याला चैन पडेना. त्याची तपश्चर्या सफल झाली होती. झालेल्या दिव्य दर्शनाचा अनुभव रुजू करण्यासाठी तो मरुतांच्या त्वरित गतीने तेथून निघाला.

पण जायचे कोठे ? पिता व पितामह याना आपल्या दिव्य अनुभवाविषयी सांगावे अशी ओढ वाटत होती. तर दुसरीकडे रथवीती राजाची कन्या–तिचे आकर्षण खेचीत होते. त्यामुळे हर्षाने धावणाऱ्या मनाच्या अश्वांचे लगाम खेचले गेले.

तो अशारितीने गोंधळला असता रस्त्यात त्याला राजा तरन्त व त्याची राणी शशीयसी रथातून जात असलेले भेटले. त्या दोघानी खाली उतरून तपस्वी ब्राह्मणास वंदन केले व विनयपूर्वक हात जोडून विनंती करून रथात बसवून आपल्या राजधानीत नेले. राणी शशीयसी मोठी चतुर स्त्री होती. तिने त्या तपस्व्यास ओळखले व राजाला सांगितले,

'हा ऋषिकुमार अत्रि कुलातील ऋषी अर्चनानस् यांचा पुत्र असून त्याला मरुतांचे दिव्य दर्शन झाले आहे. त्याच्या अंतरी मंत्र जागृत झाले आहेत. आपण त्याचे पूजन करू या.'

राजा व राणी उभयतानी भक्तिपूर्वक श्यावाश्वाचे पूजन केले व त्याला विपुल दक्षिणा देऊन प्रसन्न केले व शेजारच्या देशात राजाचा भाऊ पुरुमीढ राज्य करीत होता त्याच्याकडे त्याला पाठवले.

राजा पुरुमीढाने पण त्याचे पूजन करून आदरपूर्वक धनधान्य अर्पण केले.

ऋषि सकाळी निघाले होते ते रात्री पुरुमीढाच्या राजधानीत पोचले होते. राजाच्या प्रेमळ आग्रहाला वश होऊन त्यांनी रात्री त्याच्याकडे मुक्काम केला. परंतु मन मात्र अद्याप गोंधळून सैरावैरा धावतच होते ! पित्याकडे जावे की राजभवनाचा मार्ग घ्यावा–विचारांच्या या चक्रात सांपडलेले मन दिव्य स्वप्नसृष्टीत हरवून गेले.

श्यावाश्वाला जणू दिव्य पंख फुटले होते. त्याने अनंत आकाशात भरारी

घेतली होती. एका बाजूला सुदुधा गोमती खळखळ वहात होती. तिच्या तीरावर अत्रींचे गुरुकुल होते. तर दुसऱ्या बाजूला राजा रथवीतीचे विशाल राजभवन दिसत होते. त्या दोन्हींच्या मधे आपले पंख पसरून श्यावाश्व स्थिर तरंगत होता! कोठे जावे ? निश्चय होत नव्हता. त्याला एक दिव्य मूर्ति समोर दिसू लागली. तिने सर्वांगावर काळे वस्त्र लपेटून घेतले होते तरीही तिचे तेज त्यांतूनही तळपत होते. श्यावाश्वाने तिला ओळखले.

'रजनी राणी! मी तुम्हाला ओळखले. माझ्या मनातला गोंधळ दूर करण्यासाठी तर तुम्ही आला नाहीत ? मानवी मनाच्या उर्मि आणि वेदना यावर हे देवी तुम्हीच पांखर घालता. माझी मनःस्थिती तुम्हीच जाणू शकाल.'

'तरुण ऋषिवरा, तुझ्या भावनांचा आवेग जाणूनच मी आलें आहे. आणि राजा रथवीतीच्या कन्येचे दुःखही मी जाणते. तुझ्या ऋषिपदाविषयी खात्री पटली की राजमाता तुमचे दुःख निश्चित दूर करील. पण त्यासाठी तू स्वतः तेथे जावे म्हणतोस ?'

'देवी! माझे मनोगत खरेच आपण ओळखलेत. पण मी स्वतः राजाकडे गेलो नाही तर माझा संदेश कोण बरे पोचवील ?'

'मी तुझा निरोप पोचवीन. रात्री ही देवांचे दूतकर्म करणारीच आहे व रही जीवांचे मीलन घडवून आणणे हे तर माझे कामच आहे. मी आताच जाते पहा.'

आणि एकाएकी दृश्य पालटले. रजनी देवी राजभवनांत राजाच्या महालात जाऊन मधुर स्वराने सांगू लागली.

'राजन्, हे राजा, ऋषिकुमार श्यावाश्वाला दिव्य मंत्रांचे दर्शन झाले. तो ऋषि झाला आहे.'

ते शब्द ऐकून राजा खडबडून जागा झाला. चारी बाजूला पाहू लागला. पण कोणीच दिसेना. आश्चर्यचकित होऊन तो विचार करू लागला.

'हे कोण बरे बोलत आहे ? किंवा माझ्या मनातली इच्छाच हा आभास निर्माण करीत आहे ? श्यावाश्व ऋषि झाला तर आम्हा सर्वांचीच मनोकामना सफल होईल!'

'राजन्! मी रात्रीची देवता. मी काळे वस्त्र धारण करते, त्यामुळे आपल्याला दिसत नाही. माझे काम निरोप पोचवण्याचे आहे. मी ऋषि श्यावाश्वाचा निरोप घेऊन आले आहे. याप्रमाणे बोलून विजेच्या वेगाने ती रात्रीची देवता तेथून नाहीशी झाली. त्यानंतर राजाला झोप आली नाही. तो आनंदाने वेडावून

गेला होता. राणीला उठवून त्याने ते वर्तमान तिला सांगितले व दिवस उगवताच राणी व राजकन्येसह तो अत्रींच्या आश्रमात जाण्यास निघाला.

इकडे श्यावाश्वाचे मन पण शांत झाले होते. तोही नि:शंक मनाने आश्रमाकडे वळला. आपला पिता व परमपिता यांच्याप्रमाणेच तोही आता मंत्रद्रष्टा ऋषि होता. अत्रींना त्यामुळे परम आनंद झाला होता. गुरुकुलातील सर्व आत्रेयांनी या नव्या ऋषिवराचा आदरपूर्वक सत्कार केला. महर्षि अत्रींना साष्टांग नमस्कार करून त्यांच्या पौत्राने त्यांचे आशीर्वाद घेतले. पिता अर्चनानसाने आनंदभराने आपल्या पुत्राला आलिंगन दिले. या आनंदात भर घालण्यासाठीच राजा रथवीति राणी व राजकन्येसह तेथे येऊन पोचला. महर्षिना सर्वांनी प्रणाम केला. ऋषि अर्चनानसांनी अतिथींचा योग्य सत्कार केला भोजन व विश्रांती नंतर राजा ऋषिंना म्हणाला,

'ऋषिवर, आपण स्वत: मंत्रद्रष्टे असून आपले पितृदेव महर्षि आहेत. आणि आतां तर विशेष आनंदाची गोष्ट. आपण ऋषि–पिताही आहांत!'

आपल्या पतिच्या बोलण्याचे समर्थन करून राणी म्हणाली, 'भगवन्, मी राजर्षिची कन्या असून राजर्षिची पत्नीही आहे. माझ्या कन्येचा आपण पुत्रवधू म्हणून स्वीकार केला तर महर्षि व राजर्षिचा सुयोग साधेल. माझी कन्या ऋषि पत्नी व्हावी, वेदमाता व्हावी अशी माझी भावना आहे, ती आपल्या कृपेने सफल होवो.'

अर्चनानस् ऋषिंनी आनंदाने ती विनंती मान्य केली. आश्रमाच्या पवित्र वातावरणांत लग्नाच्या दिव्य मंत्राचे उच्चार होऊ लागले. राजकन्या व ऋषिकुमार वर–वधू होऊन अग्नि प्रदक्षिणा करून महर्षिच्या पाया पडले. अत्रि महाराजांनी दिव्य स्तुति वचनासहित दिलेल्या आशीर्वादांनी त्यांचे सहजीवन दिव्य झाले.

श्यावाश्व ऋषिच्या हृदयात दिव्य सूक्त जागृत झाले. सुरुवातीस मरुतांच्या दिव्य दर्शनाची तळमळ असून त्यानंतर राजा तरंत व राणी शशीयसी यांच्या उदारतेची स्तुति आहे. व शेवटी देवांची दूती, रात्री– तिने पोचवलेल्या संदेशाची कथा आहे.

तरन्त राजाच्या राणीची प्रशंसा करताना ऋषि श्यावाश्व म्हणतात 'राणी शशीयसीने मला अश्व, गाई व वीरांची सेना दक्षिणा म्हणून दिली. तिच्या मनात आपल्या पतिविषयी अनन्य भाव असल्यामुळे त्याची प्रतिष्ठा वाढेल अशीच कामे ती करीत असते. राणी स्त्री असली तरी पुरुषांहूनही गुणांनी श्रेष्ठ आहे. कित्येक पुरुष नास्तिक असून त्यांना परोपकाराची कामे करण्याची प्रेरणा होत नाही. तर

कित्येक असे कद्रू असतात की दान धर्माच्या गोष्टी त्यांना ऐकणेही आवडत नाही.

राणी इतरांचे मनही जाणणारी आहे. इतरांच्या इच्छा जाणून त्या पूर्ण करण्यात ती तत्पर असते. आपल्या उदारतेमुळे राणी इतरांनाही दिव्य कर्म करण्याची प्रेरणा देते.

राणीची व तिने दाखवलेल्या दानशूरतेची ही स्तुति म्हणजे पर्यायाने राजाचीच स्तुति आहे. कारण राजा व राणी एकच आहेत. त्यांचे गुण मी पूर्णांशाने वर्णनही करू शकणार नाही. दानवीरांच्या श्रेणीत ते दोघे प्रथम स्थानी आहेत.

मी, श्यावाश्व बुद्धिमान आहे व माझी यश व कीर्ति वाढत जाणारी आहे हे दर्शवण्यासाठी राणीने मला दोन घोडे जोडलेल्या रथांत बसवले. इतकेच नाही पण राजा तरन्ताचा बन्धु राजा पुरुमीढ याच्या राज्याचा मार्ग मला राणीनेच दाखवला.

विददश्व रार्जाषचा पुत्र पुरुमीढ यानेही आपला बंधु तुरन्ता प्रमाणेच माझा आदर सत्कार केला. खरोखरीच मी दिव्य मरुतांचे प्रत्यक्ष दर्शन घेऊन त्यांची स्तुति केली. सूर्याप्रमाणे आकाशात तेजाने तळपणारे मरूत् मधुर गीते गात असतात. ते आपल्या भक्ताची कधीच निराशा करीत नाहीत.'

राणीची प्रशंशा करताना ऋषिना मरुतांचे स्मरण झाले आहे. सूक्ताच्या शेवटी रात्रीच्या देवतेला दूती म्हणून पाठवतांना ऋषि म्हणतात–

'माझ्या हृदयातील उर्मि जाणणाऱ्या देवते, एक मंत्रद्रष्टा ऋषि म्हणून मी मरुतांची स्तुती केली– ही गोष्ट तू दर्भ राजाचा पुत्र राजा रथवीति याला जाऊन सांग. रथाचा सारथी ज्याप्रमाणे इच्छित स्थळी रथ नेऊन उभा करतो त्याप्रमाणे माझी इच्छा राजाजवळ नेऊन पोचव.

जेव्हा राजा सोमयाग पूर्ण करून प्रसन्न चित्ताने बसलेला असेल त्यावेळी हा निरोप त्याच्या कानांवर घाल. मी राजकन्येला घातलेल्या मागणीचे त्याला विस्मरण झाले असेल तर त्याची त्याला आठवण दे.'

रजनीदेवीच्या प्रेरणेने राजा आश्रमात आला व श्यावाश्व ऋषिला कन्यादान देऊन त्याने निरोप घेतला हा प्रसंगही ऋचेत आहे.

'राजा रथवीति धन धान्य संपत्ति व राजकन्या ऋषिना अर्पण करून हिमालयातून वहात येणाऱ्या गोमतीच्या तीरावरून परतला व नंतर जीवनाचे साफल्य झाल्याचे अनुभवून हिमालयात निवास करण्यासाठी निघून गेला.'

या प्रमाणे एका सूक्तात आपल्या जीवनातील एक प्रसंग वर्णन करून श्यावाश्व ऋषिनी आपली मंत्रदर्शनाची भावना व्यक्त केली आहे. ★★

# ३ / या बंधनातून कसे सुटावे ?

(ऋग्वेद पंचम मंडल)

त्या ऋषींचे नाव होते सप्तवध्रि ऋषि. महर्षि अत्रींच्याप्रमाणे ते ऋषि मंत्रद्रष्टे होते व अत्रींच्या सारखीच प्रतिष्ठा व मानमान्यता त्यांना लाभली होती. पण व्यक्ति तितक्या प्रकृति. महर्षि अत्रि व सप्तवध्रि अत्री या दोघा महर्षीतही, साम्य होते तसाच भेदही होता. या अत्रींचे कुटुंब व शिष्यपरिवार मोठा होता. पण त्याना स्वतःला पुत्र नव्हता. ऋषींना पृथ्वीवरील सर्वच माणसांच्याबद्दल पुत्रवत् स्नेह वाटे. पण ऋषीपत्नीला मात्र आपल्या स्वतःच्या पुत्राला लाडाकोडाने खेळवण्याची फार इच्छा होती. त्याला उपाय काय ?

आपल्या पतीची मनोभावे सेवा करून त्याना प्रसन्न करून घेण्यासाठी ऋषीपत्नी सदैव तत्पर असे. पण शिष्यमंडळी आणि परिवार यांच्या घोळक्यातून बाहेर पडून ऋषी एकटे भेटले तर मनमोकळेपणाने दोन गोष्टी बोलता येतील– पण हे घडावे कसे ? गुरुदेव व गुरुमाता एकमेकापासून दूर रहाण्यातच त्यांचे कल्याण आहे अशी सर्व शिष्य व संबंधीजनांची खात्री होती !

ऋषीपत्नीची मनोवेदना वाढत चालली. इतक्या माणसांच्यात असूनही ती एकटी होती. ऋषीना त्याची काहीच जाणीव नव्हती. ते आपले नित्य नवी कामे अंगावर घेऊन पार पाडीत. अनेक समस्या उकलून टाकीत. पण त्यांच्याच जीवनात पडत चाललेल्या गाठी त्याना माहीत नव्हत्या !

एक दिवस अचानकच त्यांची दृष्टी आपल्या पत्नीकडे वळली. ती खूप वाळली होती. दुःखी कष्टी, वेदनेचीच मूर्ति अशी ती स्त्री. वर्षानुवर्षाचे दुःख. तिला पोखरून काढीत होते. ऋषीना तिची दया आली. तिचे दुःख त्यांना उमगले. त्याचे निराकरण करण्याचा उपायही सुचला, पण त्यांचे संबंधी आणि शिष्य तेवढ्यात तेथे येऊन पोचलेच व त्यांनी ऋषिंना आपल्याबरोबर नेले.

परोपकाराची कामे करण्यात ऋषिना अत्यंत आनंद होई. रात्रंदिवस कामात गुंतलेले रहाण्याचा त्यांचा नित्यक्रम होऊन बसला होता. अशा परिस्थितीत ऋषि पत्नी बिचारी काय करणार ?

आपल्या झुरणाऱ्या पत्नीची दशा ऋषींनी पाहिली होती. त्यावरचा उपायही त्यांना उमगला होता. पण त्याचा काही उपयोगच नव्हता. कारण त्यांचे स्नेहीजन त्यांना एकटे पडूच देत नव्हते. सारा वेळ त्यांचा वेढाच जणू ऋषींच्या भोवती पडलेला असे. ऋषींना आतां ते जाणवू लागले. त्यांचे स्नेही त्यांना बंधनात टाकीत होते. इतर बंधने, मग ती कितीही बळकट असली तरी तोडणे सोपे. पण स्नेहबंधने तोडणे कठीण ! परोपकार हेच कर्तव्य असे मानणाऱ्या ऋषिवर्यांना पण आनंद-विनोद करण्यात घालवण्यासाठी वेळच होत नव्हता.

स्वतःची निरुपाय दशा जाणवल्याने ऋषि अस्वस्थ होऊन गेले. या पराधीनतेतून सुटावे कसे ते त्यांना कळेना. कोणी पेटीत कोंडले तर त्याची सुटका करणे सोपे पण या स्नेहबंधनातून कोण नी कसे सोडवणार ? अशा बिकट परि-स्थितीत त्यांना त्यांच्या इष्ट देव अश्विनी कुमारांची आठवण झाली. ऋषिना जुन्या घटना आठवू लागल्या. अश्विनी कुमारांनी अनेकांना यापूर्वी बंधनातून सोडवले होते.

फार फार पूर्वी महर्षि अत्रि महाराज दूर निविड वनांत तपश्चर्या करीत होते. त्यांनी देवांना अनेक प्रकारे साह्य केले होते. त्यामुळे असुर त्यांना शत्रु मानीत. एकदा ते एकटेच आहेत असे पाहून असुरांनीं त्यांना बांधून धगधगत्या अग्निकुंडात फेकून दिले. त्यावेळी महर्षिंनी अश्विनी कुमारांची स्तुति केली व त्या देवांनी त्यांना त्या संकटातून वाचवले सध्रि नांवाचे दुसरे एक आत्रेय ऋषि होते. अश्वमेध नांवाच्या राजाला पुत्र नव्हता म्हणून या ऋषिंना बोलावून राजाने आपली पुत्रकामना पूर्ण व्हावी म्हणून यज्ञ करविला. तरी इच्छा पूर्ण झाली नाही. ऋषिंनी दुसरा यज्ञ केला तोही निष्फळच ठरला. राजा वारंवार आग्रह करून पुनः पुनः यज्ञ करवी व ऋषिंची संकल्प शक्ति त्यामुळे निर्बल होऊन गेली.

पण ' राजन, आता मी यज्ञ करणार नाही. ' असे सांगण्याचे साहसच त्या ऋषिंच्यात उरले नव्हते. याप्रमाणे सात सात यज्ञ केले. ते सारेच फुकट गेले. राजाने रागारागाने ऋषिंना बांधून वनामध्ये एका खोल खड्डयांत फेकून दिले. त्या संकटाच्या वेळी अश्विनीकुमारांची स्तुति करून ऋषिंनी स्वतःची सुटका करून घेतली व राजांचीही कामना देवांनी पूर्ण केली.

सप्तवध्रि ऋषीनी अत्यंत बिकट अशा स्नेहबंधनातून सोडवण्यासाठी अश्विनीकुमारांची प्रार्थना केली. देवांनी त्यांची सुटका केली. बांधून टाकणाऱ्या त्या स्नेहातून सुटलेल्या ऋषींनी आश्रमापासून दूर एक लहानशी पर्णकुटी बांधली व आपल्या धर्मपत्नीसह ते तेथे राहू लागले. देवांच्या कृपेने ऋषिपत्नीचे मनोरथ पूर्ण झाले. ती गर्भवती झाली. पूर्ण मास भरल्यावर प्रसूतीच्या वेदना होऊ लागल्या.

त्यावेळी ऋषिनी परत आपल्या इष्टदेवांचे स्मरण करून त्या देवांच्या वैद्यांना आपल्या पत्नीची सुखरुप सुटका करण्याविषयी विनवले आणि त्यांची पत्नी सुखरुप प्रसूत झाली व वेदना थांबल्या.

सप्तवध्रि ऋषि स्वतः बंधमुक्त झाले. त्यांच्या पत्नीची वेदनेतून सुटका झाली त्या दोन्ही प्रसंगांचे वर्णन त्यांनी सूत्रांत केले आहे.

'हे अश्विनीकुमारांनो, तुम्ही सत्वर धावून यावे. असत्याला दूर करणाऱ्या देवांनी तुम्ही माझ्या विषयी निष्काळजी राहू नये. हंसाची जोडी मोत्यांचा चारा टिपण्यासाठी यावी त्याप्रमाणे आपण उभयता माझा सोमरस स्वीकारण्यासाठी येऊन पोचावे.

हे अश्विनी कुमारांनो, हरणांची जोडी आणि गौर मृगांचे युगुल हिरवा चारा पाहून धाव घेतात, अथवा हंसाची जोडी जशी वेगाने झेपावते तसे तुम्ही उभयता माझ्यासाठी धाव घ्या.

हे अश्विनी कुमारांनो, आमच्या इष्ट कामना सिद्ध करण्यासाठी धनधान्यांनी समृद्ध अशा आपल्या रथांत बसून आमच्या यज्ञ मंडपात सत्वर या.

हे अत्रि ऋषि धगधगत्या अग्निकुंडात पडले आहेत व विरही प्रियतमा ज्याप्रमाणे कंठात प्राण आणून प्रियकराची प्रतीक्षा करते तशी ते तुमची प्रतीक्षा करीत आहेत. गरूडाच्या शीघ्र गतिने आपण धावून यावे.

एखाद्या लाकडी पेटीत कोंडले जावे त्याप्रमाणे संसाराच्यापाशांत सापडलेल्या अत्रि ऋषिचा कोंडमारा होत होता त्यावेळी त्यांनी अश्विनी कुमाराची विनवणी केली.

हे वनस्पति, लाकडाच्या पेटाऱ्या, तुझे झांकण उघड. मातेच्या उदरात पूर्ण मास राहिलेला गर्भ, सर्भद्वार उघडले की ज्याप्रमाणे सुखाने बाहेर पडतो त्याप्रमाणे हे अश्विनी कुमारांनो हे स्नेहबंध सोडवून मला त्यातून बाहेर काढा.

मी, सप्तवध्रि, या कोंडमाऱ्याने अगदी भयभीत झालो असून यातून कसे सुटावे ते मला कळत नाहीसे झाले आहे. संसार मायेच्या या अजस्त्र पेटाऱ्याचे

झांकण उघडून आपण मला त्यांतून सोडवा, म्हणजे मी मुक्तपणे विहार करू शकेन.'

गर्भाची सुखाने सुटका व्हावी म्हणून गर्भस्त्रावाणी उपनिषद् शेवटच्या तीन ऋचांत ऋषींनी गायलेले आहे.

'वाऱ्याच्या लहरीने जलाशय ज्याप्रमाणे हलतो त्याच सुखद सहजतेने पूण मास झालेला गर्भ सुखाने बाहेर येवो. वायु ज्याप्रमाणे सरळ गतिने वहातां वहाता वन–वृक्षांना हलवून जातो, समुद्र ज्या प्रमाणे सहज गतिने वहातो त्याच प्रमाण हे गर्भस्य पुत्र, आतां दहा मास पूर्ण झालेले आहेत. तेव्हां मातेच्या उदरातून तू सुखरुप बाहेर पड.

हा कुमार दहा महिने मातेच्या उदरात झोपला होता. आतां तो सुखेनैव बाहेर येवो. त्याचा व त्याच्या मातेचा जीव सुरक्षित राहो.'

सप्तवध्रि ऋषिनी मंत्राच्या बळावर आपली, आपल्या पत्नीची व पुत्राची बंधनातून सुटका करून घेतली. त्याच प्रमाणे संसार बंधनांतून सुटण्याचा उपाय योजून त्याचे शिक्षण आपल्या शिष्यानांही दिले होते.

★★

# ४ / सूर्य व नक्षत्र माला

(ऋग्वेद. सहावे मंडल)

होय. प्रजापतीची ही सृजने असून त्याने नाना रुपे निर्माण केलेली आहेत. ही निर्मिति ऋषींनी केलेली आहे असे म्हटले जाते. ऋषि हा शब्द ऋक्ष-नक्षत्र, प्राण व मंत्रद्रष्टा या अर्थी योजला जातो.

प्रजापतीने निर्माण केलेले तेजो मंडल विझून शांत होऊ लागले त्यांत प्रथम आदित्य मंडल, दुसरे भृगु मंडळ व तिसरे अंगिरा मंडल होते. अंगिरा मंडलात बृहस्पति व त्यांच्या नंतर भरद्वाज ऋषि झाले.

आकाशात उत्तरेकडे जे सप्तर्षि मंडल दिसते त्यालाच ऋक्ष-नक्षत्र म्हणतात. व कृत्तिकेच्या सात तारकांना सप्त मातृकासप्तर्षिच्या पत्नी म्हणतात. सात ऋषि हे सप्त प्राण आहेत. शरीरांत ही साती प्राणतत्वे वास करतात. कानामध्ये गौतम व भरद्वाज डोळ्यामध्ये विश्वामित्र व जमदग्नि, नाकामध्ये वसिष्ठ व कश्यप व वाणीमध्ये अत्री ऋषींचा वास आहे.

प्राण वसिष्ठ, मन भरद्वाज, दृष्टी जमदग्नि, कान विश्वामित्र, वाणी विश्वकर्मा याप्रमाणे प्राणांची रचना आहे.

अंगिरा, वसिष्ठ, अगस्त्य, भृगु, अग्नि वगैरे ऋषि सृष्टीचे प्रवर्तक प्रजापती आहेत. त्यांनी निर्माण केलेली प्राण-सृष्टी अध्यात्मिक आहे. अग्नि वगैरे भूत पदार्थांनी निर्माण केलेल्या सृष्टीस भौतिकसृष्टि व सूर्य, चंद्र, नक्षत्र वगैरे ज्योतींच्या सृष्टीस अधिदैविक सृष्टी म्हणतात

वेद रचणाऱ्या ऋषीना प्रजापतीच्या निर्मितीचे दर्शन विविध रुपातून झालेले आहे ज्याला जसें दर्शन झाले तसे त्याचे गुण व लक्षणे झाली असे दिसून येते. त्या त्या गुणांवरून त्या त्या ऋषीना नावे मिळाली. अंगिरा, अत्री हे प्रजापती असून त्याच नावाचे ऋषीही आहेत.

तर याप्रमाणे अंगिरा पुत्र बृहस्पती व त्याचा पुत्र भरद्वाज हे मंत्रद्रष्टे ऋषी आहेत. त्याना झालेल्या मंत्रदर्शनात अध्यात्म, प्राण, आधिदैविक ज्योति मंडळ व आधिभौतिक अग्नीचा भाव आहे.

बृहस्पतीची प्रार्थना करताना भरद्वाज मुनी म्हणतात, ' सूर्याच्या बिशाल भ्रमण मार्गात येणारे अडथळे अद्रि पर्वतासारखे मधे येतात. गुरू बृहस्पती त्यांचा भेद करणारे आहेत. ते सत्याचे पालन करणारे असून प्रजापतीच्या प्रथम सृष्टीत ते निर्माण झालेले आहेत. अंगिरा हे त्या सृष्टीतील पहिले ऋषी असून त्यांच्या नंतर बृहस्पतीचा क्रम आहे. ज्याला टिकवून धरण्यासाठी सोमरसाचा हवि दिला जातो. दोन्ही लोकात ज्यांची विशेष गति आहे व जे सूर्याच्या ज्योतिमार्गात निवास करतात त्याना बृहस्पती असे म्हणतात. ते आमचे पालक पिता आहेत. ते श्रेष्ठ वृषभ ऋक्ष-नक्षत्राच्या रुपाने दोन्ही लोकाना आपल्या गंभीर गर्जनेने गाजवतात.

देवांच्या आकाशातील देवहूति महायागांत स्तोत्रे गाणाऱ्या ऋषिचे स्थान गुरू बृहस्पतींचे आहे. अंधाराचे आवरण घालणाऱ्या वृत्राचा गुरू नाश करतात. अंधार नगरींचा त्यांनी संहार केला आहे.

महान् तेजस्वी, प्रकाशवान् बृहस्पति देवांनी प्रकाश तत्त्वाचे धन व वसु साध्य करून घेतलेले आहेत. बृहस्पतींचे दर्शन कोणाला प्रत्यक्ष डोळ्यांनी घेता येत नाही. परंतु आपल्या प्रखर तेज किरणांनी शत्रूला दूर करून आपला मार्ग सरळ करणाऱ्या त्या गुरुंचा महिमा सर्वांच्या प्रत्ययास येतो. '

या सूक्तात बृहस्पती गुरुंचे वर्णन, एक तेजस्वी विशाल ग्रह-नक्षत्र-असे केलेले आहे. सौर जगतात सूर्यानंतर मोठ्यातला मोठा ग्रह गुरु आहे. सत्तावीस नक्षत्रामध्ये जे पुष्य नक्षत्र आहे त्याचा अधिपति गुरु आहे. गुरुला आकाशपिता (ज्युपिटर) व देवगुरु म्हटलेले आहे.

खगोल शास्त्रांत सूर्याच्या आकाशातील भ्रमण मार्गाला ' रविमार्ग ' म्हणतात. त्या मार्गाचे सत्तावीस सारखे भाग पाडलेले असून प्रत्येक भागास ' नक्षत्र ' म्हणतात व बारा विभाग पाडून त्यातील प्रत्येक विभागास ' राशी 'चे नांव दिले आहे. या विशाल आकाशाला सौर जगत म्हणतात. त्या सौर जगतातील सर्वात मोठा ग्रह ' गुरु ' हा आहे. सूर्याला प्रदक्षणा घालणारे एकूण नऊ ग्रह आहेत. पृथ्वी हा त्यातील एक ग्रह आहे.

सत्तावीस नक्षत्रांचा अधिष्ठाता देव सूर्य आहे. बारा महिने व बारा राशींची नांवे ही सूर्याचीच दुसरी नांवे आहेत व सत्तावीस नक्षत्र देव ही ही

सूर्याचीच विविध रुपे आहेत. उदाहरणार्थ प्रत्येक वर्षी सूर्याच्या गतिची दोन अयने होतात. त्यांना उत्तरायण व दक्षिणायन म्हणतात. उत्तरायणात दिवस मोठा होत जातो व दक्षिणायनात लहान होत जातो. उत्तरायणात सूर्याचे तेजोबल वाढते. दक्षिणायनात ते कमी होऊन रात्र मोठी होत जाते.

चित्रा नक्षत्राचा अधिष्ठाता त्वष्टा विश्वकर्मा आहे. निर्मिति हे त्याचे कर्तव्य कर्म आहे. तो सूर्य मंडळाला ज्योति चक्रावर चढवून तेज सौम्य करू लागतो. त्याचप्रमाणे रेवती नक्षत्राचा देव पूषा असून पोषण करणे हे त्याचे कार्य आहे. अर्थात शरद ऋतु संपल्यावर हेमंत व शिशिर ऋतूंत प्रजा, पशु व वनस्पतीचे बल वाढते. अश्विनी व भरणीमध्यें ते टिकून रहाते. पूषा देव प्रजाजन व पशूंचे पोषक व मार्गदर्शक मानले जातात. या देवाचा महिमा गाणारे ऋषि भरद्वाज पण प्रजा व पशु यांचे भरण पोषण करणारे आहेत. भरद्–वाज–हे कोणी सामान्य ऋषि नसून अग्नि, इंद्र, मातरिश्व, विश्वेदेवा, पूषा, बृहस्पति वगैरे देवांचा महिमा वाढवणारे ऋक्षिनक्षत्र आहेत. आधिदैविक स्वरूपांचा महिमा गाता गाता ते भरद्वाज या नांवाने प्रसिद्ध झालेले आहेत. ते बृहस्पतिचे पुत्र असून बृहस्पति हे मीन राशीचे अधिष्ठाते देव आहेत. मीन राशीत रेवती नक्षत्र येते. पूषा त्या नक्षत्राचे देव आहेत. भरद्वाज ऋषिंनी जी जी स्तोत्रे, सूक्ते रचलेली आहेत ती केवळ आराध्य देवतांची सूक्ते नसून सत्तावीस नक्षत्रे, बारा राशी, बारा महिने, सहा ऋतु, दोन अयने, दोन संपात, शशिचक्र व नक्षत्रे चक्रांचे अधिष्ठाते देव आहेत त्यांची स्तुति केलेली आहे. त्या सर्वांत मुख्य सूर्य, सविता नारायण आहे. तो आधिदैविक सृष्टिचा आदि स्त्रष्टा आहे. अग्नि, इंद्र, सोम, पूषा ही त्याचीच वेगवेगळी रुपे आहेत भरद्वाज ऋषि इंद्राच्या सूर्य रुपाची स्तुति करताना म्हणतात,

'हा देवराज इंद्र सूर्याच्या रूपात तेजाने झळकत आहे.अंधःरात सांपडलेल्या लोकांना तो प्रकाश देत आहे. या देवश्रेष्ठाने उषेला आपल्या तेजाने उजळली आहे. सर्वांना प्रकाशित करण्याचे ऋत व्रत त्याने घेतले आहे. त्याचे तेजस्वी अश्वही त्यां व्रताला आधीन रहाणारे असून आकाशाची गति जाणणारे ते अश्व आकाशात संचार करतात.

हे इंद्र, हे सूर्य स्वरूप ! प्रकाश देण्याचे व्रत तुम्ही तर घेतलेच. पण तुमच्या प्रेरणेने सोमराज चंद्रही प्रकाशित झाला आहे चंद्र प्रकाशाच्या वाढत्या व उतरत्या कलेनुसार रात्र, दिवस, तिथी, पक्ष, मास, ऋतु व संवत्सराच्या गतिचे नियमन होते.'

वैश्वानर अग्निरूप सूर्याची स्तुति करतांना ऋषि म्हणतात, 'अहो, पहा

तरी, वैश्वानर– विश्वभर संचार करणारा अग्नि सूर्यरुपाने जन्म घेत आहे. जन्मत:च तो भराभर वाढू लागला आहे. त्याच्या प्रकाशाने अंधार नाहीसा होतो. त्याच्या मुळेच दिवस उगवतो व रात्र पडते. दिवसाच्या शुभ्र प्रकाशांत लोक व्यवहारी कामे करतात व रात्रीच्या वेळी कृष्णवर्णाच्या योगे लोक निद्रा घेतात.

आकाशात पसरलेल्या विशाल सूर्य मंडळाच्या पटाचे उभे आडवे धागे कोणी निर्माण केले असावेत ते मी जाणत नाही. खरोखर आकाश गंगेचा हा पट कोणी बरे रचला असावा? सूर्यमंडळ आकाशपटाचे केंद्र असून सूर्यनारायण त्या सर्वांचा पालक पिता आहे. या लोकातील सर्व ऋषि त्याचेच पुत्र आहेत. या विस्तृत सूर्यमंडलाविषयी मी सर्व जाणतो, असे त्यांच्या पैकी कोणी सांगू शकेल काय?

होय. एक वैश्वानर अग्नि आपल्या ऋत व्रताच्या प्रभावाने सांगू शकेल की या पटाचे उभे आणि आडवे धागे सौर जगताच्या प्रकाशांतून निर्माण झालेले असून त्यांतूनच सर्व स्थूल व सूक्ष्म पदार्थ निर्माण झालेले आहेत. वैश्वानर अग्नि सर्व जगतांचा पालक पिता आहे. तोच साक्षात् सूर्य असून अग्नीही तोच आहे.

भरद्वाज ऋषींनी मंडलाच्या सुरुवातीस अग्नीला मनोता– व्यापक– म्हटलेले आहे. मनाच्या व्यास मंडलातील सूर्याच्या विविध रुपाचे वर्णन करतांना ते म्हणतात, 'हे सूर्यरुप अग्नि, सर्व प्रकाशमय ज्योतिमध्ये तुम्ही प्रथम, सर्वश्रेष्ठ मनोता आहांत. सर्व प्रकारच्या गतिचे प्रेरक होता तुम्हीच आहांत. सर्व प्रकारच्या दुर्धर्ष बलाचे धारक होऊन ज्योतिमार्गातील अवरोध तुम्ही दूर करता.'

'मनोता' या शब्दातून तीन प्रकारचा अर्थ व्यक्त होतो. सौर जगतात प्रथम मनोता, सर्वश्रेष्ठ ज्योति– म्हणजे सूर्य. सौर जगाच्या व्यापक मार्गाचा गो– गव्यूतिचा विस्तार करणारा मनोता सूर्य सर्व जीवांना प्रेरणा व आयु देणारा आहे. त्याला सूर्य म्हणा वा अग्नि म्हणा तो ज्योति, गो व आयु यांचा त्रिविध मनोता आहे. ज्योति म्हणजे सूर्य. गो म्हणजे रविमार्ग व आयु म्हणजे जीवन वाढवणारे भरद्वाज.

'हा सूर्यरुपाने प्रकाशतो तो अग्नि आहे. तेजामागे असणाऱ्या ज्वालेप्रमाणे ज्योतिमाले मागे तो दडलेला आहे. सर्व प्रकारच्या तेजाना अनुकूल अशी प्रेरणा देणारी ही दिव्य ज्योति रात्री आणि दिवसा आपल्या गतीशील किरणांना प्रेरणा देते.'

सूर्य मंडलाच्या आजुबाजूच्या नक्षत्र ज्योतिमालेच्या दोन्ही मार्गाचा व नक्षत्रांचा निर्देशही केलेला आहे.

'ज्याप्रमाणे तेजस्वी ज्योतीनी वेढलेला सूर्य दोन्ही लोक प्रकाशित करतो,

त्याचप्रमाणे हे अग्निदेव ज्वालांनी वेढलेले तुम्हीही दोन्ही लोक उजळून टाकीत आहात. अर्थात सूर्य हे तुमचेच दुसरे रुप आहे. तुमच्या भ्रमणाच्या मार्गावर स्तुति करणारे दिव्य ऋषि ऋत्विज असून तुम्हाला प्रदिप्त करण्यासाठी ते ज्याप्रमाणे हवि, समिधा अर्पण करतात, त्याप्रमाणे सूर्यांच्या आजूबाजूस असलेले सत्तावीस नक्षत्रांचे अधिष्ठाते देव सूर्य ज्योतींना विशेष देदिप्यमान करतात. त्यांच्या योगाने अंधार दूर होतो.

आपल्या महाव्रताचे पालन करणारा हा वैश्वानर अग्नि आहे. व्रतपालनाच्या योगानेच परम आकाशात तो सूर्यरुपाने उदय पावतो. सूर्याप्रमाणेच सर्व लोक आपले व्रत पालन करतात. सर्वांचे उत्तम संकल्प पूर्ण करणारा वैश्वानर अग्नि आपल्या महिमत्तेजाच्या योगाने आकाशाला स्पर्श करीत आहे.'

भरद्वाज ऋषींना सहा पुत्र होते. ऋजिश्व, पायु, वसु, सुहोत्र, शुनहोत्र व नर अशी या सहा भारद्वाजांची नावें. पित्याने रचलेल्या इन्द्र स्तुतीच्या प्रार्थनेबरोबर सुहोत्र, शुनहोत्र व नर यानीही इन्द्राच्या सूर्यरुपाची स्तुति केली असून विश्वेदेवांची स्तुति करताना ऋजिश्वाने सत्तावीस नक्षत्रांचे देव व बारा महिन्यांचे देव या सूर्यांच्या विविध रुपांचें वर्णन केलेले आहे. गर्ग भारद्वाजाने इन्द्र, सोम, देवभूमि, बृहस्पती वगैरेची स्तुती करताना श्रेष्ठ जीवन मार्ग दाखवण्याविषयी इंद्र व बृहस्पतींना प्रार्थना करून विनवलें आहे.

'हे देव, हे इंद्र, हे बृहस्पती, आम्ही सर्व ऋषि रस्ता चुकलो व अज्ञान प्रदेशांत येऊन पोचलो आहोत. येथून निघण्याचा मार्ग आम्हाला सुचत नाही. तरी यावेळी आमचे रक्षण करा.

हे बृहस्पती, आम्हाला मार्गदर्शन करा. हे देवराज इन्द्र, रस्ता चुकल्यामुळें आम्ही शोक संतापाने त्रस्त होऊन होऊन गेलो आहोत. आम्हाला मार्ग दाखवा.

विशाल अवकाशात सूर्यरुपाने प्रकटतो तोच हा देवांमध्ये श्रेष्ठ असा इन्द्र आहे. त्याच्यामुळेच आकाशात दोन मार्ग निर्माण झाले असून त्यामुळेच रात्र व दिवस असे समयाचे दोन भाग पडले. पक्ष, मास, ऋतु व संवत्सर अशा कालमर्यादा त्याच्याच योगाने निर्माण झाल्या.

गर्ग ऋषि निर्जन प्रदेशात वाट चुकले असता देवांच्या साह्याने त्यांनी मार्ग शोधून काढला होता. हा प्रदेश म्हणजे पृथ्वीवरील वनप्रदेश नाही. पण विशाल आकाशपटावरील सत्तावीस नक्षत्रांच्या ज्योतिमाला व राशिचक्र त्या चक्रात सूर्य, चंद्र, बुध, गुरु, शुक्र, शनि वगैरे ग्रह व सप्तर्षि, प्रजापति, अत्रि, अंगिरा, ब्रह्महृदय लुब्धक, रुद्रादि तारक मंडळ या सौर जगताविषयी जाणून घेण्याची उत्सुकता

ऋषिच्या मनात आहे. त्यासाठी साक्षात् सूर्यरुप इन्द्राचे मार्गदर्शन घेऊन रात्रीच्या वेळीही विशेष तेजाने प्रकाशणाऱ्या गुरु वगैरे ग्रहांचे साह्य घेतले आहे.

भारद्वाज ऋजिश्वा ऋषि विश्वेदेवांची स्तुति करताना समग्र नक्षत्रचक्रातील देवतांचा महिमा वर्णन करतात.

'देवसंघातील मुख्य मित्र व वरुण ही सूर्याचीच स्वरुपे आहेत. आकाश व पृथ्वी या युगुलाचा पुत्र अग्नि. त्याचप्रमाणे अहो-रात्र हे युगुल सूर्याच्या आधीन आहे. तथापि त्यांचे स्वरुप भिन्न आहे. रात्र नक्षत्रांनी चमकते तर दिवस तेजाने उजळतो. त्याचप्रमाणे वायु व अश्विनीकुमार, मरुतदेव व पर्जन्य आकाशात सत्ताधारी असून अदिती व चित्रविचित्र रुप धारण करुन आकाशात वसणारी सरस्वती आम्हाला सुखी करते. त्याचप्रमाणे पूषा देव आम्हाला मार्गदर्शन करतो.

धाता, ऋभु, देवत्वष्टा, रुद्र आणि विष्णु आपआपल्या विशेष पराक्रमाने तळपत आहेत. देव अहिर्बुध्न्याविषयी पण जाणून घेण्यासारखे आहे. विशाल आकाशाचा तल म्हणजे बुध्न. त्या ठिकाणी पुच्छ पसरून शिशुमार चक्राप्रमाणे गतिमान असलेला असा हा देव आहे. लांबवर पसरलेली त्याची चमकती किरणावलि मोठी शोभिवंत आहे. सविता, भग वगैरे देवही आकाशाच्या विशाल पटावर वसत आहेत.

विश्वेदेवांचा आणि सत्तावीस नक्षत्रांचा संबंध कळल्यास सूर्याची गतिही स्पष्ट होते. या सर्वांत अहिर्बुध्न्य देव अप्रसिद्ध व अपरिचित असा आहे. अज एकपात् हाही त्याच्यासारखा दुसरा एक देव. हे दोन देव प्रोष्ठपदा नक्षत्राचे अधिष्ठाते आहेत. प्रोष्ठपदातील पूर्वाभाद्रपदा नक्षत्राचा देव अज एकपात् असून उत्तरा भाद्रपदाचा देव अहिर्बुध्न्य हा आहे. त्याच प्रमाणे शतभिषा नक्षत्राचा देव वरूण, अनुराधा नक्षत्राचा मित्र, ज्येष्ठा नक्षत्राचा इन्द्र, स्वातिचा वायु, हस्ताचा सविता, आपोदेव व विश्वेदेव हे पूर्वाषाढा व उत्तराषाढा नक्षत्राचे देव आहेत.

ही सत्तावीस नक्षत्रे व बारा राशी सूर्याच्या विविध रुपांच्या गति मार्गावरील विश्राम स्थाने आहेत. म्हणूनच वेदामध्ये राशीना 'धाम,' 'सदन' असे म्हटलेले आहे.

भारद्वाज ऋजिश्व विश्वेदेवांचे वर्णन करताना सूर्याच्या विविध रूपांचा महिमा गातात. त्यामध्ये बारा महिन्याच्या बारा अधिष्ठात्या सूर्यांचा उल्लेख आहे. १) धाता २) मित्र ३) अर्यमा ४) रुद्र ५) वरुण ६) सूर्य ७) भग ८)९)पूजा १०) सविता ११) त्वष्टा १२) विष्णु

ऋजिश्व आपल्या महायागासाठी देवांना आवाहन करताना म्हणतात, 'हे

देवांनो अखंड प्रकाशमयी देव माता अदितीची स्तुति करून आम्ही तिला आमंत्रण देत आहोत. त्याचप्रमाणे आदित्य, वरुण, मित्र, अग्नि, अर्यमा, सविता, भग वगैरे आमचे पालन करणाऱ्या देवांनाही आम्ही स्तुतिपूर्वक बोलावीत आहो.

आदित्य देवांचा पिता दक्ष व माता अदिती आहे. हे प्रकाशनिधि सूर्य देव, सर्व देव आम्हांला अनुकूल रहावेत अशी प्रेरणा त्यांना तुम्ही द्यावी. हे सर्व देव कार्य, कारण, स्थान, अधिष्ठान रुपाने भौतिक व आधिदैविकरित्या दोन जन्म घेतात. ऋत–परोपकार हे त्यांचे जीवनव्रत आहे. अग्निच्या दीर्घ जिव्हेप्रमाणे तेजस्वी असे ते देव स्वर्गातील ज्योति मंडलात वास करतात.

आकाश व पृथ्वी हे दोन लोक व ते दोन प्रकाशमार्ग हे त्यांचे गति मार्ग व स्थाने आहेत. आकाशात भ्रमण करणारे रुद्र व त्यांची पत्नी रोदसी यांचे पुत्र ते मरुत. त्या मरुतांना आम्ही आवाहन करीत आहोत. त्या मरुतांच्या मार्गाने पुढे जाणारे पूषादेव दिव्य रविमार्गांचे मार्गदर्शक आहेत. तेच ऋषींना तो दिव्य मार्ग दाखवतात.

सूर्यरुप इंद्र आणि प्रकाश मार्गांवर तेजरुपाने वसणाऱ्या आपोदेवतांची आम्ही स्तुति करीत आहो.

आमच्या या देवहूति महायागासाठी हे सवितादेव तुम्ही अगत्य यावे. हे देव तुमचे हात (किरण) सोन्यासारखे चमकत आहेत. अत्यंत ज्ञानी व सत्यस्वरुप अश्विनीकुमारांनो आमच्या यज्ञमंडपात यावे अशी आमची विनंती आहे.

हे देवांनो, आमच्या या महायागासाठी रुद्र, सरस्वती, विष्णु, वायु, ऋभु, पर्जन्य, सविता, भग, अपानपात्–अग्नि, द्यौ, पृथ्वी, समुद्र, अहिर्बुध्न्य, अज–एकपात् वगैरे सर्व देवांना आम्ही भावपूर्वक आमंत्रण देत आहो.

भरद्वाज कुलांतील आम्ही ऋषि– सर्व विश्वेदेवांची स्तुति करीत आहोत. वाज–अन्न– भरपूर भरणारे असे ते देव आहेत. त्यामुळे तेही वस्तुतः 'भरद्वाजच' आहेत. त्यांनीच आमचेही भरण पोषण केले आहे. उत्तम प्रकारची स्तुति करून त्या योगे त्यांचे तेज आम्ही वाढवीत आहो.

आकाशाच्या विस्तृत नक्षत्रपटावर दोन तेजमार्ग आहेत. एका रविमार्गावर मित्र असून दूसऱ्या मार्गावर वरुण आहे. त्या दोघांचा संयोग होतो तेव्हा आदित्य मंडळाच्या स्थिरचक्षु सूर्याचा उदय होतो व आकाश त्याच्या तेजाने उजळून निघते. तीन धाम, तीन लोक, तीन देवगण व तीन मार्गाचे संकलन करून त्याना आपल्या ठिकाणी केंद्रित करणारा सूर्य स्वामीरुपाने प्रकाशत आहे.

सूर्य मंडळाच्या मार्गरेषेत आदित्य देव त्या त्या सुक्षत्र–नक्षत्रांचे अधिष्ठाते

आहेत. आकाशमंडळात तेवणाऱ्या तेजस्वी ज्योतींचे ते स्वामी चिरयुवान असून अदितीचे पुत्र आहेत. त्या सर्वांच्या स्वरुपाचे दर्शन सूर्याच्याद्वारा आम्हाला होते.

हे देवि अदिती व आदित्य देवानो, द्यौष्पिता बृहस्पति हे आमचे तात असून ममता–पृथ्वी ही आमची माता आहे. वसु हे आमचे बंधू असून आम्ही भरद्वाज कुलातील ऋषी आहो. आम्हाला सर्व प्रकारे सुखी ठेवा अशी आमची प्रार्थना आहे.

श्रेष्ठ व दिव्य प्रकाश देणाऱ्या देवांनो, आमची अनेक पापे व अंधार दूर करा. आकाशाच्या विशाल पटावर पसरलेल्या सुक्षत्र नक्षत्राच्या स्वामींनो, मित्र वरुणादि देवांनो तुमच्या धारणेने ऋत व तुमच्या वाणीने सत्याला प्रेरणा देऊन तुम्ही ऋषींना योग्य मार्ग दाखवता.

सूर्याच्या प्रकाश मार्गावर राशिचक्र देवतांची स्थाने आहेत. वृषभ हे जलवू स्थान, मिथुन नृषदनाचे, मीन अहिर्बुहध्न्याचे अशी प्रत्येक देवांची स्थाने असून आमच्या राशिस्थानाचे देव आमचे कल्याण करोत. इंद्र, पूषा, भग, अदिती, पृथ्वी, पंचजन वगैरे राशि चक्रांत वास करणारे देव पुष्टिकर, मार्गदर्शक व सुरक्षक होवोत.

वाज–अन्न भरणाऱ्या भरद्वाजाची प्रेरणा लाभलेला मी भारद्वाज देवांचा होता आहे. हे देवांनो माझ्या राशिस्थानी आपण सर्वांनी वास करावा. आम्हाला चांगली बुद्धी द्यावी. वेगवेगळ्या राशींच्या स्थानी वास करणारे देव ते ते स्थान समृद्ध करतात. त्या सर्व देवांच्या ज्योति मंडळाला मी वंदन करतो. हा ऋषि वसु व वास यांची पुष्टि करणारा आहे.

हे देवांनो आमचा हा देवहूति महायज्ञ नित्य निरंतर चाललेला आहे. त्यातून नित्य नवे रूप धारण करून येणारी देवी उषा आमचे रक्षण करो. आकाशात प्रकाश किरणांच्या प्रवाहाने वहात रहाणाऱ्या सरिता सतत वृद्धि पावोत व आमचे रक्षण करोत. अवकाशांत स्थिर रहाणारे (ध्रुव) व पर्वाचे समूह करणारे पर्वत, त्याचप्रमाणे नक्षत्र मालेत वसणारे पितर आमचे रक्षण करोत.

हे देवांनो आमचे मन नेहमी उमलत्या फुलासारखे प्रफुल्ल राहो. नित्य निरंतर आकाशात उंच उंच जाणाऱ्या सूर्याचे आम्हाला दर्शन होवो. वेगवेगळ्या राशींच्या ठायी वसणारे वसु व स्वामी आमचे भाग्य-स्थान उज्वल करोत.

भारद्वाज ऋजिश्व नावाच्या ऋषींनी गायलेल्या या विश्वेदेवांच्या सूक्तांत सूर्य मंडलाच्या नक्षत्र, ज्योतिमाला, व राशि स्थानाच्या स्वामींची स्तुति प्रार्थना केली आहे. त्यात ध्रुव व चल ग्रह, नक्षत्र, राशी वगैरेंची सूक्ष्म गति व हितकारी प्रवृत्तींचा निर्देश आहे.

त्याचप्रमाणे बहिस्पत्य भारद्वाज देव युगुलांचीही स्तुति करतात. ही देव युगुले आकाशाच्या विशाल पटावर एकमेकांच्या बरोबरच फिरत असतात व त्यांच्या युतियोगांत येणाऱ्या नक्षत्राचे ते अधिष्ठाते देव असतात. जसे इंद्र हा ज्येष्ठा नक्षत्राचा स्वामी आहे. पण इंद्र व अग्नि हे दोघे विशाखा नक्षत्राचे स्वामी आहेत. त्याच प्रमाणे इंद्र व पूषा, इंद्र व वरुण, इंद्र आणि विष्णु, इंद्र आणि सोम या प्रमाणे नक्षत्रांच्या सुयोगात वसतात. त्याच प्रमाणे मित्र आणि वरुण, सोम आणि रुद्र, दोघे अश्विनीकुमार द्यावा आणि पृथ्वी या युगुलांचा महिमा गातांना ऋषींना विस्तृत रविमार्गाचे अद्भुत दर्शन होते शिवाय मरुद्गण, सरस्वती, सविता, ही आकाश मार्गातील आगळी तेजोनिधाने असून त्यांचा महिमा भरद्वाज ऋषींनी आपल्या विविध सूक्तांत वर्णन केलेला आहे.

इंद्र व अग्नि हे वस्तुतः भिन्न देव असले तरी रविमार्गावर गति करणारे ते देव सूर्य रुपाने नक्षत्रस्वामी म्हणून एकाच राशीत एकरुप होतात. या रहस्याचा उलगडा करतांना ऋषि म्हणतात–

'प्रकाशाच्या तळपत्या तेजोवलयांत वास करणाऱ्या इंद्र व अग्नि देवांनो तुमची गति मानवाला अनाकलनीय आहे. वस्तुतः वेगवेगळे घोडे जोडलेल्या रथात बसून जातांनाही एकरुप होऊन स्वतःचे रूप व लक्षणे सूर्यासारखी करता येणे हें कार्य रहस्यमय आहे.'

या सूक्तांत ज्या रथांचा उल्लेख आहे ते सूर्याच्या वर्षं गतिचे सूचन आहे. एका राशीत दोन स्वामींची युति झाल्यास इंद्र व अग्नि एका भुवनाचे स्वामी होऊन एक गति स्वीकारतात असे सूचनही त्यावरुन मिळते.

'मित्र व वरुण हे वेगवेगळ्या नक्षत्रांचे देव असून आकाशाच्या विस्तीर्ण पटावर त्यांच्या गतिनुसार दिवस व रात्रीची शक्ति अवलंबून असते. सौर मंडळाच्या विस्तृत, उंच प्रदेशांत हे दोन्ही अधिष्ठाते मिळून सूर्याच्या गतीला दृढ करतात. हे देवांनो, तुमच्यामुळे दृढ व स्थिर गति धारण करणारा सूर्य नक्षत्र मंडलाच्या मार्गावरील राशिभुवनात दृढ व स्थिर होतो. तो सूर्य विश्वेदेव होऊन मानवी आयुष्याची वृद्धि करून अन्नधान्यांदिनी त्यांचे पोषण करतो.

हे इन्द्र आणि वरुण तुम्ही आमच्या संरक्षक देवता आहात. तुमच्या विशेष गतिमुळे तेजस्वी देवांची वृद्धि होते. तुमच्यासारखे तेजस्वी देव आमचे रक्षण करतात. आकाशाच्या विशाल पटावर युद्धाचा प्रसंग आला असता तुम्ही आपल्या बलाने शत्रूचा पराभव करता व आम्हाला शक्ति देता. हे इन्द्र व विष्णो, तुमची

कार्ये विशेष स्तुतीस पात्र आहेत. तुम्ही उभयता सोमपान करून विशाल सौर मंडलात प्रकाशाची पावले टाकीत जाता त्यामुळे सौर मंडलावरील आवरणे दूर होऊन राशिचक्राच्या भुवनांचा विस्तार होतो. तुमच्या प्रेरणेने प्रकाशित झालेली भुवने आम्हाला नवजीवन प्राप्त करून देतात.

हे इन्द्र आणि सोम तुम्हा उभयतांचा महिमा तर विशेषच आहे. तुमच्या प्रमाणे महान व दिव्य कामे इतर देवही करू शकणार नाहीत. आकाशाचा विस्तार हे तुमचे पहिले कार्य. दुसरे अंधारात चाचपडणाऱ्या जगाला सूर्याचा लाभ तुमच्यामुळे झाला. विस्तृत आकाशातून अंधार दूर करून निंदक असुरांचा तुम्ही पराजय केला.

हे सोम आणि रुद्र, विरोधी जन-असुरांचा पराभव करून आमचे भले करा. आमच्या नक्षत्र व राशिचक्रात वसणारे देव आम्हाला लाभदायी होवोत. शुभ ग्रह सात रत्नांप्रमाणे प्रत्येक भुवनात वास करोत व आम्हाला प्रजा, संतती, धनधान्य व पशुधनाने संपन्न करोत.

देव युगुलांच्या युतिमुळे निर्माण होणाऱ्या विशेष सामर्थ्याचे वर्णन ऋषी भारद्वाजांनी आपल्या सूक्तात केलेले आहे. त्याचप्रमाणे सरस्वती व सविता यांचीही स्तुती केली आहे.

'आकाशाच्या विशाल प्रांगणात सरस्वती नदी वहात आहे. प्रकाश रेखांना झाकू पहाणाऱ्या आवरणांचा ती आपल्या प्रकाशमय वेगवान् प्रवाहाच्या योगाने नाश करते. आकाशांतील रवि मार्गावर पर्वतप्राय अशी जी आवरणे होती ती तिनेच दूर केली. दूर सुदूर आकाशाच्या आरपार जाणाऱ्या महामार्गाचा छेद घेणाऱ्या त्या महानदी सरस्वतीची आम्ही विविध प्रकारे स्तुति करीत आहो. हे देवी आमच्या प्रेरणेची धारणा तू सतत टिकवून ठेव.

हे सविता नारायण, बारा राशींच्या चक्रातील बारा स्थानांचे स्वामी ज्याप्रमाणे प्रभावी आहेत त्याचप्रमाणे तुम्हीही स्वस्थानी राहून आपल्या अदम्य, कल्याणकारी शक्तीच्या योगाने सर्व लोकांचे कल्याण करता. तुमचा विस्तृत प्रकाश मार्ग म्हणजे जणू सुवर्णाची जीभच. त्या मार्गाने जात असता हे प्रभो आमचे रक्षण करा. पापग्रहांचा प्रभाव आमच्यावर पडू देऊ नका. हीच आमची प्रार्थना आहे.'

'प्रकाश मार्गावर अधिकाराने नियंत्रण ठेवणारा तो हाच सविता देव होय. दोन्ही प्रकाश मार्गावर त्याचे दीर्घ बाहूच जणु पसरले आहेत. खाली पृथ्वीवर व

उंच आकाशात वेगाने झेप घेणाऱ्या पक्षिराजाप्रमाणे गमन करणारा सूर्य नारायण मार्गातील अंधार दूर करून लीलेने मार्ग आक्रमीत जातो.'

याप्रमाणे भारद्वाज ऋषींनी आपल्या स्तुति प्रार्थनेच्या द्वारे सौर जगातील सर्वश्रेष्ठ सूर्य, व वर्षा संवत्सरांतील नक्षत्र ज्योतींचे अद्भुत वर्णन केलेल आहे. सत्तावीस नक्षत्रांच्या अधिष्ठात्या देवांची स्तुति प्रार्थना करतांना खगोल विद्येच्या सिद्धांताचे सुंदर निरुपण केले आहे. त्याच प्रमाणे बारा राशी व नवग्रह यांच्या गति विधीचे मानवी जीवनावर होणारे परिणामही त्यांनी विशद करून दाखवले आहेत

अग्नि, प्रजापति, सोम, रुद्र, बृहस्पति, पूषा वगैरे देव नक्षत्रांचे स्वामी असून त्या शिवाय अगस्त्य, पुलह, ऋतु, ब्रह्महृदय, सप्तर्षि वगैरे ग्रह नक्षत्रांच्या स्वामींनाही सौर जगात असलेले स्थान स्पष्ट करून ऋषींनी त्यांचा महिमा वर्णन केला आहे.

आदि प्रजापतीने ज्या प्रमाणे ऋषि सृष्टि निर्माण केली त्याच प्रमाणे आदि प्रजापति सूर्याच्या प्रेरणेने ऋषिसृष्टिच्या रुपाने ऋक्ष, नक्षत्रांची स्थाने व त्यांच्या अधिष्ठात्या देवांचीही निर्मिती झाली आहे. ते रहस्य भरद्वाज ऋषींच्या सूक्तांतून विशद केलेले आहे.

★ ★

# ५ / दैवताला जागवा

(ऋग्वेद षष्ठ मंडल)

हरियूपिया नदी वेगाने वहात होती. तिच्या पूर्व किनाऱ्यावर प्रस्तोक आणि पश्चिम किनाऱ्यावर चायमान, राजाची राजधानी होती. राजा चायमान हा अभ्यावर्ती (अंतर्मुख) शक्तीचा ज्ञाता होता तर राजा प्रस्तोक हा सृंजय राजाचा पुत्र, बाह्य शक्ती जाणणारा होता.

भूमि सर्व सारखीच पण मधून वहाणाऱ्या नदीमुळे दोन किनारे झाले. परस्पर व्यवहारही चालत. नदी प्रमाणेच स्नेहाचाही प्रवाह वहाता असला तर दोन्ही कडची समृद्धी वाढते.

राजा चायमान व प्रस्तोक हे मित्र होते. त्यामुळे त्यांची प्रजा सुखी व समृद्ध होती. प्रजाजन संतुष्ट होते.

रात्रंदिवस अविरत वहाणाऱ्या प्रवाहाचा लाभ नेहमीच सारखा घेता येत नाही. तथापि प्रवाहाच्या गतीत मात्र त्यामुळे काहीच फरक होत नाही. प्रजेच्या कल्याणाविषयी राजाची वृत्ति व प्रवृत्ती सतत एक सारखीच होती.

वहात रहाणे हा नदीचा धर्म आहे. परंतु वृत्र हा त्या वहात्या प्रवाहाला अडवणारा शत्रू. नदीकांठच्या अरण्यात वारशिख नांवाच्या असुरांची वस्ती होती. ते मोठे बलवान असून अवरोध उभे करणे येवढेच त्यांचे कार्य असे. वहाते प्रवाह अडवून पर्वतप्राय अडथळे निर्माण करण्यातच ते आपल्या शक्तींचा उपयोग करीत.

वारशिखांनी हरियूपिया नदीचा प्रवाह अडवला त्यामुळे प्रजेच्या सुख-समृद्धीत विघ्ने येऊ लागली. त्या असुरांची चोरी लूटही जोडीला होतीच. ते प्रजेचा जीवही घेऊ लागले.

चायमान व प्रस्तोक हे दोघेही दानी व परोपकारी राजे होते. प्रजेशी सहकार्य करून ते शेती व उद्योगाची कार्ये करीत. त्याचप्रमाणे शस्त्रांनी सज्ज असे सैन्यही ठेवीत.

वारशिखांच्या आक्रमणाचा प्रतिकार करण्यासाठी दोन्ही राजे आपआपली सेना घेऊन पुढे आले. पण वनातील निबिड मार्गात वारशिखांनी त्यांच्या सेनेचा नाश करून टाकला. पराभूत होऊन ते दोघेही आपआपल्या राज्यात परत गेले. परंतु त्यांचा उत्साह मावळला होता. प्रजाही हताश होऊन गेली.

प्राची सरस्वतीच्या काठी भरद्वाज ऋषींचा आश्रम होता. दोघेही राजे तेथे जाऊन ऋषींना शरण गेले. व त्यांची प्रार्थना केली, 'भगवन्, नीती व सदाचार पूर्वक आम्ही राज्य करतो. आमची प्रजाही परस्पर सहकार्याने काम करणारी आहे. राज्यांत कोणी दुष्ट, चोर वा कद्रू नाही, आरण्यात रहाणाऱ्या असुरांनी आक्रमण करून आमच्या प्रजेला लुटले. आमच्या सैन्याचा संहार केला तरी आता आम्ही काय करावे ते आम्हाला सांगावे.'

मुनिवरांनी त्या राजांना आश्वासन देऊन म्हटले, 'हे राजांनो तुम्ही सदाचारी आहात. व तुमची प्रजाही नीतीच्या मार्गाने चालणारी आहे. ही मोठीच उत्तम गोष्ट आहे. दुराचारी असुरांच्या जवळ भौतिक शक्ति व संपत्ती असून त्याच्या जोरावर बऱ्या-वाईट मार्गाने ते विजय मिळवतात. सदाचाराचा मार्ग सरळ असतो. त्या मार्गाने विजय मिळवण्यास वेळ लागतो. सुरुवातीला पराजयही स्वीकारावा लागतो.

असुरांचा पराजय करण्यासाठी दैवी शक्तीची साधना करावयास हवी. असुरांच्या विरुद्ध टिकाव धरून विजय मिळविण्यासाठी मंत्रशक्तीचा आगळा उपाय योजावयास हवा. तुम्ही उभयता आपआपल्या राज्यात परत जा. आपले सर्व सैन्य फिरून एकत्र जमवा. युद्धाची आयुधे, वाहने, साधनें सर्वांचा संचय करा.

माझ्या आश्रमातील भारद्वाज पायु याला मी तुमच्याबरोबर पाठवतो. मंत्र-शक्तीच्या योगाने तो तुमच्या आयुधात दैवी शक्ती जागवील आणि बोथट झालेली शस्त्रास्त्रे तीक्ष्ण करून देईल. सैन्यात नवा उत्साह निर्माण करील आणि या दैवी शक्तीच्या योगाने तुम्ही विजयी व्हाल.'

ऋषींना प्रणाम करून त्या राजांनी निरोप घेतला. नंतर भरद्वाज ऋषींनी आपल्या पायु नावाच्या पुत्राला बोलावून सांगितले- 'हे पुत्र, शान्त एकान्त आरण्यात आपण साधना करतो. पण ती साधना लोकांच्या कल्याणासाठी आहे. जेथे अन्यायाविरुद्ध युद्ध जागेल तेथे आपण न्यायी पक्षाच्या बाजूने उभे राहिले पाहिजे.

आपण मंत्रदर्शनाच्या योगाने जी दैवी शक्ति मिळवली आहे त्याचा उपयोग स्वार्थ वा लौकिक फळ मिळवण्यासाठी कदापि करू नये. परंतु अन्यायाविरुद्ध झगडणारी लोकशक्ती पराभूत होत असेल तर त्या शक्तीचा आपण उपयोग करावा. आपले साह्य मागण्यासाठी आलेले राजे पराजयाने निराश झालेले होते. आपल्या दैवी बलाविषयी त्यांच्या मनात श्रद्धा व विश्वास आहे. त्याचबरोबर आपण हेही पहायला हवे की दैवी बलावर आपलीही श्रद्धा आहे ना ? श्रद्धा व तप हेच आपले धन त्याच्या जोरावरच आपण जगतो. याप्रसंगी त्या बलाची कसोटी आहे. त्यासाठी तू तयार आहेस ?

भारद्वाज पायु आदरपूर्वक पित्याचे बोलणे ऐकून घेऊन त्यावर बुद्धिपूर्वक विचार करुन, आपल्या मंत्रदर्शनाच्या शक्तीचा प्रत्यक्ष प्रयोग करण्याच्या संधी बद्दल विचार करून म्हणाला,

'भगवन्, आपल्या प्रेरणेने मला दैवी शक्ति प्राप्त झाली आहे. आपल्या आज्ञेनुसार त्या शक्तीचा प्रयोग करण्याची संधीही मिळत आहे. माझी श्रद्धा आहे की ते दोघेही राजे व त्यांची प्रजा भौतिक साधनांचा उपयोग करण्यापूर्वी त्या साधनांतील दैवी शक्ति जागृत करून विजय प्राप्त करुन घेतील. आपले शुभाशिर्वाद घेऊन मी त्यांना साह्य करण्यासाठी जातो.'

या प्रमाणे भारद्वाज पायु आपल्या पित्याचे आशीर्वाद घेऊन हरियूपिया नदीच्या तीरावर जाऊन पोचला. उभयता राजांनी व त्यांच्या प्रजेने त्याचे भावपूर्वक स्वागत केले. भारद्वाजांना आलेले पाहून त्यांच्यात नवा उत्साह निर्माण झाला. त्या दोन्ही राज्यांत शेती व उद्योगधंदे चांगल्या प्रकारे चालत होते. त्यामुळे युद्धासाठी उपयोगी पडणारी शस्त्रास्त्रे मोठ मोठ्या भांडारांतून भरुन ठेवलेली होती. शत्रूला तोंड देण्याची वेळ आल्यावर भरून ठेवलेली साधने, वाहने व शस्त्रे, कवचे व बाणांचे भाते बाहेर काढले परंतु वापरात नसल्यामुळे ती साधने, वाहने, शस्त्रास्त्रे प्रभावी राहिली नव्हती त्यामुळे त्यांचा पराजय झाला. व ते राजे व त्यांची प्रजा हताश होऊन गेली होती.

पायु ऋषींनी भांडारे उघडून सर्व साधन सामग्री बाहेर काढावयास लावली. त्यांतील जर्जरित झालेल्या साधनांचा नाश करून टाकला. व टिकण्यासारखी शस्त्रास्त्रे वेगळी काढून त्यांना धार करून, स्वच्छ करून युद्धासाठी उत्तम प्रकारे सज्ज करून ठेवली.

त्यानंतर सर्व प्रजाजनांना बोलावून एक मोठा उत्सव करण्यात आला. त्याप्रसंगी सेनापती, सेनानायक व शूरवीर योद्धे या सर्वांचे राजाच्या व प्रजेच्या

हस्ते बहुमानपूर्वक पूजन करवले. त्यामुळे त्या सर्वांना पराक्रम गाजवण्याची, साहसे करण्याची प्रेरणा झाली. योद्धयांचा उत्साह वाढावा म्हणून नव्या नव्या शस्त्रास्त्रांचे एक मोठे प्रदर्शनही त्यावेळी थाटले होते.

भारद्वाज पायु ऋषींनी प्रत्येक शूरवीर सैनिक व तो वापरीत असलेली आयुधे यांचा नावानिशी उल्लेख करून कवचे, भाले, वाहने, साधने वगैरे दाखवून म्हटले,

'हे राजन्, प्रजाजनांनो, वीर सैनिकांनो ज्या राष्ट्रात तुम्ही रहाता ती मातृभूमी हे तुमचे परम दैवत आहे. ज्याप्रमाणे विशाल आकाशपटावर राशि चक्रात भ्रमण करणारे सूर्य नक्षत्र मंडल विविध रुपाने प्रकाशते, त्याप्रमाणे आपली मातृभू विविध प्रकारे आपले पालनपोषण करते, त्या भूमीसाठी आपण सर्वस्वाचे समर्पण करावयाचे आहे. तिची सेवा करावयाची आहे. त्यासाठी मनातील सर्व निराशा दूर करून सिद्ध व्हावयाचे आहे. आपल्या शस्त्रास्त्रांचा, साधन वाहनांचा उपयोग राष्ट्रसेवेसाठी करावयाचा आहे. ही साधने स्थूल किंवा जड नाहीत. त्यांच्या ठायी दैवी शक्ती आहे. देवाचा वास आहे. ती शक्ती जागवून जडाला चैतन्यमय करण्याचे सामर्थ्य आपल्या हाती आहे.

'पिता भरद्वाज ऋषींनी' मला जी मंत्र शक्ती दिलेली आहे तिच्या योगाने या शस्त्रांतील शक्ती जागवण्यासाठी आपण सर्व मला सहकार द्या. आपण सर्व मिळून दिव्यता निर्माण करू या. नव चैतन्य फुलवू या. आपण सर्वजण देवांना निमंत्रण देऊ त्याची स्तुति प्रार्थना करू व युद्धाच्या साधनांत मंत्रशक्ती निर्माण करू.

सर्व प्रथम या कवचाचा महिमा. दिव्य कवच धारण केलेले वीर योद्धे रणांगणावर मेघश्यामासारखे शोभतात. हे कवचधारी वीरा, तुझ्या शरीरावर कोठल्याही शस्त्राने काहीही लागणार नाही व तू विजयी होशील. हे दिव्य शक्तिमान कवच तुझे रक्षण करील.

हे वीरांनो आता या धनुष्याचा महिमा वर्णन करू. धनुष्याच्या योगाने दूरचा प्रदेश जणू हाताशी आल्याइतक जवळ येतो आणि धनुर्धारी वीर विजय प्राप्त करून येतात. तुमुल युद्धाच्या प्रसंगी पण धनुर्धारी विजयी होतात. दैवी तेजाने तळपणारी ही धनुष्ये तुम्हाला विजय प्राप्त करून देवोत.

धनुष्याच्या या दोरीचांही महिमा आहे. प्रिय पतीच्या जवळ जाऊन कान-गोष्टी करणाऱ्या स्त्रीप्रमाणे प्रत्यंचा खेचणाऱ्या वीराच्या कानाशी लागून जण विजयाचे रहस्यच ती त्याच्या कानात सांगते. खेचताना तिचा शब्दही प्रियभाषिणी

नारीच्या शब्दासारखा असतो. दिव्य तत्त्वाचा संचार झालेली ही दोरी तुम्हांला युद्धांतील बिकट संकटांतून पार पाडो.

धनुष्यांच्या दोन टोकांची आपण स्तुति करु. उत्तम रीतीने घर संसार चालवणाऱ्या दोन स्त्रीया ज्याप्रमाणे मनापासून घरांतील कामे करतात त्याप्रमाणे धनुष्याची दोन्ही टोके बाण सोडण्यासाठी अनुकुल असतात. मातेने पुत्राला जवळ घ्यावे त्या प्रमाणे सुटणाऱ्या बाणाला धनुष्याची टोके जवळ घेतात परस्पर स्वभावांचा समभाव साधणारी ही दोन्ही टोके दिव्य शक्तीने युक्त होऊन शत्रूचा थरकाप उडवून त्यांचा नाश करतात.

बाणांच्या भात्याचा अधिष्ठाता देव हा अनेक पुत्रांचा पिता आहे. अर्थातच भात्यातील अनेक बाणांचे रक्षण हा देव करतो. समरांगणावर बाणांचे चित्र-विचित्र आवाज येतात. धनुर्धारी वीर बाणांचा भाता आपल्या पाठीवर बांधतात. त्या भात्यांत दैवी शक्ति जागृत झाली की त्यांतून निघणारे बाण शत्रूच्या सैन्यावर विजय मिळवतात.

हे वीरांनो आता रथाचा सारथी आणि त्याच्या हाती असलेलें घोडयांचे लगाम यांचा महिमा पहा. रथामध्ये योद्धाच्या पुढे बसलेल्या सारथ्यामध्ये दैवी शक्ती जागृत होताच तो योद्धयाची इच्छा ओळखून त्याप्रमाणे रथाला गती देतो, त्याचप्रमाणे लगामही योद्धयाच्या मनोरथाप्रमाणेंच त्याचा रथही गतिमान करून त्याला दिशा देतात.

त्याचप्रमाणे रथाला जोडलेले अश्व वायुवेगाने धावतात. रणांगणावर उच्च स्वराने फुरफुरणाऱ्या या अश्वांची दैवी शक्ति जागृत होताच आपली शक्ति वाया न घालवता ते शत्रूला आपल्या पायाखाली तुडवून त्यांचा नाश करतात.

ज्या रथामध्ये आयुधे, कवच, भाते व खाण्यापिण्याची साधने ठेवलेली असतात. त्या रथाची आपण स्तुति करू या. हे वीरांनो योद्धयाची सर्व सामग्री धारण करणाऱ्या रथात दैवी शक्ति जागताच ते योद्धयाच्या सर्व सुखसोयी त्याला प्राप्त करुन देतात.

हे वीर पुरुषांनो तुमच्या रथाचे रक्षण करणारे गोप उत्तम प्रकारचे अन्न मिळवण्यात मोठे कुशल असतात. संग्रामाच्या प्रसंगी त्यांच्या चातुर्यामुळे अन्नाचा तुटवडा पडत नाही. अशी अद्भुत शक्ति अंगी असणारे हे गोप-पुरुष स्वभावानें गंभीर असून नाना प्रकारच्या सैनिकांची शस्त्रास्त्रे सिद्ध करुन देण्यातही मोठे

कुशल असतात. त्यांच्यातील देवी शक्ति तुमचे बल व औदार्य वृद्धिगत करो व शत्रूंचा पराजय करण्यास तुम्हाला समर्थ करो.

सौर मंडळातील विविध राशींच्या गृहात रहाणारे नवग्रह ज्याप्रमाण स्वस्थानांची वृद्धी करतात त्याप्रमाणेच राजा, प्रजा व सैन्य यांच्या भाग्यस्थानांच्या स्वामींची, अर्थात् संग्रामाच्या देवतांची स्तुति करून त्याना प्रसन्न करू या. हे वीरजनांनो, ब्रह्मस्थानाचे अधिपती सौम्य असे पितृदेव आहेत. निष्पाप व शुद्ध द्यावा पृथ्वी वेगवेगळया स्थानांचे देवत आहे. त्याना प्रसन्न केल्याने आपले कल्याण होईल. रेवती नक्षत्रातील पूषा देव व विविध ऋतूंचे अधिष्ठाते विविध सूर्य आपली स्तुति प्रार्थना ऐकून प्रसन्न होवोत व आपल्या शत्रूंचा युद्धात पराभव करोत.

हे वीरांनो, या बाणांचा महिमा अगाध आहे. हरिणाच्या कातडयाने मढवलेली तीक्ष्ण टोके असलेले हे बाण सुंदर पंखांनीही युक्त आहेत. मंत्रांच्या योगाने त्यांच्या ठायी दैवी सामर्थ्य निर्माण झाले असून शत्रु सैन्यावर त्यांचा पाऊस पडतो व त्या सेनेची वाताहात होऊन जाते. भीषण रणसंग्रामात विजय मिळवून देणारे हे बाण तुम्हाला सुखी करोत.

शत्रूंनी सोडलेले बाण निष्फळ जावेत म्हणून सोम व माता अदिती यांची प्रार्थना केली आहे.

'शत्रूंनी आमच्यावर सोडलेले बाण ऋजु व सरळ असोत. उलट आमचे शर मात्र तीक्ष्ण फत्तरासारखे कठोर असोत. सर्व वस्तुंच्या ठायी कोमलता निर्माण करणारा देव सोम कृपावंत होऊन आमचे रक्षण करो. व उत्तम कार्य करण्याची प्रेरणा देवो. माता अदिती आमचे कल्याण करो.

सारथ्याच्या हातातील चाबूक त्याचीही प्रशंसा केली आहे घोडयांना मार्गदर्शन करून गति देण्यासाठी त्यांच्या पाठीवर व खालील भागावर चाबूक मारतात. अभिमंत्रित झालेल्या चाबकामुळे रण संग्रामातील बिकट प्रसंगी घोडयांना व सारथ्यांना कल्याणकारक प्रेरणा मिळते.

हातावर बांधलेल्या हस्तबंधाविषयी ऋषि सांगतात– ' हे वीरांनो धनुर्धारी योद्धयांच्या हातावर बांधलेल्या हस्तबंधाच्या योगाने प्रत्यंचेच्या आघाता पासून योध्याचे रक्षण होते. सापाप्रमाणे हाताला विळखा घालून बसलेल्या बंधाच्या योगाने शरसंधानाविषयी वीर सर्वच जाणू शकतात. हे बंध ज्ञानी पुरुषा प्रमाणे वीरांना मार्गदर्शन करतात.

क्रूर व घातकी शत्रूंचा नाश करण्यासाठी विष पाजून तयार केलेल्या विषाक्त बाणांची स्तुति करतांना ऋषि म्हणाले, ' हे वीरांनो विषारी फळांच्या बाणासाठी

रुरुमृगाच्या कातड्याचा भाता उपयोगात आणला जातो. तीक्ष्ण धारेच्या पात्यांनी चमकणाऱ्या त्या बाणांमध्ये मंत्रांच्या योगाने मेघधारेसारखी सतत वृष्टि करण्याची शक्ति निर्माण होते हे हिंसाकुशल शरांनो मंत्रोच्चार करून तीरोधान करताच तुम्ही दूरवर असलेल्या शत्रूवर तुटून पडा व त्यांचा नाश करा.'

त्यानंतर ऋषींनी युद्ध भूमीची स्तुति केली. 'हे वीर पुरुषांनो, मुंडन केलेले कुमार ज्या प्रमाणे गुरुकुलाच्या परिसरांत मोकळेपणाने खेळतात तसे युद्धभूमीवर बाण इकडून तिकडे धावताना दिसतात. युद्धभूमी त्या वर्षावापासून तुमचे रक्षण करो. आमच्या विशाल मंत्रांचा स्वामी ब्रह्मणस्पति आम्हाला सर्व प्रकारे आनंदित करो.'

कवच गुंफणाऱ्या कारागिराचीही त्यांनी स्तुति केली आहे. 'हे राजन् तुमच्या कोमल अंगाचे रक्षण करण्यासाठी हे कवच गुंफले आहे. शस्त्रास्त्रांचे आघात भरून काढणारा देव सोम तुमच्या संनिध्र मृत संजिवनी होऊन वास करो. वीरांच्या व्रतांचे पालन करणारा राजा वरुण तुम्हांला श्रेष्ठ जनांतील श्रेष्ठपदी नेवो. तुमच्या विजयोत्सवांत सर्व देव सहभागी होवोत.

'कवचादि सर्व युद्ध साधनांच्या ठिकाणी दिव्य शक्ती जागवणारी मंत्र शक्ति स्वत: दैवी कवच आहे, हे शूर पुरुषांनो, आपले शत्रू, मग ते जवळपास असोत अथवा दूर असोत, जे नीच आपली हत्या करण्यासाठी सिद्ध झालें असतील त्या सर्वांचा नाश करण्याचे सामर्थ्य मंत्राच्या योगाने जागृत झालेल्या दैवतांच्या योगाने प्राप्त होते. युद्धाची सर्व साधने अभिमंत्रणाच्या योगाने आतां ब्रह्म कवचाने युक्त झाली आहेत. तुम्हां सर्वांच्या ठिकाणीही दैवी शक्ति जागृत होवो व तुम्हांस विजय मिळो.'

याप्रमाणे भारद्वाज पायुंनी उभयता राजांना दिव्य प्रेरणा देऊन सेनेसह सज्ज केले.

असुरांच्या आक्रमणाची वाट न पाहता यावेळी ते दोन्ही राजे सैन्यासह असुरांच्या-वर चाल करून गेले, निबिड वनात वसणारे वारशिख असुर या अचानक झालेल्या चढाईमुळे घाबरून गेले. राजांचा पराभव करून त्यांना लुटून ते निर्धास्तपणे खाण्यापिण्यात आनंद मग्न झाले होते. त्यामुळे आक्रमणाला तोंड देण्याची शक्ति त्यांच्या ठिकाणी नव्हती.

उलट राजांच्या सैन्यात नवी स्फूर्ति होती. ते शूर सैनिक, त्यांची शस्त्रास्त्रे व साधने दैवी तेजाने चमकत होती. दूरदूरच्या वनप्रदेशात, जेथे दुर्गम कंदरांतून असूर लपले होते तेथपर्यंत या सेना जाऊन भिडल्या.

परंतु त्या अज्ञात वनप्रदेशात शिरलेल्या सैन्याला असुरांनी चारी बाजूंनी वेढले व त्यांच्याबर लपत छपत हल्ले करून त्यांना त्राही त्राही करून सोडले. बिकट परिस्थितीत सांपडलेल्या त्या राजांनी व सैनिकांनीं भरद्वाज ऋषि व भारद्वाज पायु यांचे स्मरण केले. त्यांची प्रार्थना ऐकून ते तपस्वी पितापुत्र त्या वनप्रदेशात जाऊन पोचले. भरद्वाज महर्षिनीं इंद्राची स्तुति करून संकटातून वाचविण्याविषयी प्रार्थना केली. पण ती प्रार्थना पोचलीच नसावी. असुर त्या सैन्यास ग्रस्त करून सोडीत होते राजसैन्याची साधने, शस्त्रास्त्रे पाहून महर्षि भरद्वाजही दुग्ध्यात पडले. व स्तुति करण्याऐवजी देवराज इन्द्राला दोष देऊन म्हणाले,

'अरे, ज्याला सोमरस अर्पण करून प्रसन्न केले तो हा इन्द्र मद– उत्साहात मग्न झाला–त्याने आपल्यासाठी काहीच केले नाही! त्याला सोमपान करवले ते व्यर्थच ठरले. इन्द्राचा संग धरून आपण मैत्रीचा धर्म पाळला. पण त्यापासून आपल्याला मात्र काहीच लाभ झाला नाही. हे असे संबंध जोडून तरी काय कामाचे ?'

ऋषींच्या या शद्बांचा मात्र तात्काळ परिणाम झाला. इन्द्र हा शूर वीरांना प्रेरणा देणारा युद्धाचा देव. ऋषींचे रोषाचे शब्द ऐकून तो स्वतःच त्या ठिकाणी प्रगट झाला. त्यामुळे राजाच्या सैन्यास नवे बळ चढले. अंधार सरून प्रकाश पसरावा त्याप्रमाणे असुरांची माया ओसरू लागली आणि राजांनी वारशिख असुरांचा समूळ संहार करून टाकला.

देवराज इंद्राच्या या दिव्य साह्याची स्तुति करून महर्षि म्हणाले, 'अहो, मदोत्साहित इंद्राने आपल्यासाठी मोठेच उत्तम कार्य केले. त्याला सोमरस अर्पण केल्याने आपला मोठा लाभ झाला. त्याच्याशी संग करून मैत्री साधल्यामुळे आपल्याला विजय प्राप्त झाला आहे. सभा असो वा समरांगण, देवराज ज्या ठिकाणी उपस्थित असतो तेथे विजय ठेवलेलाच असतो.

खरोखरीच हे देवराजा, तुझा महिमा आम्ही पूर्णपणे जाणत नाही व तुमच्या कृपेने मिळणारी सिद्धी व लाभही आम्हाला पूर्णपणे कळत नाहीत. तुमच्या दिव्य सामर्थ्यांचेही आम्हाला फार थोडे ज्ञान आहे.

हे देवांच्या राजा, तुझा हा पराक्रम प्रसिद्ध आहे. वारशिख असुरांचा संहार तुझ्याच योगाने झाला आहे. हरियूपिया नदीच्या किनाऱ्यावरील निबिड वनात

वसणारे एकशेतीस वारशिख असुराचे पुत्र कवच धारण करून चायमान व प्रस्तोक या राजांना वेढून त्रस्त करीत होते त्यांचा तुझ्या कृपेने संहार झाला.

वनांतरी वसणाऱ्या वारशिखांचा संहार करून चायमन व प्रस्तोक हे उभयता राजे आपआपल्या विजयी सेनेसह परतले तेव्हा त्यांच्या राजधानीतील प्रजाजनांनी हर्षपूर्वक त्यांचे स्वागत केले. एक मोठा उत्सव करून महर्षि भरद्वाज व पायु भारद्वाज यांनी जी दैवी शक्ति जागृत केली त्याबद्दल त्यांचा बहुमान करून त्यांना विपुल दान दक्षिणा देऊन प्रेमादरपूर्वक निरोप दिला.

★ ★

# ६ / दिव्य जन्म आणि कर्म

(ऋग्वेद सातवे मंडल)

सकाळी सूर्योदय होतो आणि ऋषींचे हृदय आनंदाने नाचू लागते. सूर्याच्या तेजामध्ये होणाऱ्या दिव्य दर्शनाचा आनंद ते शब्दात गुंफतात. त्यातून एक सुंदर काव्य निर्माण होते.

'मला मोठे विलक्षण दृश्य समोर दिसत आहे. सूर्य हा प्रकाशगोल नाही पण देववर मित्र आणि वरुणाचा तो स्थिर चक्षु आहे.'

कोण आहेत हे मित्र आणि वरुण ? अंधाऱ्या रात्री जगताचे रक्षण करणारा देव वरुण. म्हणून त्याला रात्रीचा देव म्हणतात. आणि दिवस उजाडल्यावर सर्वांना प्रेरणा देणारा देव तो मित्र. त्याला दिवसाचा देव म्हणतात. दिवस व रात्र ह्यांचा संधिकाल म्हणजे वरुण व मित्र यांच्या भेटीचा क्षण. ही संध्या म्हणजे चमकत्या विजेसारखी अप्सरा उर्वशी. या मीलनातून तिने दोन ऋषि-पुत्रांना जन्म दिला. अगस्त्य आणि वसिष्ठ.

रात्र गहन असते. एखाद्या भरलेल्या कुंभासारखी. अगस्त्य ऋषिही तसेच खोल–गंभीर. त्यांचा जन्म कुंभाच्या ठामी झाला. प्रकाशाचे किरण क्षितिजावर पसरीत येणारी उषा उमलत्या कमल पुष्पासारखी. उमलत्या कमलातून वशिष्ठांचा जन्म झाला.

वसिष्ठांचा हा दुसरा जन्म. प्रथम जन्म प्रजापतीच्या प्राणतत्वापासून झाला होता. म्हणून वसिष्ठ प्राणरूप मानले जातात. अरुंधति हे वाणीचे रूप. प्राण व वाणी यांच्या सुयोगातून जे शतपुत्र जन्मले त्याना वासिष्ठ अथवा वसिष्ठ म्हणतात. ते सर्व ऋषि होते. त्यांच्या मनातील भाव त्यांनी काव्यातून व्यक्त केले. त्यांच्या वाणीत प्राण तर होताच. प्राणांचा देव इन्द्र. वसिष्ठ–पुत्रांनी

इन्द्रप्राण द्वारा गायलेल्या काव्यांत वशिष्ठ कुलाचा महिमा वर्णन केलेला आहे. त्यांचा द्रष्टा ऋषि देवराज इंद्र असून देव पण इंद्रच आहे. संवादाच्या सुरुवातीस इंद्र म्हणतो,

'या वसिष्ठ गोत्राचे पुरुष वर्णाने गौर असून त्यांच्या डोक्यावर उजव्या बाजूस शिखा बांधलेली असते. ते पुरुष अत्यंत बुद्धिमान असून त्यांची सर्व आवूद कार्ये योजना पूर्वक पार पाडली जातात. हे सर्व जण मला खूप आनंद देणारे असून त्यांच्या यज्ञ मंडपातील आसनावरुन उठून त्यांचा निरोप घेताना आठवण ठेवून मी नेहमी चिंततो की 'वसिष्ठ कुलातील पुरुष माझ्यापासून दूर न जावोत.'

देवराज इंद्राची स्तुति करताना ऋषि म्हणतात–

'वयत् राजाचा पुत्र पाशद्युम्न याच्या यज्ञात सोमरसाची सारी सिद्धता झाली होती. चमस पात्रांत सोमरस भरलाही होता. पण वसिष्ठ कुलांतील पुरुषांनी गाळलेला दिव्य सोमरस ग्रहण करण्यासाठी इंद्राने त्या सोमरसाचे पात्र तसेच टाकून दिले व वसिष्ठांच्या सोमयागासाठी देवराजाने धाव घेतली. खरोखरीच फार दूरवरुन याप्रमाणे देवराजाला आम्ही बोलावले. देवामध्ये श्रेष्ठ इंद्राने सोमरसाचा स्वीकार करून वसिष्ठांना वरदान दिले होते.'

स्तुतिने प्रसन्न झालेला इंद्र यावर म्हणतो–

'हे वशिष्ठ पुरुषांनो, तुमच्या ब्रह्ममंत्राच्या घोषाने पितृदेव प्रसन्न होतात. तुमच्या यज्ञासाठी वेळेवर येता यावे म्हणून माझा रथ मी स्वतःच चालवतो. तरी तुम्ही माझ्यावर कधी रुसू नये. शकवरी छंदात तुम्ही सामगान करु लागता ते ऐकून माझे बळ अनेक पटीने वाढते.'

तुत्सु, भरत आदि पंच कुलांतील राजे व पंचजन यांनी वसिष्ठांना आपले पुरोहितपद दिले होते. दाशराज्ञ युद्धांत त्या पंचजनांना विजय मिळाला. त्या प्रसंगी वसिष्ठांनी इंद्राची स्तुति करून त्याला प्रसन्न करून घेतले होते. व इंद्र स्वतः त्यांच्या बाजूने युद्ध करण्यासाठी रणांगणावर आला होता.चारी बाजूनी वेढल्या गेलेच्या तुत्सु राजाची सुटका करण्यासाठी त्यांनी एक विशाल प्रदेश निर्माण केला व राजाची मुक्तता केली.

'तुत्सु व भरत राजाचे सैन्य दुर्बल, संख्याही रोड व शस्त्रे तर गुराख्याच्या काठ्यासारखी होती. परंतु कुलपति वसिष्ठ महाराज राजपुरोहित झाल्यापासून तुत्सु व भरतांची प्रजा विशाल प्रदेशांत जाऊन वसती करू लागली.'

'अग्नि, वायु व सूर्य या देवता सामर्थ्य देणाऱ्या आहेत. अग्नि–जल देणारा असून वायु बल देणारा व सूर्य तेज देणारा देव आहे. प्रगतीच्या प्रकाश मार्गावर

तीन श्रेष्ठ आर्य अग्रेसर आहेत. बुद्धि व धनाच्या संयोगाबरोबरच उषेचा उदय होताच त्रिविध उत्साह त्यांच्यात संचरतो. वसिष्ठ कुलांतील ते पुरूष समाज, राष्ट्र व विश्वाच्या प्रगतिचा मार्ग जाणणारे आहेत.'

'हे वसिष्ठ पुत्रांनो तुमचा महिमा सूर्य किरणांच्याप्रमाणे सतत वाढता असून समुद्रासारखा सखोल व गहन आहे. तुम्ही गात असलेली साम-स्तोत्रे वायुच्या वेगाने सगळीकडे पसरतात. तुमच्या सामर्थ्याची बरोबरी करणे कोणासही शक्य नाही.

हजारो धाग्यांनी विणलेल्या वस्त्रसारखे हे विश्व-विशाल रहस्यमय आवरणा-खाली झांकल्यासारखे आहे. त्याचे गूढ रहस्य हे वशिष्ठ पुरूष आपल्या प्रेरक ज्ञान बलाने जाणतात. चराचराला नियम संयमाच्या बंधनांत ठेवणारा परमेश्वर हा साक्षात् यमराज आहे. त्याने निश्चित केलेल्या मर्यादांच्या चौकटीत विश्वाचे वस्त्र विणणारे वसिष्ठ पुरुष प्रेरक परमेश्वराच्या दिव्य शक्ती रूप अप्सरांच्या जवळ बसलेले आहेत.

या ठिकाणी विश्वपट पसरणाऱ्या परमेश्वराला यमराज म्हटलेले आहे. अप्सरा या त्याच्या प्रेरक शक्ति आहेत. वसिष्ठ पुरुष हे त्यांची ज्ञानशक्ति धारण करणारे आहेत. सामान्य घटना सांगून नंतर वसिष्ठांच्या मूळ पुरुषाची दिव्य जन्मकथा सांगितली आहे.

'हे वशिष्ठ, मित्र आणि वरुण हे दिव्य दृष्टी धारण करणारे आहेत. त्यांनी पाहिले की ऋषी वसिष्ठ आपल्या विजेसारख्या तळपत्या बुद्धी ज्योतीचा त्याग करीत आहेत व कायाकल्प करून नवीन दिव्य देह धारण करीत आहेत- तेव्हा त्यांनीं त्यांच्या पुनर्जन्माच्या कल्पनेला दुजोरा दिला. ऋषि अगत्स्यांनीही त्या नवजन्माचे स्वागत केले व वसिष्ठांनी कल्याण हेतूने नवा देह धारण केला.

हे वसिष्ठ मुनी, तुम्हाला नवजीवनाची प्रेरणा देणारे देव, मित्र व वरुण असून तळपत्या विजेसारखी ज्ञानज्योती ही उर्वशी आहे. या कारणाने तुम्ही मित्र व वरुणाचे पुत्र असून उर्वशीच्या इच्छेने तुमचा जन्म झाला आहे. मित्र, वरुण व उर्वशी यांच्या जीवनदायी वीर्य शक्तिला देवांनी पुष्कर कमलावर झेलून धरली होती.

या प्रमाणे दिव्य जन्म धारण करणारे वसिष्ठ इहलोक व परलोकाचे वैशिष्ठ्य उत्तम रितीने जाणतात. स्वतःच्या प्रेरक ज्ञानाचे दान ते हजार मार्गाने, समान रितीने करीत आहेत. विश्वनियंत्या परमेश्वराने पसरलेल्या विश्वपटाचे ते विणकर आहेत. दिव्य अप्सरांच्या पासून त्यांना दिव्य देह प्राप्त झालेला आहे.

विश्व रचना करण्यासाठी विश्वनियंत्या प्रजापतीने एक महायज्ञ केला. त्या यज्ञात सर्व देवांनी सहकार केलेला होता. मित्र व वरुण यांनी यज्ञाची दिक्षा घेतली होती. त्या सत्र महायागात उद्गाते सामगान करीत होते. तेव्हा त्या दिव्य मंत्रांच्या प्रेरणेने प्रेरित होवून मित्र व वरुण या दोघांनी आपले वीर्य एका कुंभात सिंचन करून ठेवले. त्या कुंभाच्या मापातून अगस्त्य ऋषि प्रगट झाले. म्हणून त्यांना 'मान' असेही एक नाव आहे. 'कुंभज' अथवा 'कुंभयोनि' असेही म्हणतात. त्यानंतर वशिष्ठांचा जन्म झाला.

हे प्रतृद, तृत्स, भरत जनांनो, याप्रमाणे दिव्य जन्म धारण करणारे वशिष्ठ ऋषि तुमच्याकडे येत आहेत. मनात उत्तम भावना धरून तुम्ही त्यांचा आदर सत्कार करा. उत्तम प्रकारची उक्थ-स्तुतिवचने व सामगान त्या ऋषिना अवगत आहेत. त्याचप्रमाणे ताजा सोमरस कुटण्याचा खल व बत्ताही त्यांच्यापाशी आहे. अर्थात इंद्राला प्रसन्न करण्याची सर्व साधने त्यांच्यापाशी आहेत. तेव्हा त्यांचा मान-सन्मान करून त्यांना प्रसन्न करा.

या सूक्तांत वशिष्ठांच्या दिव्य जन्म, गुण व कर्माचे वर्णन आहे. दाशराज्ञ युद्धात भरत राजांना वशिष्ठांनी विजय मिळवून दिला आहे. त्याचे वर्णन पण या 'आख्यान सूक्तांत' केलेले आहे. याप्रमाणे एक आगळी कथा या सूक्तांत मिळते.

वशिष्ठ ऋषींनी सुदास, तुर्वसु, द्रुम्हु अनु वगैरे भरतजन अथवा पंचजन या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या प्रजेला विजय मिळवून दिला व यज्ञयागादि क्रिया न करणाऱ्या दास, वृत्र वगैरे दहा राजांचा पराभव केला. त्याप्रसंगीं त्यांनी इंद्र व वरुणाची स्तुति केली आहे.

'हे इन्द्र, व वरुण तुम्ही उभयता आमचे नेतें आहांत. आम्ही यज्ञ करणारे यजमान, तुमच्याशी निकटचा संबंध असावा अशी आमची कामना आहे. आम्ही ऋत्विज विशाल परशु घेऊन पूर्वेकडे दर्भ, समिधा वगैरे यज्ञाचे साहित्य आणण्या-साठी जात आहोत. दास, वृत्र व यज्ञ न करणारे आर्य यांचा नाश करून सुदास राजाचे रक्षण करण्यासाठी तुम्ही स्वतः यावे.

हे इंद्र आणि वरुण ज्या संग्रामात योद्धे विजय पताका घेऊन जमतात, ज्या भयंकर युद्धात काहीच प्रिय अथवा हितकारी वाटत नाही, ज्या युद्धात शूर वीर योद्धे रणांत मृत्यू पावून स्वर्गात जाण्याची महेच्छा मनांत असून देखील, आंतल्या आत भीत असतात, अशा या भीषण रणसंग्रामात तुम्ही येऊन आम्हास अनुकूल वचने सांगावीत.

हे इंद्र आणि वरुण आमच्या राजा सुदासाचा शत्रु भेद रणांगणावर येऊन पोचला आहे. संहारक आयुधांनी त्याचा नाश करा. व राजा सुदासाचे त्याच्या पासून रक्षण करा. तुत्सु हे आमचे यजमान आहेत. मी त्यांचे पुरोहितपद स्वीकारले आहे. त्यांच्या हितासाठी आम्ही ब्रह्ममंत्र म्हणत आहोत. तें ऐकून तुम्ही आमची भावना जाणून मनोकामना पूर्ण करा.

हे इंद्र व वरुण, या बिकट रण संग्रामात राजा सुदासाचे सेवक व त्याचे सहाय्यक तुत्सु भरतजन तुम्हा उभयताना आवाहन करीत आहेत. या संग्रामात दहा जातीच्या राजांनी सुदासाला घेरलेले आहे. तरी त्याचे रक्षण करणाऱ्या तुत्सु आदि भरतजनांचे तुम्ही रक्षण करा व त्यांना साह्य करा.

या संग्रामात जे दहा राजे एक होऊन चालून येत आहेत ते यज्ञ यागादि परोपकाराची कामे कधी करीत नाहीत. राजा सुदास हा परोपकारी व यज्ञकर्म करणारा राजा आहे. तुमची कृपा त्याच्यावर असल्याने शत्रू त्याच्याशी युद्धच करू शकणार नाहीत. राजाने केलेल्या या यज्ञासाठी देवांना आवाहन केलेले असून ऋत्विज हवि वगैरे साधनांनी त्यांना प्रसन्न करून त्यांची उत्तम स्तुति करीत आहेत. सर्व देव प्रसन्न होऊन राजावर कृपा करोत अशी आमची प्रार्थना आहे.

हे इंद्र आणि वरुण, या रण संग्रामात एक झालेल्या दहा दहा शत्रूंनी राजा सुदासाला चारी बाजूंनी वेढा घातलेला आहे. तरी राजाला त्यांच्याशी युद्ध करण्याची शक्ति द्या. राजाला विजय मिळावा म्हणून तुत्सु आदि वशिष्ठांच्या शिष्यांनी तुम्हा उभयतांची सेवा, स्तुति करून भेटपूजा केलेली आहे. ती स्वीकारून कृपा करावी. हे ऋत्विज वशिष्ठांचे शिष्य असून अत्यंत शुद्ध आचरण करणारे, शिरावर जटाभार धारण करणारे, विवेक बुद्धीपूर्वक उत्तम व्रतांचे पालन करणारे असे बुद्धीवान तुत्सु आहेत.

हे इन्द्र आणि वरुण, तुमच्यापैकी देवराज इन्द्र हा वृत्र शत्रूचा नाश करण्याची प्रेरणा देणारा आहे आणि वरूण मित्र चांगली कामे करण्याच्या प्रसंगी राजाचे रक्षण करणारा आहे. हे वर्षणशील, शूर देवांनो उत्तम स्तुति वचनांनी आम्ही आवाहन करीत आहोत. आम्हाला सुखी करा.

या सूक्तात दाशराज्ञांतील दहा राजे व यज्ञ कर्म न करता केवळ स्वार्थामागे लागणाऱ्या लोकांची गणना केलेली आहे. व यज्ञ, पवित्र कार्ये, परोपकार करणाऱ्या सुदास तुत्सु वगैरे पंचजनांना विजयी करण्याविषयी प्रार्थना केलेली आहे. सुदास राजा हा पंचजनांचा मुख्य प्रतिनिधी असून महर्षि वशिष्ठांच्यामुळे त्याला विजय प्राप्त झाला आहे.

ज्या मित्र व वरुणापासून वशिष्ठांचा जन्म झाला ते देव वस्तुत: सूर्याचीच स्वरुपे आहेत. बारा महिने सूर्य बारा रूपे घेतो. त्याच्या त्या सर्व रूपांपासून प्रेरणा मिळावी म्हणून वशिष्ठांनी स्तुति-प्रार्थना केली आहे.

'हे सूर्य आज उगवल्याबरोबर तुम्ही आमची जीवने निष्पाप, निर्मळ करा हे माता अदिती, आम्ही देवांच्यातच राहून मित्र व वरुण यांचे सखे-मित्र व्हावे असे करा. हे अर्यमा-सूर्य स्तुति गाता गाता आम्ही आपले प्रियजनच होऊन जावे अशी आमची प्रार्थना आह.

'हे मित्र आणि वरूण, सूर्य मानवांचे समग्र आचरण पहाणारा आहे. भूलोक व परलोकाच्या मधल्या अंतरिक्षातील रविमार्गावर त्याचा उदय होतो. सूर्य हा जड, चेतनाचा रक्षक असून मानवाची बरीवाईट कोणतीच कामे त्याच्या दृष्टी बाहेर नसतात.

'हे मित्र आणि वरूण, देव-सदन, रविमार्गावर जाण्यासाठी सूर्याने आपल्या रथाला सात हरितवर्णी घोडे जोडले आहेत. पाण्याच्या वहात्या ओघासारखे ते चपळ घोडे घृताचि-सूर्याला त्या मार्गावरून नेतात. गोपाळ ज्या प्रमाणे आपल्या प्रत्येक गाईला ओळखतो त्याप्रमाणे सूर्य प्रत्येक पदार्थाच्या जन्माविषयी व स्थानाविषयी जाणणारा आहे.'

'मित्र, वरूण, अर्यमा वगैर अदितीचे पुत्र सूर्याचा मार्ग मोकळा करून ठेवतात. आदित्य देव उद्यमी पुरुषांना नेहमीच प्रगतीच्या मार्गावर पुढे नेतात. व आळशी पाप्यांना खाली ढकलून देतात. आकाश व पृथ्वीवरील हे दोन्ही मार्ग जाणणारे वीर आदित्य अज्ञानी जनांना ज्ञान प्राप्त करून देऊन संकटातून वाचवतात.'

'हे मित्र आणि वरुण, आपल्या चक्षुरुप अशा या सूर्याचा प्रकाश सर्वत्र पसरत आहे व तो मानवी मनातील भावही त्याबरोबर जाणून घेत आहे.'

'हे ऋत्विजांनो, मित्र व वरुणाच्या तेजस्वी धामाचे वर्णन करा. ते दोन्ही देव आपल्या सामर्थ्याने दोन्ही लोकांना मर्यादित ठेवणारे आहेत. जे लोक यज्ञयागादि परोपकारी कामे करीत नाहीत त्यांचे सर्व दिवस, बाराही महिने वीर देवपुरुषांच्या दर्शनविना व्यर्थ जातात व परहितरत यजमानांचे बलसामर्थ्य त्या देवांच्या कृपेने वाढत जाते. मित्र व वरुण या देवांनीच विश्वाची रचना व पदार्थांची धारणा व्हावी या हेतूने महायज्ञांना सुरुवात केली. त्यांच्या त्या परहितकारी परोपकारी कार्यांची आम्ही स्तुति करीत आहोत. हे देवांनो ती कल्याण साधने सदैव आमच्या जवळ राहोत.'

मित्र व वरुण हे ज्या प्रमाणे सूर्य-स्वरुप आहेत त्याचप्रमाणे ते दोघे वैश्वानर अग्निरूपही आहेत. त्यांची त्या रूपात व सूर्य व अग्नि अशा एकरूपातील दर्शनाची ऋषींनी स्तुति केली आहे.

'हे देव अग्नि, तुम्हीच मित्र असून वरुणही तुम्हीच आहात. वशिष्ठ कुलांतील ऋषि आपआपल्या विविध मतीप्रमाणे विविध स्तुति गाऊन तुमचा महिमा वाढवीत आहेत. तुमच्या जवळ सर्व प्रकारची वसु–धन–साधने आहेत. त्यांच्या सेवनाने मानवांचे कल्याण होते. तरी हे देवांनो त्या कल्याणकारी साधनांच्या योगाने आमचे रक्षण करावे.'

वशिष्ठ ऋषींनी अग्नि, इंद्र, वायू, वरूण, विष्णु, सरस्वती, अश्विनीकुमार, रुद्र मरुद्‌गण, जल, आपोदेवी, उषा, पर्जन्य ऋभु, सूर्य, सविता, भग, दधिकावा, विश्वेदेव आदि अनेक देवतांची स्तुति केली आहे. इतकेच नाही पण मित्र व वरुण यांच्या सूर्य स्वरुपाची, मित्र व वरुणाचा चक्षुरूप सूर्य असे जाणून त्या भावनेने त्यांनी आगळी उपासना केली आहे व एकाच देवाची प्रार्थना करण्याचे सुचनही त्यातून केलेले आहे.

वशिष्ठांच्या या स्तुति सूक्तांत वशिष्ठ ऋषींच्या प्रमाणेच वशिष्ठ कुलांतील पुरुषांचा जो निर्देश आहे तोही महत्वाचा आहे. त्याचप्रमाणे महर्षि वशिष्ठांचा पुत्र शक्ति व त्याचा पुत्र पराशर यांच्याही नांवाचा उल्लेख या सूक्तांत आहे.

★★

# ७ / अपराध कोणाचा?

(ऋग्वेद सप्तम मंडल)

हिमालयाचा रमणीय प्रदेश आहे. पांच नद्यांचे समृद्ध प्रवाह त्या प्रदेशातून वहात आहेत. त्या प्रदेशांत भरत जातीचे पंचजन रहात. त्या पंचजनांना दुसरे दहा राजे मिळून वारंवार त्रास देत. सिंधु देशांत रहाणारे ते राजे वारंवार आक्रमण करीत.

पंचजन भरतांनी राजा सुदासाला आपला सम्राट म्हणून मान्य केले. व ऋषि वशिष्ठांना राज पुरोहिताच्या जागी स्थापन केले. पुरोहितांनी सम्राटाला ऐंद्रमहाभिषेक करून त्याच्या मस्तकावर मंत्र जल शिंपडले व त्याच्या करवी सोमयाग करविला. वशिष्ठ कुलांतील ऋषींनी ताजा सोमरस पिळून काढला. व देवराज इंद्र त्यावेळी दुसऱ्या यज्ञास गेलेले असताही तेथील सोम तसाच टाकून ते भरतांच्या यज्ञ मंडपांत उपस्थित झाले. व वशिष्ठांच्या स्तुतिवचनांनी प्रसन्न झालेल्या त्या देवश्रेष्ठाने त्यांनी दिलेला सोमरस ग्रहण केला.

राजा सुदास आपल्या सैन्यासह पंचजनांच्या रक्षणासाठी पंचनद प्रदेशांत जात असता मार्गात परुष्णी (रावी) नदी आडवी आली. तिला महापूर आलेला होता. परंतु वशिष्ठांच्या मंत्रप्रभावामुळे तिचा प्रवाह शांत झाला. व राजा आपल्या सैन्यासह नदी पार करून गेला.

मागून सिंधु देशातील ते दहा राजेही त्या नदीच्या तीरावर येऊन पोचले. पण नदीचा वेग त्यांना नियंत्रित करता येईना. राजा सुदासाने त्यांचा पराभव करून पंचजनांना भय मुक्त केले. व वशिष्ठांनी त्यांना ज्ञान व भक्तीचा मार्ग शिकवला.

वसिष्ठांनी मिळवलेल्या दैवी शक्तीच्या योगाने त्यांच्या यज्ञात देवराज इंद्र स्वत: येत असे. ऋषिंना अग्निच्या ठायी ज्ञानाचा व सूर्याचें ठायी भक्तीचा

साक्षात्कार झाला होता. त्याचप्रमाणे निसर्गात इतर देवांचेही दर्शन त्यांना होई. प्रत्येक वस्तुच्या ठिकाणी असणारा उत्तम गुण पारखून तो ग्रहण करावा, त्याची प्रशंसा करावी हा त्यांचा एक गुणविशेष होता. त्यामुळे ते सर्वांनाच फार प्रिय असत. इन्द्र, अग्नि वगैरे देवतांनी आपल्या गुणविशेषासहित त्यांच्या ठिकाणी वास केला होता. त्यामुळे सर्व लोक त्यांना देवस्वरूप मानून त्यांची पूजा करीत.

पहिल्या जन्मी वशिष्ठ भूदेव होते. मित्र व वरुण यांच्या कृपेने दुसऱ्या जन्मी ते ऋषि झाले. त्यांचा तो ऋषिदेह दिव्य होता. कायाकल्पाने तो मंत्ररूप झालेला होता. त्याचा उपयोग दिव्य लाभासाठी व्हावा हेच योग्य होते.

एकदा ऋषींना आपल्या जन्मदात्या वरुण देवाचे दर्शन व्हावे अशी इच्छा झाली. इन्द्र अग्नि वगैरे देवांचे दर्शन यज्ञाच्या वेळी घडे. पण वरुण म्हणजे पितृलोकाचें सम्राट. चौदा लोकांत त्यांचे गुप्तचर संचार करीत. त्यांचे वृत्त समाचार नेहमी त्यांच्याकडे येई. जल, स्थल, आकाश कोठेही काहीही गोष्ट त्यांना नकळत घडू शकत नसे. जे पापी असत त्यांना वरुण महाराज शासन करीत. त्यांच्या बिकट पाशांतून कोणी वाचत नसे. मात्र पापाचा पश्चाताप करणाऱ्यावर देव दया करीत व त्यांना वाचवीत.

वरुणराज एका विशाल महालयात रहात. त्यांचे निवासस्थान जलराशी-मध्ये आहे. त्यांच्या कृपेनेच पृथ्वीवर पाऊस पडतो. जलआपोदेवी त्यांची पत्नी आहे. अंतरिक्ष व आकाशातील प्रकाशाच्या प्रवाहांवरही वरुण देवांचेच नियंत्रण आहे.

अशा प्रतापी देव सम्राटाचे दर्शन दिवसा घडणे शक्य नव्हते. ऋषींनी रात्रीच्या वेळी जाण्याचे ठरवले. पण वरुणाचे दिव्य दर्शन व भेट अशी स्थूल देहधारी माणसाला थोडीच होणार? ऋषींनी संकल्प करून कायाकल्प केला. स्थूल देह सोडून दिव्य देह धारण केला. स्थूल रथासारखे वाहनही येथे कामास येण्यासारखे नव्हते. म्हणून त्यांनी 'मनोरथ' सिद्ध केला. जागृत दशेतील व्यव-हारही चालणार नव्हता म्हणून स्वप्न दशेचा आश्रय घेऊन ऋषींनी हजारो महाद्वारे ओलांडून वरुणाच्या भवनांत प्रवेश केला.

दिव्य देह धारण केलेल्या त्या ऋषींना रात्रीच्या वेळी कोणी पहाणे शक्य नव्हते.' पण वरुणाच्या सभेत त्याचे चतुर गुप्तचर होते. सूक्ष्मातील सूक्ष्म वस्तूही त्यांच्या दृष्टीतून सुटणे शक्य नव्हते. प्रत्येकाच्या पाप पुण्याची नोंद घेणारे ते चतुर सेवक, त्यांना एक अज्ञात मूर्ती महलात आल्याचे कळल्याखेरीज कसे राहील?

वरुण देवाचा द्वारपाल कोणी असातसा नव्हता. इंद्राच्या पाळलेल्या सरमा नावाच्या कुत्रीच्या पोटी जन्मलेला सारमेय अर्जुन ते काम संभाळीत होता. वसिष्ठांना पहाताच तो जोरजोराने भुंकू लागला व त्यांच्यावर धावून गेला. ऋषी न भिता त्याला कुरवाळून गोड शद्वात त्याच्याशी बोलू लागले.

'हे सारमेय अर्जुना तुझा वर्ण कसा तेजस्वी पिवळा आहे. आणि भुंकताना दिसणारे तुझे दात कसे तीक्ष्ण शस्त्रासारखे दिसत आहेत. मिटलेल्या ओठामागे लपलेले ते दात तू खाऊ लागलास की कसे चमकतात. हे सारमेया माझ्या येण्यामुळे तुला घाबरण्याचे काही कारण नाही. तू आपल्या जागी सुखाने झोप.'

हे सारमेया, एकदा पाहिलेल्या जागी तू अचूक जाऊन पोचतोस. कारण कोणताही मार्ग तू विसरत नाहीस. येथे कोणी चोर अथवा लुटारु आल्यास त्यांच्यावर तू निःशक चालून जा. आमच्यासारख्या देवराज इंद्राच्या भक्तांच्या अंगावर भुंकू नकोस. आमच्या मार्गात विघ्न कशाला आणतोस ? तू सुखाने झोप.

वनामध्ये वाघ, तरस आदि हिंस्त्र पशु असतात. त्यांच्यावर तू आक्रमण करावेस हे योग्यच आहे. पण अशावेळी तू सावध रहा. कारण ते हिंस्त्र पशु तुलाच फाडून खातील. आमच्यासारख्या भक्तांच्यावर आक्रमण करू नकोस. तू सुखाने आपल्या जागी रहा.

हे सारमेया, तुझे माता पितर सुखाने विश्रांती घेवोत आणि तूही शांत झोप. महाद्वारावरचे सर्व प्रहरी निःशंक मनाने झोपी जावोत. जागता पहारा करणारे कुटुंबजनही विश्रांती घेवोत. माझ्यापासून कोणाला कसलेच भय नाही. सर्वजण सुखाने झोपून जा.'

वसिष्ठ मुनींची वाणी इतकी मधुर होती की ती ऐकता ऐकता मन शांत व्हावे. त्यांची रीतभातही अगदी साधी व सरळ होती. ते पाहून सारमेय बाजूला झाला व त्याने ऋषींना वाट मोकळी करून दिली. याप्रमाणे वशिष्ठांनी वरुणाच्या विशाल राजभवनांत प्रवेश केला. भवनांतील अनुचर व स्त्रीया जाग्याच होत्या. ऋषींना पहाताच सर्व त्यांच्या आजुबाजूस गोळा झाले. त्या सर्वांची गोड शब्दांत स्तुति करून ऋषीनी निद्रेला आवाहन केले.

'हे निद्रा देवी, या राजभवनांत जे कोणी जागृत असतील व जे कोणी आम्हांस पहात असतील त्या सर्वांची दृष्टि एकाच जागी स्थिर होवो. हे भवन मात्र साक्षीरुप होवो. व येथील सर्व जन स्थिर निश्चल होवोत.'

हजारो शिंगें असलेल्या वृषभासारखा हजारो किरणांनी शोभणारा सूर्य

उष:काली अंतरिक्षाच्या अथांग समुद्रातून वर येतो व अस्त पावून सर्व जीवांना विश्राम देतो, तो सूर्य आपल्या प्रभावाने सर्वांना निद्रिस्त करो.

वरुणाच्या राजभवनात वास करणाऱ्या, बाहेर वाहनांतून फिरणाऱ्या व अंगणांत झोपलेल्या स्त्रीयांच्या पुण्य पवित्र सुवासाने येथील वातावरण दरवळत आहे. त्या सर्व स्त्रीया निद्रिस्त होवोत.

वसिष्ठ मुनींनी या प्रमाणे प्रस्वापिनी उपनिषदांचा उच्चार करताच मोठा चमत्कार झाला. राजभवनांतील सर्व स्त्री पुरुष गाढ झोपून गेले. व ऋषींचा मार्ग मोकळा झाला. राजा वरुणाच्या विशाल महालयात ते निर्विघ्न जाऊन पोचले.

रात्रीची वेळ होती. गाढ अंधार होता. तथापि वरुण राजाच्या प्रभावाने त्याच्या महालयात पूर्ण प्रकाश होता. स्वतः वरुण देवाचे डोळे सदैव उघडेच असतात. तो देवराज निद्रेला वश होत नाही. सतत जागृत रहाणाऱ्या देव श्रेष्ठाने आपल्याकडे कोणी येत असल्याचे पाहून सत्तावाही स्वरांत प्रश्न केला.

'कोण आहे ?'

'भगवन् ! आपला पुत्र वसिष्ठ.' किंचित संकोचाने, थोड्या भीतीनें– ऋषींनी विनयपूर्वक उत्तर दिले.

'अरे, तू ? आणि असा अचानक कसा आलास ?' वरुणाने चकित होऊन विचारले.

'पिताजी! आपल्या द्वारपाल सारमेयाला मी निश्चित झोपण्यास सांगितले.'

'पण दुसरे कोणी नव्हते तेथे ?'

दुसरे रक्षक, महालयांतील स्त्री पुरुष, व सेवक सर्वांना प्रस्वापिनि विद्येच्या योगाने झोपवून मी आलो.

'हं. असा घुसून आलास तर तू !' वरुणाला ते ऐकून आघात लागला.

'पिता ! आपला पुत्र आपल्याला हात जोडून प्रणाम करीत आहे.'

परंतु वरुणाचा क्रोध त्या शब्दांनी शांत झाला नाही. ते पाहून वसिष्ठ घाबरले. वरुण राजाच्या जवळ जाण्याचे धैर्य होईना. काय करावे तेही कळेना. ते तसेच उभे राहिले.

'माझ्या आज्ञेशिवाय तू येथे प्रवेश केलास, त्याची शिक्षा तुला भोगावी लागेल.' असे म्हणून वरुणाने आपल्या अदृश्य पाशांनी वसिष्ठाला बांधून टाकले. थोडावेळ ऋषि अगदी गोंधळून गेले. परंतु थोड्या वेळाने रागावलेल्या वरुण देवाच्या दृष्टित करुणा दिसू लागली. व त्यांच्या मनात विचार आला, 'अपराधाची शिक्षा करतो तोच क्षमा पण करतो' असा विचार करून मनांतील भीति दूर करून त्यांनी नम्रतापूर्वक स्तुति करून म्हटले,

'महाराज, देवामध्ये श्रेष्ठ वरुणाचा दिव्य जन्म व कर्म यांच्या स्मरणाने शहाण्या माणसांना धैर्य प्राप्त होते. आकाश व पृथ्वी जेव्हा अस्थिर होऊन डोलू लागली होती तेव्हा बलशाली वरुण राजानेच त्यांना स्थिर करून एका जागी त्यांची स्थापना केली. आकाशांतील विशाल सूर्यमंडळ व इतर ग्रह नक्षत्रांच्या मार्गांच्या कक्षा निश्चित करून त्याना त्याप्रमाणे भ्रमण करण्याची प्रेरणाही त्या देवश्रेष्ठानेच दिली.

अशा अद्‌भुत सामर्थ्यशाली देवाधिदेवाचे दर्शन घडून त्यांच्याशी दोन शब्द बोलण्याचे महद्‌भाग्य मला लाभेल काय? महाराजांचा आत्मीयजन म्हणून त्यांची सेवा करण्याची संधी मला केव्हा बरे मिळेल? महाराज वरुणांचा क्रोध शांत होऊन ते माझ्यावर कृपादृष्टि करतील काय? असा अपूर्व क्षण केव्हा बरे येईल?'

वसिष्ठ याप्रमाणे मनाशीच म्हणत होते. परंतु अंतर्यामी वरुणदेव ते विचार स्पष्ट जाणीत होते. त्यांचा क्रोध त्यामुळे हळू हळू शांत होत होता. त्यांच्या दृष्टीत करुणेबरोबर प्रसन्नताही दिसू लागलेली पाहून ऋषी म्हणाले, 'महाराज, माझ्याकडून काय पाप घडलें बरे? मी आपले दर्शन घेण्यासाठी आलो आणि आपण मला आपल्या पाशांनी जखडून ठेवले! असाच प्रश्न मी काही शहाण्या माणसांना व कवींना विचारला होता त्या सर्वांनी मला एकच उत्तर दिलें होते.'

शहाण्या कविजनांचे म्हणणे ऐकण्याची इच्छा कोणाला बरे होणार नाही? सहाजिकच वरुणांच्या तोंडून प्रश्न निघाला,

'पुत्रा, त्यांनी काय उत्तर दिले होते बरे?'

'महाराज! त्या सर्वांनी एकच गोष्ट सांगितली. वरुणदेव तुझ्यावर रुष्ट झाले आहेत.'

त्यांचे ते स्पष्ट उत्तर ऐकून वरुणदेव चकित झाले व त्यांच्याकडे पाहू लागले. निर्भयपणे वसिष्ठ पुढे म्हणाले,

'महाराज, माझ्याकडून असा कोणता बरे मोठा अपराध झाला की आपण मला असे बांधून घालावे? आपली स्तुति व सेवा करण्याची इच्छा असलेल्या भक्ताला आपण मारून टाकणार काय? आपले दर्शन दुर्लभ असून आपली प्रभाव शक्ति अत्यंत प्रखर आहे. हे मी जाणतो. तरीही स्नेहभावाने आपल्या जवळ येण्याचे धाडस मी केले हाच माझा अपराध असेल तर मला तसे सांगावे. व त्याचे

प्रायश्चितही सांगावे. स्तुति वचनांची भेट घेऊन आपली पूजा करावी म्हणून मी आपल्या चरणाशी धाव घेतली.'

'भगवन्, आपल्या दर्शनाला आलो हा अपराध नसून माझ्या दुसऱ्या चुका आपल्या ध्यानांत आल्या असतील ही ही शक्यता आहे. कारण कित्येक अपराध वंशपरंपरेने चालत येतात. तसेच माझ्या दुर्बल शरीरानेही चुका केल्या असतील. तरी त्या दोषांची आपण मला क्षमा करावी. चोर आणि लुटारू देखील पशूंना बांधून नेतात. तरी तेही त्यांना चारा पाण्याशिवाय ठेवीत नाहीत. मी तर आपला पुत्र आहे! माझ्यावर एवढीही दया आपण करणार नाही काय ?'

'महाराज माणसाच्या हातून पापे घडतात ती जन्मापासूनच्या परिस्थिती. मुळे, दैवाधीन असल्यामुळे घडतात. समजा एखादा माणूस एरवी भला व निर्दोष असूनही सुरापान करून स्वैर वर्तन अथवा क्रोधाच्या आवेशांत अयोग्य वर्तन केले, अथवा द्यूतात अविचार घडला तर तेवढ्यावरून त्याला दुष्ट समजावे काय ? खरे पहाता माणूस हा दैवा हातचे खेळणे आहे. हृदयांतील देव त्याला प्रेरणा देतो व त्याप्रमाणे त्याच्या हातून बरी वाईट कामे घडतात. प्रेरक देवच सर्व प्रकारे समर्थ आहे. तरी माणसाला पापी कसे बरे म्हणावे? अहो, स्वप्नांत हातून जी अनेक पापे घडतात त्यांची गणतीही करता येणार नाही. ती पापे काय खरी असतात !'

'हे वरुण महाराज, आपण तर भक्तजनांच्या मनोकामना पूर्ण करून दान धर्मादि परहिताची कार्ये करून जगाचे भरण पोषण करणारे दयाळू देव. हे प्रभो मी निरपराध होऊन आपली सेवा उत्तम रीतीने करावी अशी शक्ति आपण मला द्यावी. सेवकाने स्वामीची सेवा करावी तशी मी आपली सेवा करीन. आपण उत्तम गुणांनी युक्त असे देवामध्ये श्रेष्ठ देव. आम्ही अजाणतेपणे जे काही करतो त्यांतून आपण आम्हांला योग्य मार्गदर्शन करावे व आमचे अज्ञान दूर करावे. आपले गुण जाणणारे कविजन आम्हांला प्रेरणा देवोत. व आपली कृपा समृद्धी आम्हांस प्राप्त होवो.

वरुणदेव नेहमी सचेत व सावध असतात. परंतु भक्ताची ती करूण, आर्द्र वाणी ऐकून त्यांच्या मनाची चलबिचल झाली. 'आपण वसिष्ठाला का बरे जखडून टाकले' ते आपल्या मनाशी विचार करू लागले. परंतु त्यांचे त्यांनाच योग्य कारण सापडेना. तर मग त्याला मुक्त करायला हवे. पण तोही निर्णय होईना. स्वतःच निर्माण केलेले नियम त्यांना परवश करून टाकीत असल्याचा अनुभव त्यांना येत होता. वसिष्ठाने ते पाहून त्यांच्या सामर्थ्याचा महिमा गाण्यास सुरुवात केली.

'सूर्याला विशाल मार्गावर चालण्याची प्रेरणा देणारा हाच तो शक्तिशाली देवश्रेष्ठ वरुण ! नद्यांचे प्रवाह समुद्राच्या दिशेने वहावेत अशी प्रेरणा याचीच,

रणांगणावर फुरफुरत जाणाऱ्या घोड्यांप्रमाणे कालाच्या गतीला वेग देऊन याने दिवसांचे परिवर्तन रात्रींत व रात्रीचे दिवसांत केले.'

'या वरुण देवाचे गुप्तचर त्रैलोक्यात संचार करून प्राणि मात्राच्या पापपुण्याविषयी जाणून घेतात. वरुणाचे शासन मान्य करून शहाणे लोक यज्ञादि परहिताची कामे करतात. व स्तुति प्रार्थना करून अपराधांची क्षमा मिळवतात. त्यांच्याच प्रमाणे मीही क्षमा मागत आहे.'

या प्रमाणे वसिष्ठ ऋषि वरुण देवाच्या समोर उभे राहून जणू दुसऱ्याच कोणा ऋषीला वरुणाचा महिमा वर्णन करून सांगत असल्याप्रमाणे बोलत होते. स्वतःच्या शक्तीचा तो महिमा ऐकून वरुण देवांना स्वतःच्या बळाचा प्रत्यय येऊ लागला. अपराधी जनांसाठी त्यांनी निर्माण केलेले नियम व शासन बदलण्याची शक्ति व स्वातंत्र्य त्यांच्या ठायीच असल्याचे त्यांना मनोमन पटले व ते करुणार्द्र दृष्टीने वसिष्ठांच्याकडे पाहू लागले.

'भगवन्! या पूर्वीही मी वरुण देवांचे दर्शन घेतले आहे. आणि त्यावेळी तर आपण माझी परिक्षा पण घेतली होती. आपण मला 'गो' या शब्दाचे नाम स्थान व लक्षण या विषयी प्रश्न विचारला होता. मी आपल्याला उत्तर दिले होते. 'गो' हें वाणीचे नाम असून छाती, कंठ व मस्तक ही त्याची स्थाने आहेत. असे मी म्हणताच आपण हसून माझ्या म्हणण्यास संमती दर्शवली होती. व नंतर मला सांगितले होते, 'मी 'गो' म्हणजे अघ्न्या पा परहित पृथ्वी म्हणतो. पृथ्वीच्या पाठीवर अनेक पापाचार घडतात. पण तिला त्याचा स्पर्श होत नाही. त्या 'गो' पृथ्वीची एकवीस नावे आहेत. या प्रमाणे आपण गुरुपदी राहून मला गोपदाच्या रहस्याचे ज्ञान करून दिले. तो प्रसंग मी कसा विसरू शकेन?'

'आणि भगवन्, आपल्याला स्मरण आहे काय?' वसिष्ठांनी दुसरा एक प्रसंग वर्णन करण्यास सुरुवात केली. वरुण देवांनी आपल्या मस्तकावर हात फिरवता फिरवता या विलक्षण ऋषीकडे आदराने पाहिले. ज्याच्या विषयी कोणी नुसते बोलताना ऐकले तरी प्राणिमात्रांचा भीतीने थरकाप होई. त्या वरुणासमोर हा तपस्वी निर्भयतेने स्पष्ट बोलत होता! वरुणदेव पहातच राहिले.'

'महाराज, आज हे दिव्य शरीर धारण करून मी आपल्या दर्शनासाठी आलो आहे व प्रकाश पुंजामध्ये तळपणाऱ्या आपल्या तेजःपुंज दर्शनाचा मला लाभ होत आहे. पण बऱ्याच दिवसापूर्वीची गोष्ट, आपण माझ्यावर प्रसन्न होऊन मला आपल्या लाकडी नौकेत बसवून घेतले होते. विशाल सागराच्या पटावर

त्यावेळी दुसऱ्या कितीतरी नौका फिरत होत्या. त्यांच्यासह सागर तरंगावर डोलणाऱ्या त्या नौकेत आपण दोघेच होतो. तो प्रसंग किती सुखद होता !'

'त्या वेळचे तेच आपण देवश्रेष्ठ ? आणि मी तोच वसिष्ठ ? नाही ! नाही ! आज तसे वाटत नाही. मला आपल्या नौकेवर स्नेहभराने चढवून घेणारे वरुणदेव कोणी दुसरेच होते ! ती सुखद स्मरणेच आतां आठवायची व त्यांची स्तुति करावयाची !'

वरुण देवालाही त्या प्रसंगाची आठवण होऊ लागली. व त्याच्या मनाचा गोंधळ वाढू लागला. वसिष्ठाला पाशांनी आवळून टाकायची आपण उगीच घाई तर नाही केली ? हजारो महाद्वारें व सर्वत्र संचार करणारे गुप्त चर यांच्यातून कोणी सामान्य माणूस येथवर येऊन पोचणेच अशक्य. दिव्य देह धारण करणारा हा कोणी भक्तच असल्याशिवाय असे धाडस कसे करील ? वरुणाच्या मनांत याप्रमाणे विचार येत होते. आणि वसिष्ठ हळू हळू त्यांच्या जवळ येत स्तुति करीत होते.

'महाराज ! आपला तो जुना स्नेह आतां केवळ आठवणी पुरताच राहिला काय ? आघातजनक अशी ही निर्दयता नाहीशी व्हावी व कोमल स्नेहभाव जागा व्हावा अशी माझी भावना आहे. धनधान्याने समृद्ध असे हे आपले विशाल राजभवन हजारो महाद्वारांनी शोभते आहे. भगवन्, मी तर आपलाच पुत्र आहे. मी आपल्याला प्रियही होतो. आपले प्रेम फिरून लाभावे अशी माझी प्रार्थना आहे. माझ्याकडून काही अपराध घडला असला तरी आपल्या कृपेच्या योगाने मी पापरहित होऊन सुखी होईन. आपली स्तुति करून मी मुक्त होऊन तुमच्या भवनांत सुखाने फिरावे हे एकच मागणे मी मागत आहे.'

वरूण महाराजांनी वसिष्ठाची प्रार्थना ऐकून त्याला पाशांतून मुक्त केले. व प्रिय मित्राला द्यावे तसे अलिंगन दिले. आपल्या आसनावर बसवून घेतले. सर्व मनोरथ पूर्ण झाले तेव्हा वसिष्ठ आनंदाने उद्गारले,

'हे राजन, हे देव मी आज आपल्या घरी आलो आहे. माझे हे घर मातीचे असले तरी माझ्या लेखी ते सोन्याच्या महालाहून मोठे आहे क्षात्रभाव वाढवणाऱ्या देवाधिदेवा, तुम्ही सुखी असावे व सर्वांना सुखी करावे.

दुर्गामध्ये रहाणाऱ्या देवश्रेष्ठा, हवा भरलेली पखाल ज्याप्रमाणे नदी तरते व इतरांनाही तारून नेते त्याचप्रमाणे आपण सुखी होऊन आमच्यासारख्या आपल्या आश्रयाला आलेल्यांनाही सुखी करा.

निर्मळ मनाच्या समृद्ध देवा, माझ्या शक्तीच्या योगाने प्रतिकूल वर्तन करून मी येथे आलो म्हणून आपण मला पाशांनी बांधून टाकले. परंतु आता अपराधी कोण याविषयी स्पष्टता झाली आहे. तरी माझ्यावर दया करावी.

हे भगवन् खाऱ्या समुद्रात गटंगळ्या खात असल्यासारखी माझी अवस्था झाली होती. पाण्यात असूनही मी तहानेने व्याकूळ झालो होतो. आपल्या कृपेने मी वाचलो.

हे देव, तुमच्या दिव्य प्रेरणेपर्यंत आम्ही सामान्य मानव पोचू शकत नाही हे सत्य आहे. म्हणूनच आमच्या हातून आपला अभिद्रोह– अपराध घडतो अज्ञानामुळेच तुमच्या कर्मांनी मोहीत होऊन आमच्या हातून चुका होतात. पण कृपा करून आपण त्याविषयी मनांत राग ठेवू नये.

'आपण सुखी असा व आम्हाला सुखी करा.' हाच घोष आनंद भराने करता करतां वसिष्ठांचे डोळे उघडले ! कोठे तो दिव्य वरुण लोक– कोठे] ते देवाधिदेवांचे डोळ्यांना दिपवून टाकणारे दर्शन नी कोठे स्वत:ची ती यमुना-तीरावरची पर्णकुटी !

तरीही स्वप्नांत घडलेले देवाधिदेवाचे दिव्य दर्शन अद्भुत होते. व स्वप्नांत झालेले ज्ञानही जागेपणी मार्गदर्शन करणारे होते.

कळत न कळत प्रत्येकाच्याच भोवती वरुणाचे पाश पडलेले आहेत. काही ना काही चूक हातून घडते. परंतु अपराधाचा पश्चाताप होऊन मनोभावाने क्षमा मागितली असता, धर्मव्रताचा, ऋताचा पालक, सर्वांचा पालन [कर्ता वरुण देव बंधनातून सोडवतो व मुक्तीचा आनंद लाभतो.

★★

# ८ : मलीन तत्वांचा नाश

**(ऋग्वेद सप्तम मंडल)**

विपाशा नदीच्या किनाऱ्यावर राहून वसिष्ठ ऋषींनी घोर तपश्चर्या केली. तपाच्या योगाने कायेला वश करून त्यांनी कांचनासारखी शुद्ध केली होती.

यमुना तीरावर वस्ती करून राहिलेले भरतजन दुर्बल होते. परस्पर द्वेषाने त्यांची दुर्बलता वाढत होती. वसिष्ठांनी त्यांचे गुरुपद स्वीकारून त्यांना सहकाराचा बोध-मंत्र दिला. सेवा व भक्ति शिकवली. समाज जीवनाचे मूलभूत नियम घालून दिले.

सरस्वतीच्या तीरावर ऋषींनी मोठ मोठे यज्ञ केले. व राजा सुदासाला सम्राट पदाचा अभिषेक केला. वेग वेगळचा जाती व जनांना संघशक्तीचे रहस्य समजावून सांगितले. व एका राष्ट्राच्या छत्र छायेखाली पंचजनांना संघटित केले.

समाज व राष्ट्राच्या कल्याणाची कामे करणारे ते ऋषि स्वतःला पार विसरून गेले होते. ते एक वसिष्ठ अनेक वसिष्ठ शिष्यांत वाटले गेले होते. त्यांच्या एका आश्रमाच्या शाखा सगळीकडे पसरत होत्या.

दिव्य मंत्रशक्तीच्या योगाने त्यांनी देवांना वश करून घेतले होते व त्याच शक्तीच्या प्रभावाने अनेक राक्षस नाश पावले होते. नदीकाठच्या निर्जन प्रदेशात अनेक स्वार्थी, खटपटी लोक रहात. त्यांची मने, विचार व दैवतेही मलीन होती त्यांचे देव झाडांच्या ढोलीत, औषधींच्या मुळापाशी वास करीत. त्यांना 'मूरदेव' अथवा 'यातुधान' म्हणत. गिधाडे, घुबडे, कोल्हे अशी रूपेही ते घेत. ते रात्रीच्या अंधारात संचार करीत. अशा मलीन देवतांची पूजा करणारे लोक इतरांना मारून स्वतःचे रक्षण करीत त्यामुळे त्याना 'राक्षस' असे म्हणत. मलीन विद्येची उपासना करणाऱ्या त्या लोकाना यातुधान असेही म्हणत.

राक्षस व यातुधानांच्या सारखेच दस्यु व चोर लुटारूही भरताना वारंवार त्रास देत. त्यांचे आक्रमण सेनेच्या जोरावर जिंकता येई. पण त्यांच्या मलीन विद्येचा नाश करण्यासाठी मंत्रशक्तीच समर्थ होती.

वसिष्ठ ऋषींनी आपल्या कुलपुरुषांना व शिष्यांना दिव्य मंत्रशक्ति दिली होती. वसिष्ठांना वेगवेगळ्या आश्रमात वसणारे शंभर शिष्य-पुत्र होते. शक्ति ऋषि त्या सर्वांत श्रेष्ठ होते. त्यानी आपल्या पित्याप्रमाणे उग्र तप केले होते व दिव्य मंत्रांचे दर्शनही त्याना झाले होते. त्यांच्या नावालाही राक्षस व दस्यू भीत असत.

एकदा शक्तिमुनी वनात एकटेच फिरत असता राक्षसांच्या दृष्टीस पडले. मग काय विचारावे ? मुनी सावध होण्याआधीच राक्षसानी त्याना करकचून बांधले व दावानल जळत होता त्यात टाकून दिले. पण तोवर ऋषि सावधान झाले होते. अग्नि पासून रक्षण व्हावे म्हणून त्यांनी इंद्राची स्तुति केली. पण तोवर त्यांची शरीर शक्ति संपून गेली होती. मति कुंठित झाली व स्तुति मंत्र अर्धेच राहिले. मुनि मूर्छित झाले.

इकडे शक्तिला येण्यास उशीर लागला म्हणून वसिष्ठ ऋषि आपल्या काही शिष्यांसह त्याला शोधण्यास निघाले. दावानलांत पडलेल्या आपल्या मूर्छित पुत्राला पाहून त्याचा अपूर्ण राहिलेला स्तुति मंत्र त्यानी पूर्ण केला व इंद्राला आवाहन केले.

ती स्तुति ऐकून इंद्राने शक्तीला दावानलातून सोडवले इंद्राचा अमृतस्पर्श झाल्याने शक्ति मुनीला नवजीवन प्राप्त झाले.

वसिष्ठ ऋषि उदार चरित होते. त्यांच्या मनात कोणाहीविषयी अपपर भाव नव्हता. सर्वांचेच कल्याण करावे अशी त्यांची भावना असे. त्याचप्रमाणे समाजाचे वा राष्ट्राचे अहित करणाऱ्यांना वश करून घ्यावे असेही त्यांचें मत होते. अशा त्या महर्षींच्याकडे पंचजनांचे प्रतिनिधी व ऋषी जाऊन म्हणू लागले.

' समाजात पसरणाऱ्या या मलीन तत्वांना दूर करा. त्यांच्या संगतीने इतर लोकही दुष्ट होतात. मलीन तत्वांचा सामना मात्र मंत्र शक्तिच्याच योगाने करता येतो.' ऋषींनी त्या सर्वांना धीर धरण्यास सांगितले.

थोड्या दिवसांनी एक फारच भयंकर प्रकार घडला. सरस्वती नदीच्या तीरावर एक महायाग चालला होता. वसिष्ठांचे शंभर पुत्र त्यासाठी तेथे गेले होते. यज्ञाला सुरुवात होते न होते तोच वनात रहाणारे राक्षस यज्ञमंडपावर तुटून पडले व त्यांनी त्या शंभर वसिष्ठांचा संहार करून टाकला. हा समाचार कळतांच पंचजनांत हाहाकार उडाला.

वसिष्ठ ऋषींना हे कळले तेव्हा त्यांना आघात लागला. काय करावे ते सुचेनासे होऊन गेले. ज्या ठिकाणी हा भयंकर प्रकार घडला होता तेथे जाण्यासाठी ते निघाले. त्यांची पत्नी अरुंधती व सून अदृश्यंती पण त्यांच्या मागून निघाली. दुःखाचा हा आघात अदृश्यंतीला असह्य होऊन ती पतीबरोबर स्वतःही प्राणत्याग करण्यासाठी सिद्ध झाली. ऋषि तिची समजूत घालून म्हणाले, 'माझा पुत्र शक्ति गेला पण त्याचा पुत्र जो तुझ्या उदरात वाढतो आहे मोठा मंत्रद्रष्टा होईल व जगाचे कल्याण करील.' दुःखी अदृश्यंतीला हे मोठेच अश्वासन होते.

पंचजन भरत एकत्र जमून ऋषींची प्रार्थना करू लागले. त्यांनाही या संहारामुळे फार दुःख झाले होते. मलीन विद्येची उपासना करून भयंकर पापे करणाऱ्या राक्षसांचा संहार केल्याशिवाय राष्ट्राचे रक्षण करणे शक्य नव्हते.

शोकग्रस्त झालेले ऋषि हळूहळू शांत झाले. सरस्वतीच्या पवित्र जलांत स्नान करून त्यांनी पवित्र मंत्राचे ध्यान धरले. त्यांच्या दिव्य दृष्टीला इन्द्र व सोम साक्षात दिसू लागले. इन्द्र हा उग्र तर सोम हा कोमल भावनांचा देव आहे. केवळ उग्रता विनाशाला कारण होते. दोन्ही भाव एकवटले तर मलीन वासना दूर होऊन शुभ भावना पसरेल. याच हेतूने राक्षसांचा संहार करण्यासाठी ऋषि स्तुती करू लागल.

इन्द्र तथा सोम, जे राक्षस असतीस त्यांच्या मनात शोक व संताप प्रबल होवो. त्यांच्या दुष्ट कार्याचा नाश होवो. अज्ञानाच्या अंधारात शरीरबळाने घुसणाऱ्या विवेक-विचारहीन, दुसऱ्याचे अहित करणारे मूढ राक्षस- त्यांना अडवून त्यांची परभक्षी शक्ति नष्ट करा.'

'हे इन्द्र व सोम जाणून बुजून पाप करणारे, आक्रमण करणारे, इतरांना जळत्या अग्नीत फेकून देणारे, खादाडपणे कच्चेच प्राणी खाऊन टाकणारे, असे जे आततायी राक्षस आहेत त्यांचा तुम्ही संहार करून टाका.

हे देवांनो हे राक्षस मायावी असून वेगवेगळी रुपे धारण करून ते प्रजेला पीडा देतात. तरी त्यांचा समूळ नाश करून त्या दुष्टांची परंपरा पुढे चालणार नाही असे करावे.

हे इंद्रा, राक्षसांच्या मायावी जोड्याही जगात संचार करीत असतात. त्यांचा जीवित हेतूच मुळी 'काय खाऊ? कोणाला खाऊन टाकू? कोणाला मारून टाकू?' हा असतो. त्यामुळे लोक त्यांना 'किमीदी' या नावाने ओळखतात. ते

यांना परीची रुपे धारण करून भोळयाभावडया माणसांना फसवतात व गिळून टाकतात. या मायावी जोडयांना तुमच्याशिवाय कोणी ओळखू शकत नाही. तरी त्यांना शोधून त्यांचा नाश करावा व समाजावरील कलंक नाहीसा करावा."

या प्रमाणे वसिष्ठ ऋषी 'राक्षोघ्न' सूक्तांचा जप करीत असताच एक चमत्कार घडून आला. एक राक्षस वसिष्ठाचेच रुप धारण करून आश्रमात आला व सांगू लागला,

'हे पंचजन, हे भरतजन, आत बसलेले वसिष्ठ खरे नसून मायावी आहेत. वेषधारी आहेत त्यांचे ते मंत्रही खोटेच असून त्यांच्या योगाने तुमच्याच कुलाचा सर्वनाश होईल.'

त्या राक्षसाचा मायावी वेष पाहून ऋषि व पंचजनही घडीभर विचारात पडले. त्या राक्षसाने गुरुंच्या आसनावर बसून खऱ्या वसिष्ठांना तेथून चालते होण्याची आज्ञा केली ! सत्य व मिथ्या यांची परीक्षा करण्याची ही उत्तम संधी होती. वसिष्ठांनी सावधानतेने सोमाला आवाहन केले.

'बरे आणि वाईट, खरे आणि खोटे यांची परीक्षा विद्वान माणसे सहज करू शकतात. प्रसंग येताच खरे काय आणि खोटे काय याचा निर्णय त्यांना करता येतो. खरे पाहता सत्य व असत्य या विषयी शंकाच मनात येण्याचे कारण नाही. परंतु मायावी राक्षस असत्याला स्थापित करण्यासाठी सत्याचा आश्रय घेऊ पहात आहे. त्या मुळेच खऱ्या खोटयाची ही स्पर्धा निर्माण झाली आहे. सर्व कोमल भावनांचे रक्षण करणारा सोम सत्य व सरळ वाणीचे रक्षण करून असत्य दूर करो. विद्वानांच्या विद्वत्तेची या निर्णयायोगे परीक्षा होते आहे. देव सोम या ठिकाणी उपस्थित आहे. मिथ्याचारी, पापी राक्षसाला तो निश्चितच सोडणार नाही. नेहमी सौम्य, ऋजु भाव धारण करणारा देव सोम पापीं माणसे असत्याच्या आधाराने पुढे होताना पाहून इन्द्राचा उग्रभाव धारण करून पापी लोकांचा नाश करतो.'

ऋषींच्या दिव्य वाणीमध्ये कांही आगळेच तेज होते. त्या मंत्राच्या प्रभावाने मायावी राक्षस फजित झाल्या सारखा होऊन गेला. त्याने आश्रमांत गुरुवेषाने प्रवेश करण्याचे धाडस केले होते. आता आपले सोंग उघडकीस येते की काय या विचाराने तो अस्वस्थ होऊन गेला. तरीही उसने अवसान आणून तो म्हणाला, 'तुमचे म्हणणे खरें असेल तर ते सिद्ध करून दाखवता ?'

मुनिवर वसिष्ठांनी त्याचे ते आव्हान तात्काळ स्वीकारले. व ते बोलू लागले, 'मी जर अनृत-देव असेन, मलीन, खोटया दैवतांचा पूजक असेन, तर

माझे जीवन व्यर्थ आहे असे मी मानतो. हे अग्निदेव माझ्या सर्व कर्मांचे तुम्ही साक्षी आहांत. जर माझ्या हातून वाईट कर्मे घडली असतील तर तुमचा क्रोध माझ्यावर उतरो. मिथ्याचारी, वेषधारी राक्षसाचे रूप तुम्ही उघडकीस आणावे.'

'जर मी वसिष्ठ ऋषि नसून मायावी राक्षस असेन तर या क्षणीच मी निष्प्राण होईन. मी जर राक्षसी वृत्तीने कोणाचे प्राण घेतले असतील, कोणाच्या मनस्तापाला कारण झालो असेन तर माझी पापेच माझा विनाश करोत. मी खरा वसिष्ठ असून समोर दिसणारा मायावी राक्षस आहे. कारण माझ्या शंभर पुत्रांच्या शोकात मी बुडून गेलो आहे आणि शोक-रहित असा हा मिथ्याचारी मला आपण स्वतःच वसिष्ठ असल्याचे सांगत आहे.'

हा वेशधारी 'यातुधान' असून मलीन विद्या जाणणारा आहे. त्या विद्येच्या योगानेच तो मला यातुधान ठरवू पहात आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे येथे दोन राक्षस आहेत. एक तो स्वतःच वेषधारी आहे व मलाही तो वेषधारी म्हणत आहे. तरी आम्हा दोघांमध्ये जो कोणी मिथ्या असेल त्याचा नाश देवांमधील श्रेष्ठ अशा इन्द्रानेच येथे येऊन करावा.'

याप्रमाणे वसिष्ठ मुनींनी इन्द्राचे स्मरण करताच इन्द्र तेथे प्रत्यक्ष प्रगट झाला. प्रत्यक्ष देवराजासमोर तो मायावी कसा टिकू शकेल? तो उठून पळून जाऊ लागला. परंतु देवराजाने आपल्या वज्राच्या योगाने त्याचा नाश केला. जमिनीवर पडता पडता पडता त्याचा मायावी वेष दूर झाला व मूळचे अक्राळ विक्राळ रुप निष्प्राण होऊन पडले. भरतजन तो मृत देह वनात टाकून आले.

या प्रसंगामुळे ऋषींच्या मनात क्षोभ निर्माण झाला होता. इन्द्राचे प्रत्यक्ष साह्य मिळाल्याने तो दूर होऊन त्यांचा उत्साह वाढला. समाजात मलीन विद्येचा प्रभाव वाढत चालला होता. यातुधान राक्षस त्या विद्येच्या मायावी प्रभावाने भरताना त्रास देत होते. वसिष्ठ ऋषींनी फिरून ध्यान धरून राक्षोघ्न सूत्राचा जप सुरू केला. ते म्हणाले,

'रात्री विचरणाऱ्या घुबडासारखी ही मलीन विद्या चपळ आहे. स्वतः लपून दुसऱ्यावर छुपे आक्रमण करण्याची त्यांची रीत आहे. इन्द्रदेवाच्या प्रभावाने त्यांच्या मायेच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होवोत. त्या मायेमुळे अवरोधाचे पहाडचे पहाड निर्माण झाले आहेत ते भंगून जावोत व राक्षसांचा नाश होवो.

हे मरुद्गणांनो इन्द्राचे दूत म्हणून तुम्ही सर्वत्र संचार करता. तरी गुप्त-वेशाने फिरणाऱ्या राक्षसांचा तुम्ही संहार करावा. हे मायावी पशुपक्षी वगैरे रुपेही धारण करतात व भल्या भोळ्या लोकांना पीडा देतात. अशा उपद्रवी

राक्षसांना शोधून आपण दूर करावे. यज्ञयागाच्या पवित्र कार्यांत अडथळे आणणाऱ्या या विघ्नांना आपण दूर करावे.'

' हे देवराज इंद्र, आकाशातून वीज पाडून या दैत्यांचा संहार करावा. आपले पर्व, पर्व धारण करणारे वज्र चारी दिशांतील राक्षसांचा विनाश करो.

हे देवराज, मलीन विद्या जाणणाऱ्या दैत्यांचा नाश करणारे तुम्ही पराशर– परम हिंसक आहात. कुऱ्हाड ज्या प्रमाणे मोठ मोठे वृक्ष पहाता पहाता तोडून टाकते त्याप्रमाणे विविध रूपे घेऊन फिरणाऱ्या राक्षसांचा तुम्ही संहार करता.

हे राक्षस व यातुधान हे मात्र मलीन वासनांनीच भरलेले असून स्वतःच्या वासना पूर्ण करून घेण्यासाठीच ते विविध रुपे घेत असतात. कामांध राक्षस. घुबडांच्या गतीने, क्रोधी लांडग्यांच्या गतीने, लोभी कुत्र्याच्या रूपाने, अभिमानी गरुडाच्या रुपात मदमस्त गिधाडाच्या रुपाने भटकत असतात. त्यांच्या अथवा मनाप्रमाणे ते कोणत्याही रुपात भटकोत परंतु ते इतराना पीडा देतात. इतरांचा नाश करणाऱ्या त्या दुष्टांचाच नाश होवो. या राक्षसांची मदांध अशी स्त्री पुरुषांची जोडपीही फिरत असतात. खाणे पिणे व भोग हेच यांचे काम असते. चर्चाही फक्त त्याचविषयी चाललेली असते. अशा स्वार्थी राक्षसांचा संहार करा.'

' माता धरती धरणीवर होणाऱ्या पापापासून, अंतरिक्षाचे देव मधल्या वातावरणांतील पापापासून, व स्वर्गातील देव आकाशातील पापापासून आमचे रक्षण करोत.'

' हे देवराज इंद्र, मलीन विद्येच्या योगाने दुसऱ्यांना मारणाऱ्या मायावी राक्षसांना तुम्ही मारून टाका. जी राक्षसी माया स्त्री रुप घेऊन दुसऱ्यांना कपटाने बंधनांत टाकते त्या मायेचा तुम्ही संहार करा. वनस्पतीच्या मुळाशीं असणाऱ्या मलीन तत्वांची व अक्राळ विक्राळ दैवतांची पुजा करणारे दैत्य उद्या सूर्योदय होण्याआधीच नाश पावोत.'

' हे देव सोम, हे देवराज इंद्र, तुम्ही आपल्या डोळयांनी सारेच पहात आहांत. तसेच तुम्ही सदा जागृत रहाणारे आहांत. तरी आपल्या दिव्य शस्त्रास्त्रांच्या योगाने राक्षसांच्या मलीन विद्यांचा नाश करून टाका.'

या प्रमाणे ऋषींनी संतापून राक्षोघ्न सूक्त गायलेलें आहे. तथापि त्या क्रोधाच्या भरातही कोणा एका व्यक्तीच्या वा जातीच्या संहाराची इच्छा व्यक्त न करतां इंद्र, सोम, वरुण वगैरे देवांची पुनः पुनः प्रार्थना करून काम क्रोधादि मलीन वासनांना वश होऊनच पापी लोक पापाचरण करतात तरी त्या मलीन वासनांचा

नाश करून लोकांना पुण्यमार्ग दाखवावा अशी विनवणी केलेली आहे. भावनावश ऋषींचे हृदय दयेने, करुणेने भरून येते. स्वत: मंत्रविद्येचा उपयोग परहितासाठी करीत आहेत. परंतु मलीन विद्येच्या प्रयोगाने जगाचे अहित होत असल्याचे त्यांच्या ध्यानांत येते. त्यांना साध्य असलेली मंत्र विद्याही मलीन असून तेही यातूधानच आहेत, असा आक्षेप त्यांच्यावर येतो तेव्हां त्यांना तो आघातजनक वाटतो. साध्या आणि सरळ स्वभावाचे ते ऋषी शपथ घेऊन सांगतात, 'जर मी मलीन विद्येची उपासना करणारा यातुधान असलो तर माझ्या पापाचरणाच्या योगानेच माझा मृत्यू होवो.'

वरुणाची स्तुति–प्रार्थना करतांना ऋषि आपल्या अपराधाचा स्वीकार करून त्याच्या मागची कारणपरंपराही रुजू करतात. त्यांतून ऋषींचा साधा सरळ भक्तिभाव स्पष्ट दिसून येतो.

शक्ति ऋषींच्या मृयूनंतर अदृश्यंतीच्या पोटी आर्ष द्रष्टावू पवित्र पुरुष जन्माला आला. त्याचे नाव होते पराशर. त्याच्या आईने शोकामुळे संतप्त होऊन 'सर्व राक्षसांचा नाश कर' अशी आज्ञा केली तेव्हा पराशरानी एक याग करण्याचा संकल्प केला. अशा कारणाने केलेला यज्ञ शुद्ध वा सात्विक असणे शक्य नव्हते. कित्येक मारक व अशुद्ध द्रव्यांचा त्यात उपयोग करावा लागतो व मंत्रही कल्याण-कारक नाही पण उलटे विनाशकारक जपावे लागतात. असे प्रयोग अभिचारक– मलीन असतात. समाजाला ते हानीकारक ठरतात.

पराशर ऋषि असा अभिचारक याग करणार आहेत हे जेव्हा वसिष्ठांच्या कानावर गेले तेव्हा त्यांनी पराशराला बोलावून सरळभावाने सांगितले,

'वत्स, आपल्याला देवांच्या कृपेने दिव्य मंत्रांचे दर्शन होते. आपले जीवन शुद्ध व सरळ आहे. आपली परहित व कल्याणाची भावना सोडून मलीन अभिचार प्रयोगात आपण पडलो तर आपण आपला धर्म सोडून हलका धर्म स्वीकारला असे होईल. ते आपल्यासाठीं निश्चितच योग्य नाही.

हे पुत्र, आपल्या अंगणात असलेली अग्निशाला शुद्ध व पवित्र आहे. त्यात प्रगटलेला अग्नि पवित्र कार्याची प्रेरणा देणारा आहे. आपण अज्ञानामुळे व्यक्तिगत स्वार्थाकडे पहातो पण म्हणून अग्नि अशुद्ध किंवा मलीन थोडाच होतो ?

अभिचार प्रयोगासाठी अशुद्ध व मलीन स्थानी असलेल्या अग्निचा उपयोग करावा लागतो. तसे पापकर्म आपल्या हातून होऊ नये म्हणून तू अग्नीची स्तुति कर.

हे अग्निदेव, हिंसक राक्षसांपासून आमचे रक्षण करा. हे बलवान अग्नि,

पापकर्मापासून आम्हाला वाचवा. आम्ही तुम्हाला पवित्र व शुद्ध हवि अर्पण करतो. आमची धनसाधने शुद्ध असोत.'

महर्षींची पवित्र वाणी ऐकून पराशर ऋषींनी अभिचारिक प्रयोग करून राक्षसांचा संहार करण्याचा निर्णय सोडून दिला. परंतु त्याच्या मनाचे समाधान होत नव्हते. माता अदृश्यंतीची करुण व्यथित मूर्ती त्याच्या पुढे उभी राहून जणू त्याला विचारी, 'आपल्या पित्याच्या आत्म्याला शांति मिळावी म्हणून तू काय केलेस ? त्यांचा उद्धार कसा करणार आहेस ?'

पराशरांच्या जवळ याचे उत्तर नव्हते. अनुभवी वसिष्ठ महर्षि पुत्रवधू अदृश्यंतीची मनोवेदना जाणत नव्हते असे नाही. स्वतःचा पवित्र व समर्थ पुत्र राक्षसांच्या हातून मारला गेला त्याचे दुःख त्यांनाही होतेच. परंतु वैराचा नाश वैर करून होत नाही. त्या अंध परंपरेने वैराची आग पसरतच रहाते हे ते ज्ञानी ऋषि जाणून होते. जीवनाचा सखोल अनुभव घेतल्यामुळे मृत्यूचीही त्याना स्पष्ट कल्पना होती. मृत्यु हा जीवाला अनिवार्य आहे. तो केव्हा व कसा येतो ते कळतही नाही. पराशर ऋषींना हे सत्य समजावून सांगण्यासाठीं ते म्हणाले,

'हे वसिष्ठ, हे पुत्र ! ज्या कुलात तुझा जन्म झाला ते वसिष्ठ पुरुष इन्द्रियाना वश करून प्राणतत्वाला प्रेरणा देणारे आहेत. मी वसिष्ठ आहे. तुझा पिता वसिष्ठ होता. व तूही वसिष्ठ आहेस. आपल्या कुलाचे यश उजळेल, वाढेल असे उत्तम ब्रह्ममंत्र तू जप. त्यांच्या योगाने प्राणांचा देव इन्द्र प्रसन्न होईल. शुद्ध व पवित्र यज्ञाचा संकल्प करून त्याची रचना कर. व त्या यज्ञ प्रसंगी इन्द्राचा महिमा गा. त्या देवांमध्ये श्रेष्ठ अशा देवाचे पराक्रम त्रैलोक्यात विख्यात असून तो भक्तांची स्तुति आस्थेने ऐकणारा आहे.

'हे देवराज इन्द्र, मनात शोक संवेदनांचा आवेग दाटून येतो, मन व्याकूळ होते, अविचार घडण्याचा संभव निर्माण होतो अशा वेळी तुमच्या स्तुतिचा घोष जागवला की त्यामुळे संतप्त मन शांत होते. स्वतःचे जीवन केव्हां संपेल आणि कोणत्या क्षणी मृत्यु येईल हे कोणाला कळत नाही. तथापि जीवनाची लांबी कमी करणारी अधम व हलकी कामे करण्याच्या अविचारातून आम्हाला वाचवा. व आमच्या पापांतून आमची सुटका होईल अशा उत्तम मार्गाची प्रेरणा आम्हाला द्या.

हे देवश्रेष्ठ, पाण्याचा प्रवाह जसा वेगाने धावतो, गाई ज्याप्रमाणे वासरांच्या कडे धाव घेतात, त्याचप्रमाणे तुमची स्तुति करणाऱ्या भक्तांच्या पुण्यकर्माचा ओघ पुढे पुढे वहात जातो. आमच्या पवित्र यज्ञाच्या स्थळी तुमच्या रथाचे तेजस्वी अश्व

तुम्हाला घेऊन येवोत व तुमची स्तुति भक्तिभावाने करण्याचे भाग्य आम्हाला लाभो.'

'वसिष्ठ कुलात जन्मलेल्या पुरुषानो तुम्ही देवराज इन्द्राची भक्ति करा. वज्र धारण करणारा तो देवांचा राजा शुभ कामनेने तुमचे कल्याण करो. इन्द्राची स्तुति केल्याने आपण वीरजन व पशुधनाच्या साह्याने समृद्ध होतो व आपला सर्व शोक संताप दूर होतो'

ऋषींची दिव्य वाणी ऐकून पराशरांचे मन शांत झाले. शोक व संतापाने उद्विग्न होऊन पित्याच्या वधाचा सूड घेण्याचा आवेग ओसरला. जीवन व मृत्यूचे रहस्य त्याना उमगले. मृत्यूला जिंकण्याचा उपाय पण असला पाहिजे असा विचार मनात येऊन त्यांनी नम्रतापूर्वक आपली जिज्ञासा व्यक्त केली, 'भगवन्, आपण सांगितले त्यावरून सर्वच मृत्यूला वश होतात असे दिसते. त्याच्यापासून कोणीच वाचू शकत नाही. पण त्यालाही जिंकण्याचा मार्ग नाही काय ?'

'पुत्रा, तसे पाहिले तर जीवन व मृत्यू हे एकाच दशेचे दोन प्रकार आहेत. जन्माला येतो तो मरतो व मरतो तो पुन: जन्म घेतो. जन्म-मरणाच्या या चक्रातून मुक्त होऊन अजर व अमर होण्यासाठी मृत्युंजय महादेवाची उपासना हाच एक मार्ग आहे.

हे पुत्र, मृत्युंजय महादेव हे रुद्राचे स्वरुप आहे. रुद्राच्या बरोबर तीन अंबा माता सर्वांचे कल्याण करतात. म्हणून त्याला त्र्यंबक असे म्हणतात. या तीन माता महादेवाच्या सन्निध राहून विश्वाचे सृजन, पालन व संहाराचे कार्य करतात. आळस, शोक व चिंता यापासून मुक्त असलेल्या भक्तांचे त्र्यंबक महादेव पालन करतो. भक्ति व सदाचार भक्तजनांना निर्भय करतात. त्र्यंबक हा सुगंधस्वरुप व पुष्टिवर्धक देव आहे. फळ ज्याप्रमाणे पूर्ण पिकताच वृक्षाच्या बंधनातून सुटते त्याप्रमाणे कर्तव्यकर्म परिपूर्ण झाल्यावर मानव मृत्यूच्या बंधनातून सुटतो. खरे पहातां मृत्यु हा माणसाला बंधनातून सोडवणारा आहे. मानवाच्या अंत:करणांत वसणारा प्रेरक देव हा आत्मा असून तो अजर व अमर आहे. त्या आत्म्याशी असलेला संबंध तुटला तर माणूस जिवंत असूनही मेल्यासारखाच असतो. जीवनाला चैतन्य देणारा देव तोच मृत्युंजय महादेव. तो आपल्याला मृत्यूपासून सोडवतो पण अमरत्व देणाऱ्या अमृत भावाशी असलेला धागा तो तोडीत नाही. त्या त्र्यंबक देवाचे आपण यजन पूजन करू या.'

मृत्युंजय महादेवाचा हा दिव्य मंत्र ऐकून पराशर ऋषीना नवी प्रेरणा मिळाली. महर्षि वसिष्ठांच्याकडून मृत्युंजय विद्येचे रहस्य जाणून घेऊन ऋषींनी माता अदृश्यंतीला पण नवजीवनाची प्रेरणा दिली. वसिष्ठ कुलांतील सर्व ऋषींनी

जमून त्र्यंबक याग केला. त्या महायागाची पूर्णाहूति करतांना शांती पाठाची सूक्ते म्हणून जगाच्या कल्याणाची भावना व्यक्त केली. वसिष्ठ ऋषींच्या त्या सूक्तांत सर्व देवांचा महिमा वर्णन केलेला आहे. विश्वांतील सर्व शुभ प्रवृत्तीचे देव विश्वेदेव सर्वांचे हित करोत अशा शुभ भावनेने केलेला हा स्तुतिपाठ सर्वांना शं- म्हणजे सुख देणारा होवो अशी त्यांत प्रार्थना केलेली आहे. सर्व वसिष्ठ ऋषी शांतिपाठ मोठ्या आनंदाने गाऊ लागले.

'आम्हां सर्वांच्या सुखाची व हिताची वृद्धि होवो. इंद्र व अग्नि रक्षणाची साधने, इंद्र व वरुण अन्न जलाची समृद्धी, इंद्र व सोम सर्जन बल, इंद्र व पूषा पोषण शक्ति देऊन आमचे कल्याण करोत-

आम्हाला सुख, भग-भाग्य- प्रशंसा, कीर्ती, विशाल बुद्धि, धन, सत्य भाषण. यम- नियम, श्रेष्ठ यश, धाता आणि धर्ता, विशाल पृथ्वी आणि बृहत्, रोदसी तसेच देवांचे हवन पूजन, स्थिर ज्योतिरुप अग्नि, मित्र, वरुण, पुण्यशाली जीवांचे सुकृत पुण्य, वायुची प्रेरणा (यांचा लाभ होवो) द्यावा पृथ्वीच्या पूर्व कालातील हवनांत, अंतरिक्षातील सूर्यांच्या दर्शनात लोकपालांच्या विजयात (असलेले) सुख आम्हाला प्राप्त होवो.

वसुंच्या सहित इन्द्र, आदित्यांच्या सहित प्रशंसेस योग्य असा सूर्य, रुद्रांसहित महादेव रुद्र व कलाशक्तिसहित त्वष्टा प्रजापति आम्हाला सुख देवो.

सोमयागाची साधने, सोमरस, मंत्रपाठ, खल व बत्ता, विविध याग यूपांचे प्रमाण, औषधी व वेदी सर्व आम्हाला सुखदायी होवोत.

आम्हाला शांती देण्यासाठी तेजस्वी सूर्याचा उदय होवो. दिशा उजळोत. पर्वत स्थिर होवोत. सिंधू सरिता भरभरुन वाहोत. माता अदिति व्रताच्या योगाने, मरुतगण वेगांने, विष्णु पूषा, सर्व भुवने व वायु आम्हाला सुख शांती देवोत. दिवसा आमचा रक्षण कर्ता देव सविता व प्रेरणादायी प्रकाशवती उषा-मेघ-पर्जन्य, सर्वांना सुखी करोत. आमचे क्षेत्रपाल (शेतकरी) सुखरुप असोत. विश्वाला व्यापून रहाणारे व दिव्य प्रेरणा देणारे विश्वेदेव आम्हाला सुख देवोत. देवी सरस्वती विविध बुद्धी व प्रेरणा देवो. यज्ञाचे ऋत्विज, धनाचे दान देणारे यजमान तसेच पृथ्वीवर व अंतरिक्षात वहाणारे जलप्रवाह आम्हाला सुखदायी होवोत.

आम्ही वसिष्ठ कुलांतील ऋषि सर्वांच्या कल्याणासाठी हा नवा शांतिपाठ गात आहोत. हा पाठ सर्व देव ऐकोत. पृथ्वी, अंतरिक्ष व आकाशात वास करणारे सर्व देव आमची स्तुती ऐकून प्रसन्न होवोत, आमच्या यज्ञात भाग घेण्यासाठी य वोत.

★★

# मानसरोवरातील हंस १–७

(ऋग्वेद आठवे मंडल)

## १ : कण्व आणि प्रगाथ

गोमती नदीच्या किनाऱ्यावर एक पर्णकुटी होती. त्यात घोर अंगिरसांचे पुत्र कण्व ऋषि आपल्या पत्नीसह रहात.

घोर अंगिरसांच्या दुसऱ्या पुत्राचे नांव प्रगाथ. गुरुकुलातील अभ्यासक्रम पूर्ण करून आपल्या पित्याच्या आज्ञेप्रमाणे प्रगाथ आपल्या वडील भावाजवळ राहू लागला.

कण्व व प्रगाथ हे दोघेही भाऊ ऋषि होते. कवि होते. त्यांचे जीवन साधे व सरळ होते. ऋषिची पत्नी मधुभाषिणी आणि सेवातत्पर होती.

एकदा सकाळच्या वेळी फळे फुले व समिधा आणण्यासाठी प्रगाथ शेजारच्या वनात गेला होता. कण्व ऋषीना कोठे बाहेर जावयाचे होते.

'माझे वल्कल आणि कमंडलु आण बरे' म्हणून पत्नीला सांगण्याआधीच त्यांच्या पत्नीने वल्कल व कमंडलु पुढे केले. आपल्या निर्मल संगमरवराच्या शिल्पासारख्या पत्नीकडे ऋषि पहात राहिले. एकच साधेसुधे वस्त्र तिच्या अंगावर होते. दागदागिने, काजळ की अंगराग कोठलाच शृंगार तिने केलेला नव्हता. प्रसन्न स्मित आणि डोळ्यात भरून राहिलेला स्नेह हीच तिची आभूषणे होती. त्यातूनच तिचे यौवन ओसंडत होते.

ऋषीनी भावपूर्ण दृष्टीने तिच्याकडे पहात प्रश्न केला 'प्रगाथ कोठे गेला ?'

'वनामधे फुले फळे व समिधा आणण्यासाठी गेले असतील.' साधे व सरळ उत्तर होते.

'त्याला जरा संभाळ !' जाता जाता ऋषींनी सूचना केली. वल्कल काखोटीस मारून, हातात कमंडलु घेऊन, पायात खडावा घालून ऋषि निघाले. जाता जाता खडावांचा खट् खट् आवाज येत होता. वनाच्या वाटेवर ऋषींच्या मनात विचार आला,

'आज मी आश्रमांतून बाहेर पडताना पत्नीला प्रगाथाला संभाळ असे का बरे सांगितले ? ती काय त्याची सेवा करीत नाही ? की माझ्या समोर सेवा करते आणि माझ्या मागे वेगळीच वागते–असे काही असू शकेल ?'

तरंगामागून दुसरा तरंग मनात उठला ! मी नसताना ती व प्रगाथ आश्रमात दोघेच. दोघेही तरुण ! त्यांच्या मनात पाप आले तर ? आणि संभाळावे लागते ते स्त्रीलाच. पुरुष काय ? पण छे हे योग्य नाही. पाप घडले तर ती दोघेही समभागीच ! उलट स्त्री काय बोलून चालून अबला. व्रत आणि तप आचरणाऱ्या पुरुषानेच संयम ठेवायला हवा. पण ते कसेही असो. या दोघाना एकटे ठेवता कामा नाही हे खरे ! मी नसलो तर काहीच्याबाहीच होऊन बसायचे !'

मनात हा विचारांचा गोंधळ चालला होता. पायही चाललेच होते. मन विचारांच्या मागून सैरभैर धावत होते. त्यामुळे पाय कोठल्या मार्गाने जात आहेत तिकडे लक्ष कोण देणार ? ऋषि निबिड वनांत मार्ग चुकले. काया आणि मन दोन्ही भ्रमजालात गुरफटून गेली

निबिड रानात खडावांचा अवाज येईनासा झाला तेव्हां मार्ग चुकून भलतीकडे आल्याचे ऋषींच्या ध्यानात आहे. ते थबकले पण मन मात्र विचारांच्या मागून भरकटायचे थांबले नव्हते. आपण मार्ग चुकलो हे उमगल्यावर ऋषींनी आश्रमाकडेच परतण्याचे ठरवले आणि आल्या मार्गाने ते परत फिरले.

इकडे प्रगाथ फुल फळे व समिधा आणण्यासाठी आपल्याच नादात बराच दूरवर जाऊन पोचला. एकाएकी त्याला आठवले आपले बंधू आज बाहेर जाणार होते. लगबगीने फळादि सामग्री गोळा करून तो परत फिरला.

ऋषिपत्नीने ऋषि गेल्यावर गाईला चरण्यासाठी सोडली. वासराला प्रेमाने कुरवाळून दावणीला बांधले. अग्नि शाळेतून अग्नि आणला. आज तिला उपवास होता–ऋषीही येणार नव्हते. आज मात्र प्रगाथासाठीच स्वयंपाक करावयाचा होता. त्याला गोड दही आणि भात फार आवडे. तिने भाताचे आधण ठेवून तांदूळ निवडण्यासाठी ताटात घेतले व ती अंगणात जाऊन तांदूळ निवडू लागली. थोड्याच वेळाने प्रगाथ येऊन पोचला. इकडे तिकडे पहात तो म्हणाला,

'वहिनी, दादा गेले वाटतं ? या समिधा आणि फळे मुळे कोठे ठेवू ?'

ऋषिपत्नीने दिराकडे प्रेमाने पाहून न बोलताच फळादि सामुग्री ठेवण्याचे जागा दाखवली. ती तेथे ठेवून प्रगाथ आपल्या भावजयीसमोरच एक दर्भाचे आसन पडले होते त्यावर जाऊन बसला.

'हुश्श, फार दमलो आज. कोठच्या कोठे दूर गेलो नी मग एकदम आठवले आज दादांना बाहेर जायचे आहे– मग जी धूम ठोकली इकडे येण्यासाठी! वहिनी, मांडीवर डोके टेकून झोपावेसे वाटते आहे बघ!'

भल्या भोळ्या मनाच्या त्या ऋषिपत्नीने दिराचे डोके मांडीवर घेतले. त्याच्याही मनात कोठला विकार नव्हता आणि तीही त्याला पुत्रासारखाच मानीत होती.

तेवढ्यात खडावांचा खट्खट् आवाज कानावर आला. तिला नवल वाटले आणि सहज तिच्या तोंडून प्रश्न बाहेर पडला, 'आज अर्ध्यावरूनच परत येणं झालं वाटतं?'

पण तिचा प्रश्न ऐकण्याइतकी आणि त्याचें उत्तर देण्याइतकी स्वस्थता कोणाजवळ होती? आपल्या बायकोच्या मांडीवर डोके ठेवून निजलेल्या भावाला पाहून ऋषींच्या अंगाचा नुसता तीळपापड झाला होता. मार्गे तुडवीत आल्यामुळे श्रमही झाले होते. विचारांच्या तरंगांनी मन व्यथित झाले होते आणि डोळ्या-पुढे ते दृश्य दिसताच राग आवरेनासा झाला. रागाने लाल होऊन थरथरत त्यांनी विचारले,

'पापिणी! तुझ्या मांडीवर हा कोण झोपला आहे?'

'आपला धाकटा भाऊ प्रगाथ.' तिने सरळपण उत्तर दिले.

'हं. मला वाटतच होते! मी नसलो की येथे असेच काहीच्याबाही होत असणार!' बोलता बोलता क्रोधाच्या भरात ऋषि पुढे झाले आणि शांत झोपलेल्या प्रगाथाला त्यानी लाथ मारुन उठवले.

'उठ दुष्टा! पापी माणसा! ही तपोभूमि आहे–काही मदिराघर नाही दिवसा ढवळ्या झोपा काढायला!'

'दादा! मला क्षमा करा. माझी चूक झाली.' जाग येताच प्रगाथाला आपली चूक उमगली. ऋषिंचे पाय धरून त्याने क्षमा मागितली. 'दादा–तुम्ही माझे मंत्रदाते, गुरु. तुम्हीच माझे वडील! मला क्षमा करा!'

'हं! आणि ही स्त्री?' ऋषींनी रागातच विचारले.

'ही? ही माझी माता! माझी छत्र छाया!'

ऋषींच्या पाया पडलेल्या प्रगाथाने उठून ऋषिपत्नीला वंदन केले. गाईने

वासराला चाटावे तशा प्रेमाने त्याच्या पाठीवरून हात फिरवून ती म्हणाली.

'वत्स प्रगाथ ! तू आणि तुझे दादा दोघेही मंत्र द्रष्टे आहात. मोठे ऋषि आहात. स्नेहबंधाने एकमेकाशी बांधले गेलेले आहांत. तुझे कल्याण असो पुत्रा !'

प्रगाथाने पुन: ऋषींना वंदन केले. व तो म्हणाला,

'आपला अपराधी मुलगा आपल्या पाया पडतो आहे !' त्या दोघांचे आई लेकरासारखे प्रेम पाहून ऋषि परत विचारात पडले. त्यांचा राग मावळला. पायाशी वाकलेल्या प्रगाथाला उठवून त्यानी पोटाशी धरले व त्याला प्रेमाने आशिर्वाद दिले.

'वत्सा, मीच भ्रमिष्ट झालो होतो ! वनात जाताना मार्ग चुकलो आणि विचारांच्या तरंगात मनही भरकटत गेले. त्यात डोळ्याला जे दिसले त्यामुळे डोके अगदीच फिरून गेले ! आता क्रोधाचा आवेग सरला आणि खरे काय ते उमगले. तू माझा धाकटा भाऊ आहेस. आजपासून मी पुत्र म्हणून तुझा स्वीकार केला आहे.'

घोर पुत्र कण्व ऋषींचा पुत्र काण्व प्रगाथ म्हणून जे मंत्रद्रष्टे ऋषिबर प्रख्यात आहेत तोच हा प्रगाथ !

## : २ आसंग आणि शश्वति

सिंधु प्रदेशाचा राजा आसंग हा राजर्षि प्लायोगाचा पुत्र. त्याची राणी शश्वति ही अंगिरा ऋषींची कन्या. राजा आणि राणी सर्व प्रकारे सुखी होते. पण त्यांच्या मनाला एकच दु:ख होते.

'जे काही मिळायचे ते दैवी कृपेने मिळते.' राणी मनाची समजूत घाली.

'जसे करावे तसे भरावे.' अशी राजाची मान्यता होती. सामान्यत: जीवनातल्या घटना घडत रहातात. कोणाच्याच मान्यतेला धक्का देण्यासारखे त्यांत काहीं नव्हते. प्रजेच्या मनावर मात्र वेगवेगळे प्रत्याघात होत.

राजाच्या मान्यतेप्रमाणे चालणारे काही लोक होते. ते खाण्या पिण्यात आनंद प्रमोदांत दंग असत. सुखी असत. ते राजालाही सांगत आपण मिळवले आहे आपण भोगावे. यात दैवाचा संबंधच काय ?

राणी आपल्या मान्यतेप्रमाणे व्रते करी. उपवास करी. राजाला ते आवडत नसे. दाने द्यावी, देवाची पूजा करावी ही त्याच्या मते दुर्बलतेची लक्षणे होती. राजा राणीला म्हणे,

'अग आपणच देव आहोत. तुझे इंद्र बिद्र कोणी पाहिले आहेत ?' राणी

यावर काहीच बोलत नसे. त्यामुळे राजा चिडे. व राजाच्या कठोर शब्दांनी राणीचे मन दुखावले जाई.

याप्रमाणे राजाने परमार्थाचा मार्ग सोडून दिला होता. भोग आणि विलास हीच जीवनांची परम सिद्धी असे तो मानू लागला होता. त्यामुळ प्रजेच्या सुख-दु:खाची, शोक संतापाची चिंता करून न्यायनीति संभाळण्याची त्याची वृत्ती नाहीशी झाली होती.

प्रजाजन राजाचा स्वार्थीपणा चालवून घेत. पण त्याचे भोग विलास त्यालाच नडू लागले. त्याच्या शरीरातले दैवी राजतेज त्यामुळे मावळून गेले. रोगानी शरीर पोखरून निघाले. इन्द्रियाचे वीर्य व सामर्थ्य जतन करणारा इन्द्र त्याला सोडून गेला.

देवांचा शाप म्हणा की भोगविलासांचा परिणाम म्हणा, राजाचे पुरुषत्वच नाहीसे होत गेले व तो स्त्रीसारखा होऊ लागला. थोड्या दिवसानी तो स्त्रीच होऊन गेला. जीवन असह्य वाटू लागले. भोगविलास नकोसे होऊन गेले. खाण्या-पिण्यावरुन मन उडून गेले. कोणाच्या दृष्टीस पडू नयेसे वाटू लागले व तो अंत:पुरात एकांतवासात राहू लागला.

राजाचा धीर सुटला. पण राणीचे धैर्य कायम होते. पवित्र व्रते, तप, उपवास यांच्या योगाने तिची काया कांचनासारखी शुद्ध झाली होती. दान यज्ञादि धर्मकार्यांनी तिने प्रजाजनांना प्रसन्न केलें होते.

राज्याशेजारच्या तपोवनात मेधातिथी व मेध्यातिथी नावाच्या दोन ऋषींचा आश्रम होता. राज्यातील पंचजनांना घेऊन राणी शश्वती त्या ऋषींना शरण गेली व राजाच्या विकृतीवर उपाय विचारला. त्या ऋषींनी राजाच्या अवदशेची कारण मीमांसा केली.

'हे राणी, राजावर इंद्र रुष्ट झाला आहे. त्याने राजाचा त्याग केला आहे. तो परत प्रसन्न झाला तर राजाची दशा सुधारेल.'

राणीने हात जोडून त्या उभयता ऋषींची प्रार्थना केली, 'भगवन तुम्हां दोघां महर्षिवर देवराज इंद्राची पूर्ण कृपा आहे. तरीं त्याची स्तुति प्रार्थना करून त्याला प्रसन्न करून राजावर कृपा करण्यासाठी त्याला विनवावे. आमच्यावर कृपा करून आमचे येवढे कार्य करावे.'

ऋषि यावर किंचित हसून म्हणाले,

'राणी ! इंद्राची आमच्यावर कृपा आहे हे खरे. पण त्या कृपेचे मोल रत्नमाणकांनीं करता येत नसते. देवराजाला प्रसन्न करून घेण्यासाठी व्रत आणि

नियमांचे पालन करावे लागते. संयमाची साधना करावी लागते. हे सारे राजाने स्वतःच करावयास हवे. दुसऱ्याच्या तप त्याग आणि साधनेने राजाचे कल्याण कसे होईल ?'

राणीला त्यांचे म्हणणे योग्य वाटले. राजाला ते समजावून सांगून ती त्याला घेऊन आश्रमात आली. एका पवित्र पर्णकुटीत राजा व राणी राहू लागले. तप व संयमाच्या साधनेने राजाचे विकार नाहीसे होऊ लागले. आश्रमाच्या पवित्र वातावरणात मनाच्या शुद्ध वृत्ति जाग्या होऊ लागल्या.

राजाच्या व्रत, तप व उपवासात राणीही सहभागी होतीच. दोन्ही ऋषि वरांनी पण शुभ संकल्प करून राजाचे प्राण व शरीराच्या ठायी नवचैतन्य निर्माण केले. राजाची दुर्बलता दूर होऊन पूर्ववत् दैवी राजतेज त्याच्या तोंडावर दिसू लागले.

राजाने धीराने व संयमाने व्रताचरण व तप केले. राजाची काया पहिल्या- सारखी शुद्ध व निरामय झाल्यावर राजा व राणी उभयतांना इन्द्रयागाची दिक्षा देऊन ऋषिवरांनी देवराज इन्द्राला प्रसन्न करून त्याला आवाहन केले. राजाच्या शरीरात देवामध्ये श्रेष्ठ अशा त्या इन्द्राने प्रवेश करताच इन्द्रिये वीर्यवान होऊन त्याच्या ठिकाणी उत्तम पुरुषाची सर्व लक्षणे दिसू लागली. ते पाहून राणी आनंदीत झाली.

आता राजा पूर्वीसारखा निःसंग, कामी, स्वार्थी राहिला नव्हता. त्याने उभयता ऋषिवरांना सन्मानपूर्वक आपल्या राज्यात बोलावले. त्यांच्या प्रेरणेप्रमाणे दान, यज्ञ व सेवापूजेची कामे तो नित्यनियमाने करू लागला. प्रजेच्या जीवनातही त्यामुळे नव्या श्रद्धेचा व शुभ भावनेचा उदय झाला.

## ३ : पर्वत आणि नारद

सरस्वती नदी धीर गंभीर वहात होती. पाण्याच्या प्रवाहामुळे त्या प्रदेशाचे दोन भाग पडले होते. एका किनाऱ्यावर आरावत व दुसऱ्या किनाऱ्यावर परावत प्रदेश.

आरावतातील एका पर्णकुटीत पर्वत ऋषी रहात. नदीचा प्रवाह उंचावरून खाली वहात जातो हा निसर्गाचा क्रम आहे. त्याचप्रमाणे नैसर्गिक स्वभावाला अनु- रुप असे भावही जीवनाला अनुकूल असेच असतात. पर्वत ऋषि आपल्या नैसर्गिक वृत्तीच्या अनुरोधाने जीवन जगत होते. मनाप्रमाणे वागत होते. आनंदात रहात होते.

परावत प्रदेशांत एका पर्णकुटीत नारद ऋषिचा वास होता. त्याग व संयमाच्या योगाने त्यांनी आपल्या मनाला वळण लावले होते. त्यामुळे मनही

नैसर्गिक वृत्तीच्या मागून जात नसे. नदीच्या प्रवाहाला बांध घालून पाण्याच्या प्रवाहाला वळवणे मोठे अवघड असते. नारदाचा आश्रम वरच्या भागात होता. आणि त्यांचा स्वभावही प्रवाहाच्या विरुद्ध दिशेला वर वरच चढत जाण्याचा होता. आणि त्या प्रयत्नातच ते सदा मग्न रहात.

कण्व मुनींचे हे दोघे पुत्र होतें. दोघांचे स्वभाव एकमेकाहून वेगळे होते. परंतु मातापित्यांच्या वत्सल लालन पालनामुळे त्यांचे परस्पर संबंध स्नेहाचे होते. कधी वनातुन जाता येताना, कधी कण्वांच्या सभेत, तर कधी सवन यागाच्या प्रसंगी त्याची भेट होई. अशा प्रसंगी अश्विनीकुमारांच्या जोडी सारखी त्यांची जोडी शोभे. दोघेही एकाच स्वरात इन्द्र स्तुति गात. साम गान करीत.

दोन्ही बाजूस सरस्वती वहात होती. त्याच प्रमाणे दोघा भावाचा जीवन-क्रमही चालला होता. नारदाला वेळ मिळाला की आसन घालून निरोध करून समाधी लावण्यात आनंद वाटे. त्याचा वेळ समाधीत कोठच्या कोठे निघून जाई. पर्वताला वेळ होई तेव्हां मनाच्या तरंगामागून मनोरथ करीत वनातून, नदीं किनाऱ्यावर तो फिरत राहीं. त्याचे दिवसचें दिवस त्यात निघून जात.

एक दिवस पर्वताच्या मनात विचार आला. नारदाला भेटून बरेच दिवस होऊन गेलें. आज तिकडे जावे. विचार येताच तो निघाला. नदीच्या तीरावर जाऊन उभा राहिला, नारदाला भेटायचे तर परावत, नदीच्या पैलंतीरावर जायला हवे. आणि नारदाचा आश्रमही वरच्या भागात उंचावर. प्रवाहाच्या विरुद्ध दिशेला गेल्या खेरीज चालण्यासारखे नव्हते. एक मन नदी ओलांडून प्रवाहाच्या विरुद्ध जाण्यास नकार देत होते. तर दुसरे मन म्हणू लागले नदीचा प्रवाह अनुकूल आसो की प्रतिकूल असो. मनोरथाला कोठलीच दिशा प्रतिकूल नसते. पुढे मागे वर, खाली मनोरथाच्या गतीला कोठेच अवरोध नसतो. असा विचार करून त्याने नदीत उडी टाकली. प्रवाहाच्या उलटया दिशेने त्याला पोहत जावयाचे होते मनोरथांच्या बळाने ते साहस व धैर्य त्याला अगदी सहज मिळाले.

पर्वत नारदाच्या आश्रमात जाऊन पोचला त्यावेळी त्या कुटीचे दार आंतून बंद होते. वेळ मिळाला की आपला भाऊ समाधी लावून बसतो हे पर्वताला माहीत होते. आश्रमाच्या परिसरात इकडे तिकडे फिरत तो वेळ काढू लागला. पोहून आल्यामुळे तो थकून गेंला होता. भूकही लागली होती. आश्रमाच्या वनभूमीतील फळे तोडून त्याने खाल्ली व मग कुटीच्या दारावर तीन वेळा टिचकी मारली, नारदांनी दार उघडले व चकित होऊन विचारले, 'अरे, पर्वता, तू इकडे कसा ?'

'बरेच दिवस झाले तुम्ही भेटला नव्हता. भेटण्याची इच्छा झाली. नी आलो.' पर्वताने सहज भावाने सांगितले.

झोपडीत दोघांना बसण्या एवढी जागा नसल्याने ते दोघे भाऊ एका झाडाखाली गार सावलीत बसावे म्हणून चालू लागले. झाडावर पिकलेली फळे होती ती दिसेनात म्हणून नारदांनी आपल्या भावाला विचारले,

'पर्वता, या झाडावर पिकलेली फळे होती ?'

'होती ना. मला खूप भूक लागली होती. मी ती तोडून खाल्ली.'

'फळे तोडण्याआधी तू कोणाला विचारले होतेस ?'

'नाही दादा. तुम्ही आंत होता, आणि मला तर असह्य भूक लागली होती. पिकलेली फळे पाहून मला रहावले नाही. माझ्या कडून काही अपराध झाला का ?' मनाचे मानून चालणाऱ्या पर्वताला आपले काही चुकले असे वाटले नव्हते. परंतु सतत संयमाची साधना करणाऱ्या नारदाच्या दृष्टीने अशा लहान सहान चुकाच लोभ व लालसा याना वाढवून वेग देणाऱ्या होत्या. ते आपल्या भावाला म्हणाले,

'बंधो, तहान भूक काय भागून जाते. पण दुसऱ्याच्या वस्तूला न विचारता हात लावणे हा निश्चितच अपराध आहे. लोभाला वश होऊन तू हे पाप केले आहेस.'

'दादा, तुमचे म्हणणे मी समजलो. माझी चूक झाली. त्याबद्दल तुम्ही कराल तो दंड भोगायला मी तयार आहे.'

'बंधो, तुला शिक्षा मी कशी करु ? बऱ्या-वाईटाचा विवेकपूर्ण विचार करून, न्याय नीति समजून चालणाऱ्या एखाद्या न्यायधिशाकडे जावयास हवे.'

'दादा, असा न्यायाधीश येथे कोठून आणायचा ?'

'पिता कण्व मुनि न्यायप्रिय आणि विवेकी आहेत. आपण त्यांच्याकडे जाऊ.' दोघे भाऊ उठून कण्वमुनीकडे गेले. नारदाने फळे न विचारता घेतल्याचा आरोप केला आणि पर्वताने आपला अपराध स्वीकारला. आणि होईल ती शिक्षा भोगण्याची तयारी दर्शविली. त्या दोघांचे म्हणणे ऐकून मुनि विचारात पडले. कोठल्या तरी गंभीर प्रश्नाचा विचार करावा तसा थोडा वेळ डोळे मिटून त्यांनी विचार केला. डोळे उघडून ते गंभीरपणे बोलू लागले. पण तोंडावर मात्र स्मित खेळत होते. ते म्हणाले,

'नारदा, तुझा आरोप योग्यच आहे. पर्वताने अपराध केलेला आहे. पण तो ज्या अर्थी अपराध स्वीकारीत आहे, त्याअर्थी तो क्षमेला पात्र आहे. त्याला दंड करण्याची आवश्यकता नाही.'

'पितात, मी पर्वताला क्षमा करतो.' नारद मोठ्या मनाने लगेच म्हणाला. पण पर्वताला ते रुचेना. तो आग्रह धरुन बसला,

'पितात, दादा उदार आहेत. पण मला क्षमा नको अपराध घडला असेल तर दंड भोगायलाच हवा क्षमा मागून अथवा करून उलटी पापांची परंपरा वाढत जाते. शिक्षा भोगली की पापाचा मूळ अंकुरच सुकून जातो. तरी आपण मला शासन करा. ते भोगून मी माझ्या पापापासून मुक्त होईन.

पर्वताचा हा निश्चय पाहून कण्व मुनींना बरे वाटले. ते त्याला हसून म्हणाले, 'पर्वता, राजा वरुणाने न्यायनीतीचे नियम घालून दिलेले आहेत. आणि ते नियम मोडणाऱ्यांना शासनही त्यानेच सांगून ठेवले आहे. त्या प्रमाणे पहाता तुझे हात तोडून टाकायला हवे. कारण लोभाच्या लालसेने त्या हातांनी फळे तोडली. त्या अपराधाची शिक्षा त्या हातानी भोगावयास हवी.'

पर्वताने निर्भयपणे वरूणाचे शासन मान्य करुन आपले दोन्ही हात कापून घेतले.

सकाळच्या प्रहरी आश्रमांतील मुनि आपली नित्यकर्मे करण्यात मग्न होते. सुरस्वतीचा प्रवाह संथ, अविरत वहात होता. पित्याच्या आज्ञेप्रमाणे नारद व पर्वत दोघेही नदीवर स्नानासाठी गेले. स्नान झाल्यावर नारदांनी सूर्याला अर्घ्य देण्यासाठी हातांची ओंजळ पाण्याने भरुन घेतली. पर्वत ऋषीही नित्य नेमाने सूर्याला अर्घ्य देत असत. वडील भावाच्या सहवासाने आनंदीत झालेल्या त्याच्या मनाला कापलेल्या हातांची वेदना जाणवत नव्हती. इतकेच नाही पण आपले हात कापले आहेत हे त्याच्या लक्षातही राहिले नाही. सवयीप्रमाणे अर्घ्य देण्यासाठी पाणी घ्यावे म्हणून खाली वळून त्याने आपले उरलेले हात पाण्यात बुडवले आणि एक मोठाच चमत्कार घडला. कळीतून कमळ फुलावे तसे त्याच्या ढोपरापासून नवे सुंदर हात बाहेर आले व त्याने ओंजळ भरून सूर्याला अर्घ्य दिले.

नारद हा चमत्कार पाहून आश्चर्यमुग्ध झाले. पर्वतालाही आठवले, 'आपले हात तर कापून टाकले होते, मग हे हात कसे नी कोठून आले?'

'ही देवराज वरुणाची कृपा' कण्वानी हसून म्हटले. आनंदाने एकमेकांना मनःपूर्वक भेटून ते दोघे भाऊ आपआपल्या आश्रमाकडे वळले.

## ४ : त्रिशोक आणि नाभाक

कण्व मुनि हे नृषदाचे पुत्र. दूर दूर डोंगराच्या कपारीत एक गुंफा शोधून

काढली होती. तेथे ते रात्री रहात. दिवसा रानावनात फिरत. फळे मुळे शोधून भूक तहान भागवीत.

आजुबाजूच्या लहान लहान गावातून वस्ती होती. ऋषींना ही गावे प्रिय होती. त्यांचा स्वत:चा स्वभाव लहान मुलासारखा निरागस, सरळ होता. त्यामुळे ते तेथील लोकांशी सहज समरस होऊन जात. सकाळपासून संध्याकाळपर्यंत एखाद्या गावात ते फिरत. गावकरी त्यांच्या भवतीभोवती जमत. दिवस मावळला की मुनी आपल्या गुंफेत परत जात.

त्या बाजूच्या वनात बक नावाचा एक राक्षस रहात होता. तो गावकऱ्यांना फार त्रास देई. अचानकच एखाद्या गावात जाऊन नासधूस करुन सारे गाव उजाड करुन टाकी. त्याला तोंड देण्याचे धाडस कोणी करु शकत नव्हते. त्याच्यामुळे अशी कितीतरी गावे धुळीला मिळाली होती.

भल्या भोळ्या गावकऱ्यांनी आपले हे दु:ख मुनींना मन मोकळे करुन सांगितले. दयाळू मुनींनी लोकांना दु:ख दूर करण्याचे अश्वासन दिले व ते एकटेच त्या असुराच्या वनात जाण्यास निघाले.

बक इतका क्रूर व त्रासदायक होता की त्याच्या वनाकडे कोणी माणूसच काय पण पशुपक्षीही सहसा फिरकत नसत. निर्जन नीरवतेमुळे ते वन अधिकच भयंकर वाटे.

कण्व मुनींना भय कसे ते माहीतच नव्हते. त्यामुळे त्या भयानक वाटेने पण ते नि:शंक मनाने पुढे जात होते. आपल्याच आनंदात गुंग असलेले ते मुनि बकाच्या रहाण्याच्या ठिकाणी जाऊन पोंचले.

दुपारची वेळ होती. बक त्यावेळी गाढ झोपला होता. त्याची मुलगी बाहेर अंगणांत फिरत होती. आपल्याच आनंदात मस्त असलेल्या निर्भय मुनींना पाहून तिला मोठे नवल वाटले· असा मनुष्य तिने कधी पाहिलाच नव्हता ! ती लगबगीने मुनीच्याकडे गेली. आणि त्यांना सांगू लागली.

'तुम्ही कोण ? वाट चुकून इकडे आलात काय ? हा निवास कोणाचा ते माहीत आहे ?'

तिचे ते प्रश्न ऐकून मुनि मोकळ्या मनाने हसले व म्हणाले, 'देवी ! मला या ठिकाणी पाहून तुम्हाला आश्चर्य वाटले काय ? येथे बक नावाचा असुर रहातो ते मला माहीत आहे. आणि मी त्यालाच भेटण्यासाठी आलो आहे. तुम्ही त्याची कन्या तर नाही ?'

मुनिचे ते सरळ भावाचे बोलणे ऐकून ती असुरकन्याही हसून म्हणाली, मुनिवर ! आपल्याला वाटते आहे तशा सरळपणे माझ्या पित्याला भेटणे शक्य

नाही. तो अत्यंत क्रूर व घातकी आहे. समोर दिसेल त्याला जीवे मारल्याखेरीज तो रहात नाही. पण आपल्याला पाहून माझे मन भरून आले आहे, कोणत्या उपायाने आपले त्याच्यापासून रक्षण करावे याच विचारात मी पडले आहे. आपण माझे ऐका. मी दाखवते त्या गुंफेत लपून रहा. माझा पिता उठून वनांत गेला की बाहेर येऊन माझ्या बरोबर विहार करा.'

'देवी असे लपून छपून रहाण्याची काहीच आवश्यकता नाही. मला तुमच्या पित्याला भेटावयाचे आहे. मी त्यांच्याशी सख्य करण्याच्या इच्छेने आलो आहे. त्याप्रमाणे तुम्ही त्यांना जाऊन सांगा.'

मुनींचे ते सरळ भाषण राक्षसकन्येला समजेचना. आपल्या पित्याचे भयंकर स्वरुप ती ओळखून होती. समोर दिसणाऱ्या सुंदर, सरळ, तपस्वी मुनीवराला काळाच्या जबड्यातून कसे वाचवावे ते तिला कळेना. मुनीना तिच्या मनातील गोंधळ कळत होता. पण ते स्वत: निश्चित होते. ज्या ठिकाणी बक असुर झोपला होता तेथे ते गेले. व त्याच्या डोक्यावरून मायेने हात फिरवीत मोठ्या प्रेमळपणे बोलू लागले.

'बंधो, बक, उठा. जागे व्हा. मी तुमचा मित्र. तुम्हाला भेटण्यासाठी आलो आहे.'

राक्षस झोपेतून दचकून जागा झाला. आपल्या शेजारी एका माणसाला बसलेला पाहून त्याला विस्मय वाटला. तो काही विचारणार तोच मुनी आपल्या गोड प्रेमळ वाणीने म्हणाले,

'बंधो बक, मी तुमचा मित्र, मला ओळखले नाही ? आपली जन्म जन्मांतरीची मैत्री आहे. या संसाराच्या सागरात वहाता वहाता कोठे तरी भेट होते नी परत ताटातूट होते.'

बक चकित होऊन ऐकतच राहिला. त्याने प्रेमळ, गोड शब्द यापूर्वी कधी ऐकलेच नव्हते. तो स्वत:च इतका क्रूर होता की त्याच्या घरातील माणसेही त्याला घाबरून असत. त्याच्याशी प्रेमाने बोलण्या इतके धैर्यच कोणाला होत नसे. त्या प्रेमाने तो विरघळून गेला. आणि नम्रपणे हात जोडून म्हणाला,

'मुनिवर, मी तर आपल्याला यापूर्वी पाहिल्याचेही मला स्मरत नाही. पण तुमच्या शब्दांनी मला तुम्ही जिंकून घेतले आहे. 'मी तुमचा मित्र आहे' हे शब्द आज मी पहिल्यांदाच कानाने ऐकतो आहे. तुमची वाटेल ती आज्ञा मी आनंदाने पाळीन.'

'पण मी कुठे आज्ञा करायला आलो आहे ? मी आलो आहे मैत्री करण्यासाठी

तुमच्या जवळ बल आहे. मला ईश्वराने बुद्धि दिलेली आहे बल आणि बुद्धी एक झाल्यावर किती तरी चांगली कामे होऊ शकतील.'

'तुमचे बोलणे ऐकून मोठे नवल वाटते. कारण मैत्री करणे हे माझ्या स्वभावातच नाही. नेहमी क्रूर कर्मे करणाऱ्या माझ्या हातून चांगली कामे कशी होतील ? मी राक्षस, तुम्ही ऋषि. आपले सख्य कसे बरे होईल ?'

'बंधो, मी माणूस आहे. आणि तूही माणूस आहेस. ऋषि आणि राक्षस हे भेद आपणच आपल्या मनाने निर्माण केले. आणि त्याप्रमाणे आपण वागत आलो. तुम्ही शुभ संकल्प केला तर तुमच्याही हातून चांगली, मंगल कर्मे का बरे होणार नाहीत ? तुमचेही जीवन त्यामुळे शुद्ध होईल. पवित्र होईल.'

'ऋषि ! अशा गोड गोड बोलण्यावर माझा विश्वास नाही. तू मला फसवण्यासाठी आला आहेस, तुला येथे कोणी पाठवले ते सांग. तुझ्या विषयी मला प्रेम वाटू लागले आहे. तू माझ्यावर जादुटोणा करुन मला वश करणार आहेस ? एरवी तुला पहातां क्षणी मी फाडून खाल्ले असते. असो. माझे एक काम करशील?

'सांगा. मैत्री म्हटली की एकमेकांची कामे करायलाच हवी.'

'ऋषि, माझी मुलगी अगदी भोळी आणि सरळ स्वभावाची आहे. या वनांत रहाणाऱ्या ऋषि मुनींच्याकडे ती नेहमी जाते. परंतु ते सर्व तिचा तिरस्कार करतात. कोणी तिला आपलेपणाने जवळ करीत नाही. त्यामुळे ती दुःखी कष्टी होऊन परत फिरते व माझ्याकडे येऊन रडते. मी तिला समजावतो. माझ्या मुलीने त्या सर्वांना फाडून खायचे सोडून असे रडत बसावे हे शोभत नाही. पण ते तिच्या स्वभावाशीच विसंगत आहे. त्या माझ्या भोळ्या पोरीशी तू लग्न केलेस तर ती निश्चित सुखी होईल व तुझे माझ्यावर मोठेच उपकार होतील.'

बकाचे हे बोलणे ऐकून ऋषि मोठ्या विचारात पडले. ते एकटेच रहात असत. लग्नाचा विचारही आजवर त्यांच्या मनात आला नव्हता. परंतु राक्षस कन्येशी लग्न केल्यास तिचे कल्याण होईल हे म्हणणे त्यांना मनातून पटले व ते बकाला म्हणाले,

'बंधो, तुमच्या पुत्रीशी विवाह करण्यास मी तयार आहे. त्यामुळे आपले मित्रसंबंध दृढ होतील. पण त्यासाठी आपली काही अट आहे काय ?'

'होय. माझी एक अट आहे. लग्नानंतर तुम्हा दोघाना येथेच रहावे लागेल. माझी मुलगी व परिवारातील सर्व माणसे तुमची सेवा करतील व तुमच्या आज्ञेत रहातील.'

बक राक्षसाकडे यताना स्वप्नातही त्याचा घरजावई होऊन रहावे लागेल

अशी कल्पना ऋषीच्या मनात नव्हती. बकाला हिंसेच्या मार्गातून परावृत्त करून मन्मार्गाकडे वळवण्यासाठी त्यांनी धाडस केले होते. राक्षसाच्या त्रासाने भयभीत झालेल्या लोकाना निश्चित करण्यासाठी ते त्या वनात गेले होते,

ऋषीच्या सहवासाने बकाचा स्वभाव बदलून गेला. क्रूर व घातकी कर्मे आपोआपच सुटली. आजुबाजूच्या गावातील लोक सुखात राहू लागले. त्या सर्वांना कण्व मुनी उद्धारक देवासारखे पूज्य वाटू लागले.

बक राक्षसाची कन्या ऋषीच्या सहवासात पवित्र जीवन जगू लागली. तिला दोन मुले झाली. एकाचे नाव त्रिशोक व दुसऱ्याचे नाभाक. एकाच माता-पित्याचे हे दोन पुत्र. पण त्यांचे स्वभाव एकमेकाहून फारच वेगळे होते. त्रिशोक आपल्या मातामहाच्या वळणावर गेला होता. अंगानेही तसाच धडधाकट होता. लहानपणापासून हाणामारीही तशीच करू लागला. उलट नाभाक आपल्या पित्यासारखा सरळ व ऋजु स्वभावाचा होता.

कण्व मुनींनी लोककल्याणासाठी संसार थाटला होता. त्यांचे काम झाल्यावर त्या संसाराचा मोह सोडून ते परत आपल्या निर्जन गुंफेत निघून गेले.

सरस्वतीच्या किनाऱ्यावर पर्णकुटी बांधून नाभाक राहू लागला. बक व त्याची पुत्री जग सोडून गेले. पण जाताना आपला राक्षसी वृत्ती व क्रूर स्वभाव त्रिशोकाला देऊन गेले. पूर्वी बकाचा त्रास होता तसा आता लोकाना त्रिशोकाचा त्रास होऊ लागला. त्यामुळे त्रासून गेलेले प्रजानन नाभाकाला शरण गेले व त्या छळवादापासून वाचवण्याची विनंती करू लागले.

त्याना धीर देऊन नाभाकाने समजावले.

'जसा कर्माचा परिपाक तशी मनाची घडण आणि त्याप्रमाणे स्वभाव होतो कित्येकदा स्वभावातील तीव्र आवेग पावसाळ्यात नदीला येणाऱ्या पुरासारखा अनिवार असतो. विनाशक असतो. पण पावसाळा संपला की तो वेग ओसरतो. प्रवाह शांत व संयमित होतो. माझा भाऊ त्रिशोक यावेळी मोहाच्या भरात वहात चाललेला आहे. मातामह बक राक्षसही त्याच्याच प्रमाणे वहावत चालले होते. पण वेळ येताच ते जसे शांत झाले तसा त्रिशोकही शांत होईल. त्यालाही सत्याचे ज्ञान होईल.'

पण नाभाकाचे हे बोलणे नागरिकांच्या गळी उतरले नाही. त्यांना तात्काळ उपाय हवा होता. ते निराश होऊन परत गेले. नाभाकाला त्यांची दया आली. व ते वनात त्रिशोक रहात होता तेथे गेले.

दुपारची वेळ होती. त्रिशोक झोपला होता. त्याच्या उशाशी बसून मधुर स्वराने नाभाकाने त्याला उठवले.

'बंधो त्रिशोक, खूप झाली झोप. आता जागा हो.' त्या गोड प्रेमळ शब्दांनी त्रिशोक झोपेतून जागा झाला.

'कोण ? बंधू नाभाक ? दादा, तुम्ही इकडे कसे ?'

'बंधो, खूप खूप वर्षांपूर्वी आपले मातामह असेच दुपारचे झोपले होते. आपले पूज्य पिता कण्व मुनि आले त्यांनी त्यांना झोपेतून उठवले आणि त्या क्षणापासून मातामहांचा स्वभावच बदलून गेला!'

'दादा, स्वभाव बदलणे मोठे कठीण आहे. मातामहांच्यावर पित्याने नक्कीच काहीतरी जादूटोणा केला असावा. छे. छे. मला माझा स्वभाव सोडायचा नाही. दादा, तुम्ही आपल्या आश्रमात परत जा. माझे जे व्हायचे असेल ते होऊ दे. पित्याने स्वतःच्या इच्छे विरूद्ध लोकांच्या हितासाठी एकांतवास सोडून संसार थाटला. त्यांचा तो स्वभाव तुम्हाला लाभला आहे. पण मला आपल्या आजोळाच्या वृत्तीच मिळाल्या आहेत. त्या सोडण्याची, स्वभाव बदलण्याची मला मुळीच इच्छा नाही.'

'बंधो, अरे तू हे काय बोलतो आहेस ? संसारातला त्रिविध शोक दूर करण्यासाठी तू जन्म घेतला आहेस. आणि आता तूच शोकाचा नी मोहाचा दास होऊन गेलास ? तू जेथे जातोस तेथे विजयीच होतोस, असा बलवान असून आपल्याच स्वभावापुढे असे हात टेकतोस ? अरे जरा विचार कर. आपण कोणाची मुले ? आपली आई जरी राक्षसकुलात जन्माला आली होती तरी स्वभाव एखाद्या देवते सारखा नव्हता काय ? तिने जन्मभर व्रते केली. तप केले. तुझ्यात ही दुर्बलता कोठून आली ? स्वतःच्या मान्यते पुढेच तू पराजित झालास ? तुझ्या ठायी बळ आहे. समजुतदारपणा आहे. विवेक आहे. तू वीर आहेस. शूर आहेस सोडून दे ती निर्बलता. तुझ्या अंतरी वसणाऱ्या इंद्राला जागव. आणि तुझ्या शत्रूचा नाश कर. तुझ्या स्वतःच्या अंतरीची खूण पटवून घे.'

नाभाकाच्या शब्दांचा योग्य तो परिणाम झाला. त्रिशोकाचा कठोर स्वभाव विरघळून गेला. नाभाकाच्या मांडीवर डोके टेकून आपण केलेल्या दुष्कृत्यांच्या पश्चात्तापाने तो रडू लागला. आसवांनी त्याची सारी पापे धुतली गेली. व त्याचे सारे जीवनच नंतर बदलून गेले.

नाभाक ऋषि होते. मंत्रद्रष्टे होते. त्रिशोक पण ऋषि झाले. त्यांनीही तपाचरण करून मंत्रदर्शन केले. देवराज इंद्राची स्तुति करून त्यांनी अंतरांतील देव जागृत केले.

# ५ : मत्स्य आणि अदिति

यमुनेच्या तीरावर दोन्ही बाजूला लहान मोठ्या नावा डुलत होत्या. तीरावरे धीवरांची वस्ती होती. त्यांचें घर, संसार, सर्वस्व सारे काही या नावाच होत्या. प्रवासी येतील त्यांना ते नौकेतून ऐलतीरावरून पैलतीराला नेऊन सोडीत.

दोन्ही तीरावरील धीवरांचे संबंध गोडीचे होते. आपसात लग्न संबंधही होत. मत्स्यकन्या ऐलतीरावरच्या माहेराहून पैलतीरी सासरी जात. कधी लहान महान भांडणेही होत. आणि सुखी संसारही घरोघरी नांदत. अशी प्रजा. पाण्याच्या तरंगावरच त्यांचा जन्म होई. पाण्यात खेळून बागडून ते मोठे होत. आणि त्याच प्रवाहावर होडी चालवताना त्यांचा जन्म पुरा होई. पाण्यातील माशांच्यावरच त्यांचा निर्वाह होई. ते मासे पकडीत. खात. पण ते माशांना पाळीतही असत. त्यांच्यावर प्रेमही करीत. त्यांना जलदेवता मानून त्यांची पूजाही करीत. मोठे मासे लहान माशांना गिळतात. जिवावर जीव जगतो या निसर्ग नियमाप्रमाणे ते जगत.

या धीवरांचे लहान मोठे संघ होते. त्या संघातून शासन व्यवस्थाही होती. ते आपल्या संघाचा नेता निवडून त्याच्या हाती शासनाची सूत्रे सोपवीत.

असा एक संघ नेता गाधिराज महामीन संमद या नावाचा होता. एका तीरावरील प्रजा त्याच्या आज्ञेत असे. पण पैल तीरावरील लोक त्याला जुमानीत नव्हते. पण संमद उदार मनाचा होता. शासनाचा दंड बाजूला ठेवून त्याने स्नेहाने सर्वांना जिंकून घेतले. पैल तीरावरील नेत्याला सन्मानाने आपली कन्या व आपले राजपदही त्याने देऊन टाकले. असा हा गाधीराज सर्व धीवरांना मोठा प्रिय होता. त्याच्या प्रेमाचे राज्य एकछत्री चालत असे.

गाधिराज संमदाला एक पुत्र होता. त्याचे नाव मत्स्य. दोन्ही तीरावरील प्रजाजनांचे या राजकुमारावर प्रेम होते. सर्वजण त्याला मत्स्यराज म्हणत. लहान लहान नावात बसून तो व त्याचे मित्र यमुनेवर जलविहार करीत.

जीवन निर्वाह करण्यासाठी मासे पकडणे वेगळे. आणि केवळ खेळ म्हणून माशांना पकडणे, मारणे वेगळे. मोठे लहानांना गिळतात. तरीही लहान मोठे सारेच मासे पाण्यात जन्मतात. व एकत्र नांदतातही.

मत्स्यराजाला मासे पकडण्याचा नाद लागला. तो लहान मोठी जाळी विणून पाण्यात सोडी, प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने नावा चालवी व जाळी भरभरुन मासे पकडी. हा त्याचा रोजचा क्रम होऊन गेला.

पाण्यातले मासेही मत्स्यराजाला ओळखू लागले होते. त्याच्या जाळ्या-

पासून जीव वाचवण्यासाठी ते धडपडत. शक्य तितके सावध रहात. जीव वाचवण्यासाठी इकडे तिकडे धावपळ करणाऱ्या माशाना पाहून मत्स्यराजाचा मद वाढे व जाळे चुकवणाऱ्या माशांना पकडण्यात त्याला मोठा पुरुषार्थ वाटे. त्याचा हा गर्व व मद त्याच्या बरोबरचे लोक पोषीत.

एक दिवस असाच जाळे टाकीत मत्स्यराज बराच दूरवर गेला. जाळ्यात खूपसे मासे सांपडले. ते पाहून त्याच्या मनात विचार आला, 'पाण्यातले हे मासे जमिनीवर सोडले तर जगतील की नाही?' ते प्रत्यक्षच पहावे म्हणून त्याने ते मासे किनाऱ्यावर आणून सोडले.

त्याच्या लहरी संभाळणारे मित्र बरोबरच होतेच. माशांनी भरलेले जाळे खेचून त्यांनी तीरावरच्या वाळूत ते मासे सोडले. पाण्यातले ते जीव वाळूत पाण्याशिवाय तडफडू लागले.

पाण्यामध्ये अदिती देवी वास करते. ती देवाची माता असून दैन्यास थारा न देणारी आहे. दीनांच्यावर तात्काळ दया करून दैन्य दूर करणारी आहे. जीवन व मरणाच्या मध्ये तडफडणाऱ्या दीनवाण्या माशानी जलदेवी अदितिचे स्मरण करून तिची स्तुति प्रार्थना केली. मत्स्यराज केव्हाच होडीतून दूर गेला होता. त्याचे काही मित्र तेथे किनाऱ्यावर होते.

माशांची प्रार्थना ऐकून माता अदिती त्या ठिकाणी प्रगट झाली व माशाना पाण्यात सोडून देण्याची आज्ञा तिने मत्स्यराजाच्या अनुचरांना केली. त्यांनी देवीला हात जोडून प्रणाम केला व तिच्या आज्ञेप्रमाणे मासे सोडून दिले. थोड्या वेळाने मत्स्यराज आला.

पाण्यावाचून मासे जगतात किंवा मरतात हे प्रत्यक्ष पहाण्यासाठी आलेल्या मत्स्यराजाला किनाऱ्यावर एकही मासा दिसेना. त्याचे अनुचर त्याला सांगू लागले,

'देवी अदिति साक्षात् या ठिकाणी प्रगट झाली होती. तिच्या आज्ञेवरून आम्ही मासे सोडून दिले.

अनुचरांच्या शब्दांवर मत्स्यराजाचा विश्वास बसेना. पाण्यात कोठली आली आहे देवी! आणि त्यात दया तरी काय दाखवायची? तो 'मत्स्यराज' पाण्यातील माशांवर त्याचा अधिकार. त्याला आज्ञा करणारी ही 'देवी' कोण?

मत्स्यराज मदाने उन्मत्त होऊन गेला होता. दया वा प्रेमाचा लेश त्याच्या मनात उरला नव्हता. अनुचरांना सोडून तो एकटाच नावेंत बसून दूर निघून गेला.

मत्स्यराजाची नाव वहातां वहातां प्रवाहाच्या एका भोवऱ्यात सापडली. व कलंडली, मत्स्यराज पाण्यात बुडला. परंतु तो उत्तम पोहणारा होता. पाण्याच्या तळाशी डुबकी मारून क्षणात वर येणे हा त्याच्या हातचा मळ होता. तो वर आला. पण समोर पहातो तो एक प्रचंड मासा आ वासून त्याचा घास घेण्यासाठी झपाट्याने येताना दिसला. त्याला पाहून मात्र मत्स्यराज घाबरला. लहान माशाला मोठा गिळतो हे त्याने कित्येकदा पाहिले होते. पण अशा वेळी लहान माशाची काय गत होत असावी त्याचा त्याला प्रत्यक्ष अनुभव येत होता. मासा पाण्यातून काढला तर त्याच्या जिवाची कशी तगमग होत असावी ते त्याला प्रत्यक्षच कळून चुकले. पाण्यावाचून माशांचे प्राण जातात त्या प्राणाचे मोल आजवर त्याला जाणवले नव्हते. ते त्या क्षणी जाणवले.

तो स्वत: ' मत्स्य राज ' होता. पण एक महामत्स्यच त्याला गिळून टाकण्यासाठी आ वासून येत होता. एका क्षणात त्याच्या जीवनाची इतिश्री होणार होती !

मत्स्यराज उमगला. त्याचा मद कोठच्या कोठे नाहीसा झाला. तो पाण्यात माशासारखाच तडफडू लागला. धावपळ करू लागला. आपल्या अनुचरांनी देवी अदिति विषयी सांगितले होते त्याचे त्याला त्या संकटाच्या वेळी स्मरण झाले. त्यावेळी त्याचा देवीवर विश्वास नव्हता. पण आता काळ समोर ठाकल्यावर अत्यंत दीन, नम्र होऊन त्याने अदिति देवीची प्रार्थना केली. डोळे मिटून तो करुणा भाकीत होता. आता क्षण, दोन क्षण–आणि मृत्यू आलाच. समोरचा महामत्स्य त्याला गिळणार–

पण त्या ऐवजी त्याच्या कानावर मधुर शब्द पडले.

' वत्सा, मत्स्य राजा ! घाबरलास ? अरे तू पाण्यातलाच, पाण्याचाच जीव. पाण्यातच तुझा जन्म. जीवन आणि अंत. तुला भय रे कसले ?'

मत्स्यराजाने चकित होऊन डोळे उघडून पाहिले. दयेची देवी अदिति समोर हसत होती. त्याचा अभिमान पार नाहीसा झाला. स्वत:ची दुष्कर्मे त्याला डोळ्यापुढे दिसू लागली. त्याने पकडलेल्या मासोळ्या पाण्याविना तडफडत ' दया करा. दया करा.' म्हणून कळवळू लागल्या.

माता अदितिने पश्चातापाने तप्त झालेल्या मत्स्यराजाला आशिर्वाद दिला. त्याचे जीवन सुधारले.

## ६ : कृशाश्व आणि अपाला

ते होते कृशाश्व ऋषि. परुष्णी नदीच्या तीरावर त्यांची पर्ण कुटी होती.

अंगणांत अग्निशाला होती.अग्निचे रक्षण व्हावे म्हणून ऋषींनी विवाह केला होता.

अत्रि ऋषीची पुत्री अपाला पतिगृही आली व तिने अग्नि शालेचे काम स्वतःकडे घेतले. माहेरी ऋषीच्या सत्संगतीत अपालेने वेदांच्या ऋचा शिकून घेतल्या होत्या. मंत्राच्या दिव्य रूपाचे दर्शन तिला घडले होते.

ऋषि कृशाश्व कर्मरत होते. ब्रह्म मंत्रातील तत्वांचे दर्शन त्यांना झाले होते. कर्म व ज्ञानाविषयीचा विवेक त्यांच्या ठायी होता. आपालेच्या मनात भक्तिभाव जागृत होता. कर्म व ज्ञान याना भक्तिच्या दुव्याने जोडावे ऐसे तिने आपले जीवन ऋषींच्या जीवनाशी जोडले होते.

कृशाश्व अपालेच्या उदार भावाची मनःपूर्वक स्तुति करीत. तर अपाला कृशाश्वाच्या सूक्ष्म ज्ञानाचा महिमा वर्णन करी आणि दोघे मिळून अग्निदेवतेची स्तुति करीत.

अग्नि समिद्ध होताच त्याच्या ज्वाला उंच उंच चढू लागत व त्या दंपतीच्या शरीराची कांती शुद्ध होऊन दिव्य तेजाने झळकू लागे. कर्म, भक्ति व ज्ञानाची मधुर चर्चा त्या दोघात चाले. अपालेच्या मंजुळ कंठातील गोड वाणी कृशाश्व मुग्ध होऊन ऐकत राही.

ऋषि ज्ञानी होते. ऋषिपत्नि ज्ञानाची भुकेली होती. चर्चेच्या ओघात ती प्रश्न एकात एक गुंफून ऋषींच्या पुढे ठेवी. ऋषि मितभाषी होते. बहुश्रुत होते. बोलण्यापेक्षा ऐकण्यातच त्याना आनंद वाटे. चर्चेचे सूत्र घेऊनच अपाला मधेच म्हणाली,

'परंतु भगवन्...' बोलता बोलता ती मधेच थांबली. तिची मधुर वाग्धारा अशी मधेच थांबली म्हणून ऋषि चमकले आणि त्यानी तिच्याकडे पाहिले.

आकाशात उगवलेल्या पूर्ण चंद्रासारखे अपालेचे मुखमंडल समिद्ध अग्नि ज्वालेच्या प्रकाशात शोभत होते. चंद्राकडे प्रेमभराने पहाणाऱ्याला त्याच्यावरचा कलंक दिसत नाही. पण अकस्मात तो कलंक दिसला-तर ?

समोर दिसणाऱ्या त्या सुंदर मुखमंडलावर दोन-चार कोडाचे डाग होते. अपाला बोलता बोलता मधेच थांबली त्यावेळी ऋषीची दृष्टी सहजच तिच्याकड वळली आणि ते डाग त्यांच्या दृष्टीस पडले. ते पहाताच ते दचकले.

'अपाले, अपाले,' ऋषीना विचारायचे होते, 'हे कोड आहे ?' पण त्यांच्या तोंडून शब्द फुटेना. त्यांचे मनोभाव बदलत होते. चतुर अपालेने पतिचे मन तात्काळ जाणले. तीही चमकली. पण धीर धरून विनयाने तिने विचारले,

'भगवन्, काय झाले ? ज्ञान चर्चा करुन दमलात काय ?'

ऋषि आपले मनोभाव लपवण्याचा प्रयत्न करू लागले. कसेही असल तरी अशा गुणी स्त्रीच्या मनावर आघात करण्यास ते धजावेनात. ते म्हणाले,

'नाही नाही. अपाले, ज्ञानचर्चेत मन उलट रमते. पण ज्ञान आणि भक्तिचा सुमेळ असावा तसाच गुणांचा आणि रुपाचा संयोग व्हावा हे योग्य नाही का ?'

चतुर अपालेने ऋषींचे मनोगत तात्काळ ओळखले. गुणांच्या वरून ऋषि रुपावर उतरले होते ! ती विनयाने उत्तरली,

'भगवन् ज्ञानचक्षु उघडले की शुद्ध आत्म्याचे दर्शन घडते. चर्मचक्षुना मात्र शरीराचे सौंदर्यच दिसू शकते.'

ऋषींनी ती ज्ञानचर्चा तेथेच आटोपती घेतली. कारण चर्चेची सूत्रे एकमेकात गुंतत होती. धागा कोठेतरी तट्कन् तुटण्याचा संभव होता. अपाला घरातल्या कामाच्या निमित्ताने उठून गेली. ऋषींनीही मनापासून तिला जाऊ दिले.

त्या नंतरही पति पत्नी अग्निशाळेत बरोबर येत. अग्नि समिद्ध करीत. अग्निच्या लाल केशरी ज्वालांच्या तेजाने त्यांची मुखकांति उजळून निघे. पण अपालेच्या तेजस्वी मुखावरचे ते दोनचार डाग ऋषींचे मन झाकळून टाकीत. ज्ञानचर्चा चालेनाशी झाली होती. अग्निकर्म घाईघाईने आटोपून ऋषि निघून जात आणि आपाला एकटीच अग्निकुंडाजवळ बसून राही. तिचे मन भरून येई.

अपालेच्या गुणांचे अहोरात्र कौतुक करणारे ऋषि आता तिच्याकडे दुर्लक्ष करु लागले. कित्येकदा ते अग्नि शाळेतही येत नसत. अपाला एकटीच अग्निकर्म उरकून घेई.

एक ब्रह्मज्ञानी, समजुतदार, उदारचरित ऋषि याप्रमाणे आपल्या पत्नीची अवगणना करु लागला, जिच्या गुणांचे आणि भाव भक्तिचे वर्णन करताना त्याची जीभ सुकत नसे ती आता मनातून उतरली. कारण ? दुसरे तिसरे काही नाही ! निसर्गाने काया रंगवतांना शेवटचा हात देताना केलेला आळस–निष्काळजीपणा. अपराध कोणाचा नी शासन कोणाच्या नशिबी !

अशा पतीच्या घरी रहाणेही अपालेला असह्य वाटू लागले. कृशाश्व ऋषींचे ज्ञान काही कामास आले नाही ! मत्सराच्या लाटा एकावर एक येत होत्या आणि तिरस्काराची भूमि दुस्तर होत होती. अपालेने धैर्य धरून एक दिवस ऋषींना हात जोडून विनंती केली.

'भगवन् आपण मला निरोप द्यावा.'

ऋषि निरुत्तर राहिले. अपालेच्या मनात आशेचा एक अंकुर होता. स्नेह

जल पाजून त्याला वाढवण्याची धडपड होती. पण मत्सराच्या आगीत तो अंकुर होरपळत होता. अपालेने पतीचे घर सोडले. नवऱ्याच्या घरी तिरस्कृत झालेली स्त्री पित्याकडे गेली.

'पुत्री, तू आलीस ? ये.' पित्याने स्वागत केले. ती निराशेने उन्मळून पित्याच्या मांडीवर पडली. निराधार वेलीसारखी तिची गत झाली होती. पतीच्या मत्सराग्नित कोळपलेली तिची आशा पित्याच्या वत्सल छायेत परत जीव धरू लागली, वाढू लागली, पालवली.

पतिवियोगाने दु:खी झालेली अपाला योगिनी झाली. व्रत, तप व संयमाचे पालन करून आश्रमात सेवा करू लागली. त्या जीवनाशी समरस होऊन पूर्वजीवन हळू हळू विसरू लागली.

अत्रि ऋषींच्या प्रेरणेने तिने कठोर तपश्चर्या करण्यास सुरुवात केली. इन्द्र-राज तिचे आराध्य दैवत होते. तिन्ही त्रिकाळ ती यजन, पूजन व उपासना करू लागली. उरलेल्या वेळात आश्रमाची व पिता अत्रिऋषींची सेवा करण्यात वेळ जाई.

अपालेच्या मनावरचे विषादाचे पटल दूर होऊ लागले. तसतशी तिची कायाही पालटू लागली. व्रत, तप व उपवासामुळे काया सुकली पण त्या योगाने एक आगळेंच तेजही चढू लागले. यौवनाचे तरंग व इंद्रियांचे आवेग शांत होऊ लागले.

अपालेच्या मनात मंत्र आकार घेऊ लागले. ओठ हलू लागले व तोंडून उदात्त, अनुदात्त स्वरित वेदवाणी बाहेर पडू लागली. ते मधुर वेदपाठ ऐकून आश्रमवासी आनंदित होऊ लागले.

आश्रमापासून थोड्याच अंतरावरुन परुष्णी नदीचा प्रवाह खळखळ वहात होता. त्या निर्मल प्रवाहात स्नान करताना अपालेला इन्द्राचे स्मरण होई व मधुर वेदवाणी तिच्या तोंडून उमटू लागे. प्रवाहाच्या तालावर ते शब्द तालबद्ध होत. वहात्या वाऱ्यावर सूर तरंगत. लय लागे आणि साक्षात प्रकृतिमायेसारखी अपाला शोभू लागे.

त्या दिवशी अपाला काही वेगळ्याच भावानंदाने फुलली होती. इंद्राला प्रसन्न करून घेण्यासाठी तिने सोमयागाचा संकल्प केला. शर्यणावत पर्वतावर सोमवल्ली असल्याचे तिने ऐकले होते. 'वाढत्या चंद्रकले बरोबर सोमलता पालवते आणि कृष्ण पक्षांत क्षीण होणाऱ्या चंद्राबरोबर ती कोमजते. ती सोमवल्ली इंद्राला विशेष प्रिय आहे.'

अपालेने ती सोमवेली मिळवण्याचा ध्यास घेतला. स्नान करून सूर्याला अर्घ्य देऊन हातात कमंडलू घेऊन वल्कल अंगावर घेऊन ती निघाली. पर्वताच्या उंच शिखरावर ती जाऊन पोचली. वसंत ऋतु होता. अनेक चित्र विचित्र औषधी व वनस्पती तेथे बहरल्या होत्या. त्यातून इंद्राला प्रसन्न करणारी सोमवल्ली शोधून काढावयाची होती.

अपालेने सोम राजाची स्तुति केली. पवमान सोमाचे गान गाता गांता तिच्या डोळ्यासमोर सोमवल्ली चमकू लागली. तिने आपल्या कोमल कराने तिला स्पर्श केला. तोच दुसरी शाखा तरारली. तिच्याकडे वळली तो मागून दुसरी वेल पालवली. चारी दिशांनी सोमलता डोलत डोलत तिला म्हणू लागली,

'देवराज इंद्राला प्रसन्न करून घेण्यासाठी माझा रस काढून त्याला अर्पण कर. माझ्यावर तो प्रसन्न आहे.'

भावानंदात धुंद झालेल्या अपालेला कोणत्या सोमवेलीच्या रसाने स्फूर्ति येते ते कळेना. इष्ट देवाचे स्मरण करून देवराजाची स्तुति करता करता एका वेलीचे पान तोडून तिने स्वतःच्याच तोंडात घातले. तिच्या दाताखाली सोमरस पाझरु लागला. सोमलता कुटताना यावा तसा मधुर शब्द तिच्या तोंडून बाहेर पडू लागला.

स्वर्गीय सिंहासनावर विराजमान झालेल्या देवराजाचे हजारो कान तो शब्द ऐकू लागले. इंद्र आपल्या वेगवान घोड्यांच्या रथात बसून शर्यणावत पर्वतावर जाऊन पोचला. आपल्या हजारो डोळ्यांनी तो सोमयागाचे कुंड शोधू लागला. पण यज्ञशाळा वा सोमरसाची चमस पात्रे काहीच दिसेना. एका सोमवल्ली जवळ तिची पाने तोडून चावणारी आपाला मात्र उभी होती. तिच्याज वळ जाऊन देवराज विचारू लागले,

'अपाले येथे कोठल्या खलबत्त्यात सोमवल्ली कुटत आहेत बरे? सोमरस कोठे काढलेला आहे?'

आपल्या इष्ट देवाला पाहून अपाला आनंदित झाली. पण आपला हर्षावेग आवरून मधुर वाणीने ती म्हणाली,

'देवराज, येथे सामयागही केलेला नाही आणि सोमरसही काढलेला नाही. हं. एक आहे. ही आपली कन्या नदीच्या पात्रात स्नान करण्यासाठी निघाली असता रस्त्यांत ही सोमलता आढळली. मनात आले की जरा चावून तर पहावी खरो-खरीच सोमवेल आहे कीं काय? भगवन्, आपली स्तुति करता करता या वेलीची

पाने दांताखाली चावली गेली आणि मधुर शब्द उमटला. इतक्या दूर दूर तो आपल्या कानावर आला ?'

अपालेचे निरागस आणि गोड भाषण देवराजाने ऐकले. येथे सोमयागही नाही व सोमरसही नाही हे ऐकून तो परत जाण्यासाठी वळला. तोच अपाला मृदु शब्दात म्हणाली,

'भगवन्, सोमपान करण्यासाठी आपण इतक्या दूरवर येणे केले. आणि आता सोम घेतल्या वांचून आपण जावे हे योग्य वाटत नाही. देव, माझे दांत खलबत्त्याच्या जागी असून ते सोमलता पिळून काढीत आहेत. माझे मुख चमस-पात्राचे काम करीत आहे. त्यांतून सोमरसाची धार मी धरते. आपण कृपा करून सोमपान करावे.'

अपाला भक्तिभावाच्या भरात शुद्धा शुद्ध, उष्टे, पात्र तपात्र सारे विसरून गेली होती पण देवराज इंद्राला शुद्ध सोम स्वीकारण्याची संवय होती. अपालेचे म्हणणे न ऐकता इंद्र चालू लागला. पण अपाला ही सोन्याची संधी न सोडता मुखातील सोमराजाची स्तुति करू लागली.

'हे सोमराजा, साक्षात् देवराज इंद्र आपल्या समोर आहेत. आपण त्यांना प्रसन्न करण्यासाठी मुक्त धारातून वहात यावे. आपला स्वीकार करून देवामध्ये श्रेष्ठ इंद्रराज प्रसन्न होवोत. माझे पात्र सोमरसाने भरलेले नाही तथापि आपल्या रसबिंदूनी ते भरून इंद्राला द्यावे.'

भक्तीवश देवराज अपालेची ती निरागस स्तुति वचने ऐकून परत फिरला. आणि तिच्या मुखातून ओघळणारा सोमरस त्याने ग्रहण केला. व प्रसन्न होऊन तो तिला म्हणाला,

'अपाले तुझ्या भक्तिभावाने मी प्रसन्न झालो आहे. तू वरदान माग.' भावविवश होऊन अपाला देवराजाच्या पाया पडली. जन्मभराचे तिचे तप फळाला आले होते. आनंद भराने ती मुग्ध झाली.

देवराजाने स्वतः तिला उठवले. तिची काया त्याने आपल्या रथाच्या छिद्रात घालून त्रिवार बाहेर काढली. त्या योगानें तिच्या त्वचेवरील दोष नाहीसें होऊन तिची कांति सोन्यासारखी लखलखू लागली.

देवराज परत गेले. अपालाही आश्रमात परतली. कांचनवर्णी अपाला साक्षात लक्ष्मीच वाटत होती अत्रिनी व इतर ऋषींनी तिचे आनंदाने स्वागत केले.

ऋषि कृशाश्वालाही त्याच्या वर्तणुकीबद्दल पश्चाताप झाला. ज्या मत्सराच्या आगीत अपाला होरपळून निघाली होती तिच आग त्यांनाही आंतून जाळीत होती.

आपल्या चुकीचे परिमार्जन करून प्रायश्चित्त घेण्यासाठी ते अत्रिंच्या आश्रमांत गेले. अपालेलाही प्रणाम करून त्यांनी तिची क्षमा मागितली. भली व निर्दोष तपस्विनी अपाला आपल्या पतीजवळ प्रेमाने जाऊन उभी राहिली. अत्रींनी त्या दंपतीस मन:पूर्वक आशीर्वाद दिला.

## ७ : सोभरि आणि चित्र

यमुनेच्या तीरावर एक आश्रम होता. हजारो ऋषि त्या आश्रमात रहात होते. कोणी विद्याभ्यास करीत तर कोणी योगाभ्यासात दंग असत. त्यांचे कुलगुरु होते महर्षि सोभरि. महर्षि कवि होते. आत्मनिर्भर होते, मनीषी होते. लहानपणी त्याना विद्या मिळवण्याची इच्छा झाली आणि सर्व विद्या प्रसन्न होऊन त्यांच्या ठायी वास करू लागल्या. चौदा विद्या, चोपन्न तंत्रे व चौसष्ठ कला त्यांच्या बुद्धी-क्षेत्रात रमून गेल्या.

विद्या संपादन करून ते स्नातक झाले. कण्व मुनींनी त्याना कुलपतिपद दिले व त्याचवेळी योगसाधनेचा मार्गही दाखवला. सोभरीनी दृढ निश्चयाने अष्ट अंगांसह योगाची आठ साधने सिद्ध करुन घेतली. अष्टसिद्धी त्यांच्या इच्छेत राहू लागल्या.

त्यांच्या मनात एक आगळीच इच्छा निर्माण झाली होती. 'माझ्याप्रमाणे सर्व माणसे आत्मसभर झाली पाहिजेत.' त्या इच्छेनुंरूप त्यानी आश्रमातील सर्व ऋषीना विद्यासंपन्न केले. योगसाधना करवून घेऊन योगसिद्ध केले. आश्रमही धनसाधन संपन्न असावा असे त्याना वाटू लागले. त्यांचा तो संकल्पही सर्व शक्तिसकट कामाला लागताच देशोदेशीचे राजे महाराजे येऊन आपली भांडारे त्यांच्या पायाशी आणून ओतू लागले. पहाता पहाता आश्रम संपन्न झाला. त्याला कोठल्याही दानाची आवश्यकता उरली नाही.

सोभरि मुनीच्या आश्रमाच्या दारी एक दिवस एक सम्राट येऊन पोचला. तो पुरुकुत्स राजाचा पुत्र चक्रवर्ती त्रसदस्यु होता. यमुनेच्या दोन्ही तीरावरच काय पण यमुनेच्या प्रवाहावर आणि वाऱ्याच्या लहरीवरही त्याची सत्ता होती. तो सम्राट होता तसाच सिद्ध योगीही होता. पन्नास राजकन्यांच्या समवेत तो आश्रमात जाऊन पोचला. त्याच्या आगमनाने आश्रमात आगळे चैतन्य संचारले. त्या प्रतापी सिद्ध सम्राटाचे दर्शन घ्यावे अशी उत्सुकता प्रत्येकाला होती सिद्ध सम्राटाने परमसिद्ध आचार्य सोभरिंना प्रणाम केला. आचार्यांनी आशीर्वाद

दिला, 'तुमचे सिद्ध आसन अचल राहो. तुमच्या हातून लोकांचे कल्याण होवो. पर्जन्याप्रमाणे तुमचे दान सर्वत्र पसरो.'

राजाने नम्रतापूर्वक आशीर्वाद ग्रहण करून म्हटले,

'भगवन् आपल्या चरणी समर्पण करण्यासाठी मी आलो आहे.'

'राजन् आपल्या सारख्या महादानी दात्याच्या दानाचा स्वीकार स्वर्गातील देवही करतात. गोधन, अश्व, भूमि, कंचन अन्न आणि वस्त्र यांची आवश्यकता आश्रमवासियांना असते. आपण दान द्यावे.'

'भगवन्, आपला आश्रम धन साधनांनी संपन्न आहे. आश्रमवासीयांना सर्व काही भरपूर मिळाल्याने त्यांच्या कामना पूर्ण झालेल्या आहेत हे मी जाणतो. मला आपली सेवा करण्याची इच्छा आहे.'

राजाने याप्रमाणे विनयपूर्वक भाषण करताच त्याच्या पन्नास कन्यांनी आचार्यांच्या पायावर डोके ठेवले. आचार्यांनी राजकन्यांना आशीर्वाद दिला,

'तुमचे भाग्य अखंड राहो. तुमच्या कामना पूर्ण होवोत.'

'भगवन् माझ्या या कन्या आपल्याला अर्पण करण्यासाठी मी आलो आहे त्यांनी आपले जीवन आपल्या चरणी वाहिले आहे. त्या आपल्या सेवेसाठी आलेल्या आहेत.' राजाचे नम्र निवेदन ऐकून ऋषि विस्मय चकित झाले. त्यांच्या कल्पणेतही हा मनोरथ त्यांनी कधी केला नव्हता.

'राजन् तुम्ही हे काय म्हणता? गृहस्थाश्रमाचा विचार माझ्या कधी मनातही आला नाही.'

'भगवन् आपल्याला विचार करण्याचे काही कारणच नाही. या कन्यांचा स्वीकार करा. त्यांना त्या योगाने अखंड सौभाग्य प्राप्त होऊन त्यांचे जीवन सभर होईल. आणि माझेही जीवन कृतार्थ होईल.'

'तथास्तु' म्हणून सोभरींनी त्या कन्यांचा स्वीकार केला. व काया कल्पाच्या सिद्धीच्या योगाने पन्नास स्वरुपे धारण करून पन्नास गृहिणीच्या बरोबर गृहस्थाश्रम स्वीकारला.

सम्राट त्रसदस्यु निरोप घेऊन गेले. थोड्या वेळाने आचार्यही उठले. आश्रमवासियानाही आश्चर्य वाटले. ते आचार्यांना अडवू लागले तेव्हा योगिराज आचार्य विनम्र भावाने म्हणाले,

'आश्रमाची भूमि विद्या व योगसाधनेसाठी आहे. या शांत एकांताचा भंग करणे योग्य नाही. गृहस्थाश्रमाच्या साधनेसाठी मी दुसरी भूमि शोधून काढीन.'

याप्रमाणे निर्णय घेऊन आचार्य आपल्या पन्नास गृहिणींच्याबरोबर तेथून निघाले' यमुनेच्या तीरावर जाऊन त्यानी देवराज इंद्राचे स्मरण केले. त्यांची स्तुतिवचने ऐकून इंद्र लगेच त्यांच्याकड गेला.

'ऋषिवर माझे स्मरण का केले बरे?' त्याने ऋषींना विचारले.

'देवराज या अरण्यात एक नगरी वसवण्याची इच्छा आहे. त्यासाठी मला आपले साह्य हवे आहे. आपल्या कृपेने सारे इच्छित मला मिळेल.'

इंद्राने स्मित करून कुतूहलाने विचारले,

'सिद्ध ऋषिवर, आपण तर आत्मनिर्भर, आत्मकाम आहांत!'

'खरे आहे मी स्वतः आत्मसभर असलो तरी माझ्या संगतीत जीवन घालवण्यासाठी आलेल्या राजकन्यांनाही सभर करण्यासाठी मला आपल्या कृपेची याचना करावयाची आहे.'

सिद्ध सोभरिंची निखालस सरळ भावना पाहून इंद्र प्रसन्न झाला. आणि म्हणाला, 'ऋषिराज मी प्रसन्न आहे. वर मागून घ्या.'

सोभरिंनी राजकन्यांच्याकडे प्रेमभराने दृष्टी वळवली. देवराजाच्या दर्शनाने त्या सर्व आनंदित झाल्या होत्या. मोठमोठ्या सोमयागांत थोडा वेळ येऊन लगेच अलोप होणारा देवामध्ये श्रेष्ठ इंद्र या ठिकाणी स्मृति, स्तुति करताच प्रगट होतो, प्रसन्न होऊन वरदान देतो हे पाहून त्या चकित झाल्या होत्या. भक्तिभावाने ऋषि व देवराजाचे दर्शन घेत होत्या. जीवनांत सोभरिंच्या सारखा पति लाभल्याने त्यांची मने शांत व प्रसन्न होती. त्यांच्या मुख मुद्रेवरचे ते भाव पाहून ऋषीही प्रसन्न झाले व देवराजाकडे वळून नम्रतापूर्वक म्हणाले,

'भगवन्, या पन्नास राजकन्या माझ्या गृहस्थाश्रमात सभर, भरपूर असोत आमचे गृहस्थ जीवन उज्वल, प्रतापी असो. जीवनात नित्य नवा उल्हास आणि उत्सव असो. नित्य यौवन, चिरजीवन आणि अखंड सुख आरोग्य आम्हाला लाभो हाच वर आम्हा सर्वांना द्यावा.'

'तथास्तु ऋषिवर. आणखी काही?' देवराजाला याहूनही विशेष देण्याची इच्छा होती.

'भगवन्, कुबेराचे भांडार, शंखनिधी व पद्मनिधी आमच्या घरी वास करोत. अमरावतीच्या नंदनवनासारखी आमची नगरी सुंदर व समृद्ध होवो.'

'तशीच होईल ऋषिवर! आणखी काही?'

'भगवन् इतर सर्व रथांचे वेग आटोक्यात रहातात. मनोरथाची गति मात्र कधी रोखता येत नाही. या राजकन्यांचे मनोरथ गतिमान असोत. पण परस्पर

द्वेष, ईर्षा निर्माण होताच आपण त्यांच्या गतिचे नियंत्रण करावे. कृपानाथ, एकाच मनात अनेक वृत्ति जागतात. पण परस्पर भाव असला की त्या एक होऊन जातात. त्याचप्रमाणे या पन्नास स्त्रीया एकरुप होऊन जावोत. त्यांचे मनोरथ एकाच दिशेने चालोत. त्यांच्या वाणीत व वर्तनात सहकार्याची भावना असो

देवांचा वास्तुशास्त्री विश्वकर्मा स्वत: यमुनेच्या तीरी सौभर नगरीची रचना करण्यासाठी आला. पन्नास विशाल प्रासाद, उपवने, पुष्पवाटिका जलघाट, दुर्ग, वेशी सारी रचना परिपूर्ण केली.

सिद्धजन सोभरि सुभट सम्राट होऊन त्या नगरीत निवास करू लागले. एक महारथी जसा पन्नास घोडयांची सूत्रे सभाळतो, तसा एका आत्म्याच्या बळावर सम्राट पन्नास मनोवृत्तींवर नियंत्रण ठेवीत होते. पन्नास स्त्रीयांना ते आत्मकल्याणाच्या मार्गाने पुढे नेत होते व त्या पन्नासही स्त्रीया मनोभावाने, एकमनाने सोभरिंची सेवा करीत होत्या. याप्रमाणे त्यांचे गृहस्थ जीवन सभर भरपूर होते. अनेक नद्यांचे प्रवाह सागरात विलीन होतात, त्याप्रमाणे संसारातील विविध वृत्ति आणि प्रवृत्ति स्वीकारुन देखील आचार्य नेहमी प्रमाणे प्रसन्न गंभीर, आत्मनिर्भर राहून संसार करीत होते.

संसारीजन रात्रभर झोपून दिवसभर काम करतात. काळ जात असतो ते त्यांना कळत नाही. लहानपण खेळता खेळता संपून जाते. यौवन मदमस्तीत सरून जाते. म्हातारपणी काळजी लागते. आणि सारे जीवन फुकट जाते.

सोभरि ज्ञानी होते. योगी होते. सिद्धजन होते. त्यांच्या संगतीत राहून त्या स्त्रीयाही ज्ञानी झाल्या. योगिनी झाल्या. धन साधनांचा आश्रय घेतला तरी आत्मनिर्भर रहाण्याची त्यांची मनोवृत्तिही होती. परंतु काळाच्या ओघाची गति त्यांना कळत नव्हती. म्हणून योगी जसे सावध होते तशा त्या सावधान नव्हत्या. त्यांना सरत्या काळाची गति जाणवावी म्हणून परमार्थ साधने मिळवण्याचा एक वेगळाच मार्ग ऋषींनी घेतला. त्या स्त्रीयांनीही तो स्वीकारला.

सौभर नगरीपासून थोडया अंतरावर कुरुक्षेत्रात एक यज्ञशाला रचली. ऋषिनी सोमयागाची दिक्षा घेतली. व्रताच्या कंकण सूत्राने आपल्या पन्नास पत्नींना एक भावाने बांधून घेतले. मनाच्या सर्व वृत्ति समाधीत एकाकार व्हाव्या तशा त्या सर्वजणी एक होऊन गेल्या.

ऋषींच्या सेवेसाठी प्रजाजन आलेलेच होते. त्यांचे दर्शन करण्यासाठी देशोदेशीचे राजे महाराजे, ऋषि, मुनी, यक्ष, गंधर्व, व देवही येत. रोज नवे नवे उत्सव साजरे होत.

यज्ञशाळेत धन साधनांची थोडीशी देखील उणीव नव्हती. धान्याच्या गाड्याच्या गाड्या रोज भरून येत. कामदुधा गाईच्या कृपेने दुधा तुपाची रेलचेल होती. माना वा नका मानू पण माणसाला नुसती संपत्तीची सधनता नकोशी होते. जीवन निर्विघ्न, सरळ, पाण्याच्या प्रवाहासारखे वहात राहिले तर त्यांत आनंद कसला? अशा जीवनाचे मूल्य काय? एखादे तरी विघ्न, विटंबना, क्लेश उत्पन्न झाले, शोक, संताप, भांडण असे काही होऊ लागले की त्या संघर्षातून चैतन्य निर्माण होते. प्रेरणा मिळते. कर्तृत्व शक्ति जागी होते.

प्रत्येक संकल्प सिद्ध करणाऱ्या आचार्य सोभरिच्या महायज्ञात एक विघ्न आले. राजभवनाची व्यवस्था पहाणाऱ्या सेवक सेविकांना त्या आपत्तिची जाणीव सर्वांच्या आधी झाली.

यज्ञ चालू असता रात्री हविष्यान्न, तूप, दही, समिध वगैरे सामग्री तयार केली जाई. पाकशाळेत सर्व तयार करून ठेवावे. सकाळी उठून पहावे तो सारी भांडी रिकामी. धन साधने भरपूर होती. सेवकही कष्टाळू होते. सकाळच्या सकाळी नवी सामग्री करून यज्ञशाळेत पोचवून दिली. तीन दिवस याप्रमाणे झाले. कोठारही रिकामे होऊ लागले. तेव्हा सेवकांनी मंत्र्याच्या कानावर ही गोष्ट घातली. मंत्र्याने गुप्तचरांच्या करवी शोध करण्याचा प्रयत्न करून पाहिला. मोठेच आश्चर्य होते. रात्र पडली की मोठे मोठे काळे उंदीर मोठ्या संख्येने कोठूनसे येत व सारी सामग्री खाऊन फस्त करीत व दिसेनासे होत. अधिक शोध केल्यावर कळून आले, त्या उंदरांच्या दोन टोळ्या होत्या. एका टोळीत काळे उंदीर होते तर दुसऱ्या टोळीत शुभ्र. त्यांचा सरदार चित्र नांवाचा मूषकराज होता. त्यांच्या अंगावर रंग बेरंगी चट्टेपट्टे होते.

मूषकराज चित्राला कोणाची भिती नव्हती. त्याला कोणी अडवू शकत नव्हते. कोठल्याच शस्त्रास्त्राची त्याच्या पुढे मात्रा चालत नव्हती. आग देखील त्याच्या पुढे विझून जाई.

मंत्री निरुपाय झाले. दूर दूरची भांडारे देखील रिती झाली. काहीच उपाय सुचेना तेव्हा अखेरीस त्यांनी सोभरिच्या कानावर हा प्रकार घातला. ते ऐकून त्यांनी स्मितपूर्वक त्या सर्वांना निश्चित रहाण्यास सांगितले.

संध्याकाळी यज्ञाची कर्मे झाली. विशाल यज्ञसभेत सोभरि आपल्या पन्नास सहधर्मिणींच्यासह गेले. सभेत राजे महाराजे, ऋषि मुनी, प्रजाजन सर्वच उपस्थित होते.

सिद्ध पुरुष सोभरिंनी मूषकराज चित्राची स्तुति करून त्याचे आवाहन केले.

आणि आश्चर्य असे की चित्र सभेत आलाही. सोभरिनी त्याचे स्वागत करून त्याला एका मोठ्या आसनावर मानाने बसवले. तेव्हा तो मूषकराज हसून म्हणाला, 'हे ऋषिवर, तुम्ही सिद्ध योगी पुरुष आणि मी पशुयोनीतला एक य:कश्चित जीव. तुम्ही माझी स्तुति करू नका.'

त्यावर ऋषि स्मित करून म्हणाले,

'मूषकराज चित्र, पशुयोनीत असला तरी आपण महाकालाचे दूत आहात ते मी जाणतो. आपण रोज येता आणि जाता. सामान्य लोकांना ते कळतही नाही. कृपा करून आपण या ठिकाणी आला आहात तर आम्हाला आपले खरे रूपही दाखवावे आणि बोधप्रद चार शब्दही सांगावे.'

त्यावर मूषकराजाने मधूर वाणीने उत्तर दिले,

'ऋषिवर, तुम्ही त्रिकालज्ञानी आहात. परंतु या स्त्रीया तुमच्या संगतीत संसारसुख मिळवीत आहेत, हे प्रजाजन तुमच्या संगामुळे सुखी आहेत. त्याना काळ कसा पाण्याचा ओघळ वाहून जावा तसा पहाता पहाता सरतो आहे ते कळलेले नाही. कालपुरुषाच्या प्रेरणेनेच माझ्या मंडळीसह मी तुमच्या महायागाच्या प्रसंगी येऊन पोचलो. माझ्या मंडळीतले पांढरे उंदीर आहेत ते दिवस व काळे आहेत त्या रात्री आहेत. एकदा गेलेल्या रात्री अथवा दिवस फिरून येत नाहीत. धन, साधन-संपत्ती सारे परत मिळवता येते, पण गेलेला समय परत मिळत नाही. तुमच्या संगतीत रहाणाऱ्या या सर्वांना धन-साधने विपुल मिळालेली आहेत. सुखात कोठली कमतरता नाही. परंतु काळाचे त्याना भान नाही. समय पारखणारी माणसेच जीवन कृतार्थ करू शकतात माझा धर्म मी पाळला आहे. आता माझ्या-जोगे काम असल्यास आज्ञा करावी व यज्ञाची सफल पूर्णाहुती करावी.'

मूषकराजाने ऋषींना वंदन करून त्यांचा निरोप घेतला.

मूषकरुपाने आलेल्या कालदूताचा उपदेश ऐकून सर्व स्त्री-पुरुष मंत्रमुग्ध होऊन गेले. सोभरिच्या पन्नास राण्या सावध झाल्या.

सिद्ध पुरुषाच्या संगतीत जीवन गेले तरी त्यांना उमगले नव्हते पण आता त्यांना काळाचे रहस्य कळले. त्यांनी ऋषिची क्षमा मागितली व सेवाकार्य करून शेष जीवन सफल केले.

सर्वांना संतोष होईल अशा रितीने सोभरिनी यज्ञाची पूर्णाहुति केली. व आपल्या सहधर्मिणींच्या सह ते आपल्या नगरीस परतले. त्यांच्या सहधर्मिणी पण आता आत्मनिर्भर होऊन कल्याण मार्गावर चालू लागल्या.

## सूक्तांचा बोधपाठ

पाण्याचा प्रवाह ज्याप्रमाणे वरुन खालच्या पातळीवर वहात रहातो त्या प्रमाणे मनाच्या वृत्ति संसार मार्गाकडे ओढ घेतात. त्यांना अडवून, त्यांचा आवेग शांत करून, संयमित करुन त्यांना सन्मार्गाकडे वळवणे हा योग मार्ग आहे. ऋषिमुनींनी या योग मार्गाने प्रजाहित करून लोकांचे कल्याण साधले. व लोकांना हा सन्मार्ग दाखवला त्या ऋषिंनी केलेला बोध या सूक्तांत आहे.

वर दिलेल्या सात दृष्टांतात सामान्य मनोविकारांचे शमन करण्यासाठी योजलेल्या उपायांच्या कथा आहेत. ऋषि हे मानसरोवरांतील हंसासारखे आहेत हंस अत्यंत शुद्ध निर्मल पाण्यांत रहातात. व मोत्यांचा चारा खातात अशी मान्यता आहे. ऋषि शुद्ध चरित् असून मनात विकारांची छाया देखील पडू न देता संयमाने मन निर्मल ठेवण्याचा सतत प्रयत्न ते करीत असतात. आपल्याला ते आदर्श ठेवण्यासारखे आहेत.

१) कण्वमुनींच्या मनात क्रोध जागतो न जागतो तोच ते त्याला जिंकतात. प्रगाथाची नम्रता त्यांना साह्यभूत होते.

२) आसंग काम वश होताच त्याचे रूप पालटते. पण त्याची शश्वती त्याच्या मनात सेवाभाव जागवते व त्याला साह्य करते.

३) पर्वत लोभाला बळी पडतो. पण नारदांच्या साह्याने त्यागाची भावना जागी होते.

४) त्रिशोक मोहवश होताच नाभाक त्याला त्यागाचा मार्ग दाखवतो.

५) मत्स्यराजाचा मद माता अदिती उतरवते.

६) कृशाश्वाच्या मत्सराला अपाला तपाचरणाचे वळण लावते.

७) सोभरिच्या राण्यांना संगदोषापासून वाचवण्यासाठी मूषकराज काल-गती समजावून सांगतात.

या कथानकातील ऋषिंना विविध सूक्तांचे दर्शन झालेले आहे. त्या सूक्तांत त्यांनी आपल्या जीवनानुभवाचे सार काढून बोध वचने सांगितलेली आहेत. त्यांच्या दर्शनाने आपल्याला आपआपल्या मनोवृत्तींचें स्वरुप कळून येते व विकारांच्या शमनाचे उपायही मिळतात.

## १) क्रोधाचा आवेग नम्रतेने आवरून घ्या

प्रगाथ ऋषि घोर ऋषिंचे पुत्र. थोरला भाऊ कण्व व पिता घोर यांना ते गुरुस्थानी मानत. त्यांनी नम्रतापूर्वक वडीलभावाचा क्रोध शांत केला होता.

गोड शब्द सर्वांना वश करतात व जे नम्र असतात त्यांनाच मधुर भाषण करता येते. ही भावना त्यांच्या सोमस्तुतीतून व्यक्त होते.

'मी प्रगाथ. मी नेहमी मधुर अन्न सेवन करतो. त्यामुळे मी अभ्यासू व बुद्धिवान झालो आहे. 'हा प्रगाथ नम्र असून मधुर भाषी आहे' म्हणून लोक मला विशेष भावपूर्वक पुजतात. स्वर्गातील देव व मृत्युलोकीचे मानव प्रेमाने माझ्याकडे येतात व माझा हवि स्वीकारतात व म्हणतात, 'हा स्वत: मधुभाषि आहे. याचा हविही गोड आहे.'

सोम स्तुति करताना ऋषि म्हणतात,

'हे अमृतमय सोम, सोमरसाचे पान करून आम्हीही अमर झालो. ज्योति प्रकाशाचे दर्शन करून आम्ही अमर देवतांची प्राप्ती करून घेतली. कामक्रोधा सारख्या शत्रूंचे आता आमच्यापुढे काय चालणार आहे? मी एक मर्त्य मानव-पण धूर्त मनोवृत्तींच्या आवेगाने माझे मन चळणार नाही हे निश्चित.

कण्व प्रगाथाच्या पराक्रमाचे वर्णन करताना ऋत्विज म्हणतात,

'हे प्रगाथमुनी एकटे आणि असहाय्य दिसले तरी त्यांच्यासारखी नम्रता व धीर गंभीरता इतरत्र आढळणार नाही. ते सर्व प्रजाजनांहून श्रेष्ठ आहेत. देवराज इंद्र त्यांच्यावर कृपा करो.

## २) कामाला सेवेने जिंकून घ्या

कामवश झालेल्या राजा आसंगाला राणी शश्वतीने सेवेच्या बळावर सुधारले. राणीने मेधातिथि व मेध्यातिथींच्या आज्ञेप्रमाणे तप केले व आसंगाला नवजीवन मिळवून दिले. राजा आसंगाने प्रसन्न होऊन उभयता ऋषींना मोठे दान देऊन म्हटले,

'हे ऋषिवरांनो, तुम्ही देवराजाची वारंवार स्तुति करा. इंद्र राजाला प्रसन्न करून घेण्यासाठी मी अपरंपार दान देईन.'

ऋषिवर राजाच्या दानाचा महिमा गाताना म्हणतात,

'प्रयोग राजाचा पुत्र, प्लायोगि आसंग हजारो गायींचे दान देत आहे. देवांच्या शापाने नपुंसकत्व प्राप्त झालेल्या या राजाच्या राणीने परम तप करून राजाला नवे पौरुष प्राप्त करून दिले. ते पाहून आनंदित झालेली राणी म्हणू लागली–

'माझ्या प्रिय पतीच्या पौरुषाची नवचिन्हे पाहून मला फार आनंद होत आहे. हे स्वामिनाथ! आपले मूळ स्वरुप आपल्याला लाभलेले पाहून मला अमृताचे भोजन लाभल्यासारखा आनंद होत आहे.

## ३) लोभाला त्यागाने जिंका

कण्वाचे दोन पुत्र, नारद व पर्वत हे बाराव्या व तेराव्या सूक्ताचे ऋषि आहेत. पर्वत आपल्या मनोभावना नदीच्या प्रवाहाप्रमाणे मुक्त ठेवणारा असून नारद मनाला संयमानें बांध घालणारा आहे. मनाला जिंकणारा आहे. पर्वताविषयी त्याच्या मनात आदर आहे. मनात लोभाचा किंचितसा प्रवेश होताच प्रांजलपणे तो अपराध स्वीकारतो व दंडही भोगतो. लोभ दूरच होताच त्याला ऋषिपद प्राप्त होते. इन्द्राची स्तुति करताना पर्वत ऋषि म्हणतात,

इंद्र हा आमच्या देवांचा राजा आहे. तो आम्हाला दान देऊन सभर करणारा आहे. खरोखरीच दूर सुदूर असलेल्या परावत स्वर्ग प्रदेशांतून तो आमच्याकडे येतो व मित्रभावाने आमच्या मनाचे धागे गुंफतो. अग्नि ज्याप्रमाणे वने जाळून टाकतो त्याप्रमाणे इंद्र आपल्या प्रभावाने आमचे दोष समूळ नाहीसे करतो.

कवि नारद इंद्राचा महिमा वर्णन करताना म्हणतात,

'हे सर्व शक्तिमान, नृपदन इंद्र ! तुम्ही दूरच्या परावत् प्रदेशात असा वा आसपासच्या अर्वावत प्रदेशांत असा, समुद्राच्या तळाशी असा वा अंतरिक्षात असा, जेव्हा जेव्हा आम्ही मनोभावाने तुमचे स्मरण करतो तेव्हा तुम्ही त्वरेने आमच्याकडे येऊन पोचता.

हे देवराज मैत्रीचें धागे जर जुळले असतील तर आमच्या हविष्याच्या स्वीकार करून आमचा उत्साह वाढेल असे करा.

## ४) मोहाला प्रेमाने जिंका

सर्वानुक्रमणि व शाट्यायनकाच्या मताप्रमाणे नार्षद नांवाचा एक कण्वमुनि बकाच्या कन्येशी लग्न करतो. त्रिशोक व नाभाक हे कण्व नार्षदाचे पुत्र. नाभाक हा ३९-४२ सूक्तांचा ऋषि असून ४५ व्या सूक्ताचा ऋषि त्रिशोक आहे. नाभाक अग्नि, इंद्र व अग्नि, अग्नि व इंद्र यांची स्तुति करतात. त्या स्तुतित वारंवार एक पादचरण येतो.

'नभन्ताम् अन्यके समे' याचा भाव एकच आहे. आमचे मित्र, स्नेही त्यांचा निभाव आमच्या सह होवो एवढेच नाही पण इतरेजनाचाही निर्वाह होवो व आमच्या समभाव निर्माण होवो.

वरुणाची स्तुति करताना ऋषि नाभाक म्हणतात,

'मी सुविख्यात वरुणाची स्तुति मनःपूर्वक करीत आहे. पितृदेवतांच्या अनुमोदनासह मी स्तुति करीत आहे. सरळ वहात जाणाऱ्या या नदीच्या उगमापाशी सात स्वरांची जी वाणी गुंजन करीत आहे त्यात मध्यवर्ति धृपद 'नभन्ताम्

अन्यके समे' उमटत असून त्याच्या भोवती मधुर शब्दांचे कीर्तन अविरत चाललेले आहे.

ऋषि नाभाकांचा भाऊ त्रिशोक वाट चुकलेल्या वाटसरा सारखा भवाटवीत सापडला होता. मन:पूत वर्तनाने उद्वेग, शोक, संताप वाढवीत होता. शेवटी त्यालाही सन्मार्ग सापडला व तो मंत्रद्रष्टा ऋषि झाला. देवराज इंद्राची स्तुति करतांना तो म्हणतो.

'मी त्रिशोक, माझ्यावर कृपा वर्षाव करणाऱ्या इंद्राची मी स्तुति करतो. मी मार्ग चुकलो होतो. पाण्याचा प्रवाह अडवला जावा त्याप्रमाणे माझ्या मनाचे मार्ग बंद झाले होते परंतु इंद्र देवाने मोहाची ती आवरणे दूर करुन मला सन्मार्ग मोकळा करुन दिला.

हे शूर वीर, देवामध्ये श्रेष्ठ इंद्रराज, माझ्या कडून आपला एखादा वा अधिकही अपराध घडला तरी कृपा करून माझे दोष पोटात घालून मला क्षमा करावी.'

या ऋषींना स्वत:चे पापी जीवन आठवते. त्यांनी त्याची शिक्षाही भोगली आहे. मार्ग बदलला आहे. तथापि देवाजवळ ते जुन्या पापांची वारंवार क्षमा मागतात.

'हे मर्त्य मानवांनो, अपराधांची क्षमा मागितल्यावर कोणता देव मला दूर लोटील बरे? मी देवामध्ये श्रेष्ठ इंद्राला आपला सखा मानला आहे. मला एकदा मित्र म्हटल्यावर तो देवराज कधीच अंतर देणार नाही. अपराधांची क्षमा मागितली नाही तर मात्र इंद्र म्हणतो की पापी लोक माझ्या भीतीने पळाले तरी माझा दंड त्यांना भोगावाच लागतो. तो त्यांना चुकवता येत नाही.

हे दोन्ही ऋषी एकाच पित्याचे पुत्र. परंतु दोघे परस्पर विरोधी मार्गाने जगत होते. भावाला सन्मार्गी लावल्यावर त्रिशोक स्नेहभावनेने भारावून गेला आहे. विश्वमानवाची भावना त्याच्या मनांत फुलते आहे.

'हे इंद्रराज, भक्तांच्यावर कृपा करून तुम्ही अपरंपार दान देतां हे या जगांतल्या प्रत्येकाला माहीत आहे, तुम्ही दिलेल्या मानाची आणि धनाची स्पृहा प्रत्येकालाच असते. कारण त्याच्या योगाने इहलौकिक तसेंच पारलौकिक हितही साधले जाते.'

## ५) मदाला दयेने वश करून घ्या

एक जीव दुसऱ्या जिवावर जगतो. मोठा मासा लहानाला गिळतो. या संसारात बळी तो कान पिळी अशी सर्वसामान्य मान्यता असते. कित्येक जण तर

हा निसर्गाचाच क्रम मानून स्वीकारतात. अशावेळी प्रश्न येतो तो दया व करुणेला जीवनात काही स्थान आहे की नाही ? दीन, दुःखी पतिताना कोठला आसराच नाही का ? आणि एका दुर्बलाला मारणाऱ्या बलवानाला त्याच्या सवाई शक्तिवान भेटायचाच. हेही खरेच ना ?

अदिति प्रकृति माता ही दयेची देवता आहे. ती दीनांचा उद्धार करते आणि मदाने उन्मत्त झालेल्यांना वश करून पापापासून परावृत्त करण्याचे मार्गही तिच्या जवळ असतात. अदिती मातेचे पुत्र आदित्य देवही परमार्थ सेवा करून दीनांचा उद्धार करतात.

हे रहस्य ६७ व्या सूक्तात व्यक्त केले आहे. महामीन संमदाचा पुत्र पाण्याच्या भोवऱ्यात फसलेला मत्स्यगण हा या सूक्ताचा ऋषि आहे. आदित्यांची स्तुति करून मत्स्य स्वतःचे रक्षण करण्यासाठी त्याना विनवून म्हणतात,

'हे आदित्य देवांनो पापी लोकांना त्यांच्या पापांची फळे भोगावी लागतात, निर्दोष व निष्पाप असतात त्यांच्यासाठी कल्याणाचा मार्ग मोकळा असतो. आम्ही निरपराधीं जीव. आम्हाला कल्याणरुपी रमणीय रत्ने आपल्या कृपेने लाभोत. आमची ही अभिलाषा आपण पुरवावी.'

'यावेळी आम्ही जाळ्यात सापडलो आहोत. आमच्या जीवनाला आडवणारा हा मोठाच अडथळा निर्माण झाला आहे. अद्याप कितीतरी सत्कर्मे करावयाची बाकी आहेत. तरी या जाळ्यातून आमची सुटका करा. आमचा मार्ग अडवणारी ही बंधने दूर करा.'

मत्स्यगणाने आदित्यांचे स्मरण केले आहे. तर मत्स्य राजाने आदित्य देवांची माता अदितीचे स्मरण करून तिची स्तुति केलेली आहे. ते म्हणतात, 'हे देवमाते, आपण थोर आहात. मी मत्स्यराज, या जलचरांचा प्रतिनिधी आपल्याला शरण आलो आहे. प्राणीमात्रांना सुखी करणाऱ्या देवमाते, आमची अभिलाषा पूर्ण करावी.'

'हे आदित्य देवानो, आम्ही फसून बंधनात पडावे आणि आपण आम्हाला सोडवावे त्या ऐवजी त्या बंधनात आम्ही सापडूच नये अशी सद्बुद्धी आपण आम्हाला द्यावी. सन्मार्गाने जीवनाची प्रगती साधण्यास आम्हाला साह्य करावे.

'हे आदित्य देवांनो, संसाराच्या मद प्रमादात सापडून आम्ही शिथिल होऊन गेलो आहोत. प्रगती विषयींचा उत्साहच मनात उरलेला नाही. आपण देव सतत उत्साही व वेगवान असता. तो उत्साहाचा वेग आमच्या जीवनात उतरो. म्हणजे आम्ही कोणत्या बंधनात फसून पडणार नाही.'

## ६) मत्सराला तपाने जिंका

अत्रि ऋषींची कन्या अपाला ही ब्रह्मवादिनी आहे. परंतु कोठल्या तरी प्रारब्धाच्या योगाने तिच्या अंगावर कोड उठले. तिचा पती कृशाश्व त्यामुळे तिचा त्याग करतो. आपल्या पित्याच्या घरी राहून कठोर तप करून तिने देवराज इंद्राला प्रसन्न करून घेतले. तिचे कोडही नाहीसे झाले. तिच्या उग्र तपामुळे कृशाश्व पण प्रसन्न झाला व त्याने तिचा स्वीकार केला. ९१ व्या सूक्तात अपाला व इंद्र यांचा संवाद अद्भूत आहे. सूक्ताच्या सुरुवातील अपाला म्हणते,

'ही मुलगी तळयावर स्नानासाठी गेली तेथे तिला सोमलता मिळाली. ती घरी आणता आणता आनंद भराने ती उद्गारली, 'समर्थ शक्रराज इंद्राला प्रसन्न करण्यासाठी या क्षणीच मी सोमरस काढते.' असे म्हणून ती सोमवेल आपल्या दातानीच चावू लागली.'

आपल्यासाठी सोमरस काढलेला आहे असे मानून इंद्र त्या ठिकाणी गेला. पण सोमलता चावणाऱ्या अपालेला पाहून तो परत फिरला. ते पाहून अपालेने त्याची स्तुतिपूर्वक प्रर्थना केली,

'हे समर्थ वीर पुरुष ! सोमरसासाठीं आपण यजमानाकडे जाता. तरी मी काढलेला हा सोमरस आपण कृपा करून स्वीकारावा. मी लाह्या, सातू, अपूप वगैरे सामुग्री आताच घेऊन येते. आपण भोजन करावे.'

'हे देवराज इंद्र ! आज आपण माझ्या अंगणात येऊन पाठ फिरवली हे पाहून मला आपण खरोखरीच इंद्रच का अशी शंका वाटू लागली आहे. हे सोम बिंदूनो तुम्ही इंद्रासाठी ठिबकत रहा.'

अपालेची ती भावपूर्ण वाणी ऐकून इंद्र जागच्या जागीच थांबला. व त्याने तिच्या सोमरसाचा स्वीकार केला. तेव्हा आनंद भराने इंद्राची स्तुति करून ती म्हणते,

'हे देवराज उजाड होऊन गेलेली तीन स्थाने आपल्या कृपेने पूर्ववत होवोत माझ्या पित्याच्या डोक्यावर पडलेले टक्कल दूर होऊन त्यावर केशभार झुलो. त्यांच्या ओसाड पडलेल्या जमिनीवर पिके उगवोत. आणि कोडामुळे विद्रूप झालेली माझी चामडी जाऊन त्या जागी नवी त्वचा येवो.'

अपालेची कामना पूर्ण करण्यासाठी देवराज इंन्द्राने आपल्या रथचक्राच्या छिद्रात तिची काया घालून त्रिवार बाहेर काढली. व तिची कांति कांचनाप्रमाणे झळाळू लागली.

## ७) संगाला परमार्थाने जिंका

काण्व सोभरि हा १९–२२ या चार सूक्तांचा द्रष्टा आहे. पुरुकुत्साचा पुत्र राजा त्रसदस्यु याने त्याला पन्नास कन्या अर्पण केल्याचा उल्लेख १९–३६ या मंत्रांत केला आहे. इंद्राने प्रसन्न होऊन वर दिल्याचे वर्णन २० व्या सूक्तात आहे. २१ व्या सूक्तात मूषकराज चित्राचा उल्लेख आहे. त्याबद्दल बृहद्देवता (६–६०) मध्ये म्हटले आहे,

'कण्व पुत्र सोभरि कुरूक्षेत्रांत यज्ञ करीत होते. उंदीर त्यांचे हविष्यान्न खाऊन टाकीत. सोभरींनी मूषकराज चित्राची स्तुति केली त्यामुळे प्रसन्न होऊन मूषक राजाने ऋषींना खूप दान दिले.'

ही कथा म्हणजे वस्तुत: एक रूपक आहे. सोभरि स्वत: आत्मज्ञानी व आत्मनिर्भर आहे. त्याच्या जवळ रहाणाऱ्या त्याच्या स्त्रीया व प्रजाजनांना बोध व्हावा म्हणून काळाचे प्रतिनिधी उंदीर वेळेचे महत्व समजावून देण्यासाठी आले अशी ही रूपक कथा आहे.

अग्निची स्तुती करताना महर्षि सोभरि स्वत:शीच म्हणतात,

'हे बुद्धिमान् ब्राह्मण सोभरि, तुझ्या अध्वर–यागासाठी अग्निचे स्तुतिपूर्वक आवाहन कर. अग्नि हा विभूतीचे दान करणारा असून चित्रविचित्र ज्वालांनी सुशोभित असा तो यज्ञाचा पुरातन नियामक आहे.

अग्निच्या विविध रुपांचा महिमा गाताना ते म्हणतात,

'वरुण, मित्र, अर्यमा, अश्विनीकुमार वगैरे देव ज्याच्या प्रकाशाने तेजस्वी होतात तो अग्निदेव देवराज इन्द्राप्रमाणे आमचे रक्षण करतो. आमच्या अध्व-मार्गांचाही तो रक्षणकर्ता देव आहे.'

'आम्ही 'आहुत' केलेला– निमंत्रित केलेला अग्नि कल्याणकारी होवो. हे सुभग अग्नि तुमचे रक्षण आमचे कल्याण करो' आमचा अध्वर याग कल्याणकारी होवो.'

'अग्निदेव, आमच्या मनांचे साधन करून तुम्हीच आमच्याकरवी आमच्या शत्रूंचा नाश करविता. तुमचे साधन झालेले मन आमचे परम कल्याण करणारे आहे.'

'हे वसु, अग्नि तुमची प्रशंसा करण्यासाठी खोटे बोलण्याची आवश्यकताच नाही. आमच्या हातून पाप न घडो. माझ्या बरोबरीने आपली स्तुति करणाऱ्या ऋत्विजांच्या तोंडून निंदेचे वचन न निघो. त्यांच्या मनांत पाप ना जागो. पिता पुत्राचे करतो त्याप्रमाणे तुम्ही आमचे रक्षण करा.

आदित्य देवांची स्तुति करताना ऋषि म्हणतात,

' हे आदित्य देवांनो तुम्ही दयाळू अदिति मातेचे पुत्र आहांत. म्हणून तर तुम्ही कधी कोणाचा द्रोह करीत नाही. सर्वांच्यावर दया करता. प्रेमाचा वर्षाव करता. या जगात यज्ञ जीवन जगणाऱ्या सर्वांचे जीवन तुम्ही सफल करता. तुमच्या साह्याने मानव चारी पुरुषार्थ करतो. परंतु मानवाचा पराजय करण्यासाठी त्याचे कितीतरी शत्रू त्याच्या मनांतच ठाण मांडून बसले आहेत. त्यांचे शमन करून सर्वांना सदाचाराचा मार्ग दाखवून सर्वांचे मनोरथ तुम्ही पूर्ण करा.

देवराज इंद्राचा महिमा गातांना ते म्हणतात,

' हे अश्वपति, हे गो पति, उर्वरा फलद्रूप भूमि–पति, हे सोम–पति– सोमरसाचे इंदु–बिंदु चमकत आहेत. तुमच्यासाठी हा सोमरस काढलेला आहे. तरी आपण आमच्या सोमयागासाठी येऊन त्याचा स्वीकार करावा.

' हे देवराज तुमची मित्रत्वाची भावना आणि भोग साधनांत सहकार्य करण्याची भावना आम्हाला माहिती आहे. आणि म्हणूनच सर्व साधनांसाठी आम्ही तुम्हांला विनवीत आहोत.'

' हे देवराज इंद्र, आपल्याला माहीतच आहे की धन साधनांनी संपन्न असूनही जो कोणाला दान देत नाही त्याच्या वाऱ्यासही कोणी उभे रहात नाही. यज्ञासारखी लोक कल्याणाची कामे न करता जे सुरापान करीत रहातात ते आळशी व नास्तिक जगात एकटे पडतात. त्यांना तुम्ही साह्य करीत नाही.'

मूषकराज चित्राची स्तुति करतांना ऋषि म्हणतात,

' पवित्र कुरुक्षेत्रांत देवराज इंद्रासाठी केलेल्या सोमयागास देवेन्द्र व भाग्यवती देवी सरस्वती आम्हांला साह्य करण्यासाठी उपस्थित झाली. त्याच बरोबर चित्रराजही दान देण्यासाठी येऊन पोचले आहेत.

' हजारो, लाखो, करोडोंचे दान देणारा हा चित्रराज खरोखरीच फार मोठा राजा आहे. बाकी सर्व राजे त्याच्या पुढे क्षुल्लक आहेत. मेघाने पाऊस पाडावा तसे अलोट दान चित्रराजा करतो.'

सोभरि ऋषिंनी मूषक राजाकडून 'समय–दान' प्राप्त करून घेतले आहे. खरोखरीच वाया जाणाऱ्या वेळाची जाणीव कोणाला नसते. आत्मज्ञानी ऋषींच्या स्त्रीया म्हणजे मनाच्या विविध वृत्ति त्यांना परमार्थाकडे वळवण्याचा ऋषिंचा अभिप्राय या सूक्तांत व्यक्त झाला आहे. ★★

# ८/ मनोरथाच्या मार्गावर

(ऋग्वेद : आठवे मंडल)

' माणसांचे मन हे जमिनीसारखे आहे. या विचारभूमीवर संकल्पाचे अंकूर उगवतात. संकल्पाप्रमाणे तो निर्मिती करीत रहातो. या मनोभूमीत तो मोठाले प्रासाद उभारतो, किल्ले बांधतो, बाग फुलवतो, एक आगळे विश्वच तो घडवतो.

त्या जगात नेहमीच्या रथासारखे रथ नसतात, राजमार्ग नसतात, की रथाला खेचणारे घोडेही नसतात. येथील रथ काहीं वेगळेच असतात. आगळ्याच मार्गावर ते धावत रहातात. त्यांना जोडलेले घोडेही वेगळ्याच प्रकारचे असतात.'

या मंडलात आपल्याला विश्वमना ऋषींचे दर्शन होते. ऋषींच्या पित्यानें इन्द्रियांच्या घोड्यांना वश करून घेतले होते. म्हणूव त्यांना वश+अश्व+व्यश्व = वैयश्व म्हणत व ऋषींना विश्वमना वैयश्व म्हणत. ते अग्नीचा महिमा गाताना आपल्या सहकाऱ्यांना म्हणतात.

' हे ऋत्विजांनो अग्नि हा अग्रणी आहे. तो प्रतिकूल झाला तर सामना करून शत्रूचा नाश करतो. त्या अग्नींची तुम्ही स्तुति करा. यज्ञासारखी परोपकारी सेवेंची कामे सुरू झाली की त्यांचा सुवास सुगंधित धूपा प्रमाणे दरवळू लागतो. त्याच्या तेजस्वी ज्वाला सगळीकडे पसरू लागतात. हाच जातवेदा अग्नि होय. त्याची परोपकारी कामे सर्वांना माहित आहेत. तुम्ही या अग्निदेवाचे यजन पूजन करा.'

ऋषि सावधान होऊन स्वतःच्या मनाला बोध करतात.

' हे विश्वमनस्, तू ज्ञानदृष्टीने व मनाच्या गतिने विश्वातील सर्व पदार्थ पाहिलेले आहेस. मन जड व चेतन पदार्थात सारख्याच गतिने विचरते म्हणून तर त्याला विश्वमना, विश्वचर्षण म्हटले आहे. अशा उदार मनाला कोणाचा मत्सर

वा स्पर्धा करण्याचें कारणच नाही. अग्नि हा मनाच्या रथांचे दान देणारा आहे. म्हणून मनोरथ रचण्यापूर्वी मधुर शब्दांनी अग्निची स्तुति कर.

खरोखरीच जो यजमान जीवन यज्ञाच्या सुरूवातीस परमार्थ मार्गाच्या साह्यासाठी अग्निचे आवाहन करून उत्तम रीतीने यजन–हवन करतो, त्याला बलि अर्पण करून भेट पूजा करतो, त्या उदारचरित माणसाला कोणी शत्रू उरत नाही वा त्याचा कोणी पराजयही करू शकत नाही.

हे अग्निराज, माझा पिता व्यश्व याने आपले सर्व धन साधन परमार्थासाठी घेऊन टाकले आहे. प्राप्त होणारी सर्व साधन संपत्ती लोकहितासाठी वापरावी अशी कामना मनांत ठेवून पितात तुमची पूजा करतात. आम्ही सर्वजणही तशाच च्छेने आपल्याला भेट-पूजा अर्पण करीत आहो.

हे अग्निदेव, आपल्याला माहितच आहे, मनुमहाराजांना यज्ञ करण्याची इच्छा झाली त्यावेळी कविपुत्र उशना ऋषि त्यांच्याकडे गेले व सर्व देवांचा होता म्हणून त्यांनी आपले नाव पुढे केले व विश्वदेवांनी देवाचे दूत म्हणून तुमची पुरोहितपदी स्थापना केली. शुद्ध बुद्धीने यज्ञकार्य करणारे यजमान आपल्या कार्याचे रक्षण व्हावे म्हणून तुमचीच पूजा करतात. ते तुम्हाला चांगल्या प्रकारे जाणतात. आपण विचारशील यजमानांचे अतिथी असून औषधी वनस्पतींचे प्रेरक पुत्र आहात. आपण प्राचीन, पुरातन आहात.

हे अग्निदेव देवांमध्ये तुम्ही साक्षात् यज्ञाची प्रतिष्ठा आहांत. ऋताचे पालन करणारे व शुद्ध बलाचे सेवन करणारे मित्र व वरुण हे देव सम्राटासारखे आहेत. त्यांच्यासह तुम्ही आमच्या यज्ञासाठी यावे.

विश्वमना ऋषि इन्द्राची स्तुती करून म्हणतात,

'हे वज्रधारी, गोपाळ ज्याप्रमाणे गाईंच्या मागून व्रज भूमीत जातात त्याप्रमाणे आम्ही ऋषि वचनांच्या मागून आपल्यां चरणांशी येऊन पोचलो आहोत. आमची मनोकामना पूर्ण करून आम्हाला संतुष्ट करा. हे वृत्रहन्ता, उग्रनेता, मी ऋषि विश्वमना, तुम्हाला निमंत्रण देतो, माझी विश्वव्यापी स्तोत्रे व कल्याणकारी कार्ये पाहून मनाच्या वेगाने तुम्ही आमच्या यज्ञासाठी या.'

ऋषि स्वतःलाच संबोधून म्हणतात,

'हे विश्वमना, ज्याच्या विशाल मनांत कोठलाच तरंग वा उर्मि नाही. तथापी ज्याचा उत्साह आणि वेग मात्र अतुल आहे, अशा संयमी इन्द्राची तू स्तुति कर. पिता व्यश्वानेही देवराजाची स्तुति केलेली आहे. तो इंद्र या पृथ्वीवर तुला विशाल निवास निर्माण करून देईल.

हे वैयश्व, मानवी शरीरातील नवप्राणांना चैतन्य देणारा इन्द्र हा दहावा प्राणच आहे. तो अंतर्यामी आहे. त्याची तू स्तुति कर.'

विवस्वान सूर्याचा पुत्र मनु मंत्रद्रष्टा ऋषि आहे. ऐकेका देवाची स्तुति करून त्याला जागे करून समान भावनेने त्या सर्वांचे साह्य मागत आहे.

' दिव्य मनोभावाने स्तुति करणारे आम्ही मनु सर्व दिव्य-भावना धारण करणाऱ्या देवांचे आवाहन करीत आहो. दिव्य गुणांच्या त्या देवांची आम्ही प्रार्थना करतो आमचे मनोवांछित पूर्ण करून ते आम्हाला धनधान्यादि संपत्ति देवोत.

हे देवांनो, मी, वैवस्वत मनु तुमची प्रार्थना करीत आहे. तुम्ही सर्व मनोयोगाने उत्साहपूर्वक धाव घ्यावी व आम्हां सर्वांना साह्य करावे.

हे मनूंनो दिव्य गुणांनी युक्त असे हे देव कल्पवृक्षासारखे आहेत आपल्या सर्व कामना ते पूर्ण करतील. त्यांच्या इच्छेच्या आड कोणीच येऊ शकत नाही. कोणा कद्रूने प्रार्थना केली तर त्याची इच्छा देखील देव पूर्ण करतात.

हे देवांनो सोमयाग करणारा यजमान व त्याची पत्नी दोघेही उत्साहाने सोमरस काढीत आहेत. व दूध दही वगैरेचे मिश्रण सोमरसात घालीत आहेत.

हे दोघेहे कधी असत्य भाषण करीत नाहीत. अर्थात इंद्रादि देवांना बोलावून सोमपान करविणार नाहीत असे होणे शक्यच नाही. ते वारंवार यजन पूजन करीत असतात.

या दंपतीचे पुत्र पौत्र, प्रजाजनांसहित आमचे यजन करतात. हे दोघे दीर्घायुषी असून धनधान्याने संपन्न आहेत. एकमताने दांपत्य जीवन व गृह संसार करून तुमची सेवा करण्याची वृत्ती व सामर्थ्य त्यांना द्यावे.'

या सूक्तांतील दंपती म्हणजे महाराज मनु व त्यांची पत्नी शतरूपा. मानव जातीचे हे माता पिता होत. त्यांच्या प्रार्थनेत गृहस्थधर्माचा आदर्शही दिसून येतो.

ऋषि मनु यजमानाला उत्साही वचनांनी प्रेरणा देतात.

' हे यजमान, तुम्ही देवांचे मन प्रसन्न व्हावे म्हणून यज्ञ करीत आहात. यज्ञाच्या योगाने तुम्ही अविनाशी व्हाल देवांना प्रसन्न करण्यासाठी तुम्ही सोमरस काढीत आहात. खरोखरीच देवांना संतुष्ट करण्यासाठी तुम्ही भेट-पूजा करीत आहांत तुमची सर्व प्रकारे वृद्धी होईल कारण यज्ञ न करणाऱ्या नास्तिकांच्याहून देवांना प्रसन्न करणारा यजमान निश्चितच श्रेष्ठ आहे.'

आठव्या मंडळाच्या ऋषींचे नांव कण्व आहे. कण्व कवि आहेत. मनीषी आहेत. त्यांनी मनाचा उत्साह व मनोरथाची गति वाढावी म्हणून प्रार्थना केली

आहे. देवांची स्तुति केली आहे. त्याचप्रमाणे तप व संयमाने आपले मनोबल वाढवले आहे. त्या ऋषींच्या विविध मनोरथांचे दर्शन त्यांच्या सूक्तातून घडते.

कण्वांच्या पैकी एक मेधातिथि कण्व इतर कण्वांना प्रेरणा व्हावी म्हणून म्हणत आहेत : हे कण्वांनो, हे कविजनांनो, दिवसभर सोमरस काढण्याचे पवित्र काम आपण केले. पण आता ही सोमवेल नीरस होऊन गेली आहे. आता त्यातून रस कसचा निघतो ? आणि असा हा नीरस चोथा पाहून देवराजाला तरी येथे यावेसे कसे वाटेल ? तरी आता तुम्ही आपल्या मधुर वाणीने हा चोथा रसरशीत होईल अशी गाथा गा. म्हणजे इंद्राची पावले इकडे वळतील.

खरोखरीच नीरस, निसत्व होऊन गेलेल्या जीवनात जगण्यासारखे काहीं उरलेले नसते, त्यावेळी कविजनांच्या गोड वाणीने त्यात नवा रस निर्माण होतो आणि जीवन आनंदमय होते.'

पण 'आता हा चोथा पिळून काय करायचे ? आणि इन्द्राची प्रशस्ति करून त्याला सोमरस पाजून तरी काय करणार ?' अशी शंका एका कण्वाच्या मनात आली, त्यावर मेधातिथि कण्व म्हणतात–

'कण्व कविजनांनो तुम्ही लक्षात ठेवा सोमरस पाजणारेच स्वतःही सोमपान करतात. इतरांच्या शुष्क जीवनात नवीन रस ओतण्याचे परोपकारी काम करण, त्याची सर्व प्रकारची ऋणे फिटून जातात. त्याना स्वतःच्या लाभासाठी स्वार्थ बुद्धीने कांही करण्याची आवश्यकताच रहात नाही आणि दुसरी गोष्ट अशी स्वार्थी वा लोभी माणसाच्या हातून सोमरस निघूच शकत नाही. परोपकारी जनच तो काढतात व इन्द्राला अर्पण करतात.

'हे मधुर गान करणाऱ्या कविजनांनो, देवराज इन्द्र हा सर्वांचे कल्याण करणारा देव आहे. तो उदार चरित आहे. म्हणून तर तुम्ही त्याचे स्तुति गान गाता. त्या इंद्राची प्रशंसा करून त्याला भेट-पूजा अर्पण करताना मनात संकोच ठेवू नका. कारण तो समर्थ देवराज आपला दाता आहे.'

विश्वमना वैयश्व ऋषींचा पिता व्यश्व ज्याप्रमाणे इन्द्रीयांच्या अश्वांना जिंकून जीवन जगले, त्याचप्रमाणे अत्रिचे पुत्र ऋषि श्यावाश्व होते. त्यांनी इन्द्रियांना संयमाची बंधने न घालता मनोरथांना पूर्ण करणारा भक्तिमार्ग स्वीकारला आहे. अश्वांचे अधिपति देव अश्विनीकुमार त्यांची स्तुति करताना ऋषि श्यावाश्व म्हणतात.

'हे अश्विनी कुमारांनो तुम्ही माझा सोमरस स्वीकारण्यासाठी माझ्याकडे या. पण एकटे येऊ नका. सर्व देवांना बोलावून आपल्या बरोबर घेऊन या. अग्नि, आणि इंद्र, वरुण आणि विष्णु, आदित्य, रुद्र आणि वसु सर्वांच्या सह या.

नेहमी अकरा अकरांच्या संख्येत रहाणारे विश्वेदेव व सात साताच्या संख्येत रहाणारे मरुत सर्वांना आपल्यासह घेऊन या.

हे अश्विनी कुमारांनो कोणा कुमारिकेच्या स्वयंवराला उत्साही तरुण तिचे मनोरथ पूर्ण करण्याच्या उत्साहाने जातो तशाच उत्साहाने आपण माझा सोमरस स्वीकारण्यासाठी यावे.

आकाशात विहार करणारा हंस मोत्यांचा चारा पाहून त्यासाठी खाली उतरतो त्याप्रमाणे तुम्ही दोघे अश्विनीकुमार माझ्या अंगणांत सोमरसासाठी या.

हे अश्विनी कुमारांनो माझा सोमरस ग्रहण करून संतुष्ट व्हा. आणि येथून तृप्त होऊन जाण्यापूर्वी आमच्या प्रजाजनांचे मनोरथ पूर्ण करा. त्यांना धनधान्याने समृद्ध करून तृप्त करा. तुम्ही विजयी व्हा आणि तुमची स्तुति, पूजा करणाऱ्या यजमानाचे रक्षण करा.

हे अश्विनीकुमारांनो माझ्या पित्याने, अत्रि ऋषींनी केलेली स्तुति आपण ऐकली होती. मी अत्रींचा पुत्र श्यावाश्व आपल्यासाठी सोमरस काढीत आहे. त्याचा स्वीकार करण्यासाठी आपण येऊन पोचावे.'

या दुसऱ्या ऋषींचे नाव आहे वश. त्यांच्या पित्याचे नाव अश्व. म्हणून ते अश्व्य या नावाने प्रसिद्ध आहेत. या ऋषींनी इन्द्रीयांना वश तर करून घेतलेच पण मनोरथांनाही योग्य मार्गाने वळवले. त्यामुळे त्यांच्या मनात मात्र विश्व कल्याणाचीच भावना आहे. देवराज इन्द्राची स्तुति करताना ते म्हणतात.

'यज्ञ करणाऱ्या यजमानाना देवराज इन्द्र हा दर्शनीय आहे कारण ऋत्विजांनी केलेली स्तुति ऐकून तो देवांमध्ये श्रेष्ठ इन्द्र यजमानाशी मित्रत्वाचे नाते बांधून यज्ञासाठी जाणारा आहे. देवराज इंद्र विश्वातील सर्व प्राण्यांचा जन्म व त्यांची कार्ये याविषयी जाणणारा आहे. आपल्या आगळ्या वेगाने आणि उत्साहाने तो मानवांच्या कार्यात भाग घेणारा आहे. युगधर्माला अनुसरणाऱ्यांना त्याचे सहकार्य लाभतेच.

हे इंद्रा, ज्यांची मति चुकीच्या मार्गावर गेली असेल, ज्यांच्या मनात विकारांचा गोंधळ माजला असेल त्यांचे अनिष्ट मनोरथ तू धुळीला मिळवतोस. खरोखरीच आमच्या मनाचा प्रेरक तूच आहेस. तरी आमच्या मनोरथांना योग्य मार्गावर ठेवण्याचें बळ तू आम्हांला दे.'

त्यानंतर त्रित आप्त्य या ऋषींनी मित्र, वरुण, आदित्य, वगैरे देवतांची प्रार्थना करतांना वारंवार एकच भाव व्यक्त केला आहे.'

'अनेहसो व उतय सुऊतयो व उतयः'

'हे वरुण, मित्र, अर्यमा, आदित्य वगैरे विश्वेदेवांनो आमचे मनोरथ कोठच्या कोठे उधळून जातात. पण आपले रक्षण लाभले तर पापे, अडचणी उपद्रव, सारे शांत होते. हे मनोरथ म्हणा, मनाच्या उर्मी म्हणा या देवांच्याच कृति होऊन जावोत म्हणजे ते मनोरथ सफळ होतील.

हे आदित्य देवांनो, तुम्ही ज्या यजमानाचे रक्षण करता त्याच्यावर क्रोधाचा काहीच प्रभाव पडत नाही. कितीही दुःखें कोसळली तरी तो त्यांच्या भाराने खचत नाही. कारण आमच्या मनोरथांचे व कार्यांचे तुम्ही रक्षण करीत आहांत.

हे देवांनो हे त्रित व द्वित ऋषि तुम्हांला शरण आले आहेत. त्यांच्या स्वप्नांतही असत्य न येवो अशा प्रकारे त्यांचे रक्षण करा. कारण जागे असतांना ज्याप्रमाणे आहार विहार असेल तशीच स्वप्ने पडतात.'

काण्व ऋषि मनोभूमीवर धावणाऱ्या मनोरथांचे नियमन करण्यासाठी अनेक मार्ग सुचवतात. त्याचप्रमाणे इंद्र वगैरे देवांची स्तुति करणारे आत्रेय व भार्गव ऋषि मनांतील विकार दूर करुन भावनांना सन्मार्गावर नेणारी सूक्ते गातात. मेधातिथी, ब्रह्मातिथी देवातिथी, प्रियमेधा वगैरे आंगिरस ऋषि पण भावनांच्या जोडीला प्राणांना नवा उत्साह लाभावा म्हणून इंद्रादि देवाची स्तुति करतात. प्रियमेधा ऋषि आपल्या पुत्रांना व शिष्यांना उत्साहाने म्हणतात.

'हे पुत्रांनो, हे प्रियमेधांनो, तुम्ही सर्व मिळून इंद्राचे उत्तम प्रकारे स्तुति-पूर्वक पूजन करीत जा.'

'अत्यंत वेगाने वहाणाऱ्या नद्यांचे पाणी चारी दिशांना पसरते. उत्साहाच्या भरात गाई खूप दूध देतात. पण त्या नद्यांचा वेग वा गाईंचा आवेग ओसरल्यावर मात्र त्या लोकांच्या मनोकामना पूर्ण करू शकत नाहीत. त्याप्रमाणे हे यजमानांनो इन्द्राच्या पूजनातील तुमचा उत्साह कमी होणार नाही अशी दक्षता घ्या. तुमचे उत्तम मनोरथ ओसरू देऊ नका.

हे प्रिय यजमानांनो, तुम्ही ज्या इन्द्राला जाणता तो देवांमध्ये श्रेष्ठ देवेन्द्र एखाद्या निर्दोष बालकासारखा नव्या रथात बसून वेगाने आपल्याकडे धाव घेतो व आपले मनोरथ पूर्ण करतो. हा इंद्र मोठ्या हरिणाच्या रुपाने आपल्या मातापित्यांचे कोड पुरवण्यासाठी धावपळ करतो. त्या इंद्राचे तुम्ही मनोभावाने पूजन करा.'

भार्गव कुलातील कविपुत्र उशना अग्निची स्तुति करताना आपले मनोरथ व्यक्त करतात.

'हे यजमानांनो मी काव्य उशना, धनसाधनाचा लाभ करून देणाऱ्या अग्निची स्तुति करीत आहे आपल्या प्रिय जनांना साह्य करण्यासाठी एखादा मित्र ज्या प्रमाणे रथात धनसाधने भरून घेऊन यावा त्याप्रमाणे अग्नि आपले

मनोरथ पूर्ण करतो. असा हा श्रेष्ठ मित्र आज आपला अतिथी होऊन आपल्या अंगणी आलेला आहे.'

'हे अग्निदेव, साहसकर्म करणाऱ्या यजमानांच्या पुत्रस्थानी आपण आहात. कारण आपल्याला प्रगट करण्यासाठी उत्साहभराने यजमान अरणींचे मंथन करतात तेव्हा आपला अवतार होतो. आता आपल्या पूजनाचे मनोरथ कोणत्या वेळी करावे ते आपणच सांगा. कारण योग्य वेळी आपली स्तुति केली असता ती फलदायी होते.'

आंगिरस कृष्ण आपला पुत्र विश्वक-विश्वरुप याच्या मनोभावना स्तुति स्त्रोत्रात गुंफून म्हणतात :

'हे अश्विनीकुमारानो, विमना नावाच्या ऋषींनी पूर्वी आपली स्तुति केली होती. त्यांना आपण सन्मति दिली. त्याच प्रमाणे माझा पुत्र विश्वक-विश्वरुप आपली मति वाढावी म्हणून प्रार्थनापूर्वक तुम्हा दोघांना आवाहन करीत आहे. त्याच्या स्तुति मागे उत्तम भावना आहे. त्या योगाने तुमची मैत्री त्याला लाभो.'

नृमेध व पुरुमेध ऋषि इन्द्राची स्तुती करून म्हणतात,

'मनोवेगांना संयमाचे बांध घालणाऱ्या देवेन्द्रा, तुमची धनसाधनांची भांडारे भरलेली आहेत. तशीच आमची भांडारेही भरलेली असोत. आमची कामना पूर्ण करण्यासाठी तुमचे मनोरथ आमच्या बाजूस वळवावेत. वहात्या नदीसारख्या तुमच्या शुद्ध भावना आमचे रक्षण करोत.'

त्याचप्रमाणे सुकक्ष ऋषि देवराज इन्द्राला बुद्धिदाता सूर्य मानून म्हणतात,

'हे इन्द्र, बारा सूर्यांच्या पैकी तुम्ही एक सूर्य आहात. त्या सूर्यरूपाने आमच्या भावनांचे तुम्ही पोषण करता. आमच्या जीवन यज्ञात आपला उदय सूर्य रुपाने झाला आहे व जीवनयज्ञाच्या मंगलप्रभाती होणारी सर्व मंगल कार्ये तुम्हाला वश आहेत. आम्ही तुमची स्तुति करणारे ऋषि, आमच्या मनातील भावना तुम्ही पारखता. आमचे मनोरथ जाणून घेऊन ते सफल करावे.'

आपल्या वाणीला प्रेरणा देणाऱ्या इन्द्राचा महिमा गाताना मनोरथा-प्रमाणेच मनांत जागणाऱ्या वाणीचे रहस्य नेम ऋषि व्यक्त करतात. 'मानवाच्या मुखी वाणी कोठून आली? काही कळत नाही. कारण मनामध्ये उठणाऱ्या तरंगातून मनोरथ निर्माण होतात त्याचप्रमाणे हृदयांतील देवांच्या प्रेरणेने मंद्र वाणी जागृत होते. राष्ट्र भावनेचे मूर्त रूप घेऊन ती प्रार्थनेवाटे प्रगट होते व सर्वांचे कल्याण करते.'

मानवाच्या विचार भूमीवर धावणाऱ्या मनोरथांना विवेक व संयमाचे बंध घालून परोपकाराच्या मार्गावर वळवण्यासाठी अनेक ऋषींनी इन्द्र वगैरे देवांची प्रार्थना केली आहे व मनोरथाच्या मार्गाचे स्पष्ट दिग्दर्शन केले आहे. ★★

# ९ / सोमरसाचे पान

(ऋग्वेद ९ वे मंडल)

हिमालयाच्या पवित्र शिखरावर ब्रह्मसभा भरली होती. मंत्रब्रह्माचे दर्शन करणारे ऋषि, कवि, ब्रह्मवादी, मनीषि त्या सभेसाठी जमले होते. जी मंत्रवाणी त्यांच्या मनात स्फुरली ती सर्वांना प्रेरक व मार्गदर्शक व्हावी व त्या दिव्यवाणीच्या योगाने सर्वांचे कल्याण व्हावे, हित व्हावे अशी भावना त्या सर्वांच्या मनात होती.

तेथील कित्येक ऋषींना अग्निच्या दिव्यत्वाचे दर्शन घडले होते. अग्निचा महिमा त्यांनी पाहिला होता व अग्निची प्रशंसा करणारी सूक्ते त्यांनी रचली होती. तर काही ऋषीना इंद्राच्या ठिकाणी ईश्वरी सत्ता व सामर्थ्य असल्याची प्रचिती आली होती. इन्द्राचे पराक्रम पाहून त्यानी त्याचा महिमा वर्णन केला होता. तर कोणाच्या मनी सोमाचा महिमा बसला होता. सोमाच्या विविध भावांचे त्यांना आकर्षण होते. सोमाच्या पावमानी ऋचा त्यांनी रचल्या होत्या. त्या ऋचांच्या बरोबर इतर देवांची प्रशंसा ते आनंदाने करीत होते.

चर्चा आणि विचारणा करुन शेवटी ऋषींनी तात्पर्य काढले 'अग्नि हा अग्रणि असून पुरोहित आहे. त्याला रोज सचेत व समिद्ध करावा. सकाळ संध्याकाळ अग्निहोत्र करुन नित्य नव्या ज्ञानाची प्राप्ती करुन घ्यावी.'

इन्द्र हा देवांचा राजा खरा. तो दूरही आहे व निकटही आहे. त्याचे साम्राज्य स्वर्गात. पण त्याचे स्वराज्य शरीराच्या इन्द्रीयांवर. स्वर्गातील इन्द्राचे स्मरण प्रत्येक पक्षा-मासाप्रमाणे, प्रत्येक ऋतूत करावे, त्याला प्रसन्न करून इष्ट इच्छित सुखसाधने मिळवावी. पौर्णिमेच्या संध्याकाळी व प्रतिपदेच्या पहाटेस, अमावास्येच्या संध्याकाळी व प्रतिपदेच्या प्रभाती इष्टी करून इन्द्रीयांचे बळ मिळवावे.

इन्द्र व अग्नि हे देव. त्यांच्या दिव्य प्रेरणेच्या योगाने नवे ज्ञान मिळते, नवी कर्मे सुचतात. पण जीवनाची मूळ प्रेरणा देणारा सोम आहे. सोम म्हणजे जीवनरस. सोम म्हणजे सामगान. सोम वर्षावर्षाला सभर करणारा आहे. सोमयाग हा वर्षाचा उत्सव. महोत्सव होय.'

ऋषींचा हा विचार. ब्रह्मवादी या तात्विक विचाराकडे आपल्या दृष्टीने पाहू लागले व त्यांनी आपले विचार मांडले.

सोमाची स्तुति प्रशंसा करून त्याला पृथ्वीवर येण्याविषयी विनवले, तेव्हा सोम उंच पर्वतशिखरावर जलाशयाच्या काठावरील दाट झाडीत उतरून निवास करू लागला.

खरोखर सोम ही केवळ औषधीच नसून औषधीराज वनस्पती आहे. 'सोमवल्ली व आकाशात विराजणारा सोम...चंद्र यांचा काही संबंध आहे?' कोणा ऋषीने कुतूहलाने विचारले

'आहे तर. ते दोघेही औषधीराज असून कलानिधीही आहेत. सुधांशु पण आहेत. चंद्र ज्याप्रमाणे कलेकलेने वाढतो व क्षीण होतो, त्याचप्रमाणे शुद्ध पक्षात सोमवल्ली एकेका पानाने वाढते व कृष्ण पक्षात तिचे एक एक पान रोज गळून पडते. चंद्र म्हणजे देवांचे अन्न आणि सोमही देवांचे अन्न आहे.'

'सोमाचा आणि आपल्या शरीराचा काय संबंध?'

'अग्नि ही वाणीची देवता असून इन्द्र हा प्राण आहे त्याप्रमाणे सोम हा मनाचा अधिपती आहे. सोमाप्रमाणे मनाच्या उर्मीही वाढत जातात व ओसरतही जातात.'

'ही सोमवेल हवी तेवढी मिळते?'

'छे, छे. सोम दुर्लभ आहे. सर्वांना सोमवेल कोठून मिळणार? गोड वाणीने सोमाची स्तुति करता करता मनामध्ये सोमरसाची भावना निर्माण झाल्यावर त्या भावनेने योगमार्गाने पुढे जाऊन शरीराच्या उच्च भागातून ठिबकणाऱ्या सोम बिंदूचे दर्शन घ्यावे. नंतर वनांतरी फिरून पर्वत शिखरावर उगवणारी सोमवल्ली शोधता शोधताही स्तुति प्रार्थना करावी, तेव्हा कोठे एखादी सोमवेल कोणाला आढळते आणि सोमरस म्हणून ती जशीच्या तशी गळी उतरवता येत नाही. तिचे सवन करून, सर्वांनी मिळून देवादिकांचे हवन, यजन, पूजन करावे, तेव्हाच ज्ञान व कर्म याना जोडणाऱ्या भक्तिरसाच्या भावनेने निथळणाऱ्या सोमरसाचे पान करण्याची आगळी संधी लाभते.'

नवव्या मंडलात सोमाचा महिमा अनेक ऋषींनी वर्णन केला आहे. त्यात

सर्व प्रथम ऋषि मधुच्छंदा आहेत. गायत्री छंदात त्यानी सोम स्तुति केली आहे. ऋषि एकत्र जमले आहेत.

'खरे आहे. अग्नि हा ज्ञानाचा देव आहे. देवराज इंद्र हा कर्माचा देव असून सोम हा भक्तीचे सिंचन करणारा देव आहे. अग्नि, इंद्र व सोम- ज्ञान, कर्म आणि भक्ति ही तीन साधने म्हणा वा जीवनाच्या सिद्धी म्हणा.'

त्यांच्या या भावनेला दुजोरा देतांना याज्ञिक म्हणाले,

'आम्हांला आपले म्हणणे मान्य आहे. रोज सकाळ संध्याकाळी अग्निहोत्र करावे हे तर नित्य कर्मच आहे. प्रत्येक पक्षाच्या दोन दिवसांना जोडून इष्टि करावी हे काम्य कर्म व प्रत्येक ऋतूत सोम पानासाठी देवांना आवाहन करणे व भक्तिभावाचे सिंचन करणे, जीवनरस निर्माण करणे ही तर दिव्य कर्मे आहेत.'

या प्रमाणे ऋषिनी अग्नीची स्तुति प्रशंसा केली ती संकलित केली ती अग्नि संहिता. इंद्राच्या यजन पूजनासाठी रचलेल्या सूक्तांचा संग्रह, ती इंद्र संहिता व त्याच प्रमाणे सोम पानाचा महिमा वर्णन करणारी ती सोम संहिता. या तीन देवतांनी मानवाच्या नित्य, नैमित्तिक व काम्य कर्मांना एकत्र आणून जीवन शुद्ध केले. व दिव्य जीवनाची प्रेरणा मानवांना दिली.

अग्नि रोज सचेत व समिद्ध झालेला आपण पहातो. त्यामुळे अग्नि विषयी विशेष कुतूहल वाटत नाही. परंतु देवराज इंद्राचे दर्शन मात्र दुर्लभ आहे. कोणी ऋषींना ते घडले असेल. परंतु इंद्राला कोणी पाहिले असे कुतूहल ऋषींच्याही मनात निर्माण झाले असता इंद्राने प्रगट होऊन त्यांची जिज्ञासा पूर्ण केली. त्यामुळे सर्वांच्या मनात इंद्राविषयी आदर वाढला.

त्याच प्रमाणे सोमाविषयी कुतूहल होते. सोमाचा महिमा गात असता मनात विचार येतो 'अग्नि हा देव आहे. इंद्र हा देवांचा राजा आहे. सोम कोण आहे ? देव आहे ? त्याच्या विषयी ऋषींनी बरेच जाणून घेतल्यानंतरही निश्चित निर्णय मात्र फार थोड्यांनी दिला आहे. एका ऋषींनी म्हटले आहे,

'सोम ही औषधी आहे. ती कुटली असतां त्यांतून चमकणारा रस निघतो. त्याला सोमरस म्हणतात व कुटण्याच्या क्रीयेला सवन असे म्हणतात.'

या माहितीस अनुमोदन देऊन दुसरे एक ऋषि म्हणतात.

'होय. काही काही पर्वतांच्या उंच शिखरावर सोमवेल उगवते. ती आणून काढलेला सोमरस आरोग्य देणारा असून त्याच्या योगाने जीवन सुखी होते.'

या सोमाची कथा मला माहीत आहे. सोम हे स्वर्गीय पियूषपेय आहे. त्याच्या योगाने देवांना अमरत्व प्राप्त झाले आहे. ऋषींनी यज्ञशाळेत

सोमवल्ली आणलेली आहे खलामध्ये घालून, कुटून सोमरस सवन करून काढा-वयाचा आहे. सवन केलेली वल्ली शुद्ध गाळण्यात घालून तिच्यातून ठिबकणारे चमकते थेंब लहान लहान पात्रात—ज्यांना चमस असे म्हणतात. गोळा करावयाचे आहेत. ठिबकणाऱ्या गतिमान सोमाला पवमान सोम म्हणतात. पवमान सोम हा दिव्य पदार्थ आहे. त्याची खूप स्तुति, प्रशंसा केलेली आहे. त्याचा महिमा गाणारी सूक्ते त्यावेळी म्हटली जातात. ती म्हटली जात असता दश पवित्र गाळण्यातून सोमरस थेंबाथेंबाने ठिबकू लागतो. या भावनेने रचलेल्या ऋचांना पावमानी ऋचा म्हटलेले आहे,

पावमानी ऋचा गायत्री छंदात रचलेल्या आहेत. कारण गायत्री छंद सोमाचा आवडता छंद आहे. या ऋचा मधुर स्वराने गायल्या जातात. कारण सोमाला साम गान प्रिय आहे. पवमान सोम थेंबा थेंबाने पात्रात पडतो. त्याच-प्रमाणे संथ लयीत सोमाची स्तुति स्तोत्रे गातात. त्यांना पावमानी ऋचा म्हटले आहे. पवमान सोमाला वहात रहाण्याची विनवणी करून मधुच्छंदा ऋषि म्हणतात.

'हे सोम, देवामध्ये श्रेष्ठ इंद्र तुमचे सेवन करणार आहेत त्यासाठी आम्ही सवन करीत आहोत. तुम्ही सुत—अभिषुन व्हावे (कुटून रसासाठी सिद्ध व्हावे) आपला मादक मधुर रस दशपवित्र गाळण्यातून गाळला जावो. आपण पवमान व्हावे.

थेंबाथेंबाने ठिबकणारा दिव्य सोमरस चंद्राच्या चांदण्यासारखा पाझरत आहे. हे इन्दु, हे सोमराज तुम्हाला शोधून काढण्यासाठी आम्ही स्वर्ग पालथा घातला होता. सारी कामे सोडून आम्हीं तुमच्या शोधासाठी दाही दिशा भटकत होतो. तुमची सेवा हेच आमचे जीवन व्रत आहे.

हे सोमराज, सूर्याची कन्या श्रद्धा हिने पहिल्यांदा सवन करून सोमरस काढला. त्यावेळी विणून काढलेल्या गाळण्याने गाळून आपल्याला पवमान केले. आजही ती श्रद्धाच आपल्याला गतिरूप घ्यावे म्हणून विनवीत आहे.

हे सोमराज माझी दाही बोटे दहा भगिनींच्यासारखी एकोप्याने काम करीत आहेत व सोमरस गृहपात्रात भरीत आहेत.

प्रेमळ मातेप्रमाणे गाई आपल्या वासरांना स्नेहभराने दूध पाजतात त्याचप्रमाणे यज्ञाची कामधेनू इन्द्रासाठी सोमरस काढीत आहे.'

मधुच्छंदा ऋषींच्या स्तुतिस अनुमोदन देत मेधातिथी म्हणतात,

'हे सोम, देवांना प्रसन्न करण्यासाठी तुम्ही या दशपवित्र गाळण्यावर पवमान व्हा व तुमच्यासाठी आणलेल्या गृहपात्रात वास करा.

हे ऋत्विजांनो, सोमरस हा रसांचा जणू सागरच आहे. हा सोम स्वर्गाला धारण करणारा असून आपल्या मनोकामना पूर्ण करण्यासाठी दशपवित्रामधून तो पवित्र रस गतिमान होत आहे.

हे इंदु, मेघ ज्याप्रमाणे मनाजोगी वृष्टी करतात, त्याप्रमाणे आम्ही मेधातिथी ऋषि इंद्राला प्रसन्न करून घेण्यासाठी त्याला प्रिय अशा स्तुतिचा वर्षाव करीत आहोत. (आमचे कार्य सुकर करण्यासाठी) अमृताच्या धारांसारख्या आपल्या रसधारा पवमान व्हावोत.

पवमान सोमाच्या गतीच्या महिमा वर्णन करतांना शेष ऋषि म्हणतात, 'दशपवित्रातून गळणारा हा सोम म्हणजे जणू रथात बसून त्वरित गतिने यज्ञासाठी येणारा देवच आहे.'

सोमवेल खलबत्त्यात कुटून– सवन करून रस दशपवित्र गाळण्याने गाळून गृहपात्रात भरणे ही सारी प्रक्रिया सरळ आहे. साधी आहे. पण ऋषींचे मन कविमन आहे. त्या क्रान्तद्रष्टया कवीनी या साध्या क्रियेतून जीवनाचे रहस्य गुंफलेले आहे.

पाझरणारे सोमबिंदू ही आपली इंद्रिये आहेत. चंद्राभोवती चमकणाऱ्या चांदण्यांच्या सारखे ते पाझरणारे थेंब चमकत आहेत. सोमरस पवमान झाला की जीवन पात्रांत तो भरला जातो. जीवनरस भरपूर होते. आकाशाच्या विशाल अवकाशातही सोम अविरत गतीने सूर्याला आहुती देत आहे. स्वर्गाचा देव इंद्र याला तो प्रसन्न करून घेतो त्याच प्रमाणे पृथ्वीवरच्या अग्निदेवाला इंधन देऊन आनंदित करतो.

सोमवल्ली हे महान सोमाचे एक प्रतीक आहे. यज्ञ शाळेत सोमवेल सवन करून तिचा रस काढणे ही क्रीया सामान्य आहे. परंतु त्या क्रीयेतील रहस्य उकलून सांगताना ऋषि जीवनाचा अर्थ त्यातून काढतात. त्यांची काव्यमय मधुर वाणीच सोमरस होऊन वाहू लागते. व कवि स्वतःच सोम–सौम्य रूप होतात. जीवन सोमरसाने रसरशीत होते. जीवन यज्ञाच्या प्रारंभी प्रातःसवन होते. व जीवनाच्या अखेरीस तृतिय सवन होते. हे जीवन रहस्य काव्यमय वाणीत अनेक ऋषींनी व्यक्त केले आहे. त्यांच्या अभिव्यक्तीत विविधता आहे. त्यांना अनेक नवी रहस्ये आकलन करण्याची दिव्य दृष्टि आहे . लहानशा गायत्रि छंदाच्या मोजक्या शब्दात जीवनाचे भव्य दर्शन घडवण्याची त्यांची शक्ति पाहून रसिक मंत्रमुग्ध झाल्याखेरीज रहाणार नाहीत.

गायत्री छंदात पवमान सोमाचे गान शुन:शेप, हिरण्यस्तूप, काश्यप व असित अथवा देवल, त्याचप्रमाणे अगस्त्यांचे पुत्र दृदच्युत, इध्मवाह, नृमेध व प्रियमेध, गौतम राहूगण व श्यावाश्व, त्रितआप्त्य व प्रभुवसु बृहन्मति आणि मेध्यातिथी, अपास्य व भार्गव कवि, उचथ्य आणि अवत्सार काश्यप आणि भारद्वाज या ऋषींनी केलेले आहे. त्यानंतर जगति व त्रिष्टूप छंदातही अनेकांनी सोम स्त्रोत्र रचलेली आहेत. विविध मनोभाव आणि जीवन रहस्ये या सोमवल्लीच्या प्रतीका-द्वारे आर्षवाणीत व्यक्त झालेली आहेत. सोमवेलीच्या शोधात भ्रमंति करताना सुस्वर सामगान गाणाऱ्या ऋषींच्या वाणीने रसिकांचे जीवन रसमय झाले आहे. राजा दिवोदासाचा पुत्र राजर्षि प्रतर्दन त्रिष्टुप छंदात सामस्तुति करताना म्हणतो.

'पहा पहा आमच्या सेना शत्रुवर तुटून पडत आहेत. पण शत्रूच्या तीव्र प्रहारांनी त्या हतबल होतात की काय असे वाटते तोच शूर सेनापति व महारथी पुढे होतात व सैन्यात नवा उत्साह संचारतो. त्याप्रमाणे सोम हा जीवनाचा सेनापति आहे त्याला पाहून आम्हाला हर्ष होतो. मोठमोठ्या सोमयागाच्या प्रसंगी देवराज इंद्र यज्ञस्थली आले असताना आनंदित झालेल्या यजमानांच्यासह सोमही मंद वाणीने भद्र वचने बोलू लागतो. देवराज इंद्र सोमाचा स्वीकार करून यजमानांच्या कामना पूर्ण करतात. त्याचप्रमाणे सोम इंद्रासाठी वेगवान साधने पुरी पाडतो.

'सोमवल्ली खलामध्ये घालून कुटणारी हातांची दहा बोटे सोमरसाच्या अंशुला चमकते रूप देण्यासाठी अभिषवण करीत आहेत. जातिवंत अश्व ज्याप्रमाणे रणांगणावर जाण्यासाठी फुरफुरत असतो त्याचप्रमाणे सोमरसाचे सवन करणाऱ्या ऋषींचा उत्साह व वेग वाढत जातो. सोमवेलीचे सवन करून गाळण्याचे वगैरे संस्कार झाल्याखेरीच तेजस्वी सोमबिंदू कसे प्रगट होतील ? रथाला जोडलेल्या अश्वांच्या प्रमाणे दशपवित्रांत भरलेल्या सोमाचे अंशु चंद्र किरणासारखे चमकू लागतात. ग्रहपात्रे भरण्यासाठी ते अधीर होऊन जातात. सोमराज हा इंद्राचा सखा असून शुद्ध संस्कार विधी जाणणारा आहे. दशपवित्राच्या रथावर आरूढ होऊन तो संचार करतो. व स्तुति करणाऱ्या ऋत्विजांच्याकडे सत्वर धाव घेतो.

हे सोम, इंद्र, अग्नि वगैरे देवांच्यात तुमची गणना होत नसली तरी आमच्या लेखी तुम्ही देवच आहात. कारण देवांना प्रसन्न करण्यासाठी केलेल्या मोठमोठ्या यज्ञांच्या प्रसंगी देवराज इंद्राच्या अन्नपानासाठी ग्रहपात्रात सोमरसच भरला जातो. पर्जन्यकाली पाण्याने भरलेल्या मेघाप्रमाणे व पावसात निथळणाऱ्या पृथ्वीप्रमाणे

तुम्ही ग्रहपात्र काठोकाठ भरून काढता. विशाल अंतरिक्षातून पडणाऱ्या पावसा-प्रमाणे दशपवित्रांतून तुमचा रस पाझरतो. पवमान होतो. सोमाच्या कृपेने आम्हाला धनसाधनांची प्राप्ती होवो.'

'हे पवमान सोम, युद्धांत आमचा विनाश न होता आम्हाला विजय मिळो. इंद्रादि देवता आमच्या यज्ञ कर्माने प्रसन्न होवोत. येवढयासाठी हे सोमराज, शुद्ध संस्कृत होऊन आमचे कल्याण करण्यासाठी आपण येऊन पोचावे. या विश्वातील तुमची स्तुति करणारे सर्व मित्र तुमचा आधार मागत आहेत. आणि मीही माझे रक्षण व्हावे म्हणून आपल्याकडेच आशेने पहात आहे.'

'अहो ऋत्विजानो पहा पहा. हा सोमराज पवमान होऊन ग्रहचमसांत प्रवेश करीत आहे. आपण शुद्ध मतिने त्याची स्तुति करीत आहो ही शुद्ध मति त्याच्या मुळेच आपल्याला प्राप्त झाली आहे. खरोखरीच उत्तुंग आकाश आणि भूमितलाची रचना करणारा– त्यांचा जन्मदाता हा सोमच आहे. तोच अग्नि, सूर्य व देवराज इंद्राचा आणि सर्व व्यापक विष्णूचा जीवनदाता आहे.

सोमराजाची ही विविध रुपे तुम्ही समजून घ्या. दिव्य गुणांनी युक्त अशा देवांच्यात त्याचे स्थान ब्रह्म प्रजापतिचे आहे. क्रांत दर्शक कवींची सोम ही प्रेरणा-शक्ति आहे. बुद्धिशाली मानवांत तो ऋषि रुप आहे. वनचरांत तो बलशाली श्रेष्ठ महिष आहे. आकाशात उडणाऱ्या पक्षांत तो श्येनराज आहे. वृक्ष, वनस्पति, व औषधींचे रक्षण करणारा स्वधिति तो सोमच आहे. दशपवित्र रथावर आरुढ होऊन मधुर ध्वनीने ग्रहपात्रे भरणारा तो पवमान सोम येथे येत आहे.'

'वेगाने वहाणारा नदीचा प्रवाह ज्या प्रमाणे प्रेरक असतो, त्याच प्रमाणे पवमान सोम कविजनांना स्फूर्ति देणारा आहे. गाईच्या प्रवृत्ति जाणणारा गोवृषभ दुसऱ्या गोधनात घुसावा त्याप्रमाणे मानवाच्या मनांत घुसून आंतील वृत्तींना वाणी-रुपाने प्रगट करण्यासाठी सोम मनाचा तळ गाठतो.

हा मदमत्त सोमराज संग्रामाच्या वेळी शत्रूच्या दुर्गम व्यूहाचा वेध घेऊन आत घुसतो व सर्व मार्ग आपल्या सेनांना मोकळे करून देतो. आपल्या सहस्त्र-धारांनी शत्रूंचा शक्तिवेध करीत हा पवमान सोम वहात आह. मोठमोठया यज्ञांची प्रेरणा देणारा हा सोमराजच आहे.

हे सोमराज, हे इंद्रू, हे मनिषी, देवराज इंद्रासाठी आपल्या अंशु संग्रहाने ही ग्रहपात्रे भरून जावोत.'

ऋत्विजांनी खलबत्त्यात सोम कुटण्याचे सवन कार्य पुरे केलें आहे व स्तुति मंत्रांचा पाठ करीत ते पाणी शिंपीत आहेत. आता या सोमसंघाने द्रोण व कलश

भरले आहेत. या प्रकारची अभिषवण कर्मे देवांना प्रिय आहेत. विशेषत: द्रोण कलशात भरलेला सोम पाहून देवांमध्ये श्रेष्ठ इन्द्र आनंदित होतो. द्रोण कलशातील सोम दशपवित्ररुपी रथावर आरुढ होताच वेगवान अश्व ज्याप्रमाणे विजयासाठी अधीर होऊन फुरफुरतो त्याप्रमाणे दशपवित्रातून सोमरसाच्या सहस्त्रधारा वेगाने झिरपू लागतात व विजयी योध्यांप्रमाणे ग्रहचमसात प्रवेश करतात.

फार पूर्वी ब्रह्मा वगैरे देवानी सोमाला प्रगट केले होतें. त्यावेळची प्रक्रिया अशी होती. प्रथम सोमवेल आणून पाण्यात भिजत टाकीत त्या विशिष्ठ पाण्याला वसतीवरी म्हणत. रात्री भरून आणलेल्या या पाण्यात दिव्य गुण असत. पाण्यासकट तो सोम स्तुतिपूर्वक कुटत. त्याला अभिषवण कर्म म्हणत. अभिषवणाने वेलीतून चमकता रस निघू लागला की तो द्रोण कलशात भरीत. हा सोम स्तुति करणाऱ्या यजमानांचें रक्षण करतो. तो त्रिभुवनाचा राजा आहे कलशातील सोम दशपवित्र गाळण्यात घालून शुद्ध संस्कारांनी त्याला पूयमान– पवित्र– करण्यात येई. त्यानंतर शुद्ध सोमरस पवमान होई. त्याच्या साह्याने पवित्र यज्ञकर्मे केली जात. यजमानांचे मार्ग व सिद्धी जाणणाऱ्या सोमापासूनच यजमानांना प्रेरणा मिळते.

'हे पवमान सोम, आमच्या पूर्वजांनी तुमच्याकडूनच प्रेरणा मिळवली होती. धीरवीर अशा त्या पूर्वजांनी सोमयागासारखी पवित्र कर्मे तुमच्या निर्देशाप्रमाणेच केली होती. हे सोमराज आम्हीही त्या पूर्वजांच्याच मार्गाचे अनुकरण करीत आहोत. परंतु आमचा मार्ग अडवून हे राक्षस अनेक विघ्ने आणींत आहेत. त्या सर्व अडचणी आमच्यावर कृपा करून तुम्ही दूर करा. आम्हाला धनसमृद्धी देणारे दाते आपणच आहात. तुमच्या अनुग्रहाने आम्हाला वीर पुरुष व वेगवान अश्वदल लाभो.'

'हे सोमराज तुम्ही अगदी प्रथम मनुराजासाठी पवमान रूप धारण केले होते. त्या पुण्यप्रतापी राजाच्या अन्नाचे रूप तुम्ही धारण केले आणि त्या योगाने त्याच्या शत्रूंचा संहार केला होता. त्याच प्रमाणे त्या मनुराजाने केलेल्या यज्ञप्रसंगी तुम्ही हविष्य अन्नाच्यासह उपस्थित झाला होता. तरी आमच्या या यज्ञासाठीही आपण धनधान्य समृद्धीसह यावे व पवमान होऊन देवामध्ये श्रेष्ठ इंद्राला प्रसन्न करावे. त्यांची दिव्य आयुधे सिद्ध करावी.'

'हे सोम, तुम्ही मधुमादक रस व यज्ञाची ऋत साधने घेऊन यज्ञासाठी यावे. सतीवरीचे जल हे तुमचे या प्रसंगी आवरण असावे. उंच पर्वतावरून आपण खाली

उतरून यावे. व अधिषवणासाठी खलामध्ये जाऊन नंतर द्रोण कलशात प्रवेश करावा. तेथून दशपवित्राद्वारे शुद्ध होऊन पवमान रूप धारण करावे. इंद्राला अर्पण करण्यासाठी काढलेला सोमरस अधिकाधिक मादक व मधूर करावा.

'हे सोम, शतधारांनी वहाणारा तुमचा रस अंतरिक्षातून विपुल वृष्टी करवणारा होवो. आमची ग्रह चमस पात्रे तुमच्या रसाने काठोकाठ भरून जावोत. आमचा हा महान सोमयाग सुरु झाला असून त्याच्या यजमानांच्या मनोकामना पूर्ण करण्यांसाठो वसतीवरी जलासह आपण द्रोणकलशात प्रवेश करावा. त्या ठिकाणी गाईचे दूध, दही, सातू वगैरे मिश्रणाच्या योगाने आमच्या आयुष्याची वृद्धी होईल अशी कृपा करावी.'

'हे ऋत्विजांनो, तुम्हाला ठाऊकच आहे की हा सोमराज फार प्रसिद्ध आहे. ही काही सामान्य औषधी नव्हे. तरी मनन केलेल्या स्तोत्रांच्या योगाने या सोमराजाला पवमान करावा. रणांगणावर आपल्या वेगाने तळपणारा अश्व ज्या प्रमाणे शत्रूंची फळी फोडून जातो त्या प्रमाणे राक्षसांनी निर्माण केलेल्या अडचणीतून सोमराज मार्ग काढतो. असामान्य अशा कामधेनूचे शुद्ध, पवित्र व मधुर दूध ज्या प्रमाणे कल्याणकारी व इच्छनीय आहे तसाच हा शुद्ध मधुर सोमरस आहे. अत्यंत वेगवान तेजस्वी अश्व संस्काराच्या योगाने सारथ्याच्या अंकुशात रहातो व रथात बसलेल्या रथ्यास योग्य मार्गाने पुढे नेतो. त्याचप्रमाणे उत्साह व उर्मींनी भरपूर असा सोम कविजनांच्या स्तुति नियमनाच्या अंकुशात रहातो.'

'हेच पहाना. सोमयागाच्या प्रसंगी सोमाचे सवन करण्यासाठी सोता ऋत्विज किती साधने जमवतात. स्तुति गाणारे व अभिषवण करणारे ऋत्विज सोमावर संस्कार करतात तसतशी त्याला नवी नवी नांवेही प्राप्त होतात. सोमराजाची ही मधु मधुर नांवे कवीच्या अंतरी लपून राहिलेली होती. जसजसा अभिवषण होऊन तो द्रोणकलशातून दशपवित्रात प्रवेश करू लागतो तसतशी ही सुंदर नावे कवि वाणीतून प्रगट होऊ लागतात. हे सोमराजा, आम्हीं तुझी प्रार्थना करीत आहो, आमच्या कामना पूर्ण करून आमच्या प्राणांना वेग प्राप्त करून द्या. अन्न धान्य व गोधनाने आमची घरे संपन्न करा.'

'हे ऋत्विजांनो, प्रसुतीगृहात जन्माला आलेले नवजात बालक ज्याप्रमाने सर्वांना प्रिय असते तरीही त्याच्यावर जातक संस्कार केले. जातात त्याप्रमाणे नवजात सोमाचीं आपण प्रेमभराने स्तुति केली, आता त्याच्यावर विधीपूर्वक संस्कार करून पवित्र सोमरस काढूया. मरुत् सोमाला शुद्ध व पवमान करतात त्यामुळे त्याचे बाह्य रूप शुद्ध होते. कवि आपल्या दिव्य वाणीने त्याला शुद्ध

करतात व त्या वाणीच्या प्रेरणेने दशपवित्रातून पवमान होताना सोम मधुर ध्वनि करतो.

सोमाचे मन व कर्म ऋषिप्रमाणेच आहेत. फार काय त्याचे गुण कविसारखे असून आपल्या असंख्य किरणांनी प्रकाशमान होणाऱ्या सूर्यासारखा हा सोम तेजोनिधी आहे. हा सोम स्वर्गात असताना इंद्राप्रमाणेच दिव्य तेजाने शोभत होता.

'या वेळी ग्रह चमस पात्रात पवमान सोम प्रवेश करीत आहे. हा सर्व प्रकारे समर्थ असून गतिशील आहे. वेगवेगळया पात्रांचे अवलंबन करणारा हा सोम यजमानांच्या सर्व कामना पूर्ण करणारा आहे. शुद्ध संस्कारासाठी जरी त्याने अनेक साधने व पात्रे यांचा उपयोग केला तरी मूळ रुपाने तो अंतरिक्षात राहून वृष्टि करणारा आहे. सागर ज्याप्रमाणे जलाचा निधी वर पाठवतो त्या प्रमाणे वर राहून सोम पृथ्वीवर वर्षाधारांचा वर्षाव करतो. स्वर्गामध्ये तो सूर्य रुपाने रहातो. त्याच्याही वर सोम लोक असून ते सोमाचें चौथे घर आहे. तेथे तो महान वृषभाच्या रूपाने राहून सर्वांना प्रेरणा देतो. तेथे रहाणारा नक्षत्रांचा स्वामी चंद्र हाच सोम होय. त्याचे सर्व गुण सोमरसात उतरलेले आहेत.'

'हे ऋत्विजांनो, खरे पहातां एक मर्त्य मानव हा अगदी सामान्य आहे. परंतु त्याच्यावर शुद्ध संस्कार झाले, त्याला वस्त्रालंकांरानी नटवले तर तो राजा सारखा शोभू लागतो. त्या प्रमाणे ही सोमवेल साधारण असली तरी तिच्यावर अनेक संस्कार झाल्याने, वसतीवरींच्या जलाने तिचे शोधन झाल्याने, धनसाधने मिळवून देण्याचे सामर्थ्य तिला प्राप्त झाले आहे वेगवान अश्व रणांगणावर मुक्त संचार करतो त्याप्रमाणे द्रोणकलशातून पवमान झालेला सोम दशपवित्रातून आपल्या विशेष गतिच्या योगाने श्रेष्ठ वृषभाप्रमाणे कामना पूर्ण करणारी वर्षा करतो. या प्रमाणे वेगवेगळया पात्रातून प्रवेश करणारा सोम विशेष सामर्थ्यशाली आहे.'

हे इंदु, सोम, महान ऋत्विजांच्या स्तुतीने प्रसन्न होऊन पवमान व्हा व शुद्ध सोमरस वाहू द्या. धीर, मधुर शब्द करीत दशपवित्र गाळणीतून पवमान व्हा. खलबत्त्यात लहान मुलासारखे तुम्ही खेळत होता. परंतु या विशेष पात्रात प्रवेश करताना तुम्ही पूयमान, पवित्र, व मदसभर झाला आहांत. तुमच्या मादक रसांचे सेवन करून देवराज इंद्र आनंद-धुंद होवो.

हे ऋत्विजांनो सोमरसाच्या मोठमोठ्या धारा वहात आहेत. त्यात गाईचे दूध, दही, लोणी वगैरे घालून द्रोण कलशात रस भरला आहे. सामगान गाणारे उद्‌गाते लय व तालबद्ध संयोजन करून मधुर स्वराने सामगान करीत आहेत.

त्यामुळे प्रसन्न झालेला सोम कोण्या प्रियजनाच्या भेटीसाठी अधीर होऊन धाव घ्यावी त्याप्रमाणे यजमानांच्या मनोकामना पूर्ण करण्यासाठी चमसपात्रात वेगाने उडी घेत आहे.'

'हे पवमान सोम, शत्रूंनी निर्माण केलेली विघ्ने दूर करुन तुम्ही आमच्याकडे येऊन पोचलात. गोड संगीताद्वारे प्रियतमाने आपल्या प्रियेला बोलवावे त्याप्रमाणे मधुर सामगानाचे स्वर तुम्हाला येथे घेऊन आले आहेत. चमकत्या चांदण्यांसारखा सोमरसाचा एक एक थेंब दशपवित्रातून लोकरीच्या दोरीवरून ठिबकत आहे. खरोखर बनवृक्षाच्या फांदीवरून उडणारा पक्षी जसा त्या वृक्षालाही आनंदित करतो तसे सोमयागासाठी आणलेली साधने, पात्रे, कलश, सर्वच सोमाच्या आगमनाने आनंद-धुंद झाली आहेत.'

'हे सोम, नवजात बालकाला मातेने दूध पाजावे त्या प्रमाणे तुमच्या चमकत्या रसधारा यजमानांच्या सर्व कामना पूर्ण करतात. उंच पर्वत शिखरावर, जलाशयाच्या काठी वनामध्ये सोमवल्लीचे प्रथम दर्शन घडले. तेथून ऋषींनी आदरपूर्वक मानापानाने त्या सोमाला सोमयागासाठी आणले. वसतीवरचे जल भरून, अभिषवण करून सोमाला द्रोणकलशात भरले. व देवांना अर्पण करण्यासाठी त्याचे रक्षण केले. आता पवमान होऊन मधुर शब्द करणारा सोम यजमानांच्या कामना पूर्ण करीत आहे.'

पवमान सोमाचा महिमा त्रिष्टुप छंदात वर्णन केला आहे. जगती छंदात हिरण्यस्तूप, आंगिरस, कक्षीवान, दैर्घतमस्, वसु, भारद्वाज, वाच्य प्रजापति, वेन भार्गव वगैरे ऋषिंनी स्तुति केली असून उशना काव्य, कश्यप मारीच, नोधा गौतम, दैवो दासी प्रतदर्शन, मैत्रावरुणि वसिष्ठ, वगैरे ऋषींनी त्रिष्टुप छंदाची योजना केली आहे व अनुष्टुप, उष्णिक, प्रगाथ, द्विपदा, विराट इ. विविध छंदात वर्षागिर नाहुष ययाति, पर्वत व नारद, सप्तर्षि, गौरिवीती, शाक्य, त्र्यरुण, शशु, आंगिरस वगैरे ऋषींनी सोमस्तुति केलेली आहे-

पवमान सोमाच्या दर्शनाने आनंदित झालेले हरिमंत नांवाचे ऋषि म्हणतात 'देवराज इंद्राला प्रसन्न करण्यासाठी हा सोम पवमान होऊन पात्रात प्रवेश करीत आहे. हा पवमान सोम म्हणजे पृथ्वीची नाभी, द्युलोकाचा धारक, नद्यांच्या प्रवाहात अमृत सिंचन करणारा असून इन्द्राच्या वज्रात सामावलेला आहे.'

पवित्र आंगिरस ऋषि पवमान सोमाचा महिमा गाताना म्हणतात, 'पुण्यश्लोक यशगान करण्याची प्रेरणा व यंत्र नियमन आणि उत्साह प्राप्त करून देणारी ही सोमाची सौम्य किरणे खरोखर फार मधुर आहेत. अंतरिक्षातून ती किरणे पृथ्वीवर

निथळत आहेत. ज्यांना त्यांचे सौंदर्य जाणून घेण्याची दृष्टि वा बुद्धी नाही अशा रुक्ष लोकांचा ती किरणे त्याग करतात. परंतु ज्यांना दर्शन व श्रवणाची दिव्य शक्ति लाभलेली आहे. अशा साधुजनांना ऋजु मार्गाने जाणारी ती किरणे नेहमी सहाय्य करतात.'

कवि भार्गव म्हणतात,

'हे सोम, तुमचा उत्तम अंश परम द्युलोकात, आकाशाच्याही वर आहे. सामरसाच्या धारा हविष्याच्या आहुती प्रमाणे वर्षाव करीत आहेत. सूर्य वगैरे देवता त्यांच्या योगाने पुष्ट होतात. उंच आकाशातून सोमरसाच्या अमृतधारा पृथ्वीच्या उत्तुंग शिखरावर वरसतात. सोमरसाचे सिंचन झालेल्या त्या गिरि-शिखरावरील वनस्पतीना खलबत्त्यात कुटून त्यांचा रस पवित्र गाळण्याने गाळून वसतीवरी जलात मिसळण्यासाठी ऋत्विज आपल्या दाही बोटांनी त्याचे मंथन करतात.'

भृगुपुत्र वेन देवांच्यासाठी सोमाची स्तुति करून म्हणतात,

'हे सोम, दिव्य जन्म धारण करणाऱ्या परोपकारी देवांच्यासाठी तुम्ही पवमान व्हा. ज्याचे नामस्मरणही मोठे सुंदर आहे अशा देवराज इंद्रासाठी तुम्ही पवमान व्हा. दिवसाचा देव मित्र व रात्रीचा देव वरुण या उभयतांच्यासाठी तुम्ही पवमान व्हा. प्राणवायु व बृहस्पतीसाठी तुम्ही पवमान व्हा. तुम्ही स्वादिष्ट असून अत्यंत मधुर आहात. आपल्या प्रभावाला कोणीच अवरोध करू शकत नाही.'

सर्वांच्या श्री–कल्याणासाठी प्रगटलेल्या सोमराजाचे दर्शन करून आंगिरस कण्व आगळाच आनंद अनुभवतात व म्हणतात, 'अहो, हा सोमरस श्री–कल्याणासाठीच प्रगटला आहे. कल्याणासाठीच त्याचा अंशु अंशु गाळला आहे. दश पवित्रातून ग्रहपात्रात प्रवेश करणारा सोमरस सामगान गाणाऱ्यांच्या जीवनात रस निर्माण करतो. त्या सोमाच्याद्वारे आपले कल्याण साधून त्याची स्तुति करणारे ऋषि अमरपद मिळवितात. अनेक अडचणी व मनस्ताप यांनी भरलेल्या जीवन मार्गावरही सोमाचा सत्य भाव वसत असल्याने जीवनात माधुर्य आहे. कल्याणकारी सोमाचे दर्शन सर्वांना आनंद देणारे आहे.

मैत्रा वरुणि वसिष्ठ व त्यांच्या कुलातील ऋषि इन्द्रप्रमति, वृषगण, मन्यु, उपमन्यु, व्याघ्रपद, शक्ती, कर्णश्रुत, मृडीक, वसुक व शक्तीपुत्र पराशर सर्व मिळून सोमाचा महिमा गातांना म्हणतात,

'आमच्या कामधेनू रससभर होण्यासाठी सोमरसाचे सेवन करतात. मनस्वी

ऋत्विज विवेकपूर्ण मनन करून सोमरसाविषयी जिज्ञासेनें विचार करतात. अभिषुत झालेल्या या सोमाला स्तुतिपूर्वक गति देऊन ऋत्विज पवमान करीत आहेत. आमच्या स्तुतिवचनांनी सभर झालेला त्रिष्टुप छंद व दिव्य तेजाने शोभणाऱ्या ऋचा सोम च्या संगतीत रहाण्याची मनीषा धरून आहेत.

'अहो सोमराज, तुम्हाला पवित्र व पवमान करण्यासाठी येथे तीन गाळण्या आहेत. अग्नि, वायू व सूर्य अशी त्यांची नावे आहेत. सूर्यांमधून स्वर्गात, वायूमधून अंतरिक्षात व अग्नीतून पृथ्वीवर सोम पवमान होतो. ही पवित्र साधने फार विस्तृत आहेत व त्यातून एकच परम उदार असा सोमरस नित्य निरंतर पूयमान– पवित्र होत आहे. या त्रिभुवनांच्याही वर परमधाम गंधर्व लोकांत इन्दुरुपाने प्रकाशणाऱ्या सोमराजा, तुम्ही साक्षात भग-भाग्यरुप आहात. आम्हाला योग्य असे सर्व धन साधन आपण देता. दानेश्वर मघवान इंद्रालाही दान देणारे तुम्हीच आहात. खरोखरीच सोम हा विश्वाचा राजा असून, विश्वाला जाणणाऱ्या प्रेरक मतिच्या गाळण्यातून तो वारंवार पवमान होतो.'

सोम ही एक औषधी वनस्पती आहे. सामान्यतः हिरवळ असलेल्या प्रदेशात ती उगवते ती आणूण खलबत्त्यात विधिपूर्वक कुटल्यावर सूत–अभिषूत होते. त्या क्रियेस अभिषवण क्रिया म्हणतात. अभिषूत सोम द्रोण कलशात भरून त्यांत दूध, दही, लोणी वगैरे घालून चाळणीत ओवलेल्या लोकरीच्या धाग्यातून सोमरस गाळला जातो त्या गाळणीस दशपवित्र म्हणतात व गाळण्याच्या क्रियेस पवमान म्हणतात. पवनमान झालेला सोम ग्रहपात्रात, चमसात व कलशात भरतात. अशा रितीने काढलेल्या शुद्ध, संस्कृत, पवमान सोमाच्या आहुती अग्नि इन्द्र आदि देवांना देतात.

पवमान सोमाला शुद्ध, संस्कृत करण्याची प्रक्रिया साधारण सारखीच दिसून येते. या प्रक्रियेच्या वेळी ऋत्विज, उद्‌गाते होते व अध्वर्यु मंत्र म्हणून सोमाची स्तुति प्रार्थना करतात.

पवमान सोमाची स्तुति प्रार्थना साधारण वर्णनासारखी नसून सोमाविषयीची अनेक रहस्ये त्यातून व्यक्त झाली आहेत. सोम ही औषधी उंच व हिरवळीच्या प्रदेशात उगवते. त्यामुळे ती उंचात उंच अशा स्वर्गात उगवणारी दिव्य बिभूति मानली गेली. खलबत्त्यात घालून तिचे सवन करण्याची प्रक्रिया ही उच्च प्रकारची असून वसतीवरी जल हे दिव्य, अलौकिक जल म्हटलेले आहे. त्या पाण्याच्या योगाने सोम मधुर व मादक होतो. द्रोण कलश हा समुद्रा सारखा बिशाल असून दशपवित्रातून पवमान होणारे सोमबिंदू हे निथळणाऱ्या चांदण्यांसारखे आहेत असे वर्णन आहे.

यांप्रमाणे सोम हा सुधांशु, कलानिधी, मृगांक, औषधीश, चंद्रमा, जैवातृक, द्विजराज– अशा अनेक नावांनी ओळखला जातो. नक्षत्रपति चंद्र हे त्याचेच स्वरुप मानलेले असल्याने तो गंधर्वंही मानला जातो.

वेदविज्ञानाच्या दृष्टीने पहाता विश्वाच्या रचनेत रुक्ष व आर्द्र या दोन प्रकारची तत्वे मिसळलेली आहेत. शुष्क पदार्थांचे मूळ अग्नि असून आर्द्र तत्वाचे मूळ सोम आहे. अशा प्रकारे हे जग ' अग्निसोमरुप ' आहे.

सोमाला पवमान संस्कृत करण्याच्या प्रक्रियेतून कित्येक गूढ रहस्यांचा उलगडा होतो. पृथ्वीवरील अग्नि, अंतक्षितील वायु व स्वर्गातील सूर्य ही अग्नि तत्वे असून त्या सर्वांच्यावर तुरीय धामांत वसणारा सोम हा अग्नि, इंद्र व सूर्याचे पोषण करणारा, त्यांना जीवन देणारा, दिव्य अन्न व औषधीरुप आहे. त्या सोमाची निरंतर वर्षा होत असल्यानेच तिन्ही लोकांतील अग्नि समिद्ध व सतेज होऊन त्यांची कार्य चालू रहातात.

या ठिकाणी पिंड व ब्रह्मांड यांचे ऐक्यही दिसून येते. देहामध्ये जे काही शुष्क ते अग्नि तत्व असून आर्द्र ती सोमतत्वे आहेत. प्राण हा अग्नि अथवा इंद्र असून त्यांचे पोषण करणारा सोम हे जीवन आहे. हृदयांत व भ्रुकुटीच्या मध्यभागी अग्नि व सूर्य यांचे स्थान असून त्यांच्या मध्ये सोमाचे स्थान आहे. इडा ही सूर्य नाडी असून पिंगला ही सोमनाडी आहे. व सुषुम्णा ही अग्निनाडी आहे. अग्नि व सूर्य यांच्यामध्ये राहिलेला सोम त्यांच्या योगाने पक्व होतो व त्यापासून त्या उभयतांना जीवन मिळते.

स्वरोदय–प्राणविद्या अथवा वेद शास्त्रातील प्रक्रिया वेदात वर्णन केलेल्या अभिषवण व पवमान प्रक्रियेसारख्याच आहेत. अशा प्रकारे सोमयाग म्हणजे मोठा आत्मयाग अथवा अध्यात्म सर्जनाचाच दृष्टांत आहे.

सोमाच्या प्रक्रियेला सचेत, सजीव व दिव्य रूप देणारे मंत्राचे गान महत्वाचे आहे. सोम व साम एक रूप आहेत. सोम हे यंत्र, साधन असून साम हे मंत्र आहेत. त्यांचा संगम होऊन जे दिव्यतंत्र निर्माण झाले आहे त्याला रथाची उपमा दिलेली असून सोम त्या रथातून विहार करीत आहे असे म्हटले आहे.

सोम ही औषधी उपलब्ध आहे किंवा नाही हा वैज्ञानिकांच्या संशोधनाचा विषय आहे. वेदातील कवि व ऋषि त्याची खूप प्रशंसा करतात. स्तुति प्रार्थना करतात. सोमाच्या बरोबरच सामाचे गान एक दिव्य भूमिका निर्माण करते. गायन व गायक या ठिकाणी एकरूप होऊन जातात.

सोमाचे सवन, अभिषवण होत असताना साम गायला जातो. सवन व पवामन कर्मे सामाचे अनुकरण करतात. सोम हा मतिला प्रेरणा देणारा सृजन व पालन करणारा देव आहे. सोम हा सौम्य आहे. तथापि तो शूर वीरही आहे. सेनानी आहे. राजा आहे. सम्राट आहे. सोम हा सर्व काही असल्यानेच पवमान सोमाचे गुणगान करताना ऋषि कंटाळत नाहीत, त्यांच्या स्तुति प्रार्थनेत वारंवार पुनरुक्ति असून त्याच त्या प्रक्रियांचे वर्णन केलेले आहे, तरीही त्यातून कवींची अभिव्यक्ति, व्यंजना, व रूपक कथातून प्रगट होणारी गूढ रहस्ये त्यांतून व्यक्त होतात.

# १० / आजिविकेची प्रेरक शक्ति

(ऋग्वेद ९ वे मंडल)

उंच गिरीशिखरावरचा तो हिरवागार प्रदेश होता. वनराजींच्या त्या रमणीय प्रदेशात आंगिरसाचे तपोवन होते. अंगांगातून जीवनरस भरपूर होता. शरीरे हृष्ट पुष्ट होती. सर्वजण आपआपली कामे करीत. ती उत्तम रितीने सफल झाली की जीवनात नवरस निर्माण होऊन स्फूर्तिचा संचार होतो. ज्यांची काया निरोगी असते त्यांचे मनही दृढ व स्थिर असते. तन मनाची समतुला साधलेले ते आंगिरस सर्व प्रकारे शांत व सुखी होते.

एकदा त्या प्रदेशात पाऊसच पडला नाही. नवी धान्ये पिकली नाहीत. जमिनीतील रस कस पार सुकून गेला. अन्न व पाणी यांचा तुटवडा जाणवू लागला. ऋषींचे जीवन साधे व सरळ होते. त्यांनी कोठल्याच धनसाधनांचा संचय केलेला नव्हता. घरातील अन्न धान्य पहाता पहाता संपून गेलें. वनातील कंदमुळेही संपली.

ऋषिकुल तपोवन सोडून दुसरीकडे रहाण्यास गेले. गावोगावी रहाणाऱ्या नागरिकांनी ऋषींना आश्रय दिला.

ऋषि श्रमजीवी होते. तपोवनात असताना ते शेती करीत व अन्न धान्य पिकवीत. नव्या जीवनक्रमात त्यांच्या पुढे मोठाच प्रश्न निर्माण झाला.

तपोवनात पुरते अन्न धान्य मिळे. जीवनाचे सारे व्यवहार सरळपणे चालत, कशाची काळजी नव्हती. आपला स्वाध्याय करावा. सामगीते गावीत. योगाच्या प्रक्रिया जाणून घ्याव्यात. व्रत, तप व नियमांच्या योगाने जीवनाला रसभरपूर करावे. हा तेथील क्रम. पण तो प्रदेश सोडला. आजिविकेची साधनेही गेली. आता आपले जीवन कसे टिकवावे ?

'जीवन हे काही बाह्य साधनांच्यावर अवलंबून नसते. सोम हा आपल्या जीवनाचा स्वामी असून त्याच्या प्रेरणेने आपण जगतो.'

'सोम या नांवाच्या औषधी विषयी आपण सांगता ? की दुसरा कोठला सोम आपल्याला अभिप्रेत आहे ?'

'सोम वल्ली येथे कोठली मिळायला ? गिरिशिखरावर रहात होतो तेव्हा त्या सोमरसाचे नित्य सेवन केले. त्याच्या प्रेरणेने साम गाने गायलो त्यानेच आपल्या प्राणावर रसांचे सिंचन केले. आपले जीवन भावना समृद्ध झाले. तो सोम आपले इष्ट दैवत आहे. त्याची साधनाच आपल्याला प्रेरणा देईल. आपली जीवने पुनः समृद्ध करील. आपल्या इंद्रियांना नवे बळ देईल. व देवराज इंद्राचे साह्यही तोच आपल्याला मिळवून देईल.'

'तुमचे म्हणणे खरे आहे. सोमच जीवन समृद्ध करणारा आहे. त्याच्या प्रेरणेने आपण आपल्या आजिविकेचा मार्ग शोधून काढू. आपल्या मतिच्या ठायी वसत असलेला सोम आपल्याला विविध मार्ग सुचवील.'

आंगिरा कुलातील ते ऋषि जीवनाचा डाव हरले नव्हते त्यांच्या मनात सोम भावना जागृत होती. आजिविकेचे नवे नवे मार्ग ते शोधू लागले. त्यांच्यातील एक ऋषि म्हणतात,

'सोमाच्या प्रेरणेने मी नवी कला हस्तगत केली आहे. देवांचे कारागीर ऋभु हे माझे गुरु आहेत. रथ, गाड्या, शकट वगैरे करण्याचे सुतार काम मला करता येते.'

तर दुसरे एक ऋषि म्हणतात,

' राजा सोमाच्या प्रेरणेने मी विणकर झालो आहे. लोकरीचें धागे काढून मी घोंगड्या विणतो. तसेच रेशमी व सुती धागे मागावर चढवून मी वस्त्रे विणतो. तर तिसरे ऋषि म्हणतात,

'सोमाच्या प्रेरणेने मी रंगारी झालो. मी वस्त्रे रंगवतो. लाकडी वस्तू रंगवतो.'

चौथ्या ऋषींना सोमाच्या प्रेरणेने औषधी वनस्पतींचे गुणधर्म कळू लागले होते व औषधपचाराने रोग दूर करण्याचे कार्य ते करू लागले.

पांचवे ऋषि म्हणाले, 'मला पशुपालनाचे काम उत्तम रितीने करता येते. दुभत्या गुरांचे व इतर पशूंचे मी पालन करतो.'

हे सर्व ऋषि स्वाश्रयी होते. सोमाच्या प्रेरणेनें त्यांनी वेगवेगळे उद्योग

शोधून काढले. परक्यांच्या आश्रयास जाऊन रहाणे व समाजाला भाररूप होणे हे दरिद्री लक्षण त्यांच्यात नव्हते.

आजूबाजूच्या गावातून व नगरातून हे ऋषि आपआपल्या कुटुंबासहित विभागले गेले होते. व त्या सर्वांनी आपआपल्या आवडीचे नवे व्यवसाय पत्करले.

दुष्काळाचे विपरीत दिवस सरले. ती दोन चार वर्षे अंगिराना फारशी कठीण वाटली नाहीत. कारण संकटातही ते लाचार झाले नव्हते. पराश्रयी झाले नाहीत. त्याचे कारण त्यांचा जीवनरस आटला नव्हता. ज्या सोमरसाचे त्यांनी सेवन केले होते त्या सोमाने त्यांची बुद्धी सतेज ठेवली. त्यांच्या प्राणांना बल दिले. व इंद्रिये कार्यक्षम ठेवली. त्यांना सोमाच्या शोधासाठी रानावनात भटकण्याची आवश्यकता नव्हती. अग्नि व इंद्राप्रमाणे सोमही अंतरातच वसणारा आहे हे त्यांना माहित होते. म्हणून तर अंगांगात रस भरपूर असलेल्या त्या ऋषिकुलाला आंगिरस म्हणतात,

हे आंगिरस स्वत:चा देश सोडून दूर दूर रहावयास गेले होते तरीही त्यांना वेळोवेळी आपल्या जन्मभूमीची आठवण होई. तेथील सुख व शांती त्यांना परदेशी लाभली नव्हती. आपल्या कला कौशल्याच्या योगाने त्या ऋषींनी साधन सामग्री गोळा केली होती. सुख सोयीही पुष्कळ मिळवल्या होत्या. परंतु त्या पासून त्यांना समाधान मात्र नव्हते.

त्यांच्या कुलगुरू अंगिरा ऋषींनी त्यांच्या मनात आगळयाच भावनांचे सिंचन केले होते. आजिविकेचे एक मात्र साधन शेती हेच होय. शेती ही कामधेनू असून तीच जीवनाची समृद्धी आहे अशी त्यांची भावना होती.

ते ऋषि फिरून आपल्या मातृभूमीवर परतले. त्यांनी त्या भूमीचे पूजन केले. गाईना व गोवृषभाना नानापरींनी सजवले. शेतीची साधने नीट नेटकी करून घेतली. व उजाड पडलेल्या भूमीवर ऋषींचे नांगर फिरु लागले. नवी पिके पेरली. धान्याची खळी भरु लागली.

देवराज इद्राला प्रसन्न करण्यासाठी 'ऋषींनी' इंद्रयागाचे आयोजन केले. सोम आणून त्याचे सवन करुन दशपवित्राद्वारे पवमान झालेल्या सोमरसाने ग्रह-चमस पात्रे भरली जाऊ लागली.

आंगिरसांची स्तुति वचने ऐकून व सोमरसाने भरलेलो ग्रहपात्रे पाहून देवराज इंद्र ऋषींच्याकडे जाऊन पोचले. ते ऋषि दरवर्षी सोमयाग करीत. परंतु दुष्काळात सोमयाग थांबले होते, पुष्कळ वर्षांनी देवराज इंद्राला परत सोमयागाचे निमंत्रण मिळाले होते. त्यांनी तेथे गेल्यावर ऋषींना प्रेमपूर्वक विचारले,

'गेली कित्येक वर्षे तुम्ही यज्ञयाग केले नव्हते. का बरे ? तुम्ही सर्वजण येथून कोठे निघून गेला होता ?'

देवराज इंद्राचे ते मधुर वचन ऐकून ऋषि आनंदित झाले व त्यांनी गोड शब्दात इंद्राला उत्तर दिले.

'देवराज आमच्या या फलद्रूप भूमीवर मेघराज रुसले होते. दुष्काळामुळे आम्हाला ही भूमी सोडून परदेशात जावे लागले. सुकाळ येताच आम्ही येथे परत आलो. आणि आमची ही भूमी परत धान्याने समृद्ध होताच आम्ही आपले स्मरण केले.'

'तुमची खरोखरीच धन्य आहे. हे ऋषींनो संकटाच्या वेळी खचून न जाता निराश न होता विपरीत काळावर विजय मिळवून देणारी अशी कोणती संजीवनि विद्या तुम्हाला साध्य झाली आहे बरे ?'

'भगवन्, सोम ही आमची प्रेरक शक्ति आहे. या सोमाच्या कृपेने आमचा जीवनरस टिकून राहिला. त्या सोमानेच आमच्या मतीला वेगवेगळे मार्ग सुचवले. सोम हीच आमची संजिवनि विद्या आहे. आमच्या अंगांगात सोमरस भिनला आहे. त्याच्यामुळे आमच्या इन्द्रियांना नवी नवी शक्ति मिळत रहाते. आमच्या इन्द्रियांचे अधिष्ठाते देव तर आपणच आहांत.'

'हे देवराज इन्द्र, हा सोमरस आपल्यासाठीच काढलेला आहे. दुष्काळात आम्हाला सोमवेल मिळाली नव्हती म्हणून आम्ही आपल्याला आवाहन केले नव्हते. आमचे नियमित होणारे सोमयाग बंद पडले. पण आमच्या जीवनातून सोम नाहीसा झाला नव्हता. त्याने आमचे जीवन टिकवून ठेवले. त्या सोमाला आम्ही केव्हाही विसरणार नाही.

हे भगवन्, राजा सोमाची स्तुति करताना आमच्या मनात एकच भावना होती. हा सोमरस आम्हाला नित्य प्रेरणा देवो व आमच्या इन्द्रियांची शक्ति टिकून राहो.

आता ही ताजी सोमवेल मिळताच तिचे सवन करून दशपवित्रांत पवमान झालेला हा सोम बिंदु बिंदूंनी ठिबकू लागला आहे. ती आमची प्रेरक शक्ति आहे.'

देवराज इन्द्र ऋषींच्या भावभक्तीने प्रसन्न झाले. ऋषिमुनींनी स्तुति-प्रार्थना करून पवमान सोमाचा महिमा वर्णन केला त्या पावमानी ऋचा ऐकून इन्द्र आनंदित झाला व त्या ऋषींना म्हणाला,

'तुमच्या या पावमानी ऋचा कामधेनूसारख्या आहेत. तुम्ही जेव्हा जेव्हा

कामना कराल तेव्हा तेव्हा मेघराज येऊन वृष्टि करील व तुमची ही सुफला भूमी औषधी वनस्पती, धान्य व फुलाफलांनी भरपूर भरलेली राहील.

या पावमानी ऋचांचे गान इतरही अनेक ऋषींनी केलेले आहे. कित्येकांनी सोमाच्या ठायी सोमरसाचे दर्शन केले आहे. तर कोणाला तो चंद्राचे रुप असल्यासारखा वाटला आहे. कित्येकांच्या जीवनाची ती प्रेरक शक्ति आहे तर कोणाला आजिविकेचे साधन सुचवणारा सोम आहे.

साधे सरळ जीवन जगणारे हे ऋषि पावमानी ऋचा गाताना जीवनाच्या विविध अंगाचे व आजिविकेच्या साधनांचे वर्णन करतात. त्यांच्यातील एका ऋषीचे नाव शिशु आंगिरस आहे. पवमान सोमाचे निथळणारे थेंब त्यांना चंद्रातून निथळणाऱ्या चांदण्यासारखे वाटतात. आकाशात प्रकाशणारा चंद्र पृथ्वीवर प्रेमाने चांदण्याचा वर्षाव करतो. वृक्ष वनस्पतींना नवजीवन देतो. तोच सोमरस होऊन शुष्क जीवनात रसाचे सिंचन करतो. मानवांच्या अंगागात सोमरस भिनतो व देवराज इंद्राला तो प्रसन्न करतो.

हा तोच तो देवराज इंद्र, जो आकाशात तुरीय धामात रहाणाऱ्या सोमराजाने (चंद्र) केलेली वर्षा झेलून घेतो, व जो स्वतः सोमरूप होऊन पृथ्वीवर पाऊस पाडतो, वृक्ष वनस्पतींना नव जीवन देतो तोच हा इंद्र. मानवाच्या शुष्क जीवनात नवा रस निर्माण करून आजिविकेचे नवे मार्ग दाखवून त्याला धन साधनाने तो संपन्न करतो. हा इंद्रच अंगांगात भिनलेल्या सोमरसाच्या योगाने नवे चैतन्य, नवे जीवन निर्माण करतो.

हे ऋषि सोमराज इंदुला संबोधून वारंवार एकच गीत गात आहेत. 'हे इंदु ! आमच्या देवराज इंद्रासाठी रसरशीत होऊन अभिषवण करा. तुमचा रस पाझरू लागताच आमची रुक्ष झालेली जीवने नव जीवनाने प्राणवान होतील.

वेगवेगळ्या प्रकारे आजिविकेचे मार्ग शोधून काढणाऱ्या आंगिरसाचा महिमा गाताना शिशु ऋषि म्हणतात,

'हे सोमराज, आजिविकेसाठी तुम्ही अनेक साधने शोधून काढली आहेत. त्यानुसार आमच्यातील अनेक ऋषि नाना प्रकारचे व्यवसाय करीत आहेत. आमच्यातले कित्येकजण सुतार आहेत. तर काहीजण वैद्य होऊन रोग शोधून त्यावर औषधोपचार करीत आहेत. कोणी ब्रह्मा होऊन यजमानांना सोमरस काढण्याची प्रेरणा देत आहेत. परंतु आमच्या सर्वच कार्यामागे केवळ आपलीच प्रेरणा आहे. तरी हे सोमदेव, देवराज इंद्रासाठी तुमचा रस थेंबा थेंबाने निथळू द्या.

हे सोमराज, भिन्न भिन्न प्रकारे कर्म करणारे आपली तीक्ष्ण साधने घेऊन आपआपल्या कामाला आरंभ करीत आहेत. बाण घडवणारा कारागिर सुकलेली लाकडे जमवीत आहे. त्यातून तो सुंदर बाण घडवणार आहे. वनांतील पक्षांची पिसे आणून त्यांनी तो बाण शृंगारील. नंतर तीक्ष्ण पाषाणातून त्याचे फळ घडवील व बाणाच्या अग्रभागी ते लावील. या प्रमाणे आजिविकेसाठी काम करीत असता तो ऋषि तुमचे नित्य स्मरण करीत असेल. तरी हे इंद्रुराज, आमच्या देवराज इन्द्रासाठी भरपूर रस निघू द्या.'

'हे सोमराज, मी स्वत: कला कौशल्यात कुशल असा कारागीर आहे. माझे आईवडील औषधी जाणणारे वैद्य आहेत. व माझ्या आईची आई पाटयावर धान्य वाटून भोजन सिद्धी करण्यात कुशल आहे. आम्ही सर्व कुटुंबातील माणसे वेग-वेगळया मार्गाने धनोपार्जन करीत असलो तरी ती सर्वच कामे मिळकतीसाठी चांगली आहेत. तरी हे इन्दु, सोमराज तुम्ही इन्द्रासाठी रसाची पात्रे काठोकाठ भरा हे सोमराज, रथाला जोडलेला तेजस्वी घोडा ज्या प्रमाणे रथात बसणाऱ्या रथीला योग्य मार्गावर नेतो. त्यासाठी त्याला उत्तम प्रकारचा रथ असावा लागतो. राजा दुःखी कष्टी झाला तर त्याचे मनोरंजन करण्यासाठी त्याचे कुशल. सचीव, मंत्री त्याला लहान लहान विनोदी कविता ऐकवून उल्हसित करतात, कवि मार्मिक विनोदी काव्ये रचतात. विलासी माणसांना विशाल व सुखद मृदु अशी शयनागारे हवी असतात. त्यासाठी लागणाऱ्या वस्तु कारागीर बनवतात. बेडकांना आनंदाने रहाण्यासाठी तलावांची आवश्यकता असते. तलाव खोदून कुशल कारागीर ते पक्के बांधून काढतात. हे सर्व कर्मचारी जन इंद्राची प्रेरणा मिळवण्यासाठी सोमरसाची प्रतीक्षा करीत आहेत. तरी हे इंदुराज तुम्ही सोमरसाचे भरपूर सिंचन करा.'

शिशु आंगिरसाच्या स्तुति गानातच आपलीही स्तुति मिळवून तेच गीत पुढे चालवून कश्यप मारीच पुढे म्हणतात,

'हे इंद्रुराज सोम, कुरुक्षेत्रातील शर्यणावत प्रदेशात सरोवराच्या काठी तुमचा निवास आहे. वृत्रहा तेथे जाऊन सोमपान करतो. व बलशाली होऊन विशेष पराक्रम करतो. तरी तुम्ही रसाने ही पात्रे भरून काढा.

'हे इंदुराज हिमालयातील आर्जिक प्रदेशात आपला निवास आहे. तेथून तुम्ही आमच्या यज्ञासाठी येऊन पोचावे. सरळ वाणी, सत्य, श्रद्धा, व तप यांची उपासना करून आम्ही तुमचे अभिसवन करु. तरी तुम्ही इंद्रासाठी भरपूर रस द्यावा.

'हे सोमराज, फार पूर्वी तुम्ही उंच आकाशात रहात होता. व पर्जन्य कालातील मेघाप्रमाणे पुष्ट होत होता. सूर्याची पुत्री श्रद्धा तुम्हाला तेथून पृथ्वी

तलावर घेऊन आली. त्यावेळी गंधर्व लोकांतील गंधर्वांनी तुमचा स्वीकार केला. व ऋषींनी तुमच्या रसांचा अंगिकार केला. तरी हे इंद्रराज सोमरसाचे सिंचन करा.

हे सोमराज, ज्या साधु पुरुषांनी सरळ व मधुर जीवनाचा मार्ग स्वीकारला आहे ते साधे, निसर्गाला अनुकूल असे जीवन जगनात. ज्या नितिमान पुरुषांनी सत्य कर्मांचा मार्ग स्वीकारला आहे ते सात्विक नीतिमार्गाने आपली प्रगति साधतात. भले भोळे भक्त श्रद्धेचा मार्ग स्वीकारतात. ते देवाची कृपा व प्रेरणा मिळवून जीवनाचे सार्थक करतात. त्या ज्ञानी, भक्त व कर्मयोगी लोकांच्यासाठी सोमराज परिष्कृत (तयार) झालेला आहे. तरी हे इंद्र, इंद्रासाठी सोमरसाची पात्रे भरु द्या.

हे पवमान- सोम मोठमोठ्या सोमयागात स्तुति करणारे ऋषि एकत्र जमून विविध थंदात सोमाची स्तुति गातात. व खलबत्त्यात विधिपूर्वक सवन करुन सोमरस काढतात. ते ऋत्विज सोमरसाच्या दर्शनाने आनंदित होतात. तरी हे इंद्र इंद्रासाठी सोमधारा वाहू द्या.'

हे पवमान सोम, जेथे अविनाशी ज्योति वसत आहे, जेथे सूर्याचा निवास आहे, त्या अजर अमर स्वर्ग लोकात तुमचा वास असो. हे इंद्र, इंद्रासाठी तुम्ही रसाचें सिंचन करा.'

मारिच ऋषि सोमाचा महिमा गाता गाता कष्ट सहन करुन न्यायनीती व सदाचार यांचे पालन करणाऱ्या ऋषींना सोम प्रसन्न होतो व त्यांना सतत प्रेरणा देचो असे म्हणून त्या भक्तांचाही महिमा वर्णन करतात.

'खरोखरीच ज्या भक्तजनांनी पवमान सोमाची स्थाने, साधने व पात्रे मिळवली आहेत, जे यजमान आपल्या स्नेही व कुटुंबीजनासह सोमाचे अभिषवण करुन, पवमान सोमाचे सेवन करतात ते सर्व त्यांच्या प्रजाजनांसह समृद्ध होतात. तरी हे इंद्र, इंद्रासाठी तुम्ही रसाची पात्रे भरुन टाका.'

या कश्यप ऋषींनीच दुष्काळाच्या दिवसात आंगिरस ऋषींना सोमाचे सोम, महात्म्य समजावले होते. ते ऋषि स्वतःच्या मनाला उद्देशून म्हणत आहेत.

'हे मंत्रद्रष्टा, हे कश्यपा, मंत्रद्रष्टा ऋषींनी रचलेली सोमस्तोत्रे गाऊन तुझी वाणी तेजस्वी झाली आहे. उत्तम प्रकारे स्तुति करून राजा सोमाचे तू भजन पूजन करीत आहेस. खरोखरीच सोमराज हा सर्व औषधींचा स्वामी आहे. तरी हे इन्द्रराज इन्द्रासाठी भरपूर रस वाहू द्या,

हे सोमराज या देशाच्या आजुबाजूस आठ दिशा आहेत. त्यातील एकाच

दिशेला आपला निवास आहे. बाकीच्या सात दिशांना वेगवेगळी स्वरुपे धारण करणारा सूर्य वास करीत आहे. त्यांचें यजनपूजन करणारे सात ऋत्विज आहेत व आदित्य देवही सात आहेत. त्या सर्वांना प्रेरणा देणाऱ्या सोमदेवा तुम्ही सर्वांना प्रेरणा देणारे आहात. तरी हे इन्दु इन्द्रासाठी सोमरस वाहू द्या.

हे सोमराज, आमच्या सर्व यज्ञयागांमागची प्रेरक शक्ति तुम्हीच आहात. तुमच्यासाठी विशेष भावपूर्वक हे हविष्यान्न केलेले आहे. तुम्ही शत्रूपासून आमचे रक्षण करावे. त्यामुळे आमचा कोणी नाश करू शकणार नाही. आमचे धनसाधन कोणी लुटून नेणार नाही. तरी हे, पवमान होऊन इन्द्रासाठी रसाचे सिंचन करा.'

★★

# ३२ / इहलोक आणि परलोक

(ऋग्वेद दहावे मंडल)

## १. पापाची टोचणी :

ते दोघे ऋषि होते पुरोहित होते. देवराज इन्द्राचे सहाय्यक होते. एकाचे नाव त्रित व दुसऱ्याचे नाव त्रिशिरा होते.

त्रिशिरा हा त्वष्टा प्रजापतीचा पुत्र. प्रजापतीची पत्नी रचना ही विरोचनाची बहिण. त्वष्टा देवांचा कारागीर होता. रचनेची मदत घेऊन त्यांनी एक विशिष्ट कलाकृति निर्माण केली होती. विश्वरुप नावाच्या त्यांच्या मुलात तीन विशेष गुण होते. त्याला गुणानुरुप अशी तीन मस्तके होती. उजव्या बाजूचे मुख सत्वगुणाचे प्रतिक होते. त्या द्वारे देव सोमपान करीत. मधले मुख रजोगुण धारण करणारे होते. त्या मुखाने विश्वरुप अन्नग्रहण करी. डाव्या बाजूचे मस्तक तमोगुणाचे प्रतिक होते. दानव सुरापान करीत त्याप्रमाणे विश्वरुप त्या मुखाने सुरापान करी.

विश्वरुप त्रिशिराला पित्याची मति व मातेची भावना लाभली होती. त्वष्टा कलावंत होता. तो नित्य नव्या कलाकृति घडवी. विश्वरुपाजवळ शब्दकळा होती. तो नित्य नव्या स्तोत्रांची रचना करी.

बृहस्पति देवांचे पुरोहित होते. स्वर्गात देवराज इंद्राचे राज्य होते. पण तोही बारंवार बृहस्पतिचा विचार घेई. देवसभेत त्यांची उपस्थिती आवश्यक व महत्वाची मानली जाई.

एकदा असे झाले की बृहस्पति सभेला गेले नव्हते. पण देवांनी तिकडे फारसे लक्ष न देता काही निर्णय घेऊन टाकले. हे कळल्यावर बृहस्पति स्वर्गातून निघून गेले. आता कसे करावयाचे ? ते तर स्वर्गाचे पुरोहित. त्यांच्याशिवाय कसे चालेल ?

देवराज इन्द्राने त्वष्टयाचा पुत्र विश्वरुप याला आदरपूर्वक बोलावून घेतले व त्याची पुरोहितपदी स्थापना केली. विश्वरुपाने पुरोहित होऊन अनेक कल्याणकारी यज्ञ केले.

ऋषि त्रित विभूवसुचा पुत्र. आपोदेवी त्याची माता; म्हणून 'त्रित आप्त्य' म्हणून तो प्रसिध्द झाला. आपोदेवी ही अंतरिक्षातील जलतत्वाची देवता व

त्रिभूवसु दिव्य गान रचून गाणारे गंधर्व. त्रिताला माता-पित्यांकडून ज्ञान-विज्ञानाचा वारसा मिळाला होता.

पृथ्वीवरील अग्निच्या ठायी असलेली तत्त्वे त्रिताने जाणली होती. हा अग्नि अंतरिक्षात वायुरुपाने पसरतो. आकाशात तो सूर्य रूपाने प्रकाशतो. हे रहस्य त्यांना उमगले होते. त्याचप्रमाणे वेगवेगळ्या शक्ति व विभूति व देव हे पृथ्वीवर, अंतरिक्षात व आकाशात वसत असतात या रहस्याचे त्यांना दर्शन झाले होते.

या विश्वातील सर्व देवतांचे स्थान आकाश अथवा पृथ्वी आहे. पृथ्वीपासून आकाशापर्यंतच्या अवकाशात सर्व काही सामावलेले आहे पृथ्वी आणि आकाश, जड आणि चेतन, प्रकाश आणि अंधार, स्थूल आणि सूक्ष्म ही तत्वे एकमेकात मिसळलेली आहेत. म्हणूनच त्यांना ' रोदसी ' असे म्हणतात. द्यावा आणि पृथ्वी हे दोन लोक आहेत. पण ' रोदसी ' या दोन लोकांचे, दोन पदार्थांचे ऐक्य सूचित करणारी संज्ञा आहे या ' रोदसी ' ला उद्देशून ऋषींच्या मनात एक प्रश्न आला.

' हे विश्वातील देवांनो, तुम्ही प्रकाशाच्या तीन स्थानी वास करता. म्हणून मी तुम्हाला विचारतो, ' तुमचे ' ऋत '–खरे व सरळ व्रत कोणते ? ' अनृत ' ' अज्ञान ' म्हणजे काय ? पुरातन ' आहुति प्रार्थना ' कोठे आहे ?

' माझ्या जीवनयज्ञासमोर बसून मी तुम्हाला हे प्रश्न विचारीत आहे. देवदूत अग्निद्वारा आपण मला उत्तर द्यावे.'

' सूर्याच्या सात किरणापर्यंत माझा वास आहे. मी आपोदेवीचा पुत्र त्रित आप्त्य आहे. आकाशातील विविध नक्षत्रे, अंतरिक्षात विहार करणारे सुंदर पक्षी, यज्ञ करणारे तपस्वी ऋत्विज या सर्वांपासून प्रेरणा घेऊन मी ही उत्तम स्तुति गातो आहे.'

' हे मानवांनो, सूर्याने आकाशाच्या अंतापर्यंत जो मार्ग उजळला आहे, त्याचे अतिक्रमण देव करीत नाहीत. तो दिव्य मार्ग मानवांना दिसू शकत नाही.'

' हे रोदसी, तू माझ्या स्तुतिस्तोत्रामागची प्रेरणा आहेस. अग्नि, वरुण, इन्द्र, मित्र, सिंधु, आदित्य, पृथ्वी या सर्व देव देवतांचा महिमा तुझ्यामुळेच आहे.'

विभूवसुच्या पुत्राने, त्रित ऋषींनी उत्तम प्रकारे ज्ञान मिळवले होते व त्याच्या योगाने उंच आकाशात प्रकाशणाऱ्या सूर्याचे तेज त्यांनी पृथ्वीवर उतरवले होते. त्या ऋषिवरांचा जन्म धरणीवर झाला होता व ते मानवी जीवन जगत होते.

' ही माणसे पाप कशासाठी करतात ? जीवनात पदोपदी अडचणी का निर्माण व्हाव्यात ? माणसाला भीती का वाटते ? त्याला दुःस्वप्ने का पडतात ? पापांचे निवारण कोणत्या उपायाने करता येईल ?'

विचारशील माणूस हे प्रश्न स्वतःलाच विचारुन त्यांची उत्तरेही स्वतःच शोधून काढतो. तसेच त्रित ऋषींनी ही उत्तरे शोधून त्यातून जीवनाचे रहस्य

जाणून घेतले होते. त्यांना एक गोष्ट कळून चुकली होती– निष्पाप माणसांचे देव रक्षण करतात. हे रक्षण उत्तम प्रकारे जीवन जगता यावे म्हणून ते करीत असतात.'

पाप शोधून काढणे मोठे अवघड आहे. ऋषि जीवनातूनच ते शोधून काढतात. ते म्हणता, ' मला भीती वाटते. दु:स्वप्ने पडतात. या मागचे कारण काय ? ते मला शोधायचे आहे. हरवलेली वस्तु अंधारात सापडत नाही. त्यासाठी प्रकाशाची जरुरी असते.'

पापापासून स्वतःला वाचवावे म्हणून ऋषि देवांची प्रार्थना करतात. देवमाता अदिती करुणामूर्ति असून दयेची देवता आहे. तिचे पुत्र आदित्य. त्या आदित्यांची प्रार्थना करताना ते म्हणतात,

' हे मित्र, हे वरुण, हे अर्यमा, तुम्ही आदित्य आहात. देव आहात निष्पाप जीवांचे तुम्ही रक्षण करता. सत्कार्यांना तुम्ही पाठिंबा देता.'

' हे आदित्य देवांनो, पक्षी पिलांना पंखाखाली घेऊन सांभाळतात तसेच माझ्यावर पाखर घालून तुम्ही मला पापापासून वाचवा. दुस्तर संकटातून पार पडण्यासाठी सुखकर व कल्याणकारी साधनें तुम्ही आम्हाला द्या.'

' हे देवी अदिती, पापापासून वाचवून तू आमचे कल्याण कर. मित्र, वरुण, अर्यमा आदि देवांची माता अदिती आमचे रक्षण करो.'

' हे आदित्यो, उघडकीस आलेल्या व लपून राहिलेल्या दोन्ही प्रकारच्या पापातून मला–त्रिताला–तुम्ही सोडवा.'

' हे आकाशकन्ये उषादेवते, जो द्वित म्हणजे परका आहे, एक्त म्हणजे आपला आहे, त्रित म्हणजे तटस्थ आहे, ते सर्वच माझे बांधव आहेत. कारण त्या साऱ्यांची जन्मदात्री आपोदेवीच आहे. आम्ही सर्व आपोदेवीचे पुत्र, आप्त्य तुमची स्तुती करीत आहोत. आम्ही कोणाकडून व्याज घेतले असले, कोणी कधी अयोग्य कामे करवून घेतली असतील तर त्याची टोचणी लागल्यामुळे आम्हाला दु:स्वप्ने पडून जो मनस्ताप होतो त्यापासून व त्या पापापासून तू आम्हाला वाचव.'

' हे उषादेवी, आज आमचा विजय होऊन आम्हाला खूप लाभ व्हावा असे कर. आम्हाला निष्पाप कर. दु:स्वप्नांच्यामुळे भयभीत झालेल्या आम्हाला भयमुक्त कर. आदित्य निष्पाप जीवांचे नेहमी रक्षण करतात व सत्कृत्यांची प्रेरणा देतात. '

ऋषींनी याप्रमाणे देव देवतांची स्तुती करता करता उपायही शोधून काढला आहे. पाप कोठून बाहेरून आपल्यामध्ये प्रवेश करीत नसते. दुर्बलतेमुळे पापबुध्दी जागृत होते. भीती वाटते. वाईट स्वप्ने पडतात. विचारी माणसे या सर्वांपासून सावध राहून पापापासून दूर राहातात.

'मला भीती वाटते.वाईट स्वप्ने पडतात.' म्हणून माणसाने सावध व्हावे. कळत नकळत हातून पाप घडले असेल तरच भीती वाटते. वाईटसाईट विचार मनात येतात व तशीच स्वप्ने पडतात. त्यातून मुक्त होण्याचा उपाय माणूस योजू लागतो तेव्हा देव त्याला सन्मार्ग दाखवून मदत करतात.

त्रित हे ऋषि आहेत. ते मानवी हिताचा विचार करणारे, म्हणून मानव आहेत. देवांचा विचार करणारे म्हणून ते देवही आहेत. कण्व ऋषींनी यज्ञ केला तेव्हा त्रित त्या यज्ञाचे 'होते' होते. प्रजाजनांच्या हितासाठी ते सगळीकडे हिंडत. त्यांचे एक असे निश्चित स्थान नव्हते. आज येथे तर उद्या तेथे, तर कधी अगदीच वेगळ्या ठिकाणी ते दिसत.

त्या ऋषींनी यज्ञ करुन सोमरस तयार केला होता. त्यामुळे देवांचा राजा इंद्र प्रसन्न झाला होता. त्याने ऋषींना आपल्या जवळच राहाण्यास सांगितले. पण देव–पुरोहित होऊन स्वर्गात नांदणे हे त्यांच्या स्वभावातच नव्हते. पुरोहित न होताही ते देवांचा विचार करीतच होते. त्या दृष्टीने ते पद न स्वीकारताही देव-पुरोहित होतेच ज्याप्रमाणे राजाबरोबर हितकर सल्ला देणारा, मित्रासारखा मंत्री असावा त्या प्रमाणे ते इंद्राबरोबर राहात व देवही त्यांना देवासारखाच मान देत.

त्रिशिरा विश्वरुप देवांच्या पुरोहितपदी होते. देवराज व इतर देवांच्या हितासाठी ते यज्ञयाग करीत. पण देव–पुरोहित असले तरी ते स्वतः देव होऊं शकले नव्हते. त्यांची माता रचना ही दैत्यपुत्री होती, दानवी होती. त्यांना त्याची पूर्ण जाणीव होती. यज्ञात देवांच्या भागाप्रमाणेच ते दानवांचाही भाग वेगळा काढीत व दैत्यांनाही प्रसन्न ठेवीत. हे काम ते चोरून करीत. त्यामुळे त्यांच्या मनात सतत भय असे.

कित्येकदा त्रित व त्रिशिरा यांची भेट होई. दोघे मिळून देवकार्ये करीत. पण त्रिताला पाहाताच त्रिशिराला त्याचा मत्सर वाटू लागे. मनातून भीतीही वाटे की हा आज ना उद्या चहाडी करून आपले पाप उघडकीस आणील. तो स्वतः कपट करीत असल्याने त्याला इतर सारेच कपटी वाटत. तो त्रिताला शत्रू मानी. स्वप्नातही त्रित आपल्याला ठपका देत आहे असेच त्याला दिसे. देवांना सारे कळून चुकले आहे असे त्याला स्वप्नात दिसे आणि घाबरून तो 'हा त्रित मला मारून टाकतो आहे. मला कोणीतरी वाचवा' असे बरळत राही.

या स्वप्नाविषयी कोणाला काही कळले नाही. परंतु त्रिशिरा हा दानवांच्या विषयी पक्षपाती असल्याचे देवदूतांनी शोधून काढले. एका यज्ञात तर स्वतः इन्द्रानेच त्याला दानवांचा भाग काढताना पकडले. विश्वरुप दानव होता, मायावी होता. त्याने 'तो भाग देवांचाच आहे व मी देवांचा पुरोहित असून त्यांचाच

'हितैषि आहे. दानवांशी माझा काय संबंध ?' याप्रमाणे सांगून बाजू सावरून घेतली.

त्रिशिरा विश्वरूप याप्रमाणे इन्द्राच्या दृष्टीने निर्दोषी ठरला तरी त्याचे मन त्याला खातच राहिले. त्यामुळे त्याचे बळ ओसरू लागले. त्याने मंत्रदर्शन केले तरी आर्षदर्शन होईना.

देवराज इन्द्राला आपल्या पुरोहिताचे कपट कळून चुकले. त्याने त्रिताचा विचार घेतला. त्रिशिराच्या कृत्याचा निषेध करून त्रित म्हणाला,

' देवराज, देवांच्या पुरोहित पदावर राहून विश्वरुप जर दानवांचे हित इच्छित असेल तर त्याने देवांचा विश्वासघात केला आहे, असे म्हटले पाहिजे. विश्वासघात हे मोठे पाप आहे. दुसरे, कपटपूर्वक तो दानवां.ा यज्ञभाग देत असेल तर ते त्याचे छुपे पाप आहे. त्याची ही पापेच त्याला टोचीत आहेत व त्यामुळ त्याची शक्ती नष्ट झाली आहे. पापी व कपटी असेल त्याला दंड करणे हे तुमचे कर्तव्य आहे. अपराध्याला शासन न करणे हा तुमचाच अपराध ठरेल.'

' मित्रा, पापी असेल त्याला मी शिक्षा करतोच. पण विश्वरूप पुरोहित आहे. ऋषि आहे. त्याला दंड करणे हेही पापच ठरेल अशी मला भीती वाटते. मला यातून मार्ग दाखव.' इन्द्राने आपल्या मनातली गोष्ट त्रिताला सांगितली.

' देवराज, दुष्टांना शासन करावे हे तुमचे कर्तव्य आहे. मी तुमचा मित्र व सहचर आहे. मी योग्य तेच सांगतो. त्रिशिराचा वध करण्याने पाप लागणार नाही.'

त्रित ऋषींचे सांगणे मानून इन्द्राने आपल्या वज्राचा आघात करून त्रिशिरा विश्वरूपाची तिन्ही डोकी उडवली. देव व ऋषिगण सर्वांनी त्याच्या या कार्यास मान्यता दिली. त्रिशिरा पापी होता. कपटी होता पण काही झाले तरी तो देवांचा पुरोहित होता. त्याची हत्या केल्याने देवराजाला जे पाप लागत होते त्याचा सारा दोष त्रिशिराने आपल्या माथी घेतला. सिंधुद्वीप ऋषींनी इन्द्राच्या मस्तकावर जलाभिषेक केला. ' मातेप्रमाणे सुख देणारे जल पाप दूर करो, बळ वाढवो. जल हे औषधीप्रमाणे शुध्दिदायक आहे. कळत नकळत आमच्याकडून हिंसा किंवा इतर दोषी कृत्ये झाली असतील तर जलदेवता त्यापासून आम्हाला मुक्त करो.'

ऋषींनी याप्रमाणे मंत्र म्हणून इन्द्राच्या मस्तकावर अभिषेक केला. पाण्याच्या धारा त्याच्या शरीरावरून वाहू लागल्या. अंगावरच्या मळाप्रमाणे त्याचे पातक पण त्या जलधारांच्या योगाने दूर झाले देवराज इन्द्राला नवचैतन्य व नवी प्रेरणा त्यातून लाभली. देवांचे पुरोहित बृहस्पति स्वर्गात परत आले. त्यांनी त्रित ऋषींच्या कार्याची प्रशंसा केली व त्यांना देवपद दिले. ज्या ज्या ठिकाणी इन्द्राला यज्ञभाग मिळतो तेथे यज्ञ जल त्रित ऋषींना देवभाग म्हणून तेव्हापासून मिळू लागले.

## २. बहिण–भाऊ

दूर दूर, समुद्रकाठचा तो निर्जन प्रदेश होता. विवस्वान सूर्यपुत्र यम त्या किनाऱ्याकडे पाहात अंतरीचे गंभीर रहस्य शोधीत असल्याप्रमाणे बसला होता. त्याची बहिण यमीं त्याला शोधीत त्याच्या मागे येऊन उभी राहिली तेही त्याला कळले नाही.

' यमा, तुझी दृष्टी कोठे लागली आहे ? तू काय शोधतो आहेस ? कसला येवढा विचार करतो आहेस ? माझ्याकडे पहा तरी. तुला शोधीत किती दूर दूर आले मी.'

यमीकडे पाहून यमाने शांतपणे विचारले,

' का बरे यमीताई ? असे काय मोठे काम होते ? सांग ना.'

' असं पहा यमा, मातेच्या उदरात आपण बरोबरच राहिलो होतो. आता जन्मभरही तसेच एकमेकाबरोबर राहूं या. मी तुझी जीवन सहचरी होऊन तुझ्याजवळच राहीन. हे सांगण्यासाठीच मी तुला शोधीत येवढया दूर आले. या एकांत प्रदेशात तुझ्याशिवाय दुसरे कोणीच नाही. ही...ही आपल्याला घडवणाऱ्या विधात्याची मान्यताच म्हणता येईल. मी तुझ्या पुत्राची माता होईन ' असे काही ती बोलू पाहात होती पण यमाने तिला अडवले व तो शांतपणे म्हणाला,

' यमी, माझी बहिण तू ! तू हे बोलते आहेस ? नाही ! यम हे कदापी मान्य करणार नाही. गर्भवासात आपण एकत्र होतो म्हणून जीवनात तसे राहाणे कसे शक्य आहे ? आपले जन्मस्थान एक. आपण भाऊ आणि बहिण. रक्ताचे हे नाते. बहिण पत्नी कशी होईल ? मला हे मुळीच रुचण्यासारखे नाही.'

' आणि हा प्रदेश निर्जन आणि एकांत आहे, येथे माझ्याशिवाय दुसरे कोणी नाही असे तू म्हणत होतीस ? पण महाप्राण प्रजापतीचे पुत्र सर्व लोकांचे सदाकाळ साक्षी आहेत. तेच आकाश धारण करुन शत्रूचा विनाश करतात. त्या सर्वसाक्षी देवांची दृष्टी सगळीकडे पोचते.'

' यमा, तुझे म्हणणे काही खरे नाही. मुलगी आणि बहिण यांना दुसऱ्या कुलात पाठवून त्यांचा त्याग करावा ही मान्यताच चुकीची आहे. तू ज्या सर्वसाक्षी देवतांच्या विषयी म्हणतो आहेस त्यांना हा संबंध मान्य आहे. सृष्टी निर्माण झाली त्यावेळी अशा प्रकारचा संबंध झालेला आहे. तो प्रजापतीनी मान्य केलेला आहे.'

' तू आपले मन माझ्या मनाशी जुळवून घे. माझे तुझ्यावर प्रेम आहे. तू माझ्यावर तसेच प्रेम कर. पुत्राची इच्छा करणारा पति पत्नीकडे खेचला जातो; तसाच माझा पति होऊन तू माझ्याकडे ये.'

' यमी, ताई, तू अशी चुकीची उदाहरणे देऊ नकोस. पिता आणि पुत्री; बंधु आणि भगिनी शरीर संबंधाने जोडले गेलेत असे आजवर कधी घडलेले नाही.

आपण नेहमी सत्य व सदाचार पाळीत आलो. आणि आता असा ' अनृत ' आचार करूया म्हणतेस ? हे कसे शक्य आहे ? आपले आई–वडील कोण याचा तरी विचार कर. अंतरिक्षातील पाण्यासारख्या चमकत्या किरणात वास करणारा गंधर्व विवस्वान सूर्य हा आपला पिता आणि अंतरिक्षातील जलात राहाणारी सरण्यू आपली माता. या जन्मदात्यांच्यामुळे आपले भावा बहिणीचे उत्तम नाते जडले. हा उत्तम संबंध पाहाता अयुक्त व्यवहार करणे योग्य ठरणार नाही.'

' अरे विसरभोळ्या यमा, विश्वरुप त्वष्टया प्रजापति सविता नारायणानेच आपल्याला एका गर्भात वास देऊन जन्मभर एकमेकाबरोबर राहाण्यास संमति दिलेलीच आहे. आपण त्याच नात्याने गर्भवासात होतो असेच का म्हणेनास. धात्याचे निर्धार कोणी बदलू शकत नाही. त्याने निर्धारित केलेल्या व्रतांचे व कर्मांचे कोणी उल्लंघन करीत नाही. आपले नाते पृथ्वीला व द्युलोकालाही माहिती आहे.'

' त्यातूनही घटकाभर धरून चाल की हे अयोग्य आहे. तरी येथे कोण पाहाणार आहे ? अद्याप दिवसही उगवलेला नाही. यावेळी आपण दोघांनी काय केले हे कोणाला कळणार आहे ? आणि ते पाहाणारे वा जाणणारे येथे आहे तरी कोण ? समजा एखाद्याने पाहिले तरी ते सांगायला नी ऐकायला रिकामे कोण आहे ?'

' खरे पहाता शुभ वा अशुभ कर्मांचा नियामक तर तू स्वत: आहेस. दिवसाचा देव मित्र आणि रात्रीचा देव वरूण आहे. रात्र असो वा दिवस, माणसांना शिक्षा करून नरकात पाठवायचे की त्यांच्यावर कृपा करून स्वर्गात पाठवायचे ते तुझ्याच हाती आहे. तुला मी काय सांगणार ?'

' अरे यमा, मी या विषयी चर्चा करू इच्छित नाही. मला मात्र येवढेच हवे आहे. समोर यम आहे, मी यमी आहे. यमाचा कामभाव यमीच्या ठिकाणी जागृत व्हावा. दोन चाके मिळून रथाला गति देतात त्याप्रमाणे आपण आपला घरसंसार चालवावा. पत्नी आपले शरीर पतीला देते त्याप्रमाणे मी माझी काया तुला देते.'

यमीच्या स्पष्ट मागणीने यम विचारात पडला. कामावेशात ती भलतेच बोलत होती. चराचरात तिला कामवासनाने पूरक अशीच उदाहरणे दिसत होती. बऱ्या वाईटाचा निर्णय करण्याची शक्ति यमाच्या ठायी होती. तो अशा अविचाराला न्याय्य कसे म्हणेल ?

काही म्हणाली तरी यमीला मनातून भीती वाटत होती. आपण करीत असलेल्या चुकीची तिला जाणीव होती. पण यमाचे सामर्थ्य तिला माहिती होते. त्याची संमती असली तर वाईटाचे चांगले ठरेल ही खात्री होती.

यमाचा निश्चय अचल होता. परंतु तो स्वतः स्वतंत्र नव्हता. तो नियामक होता. तथापी नियमांच्या आधीन होता. मिळालेली सत्ता अनियंत्रितरित्या वापरणे हा अधर्म नाही का? त्याने धैर्यपूर्वक म्हटले,

'ताई, देवांचे दूत सर्वत्र फिरत असतात हे तुला माहिती नाही का ? रात्रंदिवस ते जागता पहारा देत असतात. ते घडीभरही विश्रांती घेत नाहीत. कितीही गुप्तता राखून वाकडी कामे केली तरी ते लगेच पकडतात.'

'यमी, तुझे कामुक शब्द मला आघातजनक वाटत आहेत. तू हा विचार सोडून दे आणि योग्य पुरुष शोधून काढ व त्याचा संसाररथ त्याच्या जोडीने वहन कर.'

'मी बऱ्या वाईटाचा नियामक आहे, याचा अर्थ मी स्वतंत्र आहे असा नाही. मी दुसऱ्या देवांच्या आधीन आहे. रात्री आणि दिवसा यजमान जी कामे करतात त्यातून ते आम्हाला भाग देतात. आकाशातील सूर्याचा स्थिर चक्षु यमाकडे सतत पाहात असतो. द्यावा आणि पृथ्वी हे दोन लोक वेगळे दिसत असले तरी रात्र व दिवसाची जोडी असावी त्याप्रमाणे यमाचे कार्यक्षेत्र विस्तृत करीत एकमेकाशी ते जोडले जातात.'

'यमी, तू यमाची बहिण आहेस. तू आपला पति जगातून निवड. हा संभव आहे की कधी काळी तू म्हणतेस तसे संबंध जुळतीलही. पण तो विपरीत काळ सध्या तरी आलेला नाही.'

'हे सुभगे, तू सुयोग्य पति तुझा जीवन सहचर म्हणून निवड आणि त्याला सुखी कर.'

कामावेगाने यमी भारून गेलेली होती. यम तिच्या वासनेला प्रतिसाद न देता दूर ठोकरून देत होता. त्याची विवेकी वाणी ठसावी इतके तिचे मन जाग्यावर नव्हते. तिचा काम आता क्रोधाचे रूप घेऊन जळू लागला. ती रागाने थरथर कापू लागली. तिची वेदना एका बाजूने वाढत चालली. रागाचा परिणाम होईना. तेव्हा ती यमाला विनवू लागली, 'अरे, तुझ्यासारखा येवढा समर्थ पाठीशी असताना मी अनाथ, एकटी दुकटी राहू ? तुला तरी ते शोभण्यासारखे आहे काय ? आणि मी असताना तू असा एकटा का पडतोस ? आपला निर्णय आपणच दोघांनी मिळून घ्यावयाचा आहे. तुला निर्णय नसलाच घ्यायचा तर माझे निदान ऐकून तरी घेशील ? अरे यमा, कामावेगाने पीडित झालेल्या कायेला सुखी कर. माझ्यावर दया कर.'

यमीची केविलवाणी विनवणी ऐकून दया करून भलते सलते करून मग पस्तावा करीत बसणारा भलाभोळा–असा यम नव्हता. त्याचा निर्णय स्पष्ट आणि ठाम होता. तो म्हणाला,

'भोळ्या मुली, माझ्या स्पर्शाने तुझ्या शरीराला सुख मिळणार नाही. नीति आणि सदाचाराचे नियम मी जाणतो. भावाबहिणीमध्ये अशा संबंधाची कल्पना करणे हे पाप आहे. हे सुभगे, तू तुझा पति निवड आणि सुखी हो. मी तुझ्या मागणीचा स्वीकार कदापि करणार नाही.'

आपल्या कोठल्याच युक्ति प्रयुक्तिचा परिणाम होत नाही असे पाहून यमीही दुसऱ्या टोकाला जाऊन त्याला टोमणा देऊन म्हणाली,

'यमा, अरे तू खरेच षंढ आहेस ! मला तुझी कीव येते. तू मला किंवा माझ्या भावनांना जाणूच शकला नाहीस. तुझे हृदय पाषाणाचे तर नाही ? नाही, नाही, मला वेगळीच शंका येते आहे. घोडा जसा लगाम खेचावा तसा वळतो, इकडे तिकडे जाऊच शकत नाही. तसा तू कोठल्या तरी अन्य स्त्रीला वश झाला आहेस. वेल जशी वृक्षाला विळखा घालते तसा तू त्या स्त्रीच्या विळख्यात सापडून मला दूर लोटतो आहेस.'

यमीने शेवटचे अस्त्र काढावे तसे हे उपरोधिक आरोप यमावर केले. या वाग्बाणांचा तरी इच्छित परिणाम होईल अशी तिला मोठी आशा होती. पण यमाने तीही निष्फळ केली.

'भली स्त्री हो आणि योग्य वर शोधून तू लतेप्रमाणे त्याला बिलगून सुखी हो. तू त्याचे मन जाणून त्याला तुझे मन जाणू दे व मनोमीलनाने तुमचे कल्याण होवो. तुमचा संसार सुखाचा होवो.'

धीर गंभीर यम कामपीडित यमीला मनःपूर्वक आशीर्वाद देत होता. त्या आशीर्वादाची मात्रा लागू पडली आणि यमी शांत झाली.

## ३. यमराज आणि पितृलोक :

विवस्तान सूर्याचा पुत्र यम हा पितृलोकाचा स्वामी आहे. अंगिरा, मरीचि, भृगु वगैरे पितर पितृलोकात नित्य राहातात. जेथे इतर पितर त्याला विश्रामस्थान असे म्हणतात.

मृत्युलोकातील माणसांच्यातील प्रथम मर्त्य मानव यमराज स्वतःच आहे. स्वतः मरण पावल्यावर त्याने वैवस्वत लोकाची स्थापना केली. मरणानंतर माणसे या लोकात जाऊन पोचतात. मृत्यु हा यमलोकाचा श्रेष्ठ राजमार्ग आहे. या मार्गाने जाणाऱ्या मानवांना यमाचे दोन कुत्रे भेटतात. ते या मार्गावरचे मार्गदर्शक आहेत. त्यातील एकाच्या अंगावर रंगीबेरंगी डाग असून दुसरा कुत्रा काळा आहे. त्यांना चार चार डोळे असून त्यांची नाके लांब आहेत.

पितृलोकाचा स्वामी यम. त्याला संतुष्ट करण्यासाठी ऋत्विज यजन करतात. त्या यज्ञयागाचे मुख्य धन श्रद्धा हे आहे. म्हणून पितर व त्यांचा स्वामी यम यांना

संतुष्ट करण्यासाठी जो पितृयज्ञ करतात त्याला श्राद्ध कर्म असे म्हणतात.

माणूस मरण पावून परलोकी गेल्यावर त्याच्या शरीरावर अंतिम संस्कार करण्यात येतात, ते पितरांच्या द्वारे त्यांच्यापर्यंत पोचतात. माणूस पुन: पृथ्वीवर जन्म घेतो. पण त्यासाठी केलेली कर्मे त्याला पितृलोकाद्वारे प्राप्त होतात. म्हणूनच त्याला श्राद्ध कर्म असे म्हणतात. यमराजाला संतुष्ट करणारा हा याग करण्याची रीत अशी आहे :

‘ हे यजमान, यम हा पितरांचा राजा आहे, त्याला भेट पूजा करून त्याची सेवा करा. या जगात असेपर्यन्त ज्या माणसांनी श्रेष्ठ व उदार कर्मे केली त्यांच्यासाठी स्वर्गाची महाद्वारे उघडी आहेत. पापीजनांच्यासाठी मात्र तो मार्ग बंद आहे. त्यांना घडीभर विसावा मिळावा म्हणून वैवस्वतलोक त्यांच्यासाठी निर्माण केलेला आहे. ’

आपल्या शुभ व अशुभ मार्गाचा प्रथम ज्ञाता यमराज आहे. त्यांच्या नियत मार्गाचे उल्लंघन कोणीच करू शकत नाही. या आधीही आपले वाडवडील मरण पावले ते याच मार्गाने गेलेले आहेत. ज्यांनी मृत्युलोकात परत जन्म घेतला त्यांना ही कर्मानुसार याच मार्गाने जावे लागते.

देवराज इंद्र, बृहस्पति व यमराज पितरांची वृध्दि करतात. व त्या देवांची वृध्दी पितर करतात. ‘ स्वधा ’ म्हणून केलेल्या श्राद्ध कर्माने पितर संतुष्ट होतात व ‘ स्वाहा ’ म्हणून केलेल्या यज्ञयागाने देव प्रसन्न होतात.

‘ हे यमराज, ऋत्विज मंत्रगान करून तुम्हाला आवाहन करीत आहेत. तुम्ही अंगिरा, यमाबरोबर पितृच्या आसनावर विराजमान व्हा आणि आम्ही देत असलेली भेटपूजा स्वीकारून संतुष्ट व्हा. हे यमराज, आम्ही आपले तात. विवस्वान सूर्य यानाही यज्ञस्थानी येऊन यजमानाला आनंदीत करावे अशी विनंती करून आमंत्रण देत आहोत.’

मरण पावल्यानंतर प्रेत मानवाला यमराजाच्या मार्गावरून पुढे नेणाऱ्या मार्गदर्शक कुत्र्यांना संबोधून ऋषि म्हणतात,

‘ हे मर्त्य मानवा, या दर्शकांनी दाखवलेल्या मार्गावरून तुम्ही त्वरेने जावे. आपले पूर्वजही याच मार्गाने गेले आहेत. पितृलोकात वास करणाऱ्या वरुण देवाला व यमराजाला मी येथून पाहू शकतो. स्वधा-अन्नाचा स्विकार करून ते प्रसन्न झाले आहेत. ’

‘ हे प्रेत मानव, उत्तम स्थानी वास करणाऱ्या पूर्वजांत तुम्ही मिळून मिसळून जावे. तुम्ही या लोकी केलेल्या पुण्यकर्मांच्या योगाने यमराजाला प्राप्त करुन घ्यावे. पितृलोकात सारी पापकर्मे सोडून देऊन पुण्यकर्मे करुन नव्या शरीरासह आपण पुन: जन्म घ्यावा.’

माणूस मरण पावल्यावर प्रेताला स्मशानात नेल्यानंतर स्मशानभूमीवर जल शिंपडतात व मंत्र म्हणून भूत पिशाच्चांना तेथून घालवून देतात.

'अहो पिशाच्च वगैरे मलीन तत्वांनो, ही स्मशानभूमि सोडून तुम्ही दूर दूर निघून जा. हे स्थान पितृलोकी जाणाऱ्या मानवाच्यासाठी राखून ठेवलेले आहे. यमराजाने स्वतः जलसिंचन करून हे स्थान पितृलोकी जाणाऱ्या मानवांच्यासाठी शुध्द केलेले आहे.'

'हे अग्निदेव, पितृलोकाकडे जाणाऱ्या मार्गावर यमराजाचे दोन कुत्रे उभे आहेत. त्यांना चार चार डोळे असून एकाच्या अंगावर रंगीबेरंगी डाग आहेत व दुसरा कुत्रा काळा आहे. पूर्वज जेथे यमराजासह आनंदात राहातात त्या पितृलोकात आमच्या या ज्ञानी पितराला न्यावे.'

'हे यमराज, मरण पावलेल्या आमच्या या स्वजनाच्या रक्षणासाठी आपण आपल्या दोन्ही कुत्र्यांना पाठवावे. ते दोघे यमलोकाच्या मार्गाचे संरक्षक आहेत. त्यांना चार चार डोळे आहेत व शहाणी माणसे त्यांना लगेच ओळखून काढतात. आमच्या स्वजनाचा सांभाळ करावा म्हणून आपण त्यांच्याकडे त्याला सोपवावे. आपण आमच्या स्वजनाचे कल्याण करून त्याच्या आरोग्याचे पितृलोकात रक्षण करावे.'

पिंडदान करून यमराजाला प्रसन्न करण्यासाठी यागात स्तुती केली आहे. 'हे ऋत्विजांनो, यमराजासाठी सोमरस काढा. त्यांना भेटपूजा अर्पण करा. हे यज्ञकर्म त्यांनाच अर्पण करावयाचे आहे कारण अग्नि त्यांचा दूत होऊन सज्ज झालेला आहे. धृताने पूर्ण असे अन्न यमराजाला अर्पण करा. देवामध्ये श्रेष्ठ देव यमराजच आहे. तोच आपल्याला दिर्घायुष्य देतो. त्या यमराजाला श्रेष्ठ मधूर हवि अर्पण करा. त्या यमराजासह राहाणारे आमचे पूर्वज व मार्गदर्शक पूर्व पितृ सर्वांना आमचे नमस्कार.'

पृथ्वीवर जो मरण पावतो त्याला प्रेत म्हणतात. त्याला अग्निदाह देतात. त्यामुळे स्थूल शरीर जळून भस्म होते व सूक्ष्म शरीर, मन, प्राण वगैरेसह जीवात्मा निघून जातो. हे रहस्य स्पष्ट करताना अंत्येष्टि संस्काराचे मंत्र ऋत्विज म्हणतात:

'हे अग्नि, या शवास अग्निदाह देत आहोत. पण याचे सारेच जळून भस्म होईल असे करू नका. त्याच्या अस्थी बाकी राहोत. त्याची त्वचा तडतडून वर आली तर ते योग्य होणार नाही. अथवा शरीराची अंगे-उपांगे सुटी पडली अथवा काही भाग न जळता राहिला तर तेही बरे नाही. तुम्ही दाह संस्कार म्हणजे काय ते पुरते जाणता. तेव्हा शरीराचे दहन योग्य रितीने व्हावे व सूक्ष्म शरीर पितृलोकात मिसळून जावे व त्याची प्रेतावस्था सरून त्यास पितृपद प्राप्त व्हावे असे तुम्ही करावे.'

'हे प्रेता, हे तुझे स्थूल शरीर जळून गेले असून सूक्ष्म शरीर पितरांना सोपवण्यात आले आहे. सूक्ष्म शरीराचे डोळे सूर्यात व प्राणवायूत मिसळून जावोत व जीवात्मा पुण्यफल भोगण्यासाठी स्वर्गात वा पृथ्वीवर जावो. अथवा कर्मफलानुसार अंतरिक्षात जावो.'

'हे अग्नि, या प्रेताच्या सूक्ष्म शरीराच्या भागांना तुमच्या तापाने तापवून त्यावर उत्तम संस्कार करा. तुमच्या ज्वालांच्या योगाने त्याला पितृपदाला जाता येवो. तुमच्या ज्वाला हितकारी असून पुण्यलोकी नेणाऱ्या आहेत.'

अग्निदाह दिल्यानंतर चित्ता थंड करण्यात येते. राखेतून उरलेल्या अस्थी गोळा करून एका मडक्यात भरून नंतर त्या तीर्थस्थानी पवित्र जलात विसर्जन केल्या जातात. याप्रमाणे शवदाह झाल्यावर पिंडदान करतात. त्यानंतर जीवात्मा प्रेत-संज्ञेतून मुक्त होतो व त्याचा सूक्ष्म देह पितरांच्यात मिसळून जातो. माणसाने जन्मभर जी पुण्यकार्ये केली, यज्ञ करून शरीर खपवले त्या शरीरातून जीवात्मा सूक्ष्म देहासह निघून गेल्यावर स्थूल शरीराला अग्नि दाह देण्यातही यज्ञ भावना आहे. या अंतिम संस्काराला 'अंत्येष्टि संस्कार' म्हणतात.

यमराज स्वतः मर्त्य मानव होते. जो जन्माला आला तो मरतो या नियमाचे त्यांनी पालन केले. त्यांनी मरणानंतरचा परलोकाचा मार्ग दाखवला. पितृलोकांत त्यांनी पितरांच्यासह वास केला. इतर मर्त्य मानवांच्यासाठी तो मार्ग सरळ व सुगम केला. नैसर्गिक मृत्यु स्वागतार्ह आहे. पण अपमृत्यू टाळावा. दीर्घ जीवन प्राप्त करून घेण्यासाठी प्रयत्न करावा. त्यासाठीही ऋत्विजांनी प्रार्थना केलेली आहे.

## ४. मृत्यु आणि दीर्घ जीवन :

'हे मृत्युदेव, आमच्या यजमानाला तू दीर्घ आयुष्य दे. त्यासाठी त्याच्याकडे येण्याचा मार्ग सोडून तू अन्य मार्गावर जा. आमचा यजमान पुण्यकार्ये करून देवमार्गाने जात आहे. त्याच्या मार्गात तू अडथळे आणू नकोस. तुम्ही नेहमी सत्य असेल ते डोळ्यांनी पाहाता व कानांनी ऐकता. म्हणून आम्ही तुम्हाला हे निवेदन करीत आहोत. आमचे प्रजाजन, पुत्र, पौत्र यांच्यावर आपली अवकृपा नसावी. त्यांना सुखाने जगता यावे असे आपण करावे'

'हे यज्ञ करणाऱ्या यजमानांनो, अकालीच मृत्यु आला तरी त्यामुळे तुम्ही घाबरुन जाऊ नका. मृत्युच्या माथ्यावर पाय ठेवून तुम्ही दीर्घकाळ जीवन प्राप्त करुन घ्या. प्रजाजनांनो, धन साधने मिळवून, हृष्ट पुष्ट होऊन, सर्व संस्कारांनी शुद्ध होऊन पुण्यकर्मे करीत रहा व पुढे पुढे जात रहा.'

'जे कोणी मरण पावले ते पूर्वज आमचे रक्षण करोत व जीवंत असतील त्यांना मृत्यु न येवो. आम्ही हा जीवनयज्ञ सुरु केला आहे. त्यात जीवनाच्या क्षणा-

क्षणाची आहुति देऊन देवांना आवाहन केले आहे. आम्ही आनंदविभोर होऊन हा जीवन नाट्याचा खेळ खेळत आहोत. पुत्र, पौत्र व स्नेहीजनांच्यासह हसत खेळत ही जीवनलीला चालली आहे. म्हणून हे जीवन दीर्घकाळ टिको.'

'दीर्घ जीवनाची मर्यादा शत वर्षांची मानलेली आहे. त्या आधी कोणाचा मृत्यु न होवो. सर्व माणसे नानाप्रकारे जीवनाचा आनंद उपभोगीत हसत खेळत शत शरद जगोत. पर्वतासारख्या कठोर जीवनव्रताखाली आम्ही मृत्युला दाबून ठेव म्हणजे अकाली येऊन तो जीवनव्रताचा भंग करणार नाही.'

'हे विधाता, तुम्ही सर्वांच्या जीवन मरणाचा लेख लिहिता. रात्री व दिवस कसे जातील, ऋतुचक्र कसे पसार होईल; पूर्व मानव जीवंत राहून मागून आलेला आधी जाईल. पण पित्याच्या देखत मरण होऊं नये अशाप्रकारे तुम्ही सर्व जीवांच्या आयुष्यक्रमाची मर्यादा बांधावी व तुमचे लेख मिथ्या होऊ नयेत या विषयी सावधान राहावे.'

साधारणतः यमालाच मृत्यू म्हटले जाते परंतु यम हा शुभाशुभाचा नियामक आहे आणि मृत्यु ही एक घटना आहे. ती जन्माप्रमाणेच नैसर्गिक आहे. यमराज स्वतःही मृत्यू पावतात. अपमृत्यू वा अकाल मृत्यूवर .माणसाने विजय मिळवला पाहिजे. त्यासाठी त्याने केलेल्या प्रयत्नांना यमराज मदत करतो.

## ५. आदि माता पिता :

त्वष्टा देवाला विश्वरुप त्रिशिरा नावाचा पुत्र आणि सरण्यू नावाची कन्या होती. सरण्यूच्या ठायी पित्याची प्रतिभा होती रुपागुणांनी व धर्माने ती कन्या म्हणजे पित्याच्या कलेचा एक उत्तम नमुना होता.

कश्यप प्रजापति व अदितीच्या पोटी देवांचा जन्म झाला. त्यांच्यापैकी एक देव विवस्वान सूर्य याचे ओज काही आगळेच होते व तो मूर्तीमंत चैतन्याचे जणु प्रतिकच होता. आकाशात त्याच्यासारखा तेजस्वी दुसरा कोणी नव्हता.

सरण्यू व विवस्वान पुण्ययोगाने एकमेकाशी जोडले गेले व सरण्यूला एक पुत्र व एक कन्या अशी जुळी अपत्ये झाली. प्रथम श्वास यमाने घेतला म्हणून तो मोठा व कन्या यमी ही धाकटी.

स्नेहाच्या सिंचनामुळे आतापर्यंत सरण्यूला सूर्याचा ताप जाणवला नव्हता. पण मुलांचे लालन पालन करताना स्नेह विभागला गेला व सूर्याच्या तापाचा कठोर अनुभव येऊ लागला.

'स्वतः तापत राहाणे, इतरांना तापवणे व सतत फिरत रहाणे 'हे सूर्याचे व्रत होते, कर्तव्य होते. सरण्यूच्या सहवासात त्याला अंमळ विश्राम मिळे. पण कठोर ताप ? तो कोठे ठेवता येण्यासारखा होता ? तो तर जीवनाशी निगडीत झालेला

होता. जीवन संगिनी झाली तरी तिलाही त्या व्रताची बळजबरी थोडीच करता येणार होती ?

सरण्यूला तो ताप दिवसेंदिवस असह्य होऊ लागला. तप व व्रताचे पालन करून येणाऱ्या पतिला सरस मधुर भोजन करून वाढावे व सुखद सहवासाने विश्राम द्यावा हे तिचे कर्तव्य होते. पण काळ जात चालला तसा सूर्य तिला अधिकच कठोर वाटू लागला. अगदीच सहन होईना तेव्हा तिने त्यातून मार्ग काढला. त्वष्टयाची ती पुत्री स्वतःही उत्तम कलाकार होती. आपल्या ठायी असलेल्या प्रतिभेचा उपयोग करून तिने एक उत्तम स्त्री मूर्ती घडवली. कलेचा तो एक अप्रतिम नमुनाच होता. आपले स्वतःचे रंग, रुप, वाणी, आकार सारेच तिने त्या मूर्तित मूर्त केले होते. फक्त ती सरण्यू स्वतः नव्हती. तिची प्रतिकृती होती, छाया होती. त्या छायेला स्वतःच्या जागी ठेवून तिने आज्ञा केली–

' तू सूर्यपत्नी होऊन रहा. तू छाया आहेस हे सूर्याला कळता कामा नये माझ्या पोटी जन्माला आलेल्या यम व यमीचे पालन पोषणही तू आईप्रमाणेच ममतेने कर.'

याप्रमाणे करुन सरण्यूने सूर्य लोकाचा निरोप घेतला व कुरु नावाच्या वनात ती घोडीचे रुप घेऊन राहू लागली. इकडे छायेने सूर्याची आगता–स्वागता आस्थेने केली. त्याला तिच्या सहवासात परमशांती लाभू लागली. तेज व छाया यांच्या सुभग मीलनातून एक पुत्र जन्माला आला. त्याचे नाव ठेवले ' मनु विवस्वान.' पित्याचे तेज व मातेची छाया, जाणे ज्ञान व अज्ञान, सुख–दुःख, लाभ-हानी, जय–पराजय या द्वैताच्या मीलनाचे तो प्रतिकच होता.

छायेच्या ठिकाणी सरण्यूने मायेची ममता निर्माण केली होती. यम आणि यमीचे पालनही ती अत्यंत प्रेमाने करीत होती. परंतु मनूच्या जन्मानंतर त्याने तिचा स्नेह आपल्याकडे ओढून घेतला. छाया पराधीन झाली. मनूच्या लालनपालनात तिची ममता सामावली.

अंगणात खेळणाऱ्या यम व यमीला पाहून सूर्याला अमाप सुख होई. छाया येण्याआधीच ही दोघे धावत जाऊन त्याच्या मांडीवर बसत. सूर्य त्यांना जवळ घेऊन मनःपूर्वक शुभाशीर्वाद देई. पण काही काळ लोटल्यावर हा क्रम खंडित होऊ लागला.

सूर्य आला की छाया आणि मनू सामोरे येऊ लागले. यम व यमी दिसेनासेच झाले. सूर्याच्या मनात शंका आली. त्याने प्रथम यमाला बोलावले, तो समजुतदार होता. तो काही बोलेना. त्याने यमीला बोलावले. तीही काही बोलेना ते पाहून सूर्य गोंधळून गेला व ओरडला,

' माझ्या मुलांना झालंय् काय ?'– 'सरण्यू ..' पण सरण्यू होतीच कोठे! छाया आली. पण ती भीतीने नुसती थरथर कापत होती. ' आपण सापडलो ' या शंकेने अर्धमेली झाली होती. सूर्याच्या ते लगेच लक्षात आले व त्याने तिला दरडावून विचारले, ' तू सरण्यू नाहीस. खरे सांग, ती कोठे आहे ?'

सांगितल्याशिवाय सुटकाच नव्हती. तिने भीत भीत सांगून टाकले, 'स्वामी, मी सरण्यू नाही. तिची छाया आहे. तुमची पत्नी आहे.'

सूर्याने डोळे मिटून शोध घेतला. कुरुवनात विहार करणारी सरण्यू त्याने लगेच ओळखली व दिव्य अश्वाचे रूप घेऊन त्याने तिची प्राप्ती करून घेतली. आता त्याचे तेज सौम्य झाले होते. सरण्यूचा स्नेह पण आता सभर झाला होता. फार मोठ्या वियोगानंतर त्यांचे पुर्नमिलन झाले. अंतरिक्षातील अवकाशात सरण्यूने पुन: जुळ्या मुलांना जन्म दिला तेच अश्विनी कुमार.

तो सूर्य व सरण्यू यमाचे माता पिता. छाया व सूर्य हे मनूचे जन्मदाते व अश्वरुपात अश्विनी कुमारांचे आईबाप.

## ६. मरणोत्तर गती :

विवस्वान सूर्य हा ऋषि आहे. त्याचा पुत्र यम व कन्या यमीही ऋ आहेत.

' हे विश्वाच्या देवतांनो, तुम्ही दिव्य धामी वास करता. तुम्ही अमृताचे पुत्र आहात. तुम्ही आमचे म्हणणे ऐकावे. इहलोक व परलोक यांच्यातील संबंध अनादि काळापासून जोडलेला आहे व मंत्र वाणी त्याला दिव्यबळ देते.'

' विधात्याने केलेले नियम अबाधित आहेत. त्यानुसार देव हे अजर व अमर आहेत व माणसे मर्त्य आहेत. देव मृत्यु पसंत करतील कधी ? तर मग अमरधामे माणसांच्या काय कामाची ? त्यांना मर्त्यलोकच प्रिय वाटतो व यमराज त्यांच्या जीवनाचे हरण करीत नाही.'

विवस्वान ऋषींच्या या शब्दात सनातन नियमाचे दर्शन आहे. तर यम यजमान होऊन स्वत:शीच पुण्यलोक व नरकलोकांच्याग तीचे वर्णन करीत आहे. ' यमराज मृत्यूचे नियमन करतो. तो स्वत: पितृलोकात वास करतो. मृत्यूनंतर जीवात्म्याला वेगवेगळी गती प्राप्त होते. ती यमी दिव्य दृष्टीने पाहाते व आर्ष वाणीत ती व्यक्त करते.'

' मरण पावल्यानंतर जीवात्मा पितृपद प्राप्त करतो. सर्व पितर एकाच ठिकाणी वास करीत नाहीत. मृत्युलोकात जी माणसे भक्तिपूर्वक जीवन जगतात ती मरणानंतर सोमलोकात जातात व सोमरसाचे सेवन करतात. ज्यांनी विविध

प्रकारे कार्य केली ती माणसे देव लोक प्राप्त करून घेतात. व देवांच्यासह राहून घृतपान करतात. जी माणसे ज्ञान–विज्ञानाला अनुसरून विविध विद्या व कला संपादन करतात ती ब्रह्मलोकात जातात आणि अथर्व व अंगिरा वगैरे पूर्वजांच्या बरोबर मिष्टान्नांचे सेवन करतात. मर्त्य लोकांत कर्म, भक्ति व ज्ञान या साधनांच्या योगाने जीवात्मे या विविध पुण्यलोकात जातात.

'जे मर्त्य मानव व्रत, तपादि आचरणाने जीवनाला विशेष दृढ आणि सुबद्ध करतात व ज्यांनी जीवनात आगळी साधना केलेली असते त्या माणसांच्या जीवात्म्यास अनंत सुख शांति लाभते.'

'त्याचप्रमाणे जे शूर वीर योद्धे राष्ट्रहितासाठी स्वतःचे बलिदान देतात व जे दानवीर परोपकारासाठी आपली काया चंदनाप्रमाणे झिजवतात त्यांच्या जीवात्म्याला सुख शांती लाभते.'

'हे यमराज, मृत्युलोकात कितीतरी परोपकारी संत सज्जन आहेत. ऋत व सदाचाराला अनुसरून त्यांनी आपले जीवन पवित्र केले आहे. समृद्ध केले आहे, निष्कपट राहून सारे जीवनच यज्ञरुप केले आहे, ती माणसे पितृलोक प्राप्त करून घेतात. त्यांना तुमच्यात मिसळून घ्या.'

'हे यमराज, मृत्युलोकात कित्येक कवि आणि मनीषी, ज्ञानीजनही आहेत. त्यांनी जीवनाच्या विविध अनुभवातून नवनवीन दर्शने प्राप्त केली आहेत. त्यांची दिव्य वाणी अनेकांना जीवन–दर्शन घडवते, मार्गदर्शन करते, ते कवि व ऋषि पितृलोकी आले की त्यांना पितृपद देऊन स्वतःच्या धामात तुम्ही सामावून घ्यावे.'

## ७ यमराजाशी संवाद :

यमराज व यमी पितृपदी पोचलेल्यांना वेगवेगळी गति देतात. पितृलोकी वास करणाऱ्या यमराजाचे दर्शन करण्यासाठी कुमार नावाचा एक ऋषि पितृलोकी जाऊन पोचला. त्याने यमाला आपला गुरु मानले म्हणून त्याला यामायन म्हटले जाते. नचिकेता या नावाने तो प्रसिद्ध आहे.

त्याच्या पित्याचे नाव वाजश्रवा. त्याच्या आज्ञेनुसार कुमार नचिकेताने पितृलोकाचे दर्शन करून दिव्य ज्ञान मिळवले. त्याच्या आर्ष वाणीतून अपूर्व मार्गदर्शन प्राप्त होते.

'वृक्षवेलींनी सुशोभित उपवनात पोचल्यावर पथिकाच्या श्रमांचा परिहार होतो तसेच हे यमराजाचे विश्राम स्थान शांतिदायक आहे. वैवस्वत यम येथे अन्य देवांसह सुखाने वास करतो.

माझा पिता प्रजेचा स्वामी आहे. यमलोकी अनेक पितर वास करतात त्यांच्यासह मी रहावे अशी त्यांची इच्छा आहे.

पुरातन पितरांच्या सहवासात मी रहावे अशी माझ्या पित्याची इच्छा होती. त्यामागे त्यांची मति अधम प्रकारचीच होती. कारण त्यांना माझा मत्सर वाटू लागला होता. द्वेषामुळे कामनाही दूषित होतात. मला आपल्यापासून कायमचे दूर करण्यासाठी त्यांनी तशी आज्ञा केली. मी जिवंत असूनही त्यांनी मला यमलोकी पाठवले, यावरून त्यांच्या मनात किती संताप होता हे स्पष्टच दिसते. परंतु त्यांची आज्ञा मान्य करून मृत्युलोकात जायचा निर्णय मी घेतला.'

याप्रमाणे कुमार नचिकेता दृढ मनोसंकल्प करून पित्याच्या घरून निघाला व यमलोकात यमराजाजवळ जाऊन पोचला.

मृत्यु लोकातील तो ऋषिकुमार स्वभावत: निर्भय होता. त्याला मृत्युचे रहस्य जाणून घेण्याची जिज्ञासा होती. मरणानंतर आत्म्याची गति काय ते त्याला जाणून घ्यावयाचे होते. वैवस्वत यमाकडून आत्मविद्या मिळवण्याची इच्छा त्याच्या मनात होती. सर्वसाक्षी यमाने त्याची जिज्ञासा ओळखली. पण ती खरी आहे की खोटी त्याची कसोटीही त्याने केली. त्याला अनेक प्रलोभने दाखवली. पण कुमार रेसभरही चलित झाला नाही.

ज्याला खरोखरीच भूक लागली आहे, त्याला सोन्याची काय किंमत ? त्याला अन्नच हवे. तहान लागली की धन-संपत्ति नाही, पण पाण्याचा घोटच ती शांत करू शकतो. त्याचप्रमाणे आत्मविद्येची जिज्ञासा कोठल्याच प्रलोभनाने शमत नाही. त्याला मात्र आत्मज्ञानच संतोष देऊ शकते.

ऋषिकुमाराला भुलवण्यासाठी यमराज म्हणाला,

'कुमार तू माझ्याकडे आलास, मी प्रसन्न झालो आहे. माझ्यासाठी देवांचा कारागिर जो त्वष्टा, त्याने एक नवा रथ बनवला आहे, सामान्य रथाहून तो वेगळाच आहे. रथाला चाके असतात. पण या रथाला एकही चक्र नाही. तरीही त्याची गति अबाधित असून अत्यंत त्वरेने तो सर्वत्र संचार करतो. माझ्या मना-प्रमाणे ही रचना त्याने केली आहे. हा रथ म्हणजे मनोरथच म्हण ना. याच्या योगाने सर्व इच्छा सफल होतील.'

यमराज रथाचे वर्णन का करीत आहेत हेच कुमाराला समजेना. त्याला त्यात स्वारस्य नव्हते. यमलोकात आल्यापासून दुसरी कोठलीच इच्छा त्याच्या मनात उरली नव्हती. यमराज त्याला समजावीत होते:

'अरे कुमार, हा रथ म्हणजे तुझे मनच आहे. त्याच्या योगान तर तू येथवर येऊन पोचलास. पृथ्वीवर जे ज्ञानीजन आहेत, त्यांनी बुद्धीच्या बळावर यमलोक म्हणजे काय ते जाणून घेतले आहे. पण तू मोठेच धाडस करून स्वत:च येथे येऊन पोचलास. आता तू मृत्युलोकात परत जा. तुझ्या पित्याचे सांत्वन कर व मी सांगितलेल्या रहस्याविषयी त्याला सांगून तो तुझ्यावर प्रसन्न होईल असे कर.'

नचिकेता व यमराज हे गुरु व शिष्य भेटावे तसे भेटले आहेत. त्यांच्यामध्ये जी प्रश्नोत्तरे झाली त्याची नोंद कुमाराने घेतली आहे. कविच्या मनात स्फुरलेल्या काव्यासारखा हा संवाद आहे. इहलोक, परलोक व आवागमन या विषयीचे प्रश्न त्यात आहेत.

'अरे, या कुमाराला यमराजाकडे जाण्याचे सुचवले तरी कोणी ? ज्याच्या योगाने हा कुमार यमलोकात जाऊन पोचला व यमराजाला भेटून मृत्युलोकात परत आला तो रथ आहे तरी कसा ? कुमाराने यमराजाकडून कोठले रहस्य जाणून घेतले असावे ? यमलोकातून परत आणणारे असे कोठले ज्ञान त्याला प्राप्त झाले असावे.'

अशा प्रकारचे प्रश्न मूर्खता वा अज्ञानामुळे निर्माण झाले ? की त्या मागे ज्ञान मिळवण्याची जिज्ञासा आहे ? काही भूमिका आहे ? पित्याने मत्सर करून पुत्राला यमलोकी धाडले असेल तर तो पित्याचा दोष आहे. यमराजाला भेटल्यावर प्रलोभनांना वश झाला तर तो कुमाराचा दोष म्हणावा लागेल. यमराजाने कुमाराचा अनादर केला तर त्याना दोषी समजावे लागेल. पण तसे काहीच नाही. ही सारी घटना ज्ञानाची भूमिका दृढ करण्यासाठीच घडलेली आहे.

'हे कुमार, तू यमराजाकडे जा.' या पित्याच्या आदेशामागे ज्ञान मिळवावे अशी प्रेरणा जागृत करण्याचा हेतू होता. त्याचप्रमाणे यमराजाने कुमाराला त्याच्या सर्व शंकाचे समाधान करून पित्याकडे परत पाठवले. यमराजाच्या कृपेने पित्याने प्रेमपूर्वक त्याचे स्वागत केले हे यमाचे अनुदानच होते.

गुरुकुलात राहून विद्या मिळवणारा विद्यार्थी विद्या प्राप्त करून पित्याच्या घरी परततो तेव्हा विद्या व कला यांच्या तेजाने तो तळपत असतो. त्याचप्रमाणे कुमार नचिकेता यमराजाकडून जीवनाचे रहस्य प्राप्त करून पित्याच्या घरी परतला.

यमलोक हे पुण्यशाली जनांना आनंद दायक असे विश्रामधाम आहे. पापी माणसांना त्याची भिती वाटते. पण ज्ञानी जनांना भिण्याचे काहीच कारण नाही. याविषयी नचिकेता म्हणतो,

'पुण्यशाली देवांच्या भावनेतून ज्याची रचना आली असे हे स्थान आहे. येथे आनंद विनोदासाठी दुंदुभी नाद होत असतो. व गोड शब्दात मधुर स्तुति गाने चाललेली असतात.'

कुमार नचिकेता सदेह यमलोकी जाऊन यमाकडून ज्ञान मिळवून मृत्युलोकी परतला आहे. त्याने जीवन व मृत्यु यांचे उत्तम ज्ञान मिळवले आहे.

## ८ श्रद्धांजलि :

त्या ऋषींचे नाव बृहदुकथ. आत्मज्ञानी वामदेवांच्या कुलाला त्यांनी भूषवले होते. इंद्राचा महिमा जाणून घेता घेता त्यांना रहस्य उलगडले होते.

'हे इंद्र, मी तुमच्या महत्तेचे कीर्तन करतो. पूर्वज व इतर अनेक ऋषि तुमचा महिमा जाणू शकले नाहीत. तुमची नावे व कामे अनेक आहेत. एक गोष्ट मात्र नक्की की तुमचा कोणी शत्रू नाही. व तुम्ही कोणाशी युद्धही केलेले नाही. पूर्वकालीन ऋषींनी तुमच्या पराक्रमांची व युद्धांची वर्णने केली आहेत पण ती मायिक आहेत. रूपकात्मक आहेत. ती काही वास्तविक घटना नाही.

आकाशातील सूर्याला ज्योति देणारे तुम्ही आहा. पंचमहाभूते तुम्हीच निर्माण केली. चौदा लोक, सात पदार्थ, तेवीस देव, पंचजन हे सारे विभाग तुम्हीच पाडले. देश आणि कालानुसार होणारी परिवर्तने, ऋतुधर्म व माणसांचे स्वभाव तुम्हीच घडवले.

हे इंद्र, इतर लोक पाहू शकत नसले, जाणत नसले तरी आकाशातील विराट शरीरापासून सर्वांची उत्पत्ति झाली आहे. आकाश हे तुमचेच गुप्त नाव आहे व त्याप्रमाणेच तुमचे गुण व कर्मे आहेत.'

याप्रमाणे इंद्राची कीर्ति गाता गाता त्या ऋषींनी दर्शन, विवेक ज्ञान मिळवले होते. जीवन व्यवहारातील गहन गुंतागुंत सोडवण्यासाठी ऋषींच्या विवेकज्ञानाचे साह्य होई.

त्यांना एक पुत्र होता, त्याचे नाव वाजि. त्याच्या मातेने स्वत: तहान-भूक सहन करून अन्नरसाने या पुत्राचे पोषण केले होते. स्वत: दु:ख सहन करून त्याला वाढवले होते. त्याचप्रमाणे पित्याने कष्ट सहन करून त्याला विद्या दिली होती. मातापित्याचे हे जीवनच होते. आपला पुत्र दीर्घायुषी व्हावा. त्याने कुल गोत्र व संतान परंपरेचे रक्षण करावे अशी त्यांची भावना होती.

पण त्यांच्या साऱ्या इच्छा मनातच राहिल्या व पुत्र मरण पावला. तोंडचा घास काढून वाढवलेला पोटचा गोळा असा गेला म्हणून माता आक्रोश करून रडू

लागली. पित्यालाही दुःख, शोक संताप होतच होता. पण त्यांच्या मनात विचार आला. 'हे असे का झाले ? कसे झाले ? पित्याच्या आधी पुत्राने जावे–हे घडलेच कसे ?'

त्यांची विवेकबुद्धी सचेत झाली. आपला उपाय चालत नसेल तेथे शोक करण्यात अर्थ नाही. मन कठीण करून त्यांनी पुत्राचे शव उचलले. त्याला अग्नि-दाह दिला व श्रद्धापूर्वक अंजलि देताना ते म्हणाले,

'अरे माझ्या प्रिय पुत्रा, तुझ्या शरीरातील अग्निचा अंश महानलात मिसळून जावो. शरीरातील प्राणवायु अंतरिक्षातील वायुमंडळात सामावून जावो व शरीरातील चैतन्य आकाशातील आदित्य पुरुषाच्या ठायी विलीन होवो. सूर्यमंडलात वसणारा आदित्य पुरुष हा देवांचाही परम पिता आहे. तुझा प्रिय आत्मा त्याच्या ठायी विलीन होऊन तुझे परम कल्याण होवो असेच मी इच्छितो.'

'हे प्रिय पुत्र वाजि, तुझ्या शरीराचा स्थूल भाग पृथ्वीच्या योगाने घडलेला आहे. तरी ते शरीर पृथ्वीसह एकरूप होवो. तुझ्या कोठल्याही अंशाचे पतन न होवो. विश्वेदेव व आकाशात तळपणारा सूर्य तुझी प्राणज्योति धारण करण्यास सिद्ध आहेत त्यांच्यात तू मिसळून जा. त्या योगाने तुला सुख शांति लाभो. व आमची मनेही शांत होवोत.

हे वाजि, अन्न व रसातील पोषक तत्व 'वाजी' तुझ्या शरीरात होते त्यामुळेच तू हृष्टपुष्ट होतास. अग्नि, सूर्य, वायु या देवांचे चैतन्य तुझ्यात खेळत होते. त्यामुळे तू सुंदर होतास.

हे प्रिय पुत्र, ज्या वाणीच्या प्रेरणेने मी तुझे गुण गातो आहे त्या मूल वाणीत तुझी वाणी विराम पावो. तुला प्रेरणा देणाऱ्या आकाशाशी तुझे मन एक रूप होवो. जीवन धारणा करणाऱ्या सनातन सत्य धर्माचे तू पालन केले आहेस त्या धर्मात तुझा धर्म मिसळून जावो. इंद्रादि प्रेरक देवता व आकाशातील आदित्य यांच्याशी तू एक रूप हो.

हे पुत्र आपल्या पूर्वजांनी आपले तेजस्वी अंश देवरूपात विलीन केले व ते स्वतःच देवरूप झाले. त्याचप्रमाणे तूही देव हो.

आपल्या प्रियपुत्राला या प्रमाणे श्रद्धांजलि देताना बृहदुकथ ऋषि त्याच्या जीवात्म्याला चैतन्य स्वरुप आदित्याशी एकरुप व्हावे अशी प्रेरणा देत आहेत. नदी ओलांडण्यासाठी यात्रिक सुंदर नावेचा उपयोग करतात व व्यवहारी माणसे संसारातील संकटातून पार पडण्यासाठी विविध साधने वापरतात त्याच प्रमाणे हा पिता पुत्राच्या जीवात्म्याला चिरशांती लाभावी अशा साधनाचा निर्देश करीत आहे. बृहदुकथ ऋषींनी श्रद्धापूर्ण शब्दांनी आपल्या प्रिय पुत्राचे अंश व चैतन्य इंद्र वगैरे देवता व आदित्य मंडलातील चैतन्य पुरुषात विलीन केले.

खरोखर प्रिय व्यक्तीच्या मृत्युने व्यथित होऊन माणसे शोक करतात. परंतु विवेकीजन त्यांच्या जीवात्म्याच्या सुख शांतीचा व कल्याणाचा विचार करतात.

## ९ मृत्युला आव्हान :

असमाती इक्ष्वाकु वंशातील राजा होता. बंधु, सुबंधु, श्रुतबंधु व विप्रबंधु हे त्या राज्याचे पुरोहित होते. अगस्त्य मुनींची बहीण गोपा ही त्या चौघांची माता म्हणून त्यांना गोपायन म्हणत.

राजाने एक महायाग करण्याचे ठरवले. पुरोहितांना घेऊन तो खांडव वनात गेला. यज्ञाची साधने व सामुग्री जमवण्याची सुरुवात झाली. अरण्यात बसणाऱ्या ऋषिमुनींना यज्ञाची आमंत्रणे दिली.

अरण्यात असुरही रहात होते. किलात व अकुलि नावाचे त्यांचे पुरोहित होते. त्यांनी आपल्या मायावी विद्येच्या योगाने राजाला वश करून घेतले. व त्या दोघांच्या सांगण्याप्रमाणे यज्ञ करण्यास राजा सिद्ध झाला. गोपायन मात्र त्या मायेने प्रभावित झाले नाहीत.

असुरांच्या मायावी जादूमुळे राजा पराधीन होऊन गेला होता. त्यांच्याच डोळयांनी तो जणू पहात होता. त्याने आपल्या चारी पुरोहितांचा अपमान करून त्यांना हाकून दिले. असुरांची पुरोहितपदी स्थापना केली. व यज्ञाला प्रारंभ केला.

चारी गोपायन बंधू खांडववन सोडून निघून जाऊ लागले. पण अरण्यवासी ऋषींनी त्यांना अडवले. असुरांचा त्रास नाहीसा करण्यासाठी त्यांनी उपाय विचारला. गोपायनांनी त्यासाठी यज्ञाचा प्रयोग सुचवला. त्यानुसार ऋषींनी यज्ञाला प्रारंभ केला.

असुर पुरोहितांना हे वर्तमान कळले. राजाचा यज्ञ तसाच अर्धवट टाकून ते ऋषींच्या यज्ञात विघ्न निर्माण करण्यासाठी धावले. ते दोघेही मायावी होते. त्यांनी कपोताचे रुप घेऊन यज्ञ शाळेत प्रवेश केला. त्यावेळी एकटा सुबंधू तेथे होता. दुसरे भाऊ वनात गेले होते.

त्या दोन्ही कपोतांनी सुबंधूवर आक्रमण केले. चोचीच्या व पंखांच्या प्रहरांनी त्याला विद्ध करून तो मूर्छित पडल्यावर ते उडून गेले. थोडया वेळाने तिघे भाऊ परत येऊन पहातात तो यज्ञाग्नि जवळ सुबंधु गतप्राण होऊन पडला होता. भावाची ती अवस्था पाहून तिघेही गोपायन शोकमग्न झाले.

त्यांची माता गोपा हिला हे कळल्यावर तिने राजा आसमतिकडे जाऊन त्याच्या कानावर हे वर्तमान घातले. राजाचा यज्ञ अर्धवट पडला होता. त्यालाही

आसुरांचे कपट कळून चुकले होते. राजाला घेऊन गोपा ऋषींच्या यज्ञशाळेत गेली. तेथे सुबंधुचा अचेतन देह पडला होता.

राजाबरोबर अत्रि ऋषि आले होते. त्यांनी गोपायनांना धीर दिला व सुबंधूस पुन: जिवंत करण्यासाठी प्रेरणा दिली. गोपायन ऋषि होते. त्यांनी दिव्य मंत्रशक्ति मिळवलेली होती. त्यांनी राजानें आरंभलेल्या यज्ञात भाग घेऊ न शकल्यामुळे प्रथम इन्द्राची स्तुति करून त्याची प्रार्थना केली.

'हे देवराज इन्द्र, आम्ही गोपायन, राजाच्या पुरोहितपदी राहून आम्ही यज्ञमार्गास अनुसरीत होतो. परंतु आम्हाला त्या मार्गावरून काढून लावल्यामुळे आम्ही मार्ग चुकलो. त्याचे कारण असुरांची मायाच आहे. ते मायाजाल आपण दूर करावे. सोमयाग करणाऱ्या राजाने आमचा पुन: स्वीकार करावा. जो अग्नि यज्ञाचा विस्तार करून देवांना बोलावून आणतो तो आम्हाला पुनरपि प्राप्त व्हावा. या प्रकारे सोमराजानेही आमच्यावर कृपा करावी.'

इन्द्र, आग्नि व सोम यांची या प्रकारे स्तुति केल्यावर ऋषींचे मन शांत झाले. उद्वेग दूर झाला. सुबंधूच्या अंगावर प्रेमाने हात फिरवून त्यांनी आवर्तन सूक्ताचा जप करण्यास सुरुवात केली. त्या योगाने स्थूल शरीर सोडून गेलेल्या मनास पुन: बोलवता येते. इन्द्रिय, प्राण व सूक्ष्म शरीर यांच्याबरोबर मनही स्थूल शरीर सोडून परलोकी निघून जाते. ते कोठल्या लोकात जाते ते कळत नाही. गोपायन सुबंधुच्या मनाला संबोधून म्हणाले,

'हे बंधो सुबंधु, आम्हाला सोडून तुझे मन दूर निघून गेले आहे. त्याला आम्ही परत येण्यासाठी विनवित आहो. आमच्या जवळ राहिल्यास त्याला पुन: जीवन प्राप्त होईल. आम्हीं त्याला बोलावीत आहो. दूर दूर असलेल्या कोठल्याही लोकात ते गेले असले तरी तेथून त्याने परत यावे म्हणून आम्ही पुन: पुन त्याला बोलावीत आहो.

हे बंधो, यमराजाचा यम लोक हे जीवांचे विश्राम स्थान आहे. तुझे मन त्या लोकी पोचले असले तर तेथून आम्ही त्याला परत बोलावीत आहोत. त्याचप्रमाणे ते द्युलोकात अथवा पृथ्वि लोकातील चार दिशात वा चार विभागात विभागलेल्या भू लोकात, समुद्र प्रदेशात, अंतरिक्षातील किरणात, आकाशामध्ये सूर्य, उषा वा जल अथवा औषधींच्या ठिकाणी तें गेले असेल, दूर पर्वत शिखरावर अथवा विविध लोकांच्या पलिकडे अज्ञात प्रदेशात किंवा भूत वा भावि कालात जरी ते गेले असले तरी असेल तेथून ते परत येवो व तू पुन: सजीवन हो.'

गाढ झोपेत विलीन झालेले मन जागृतावस्थेत यावे, त्याप्रमाणे मूर्च्छितदशेत

पडलेले मन परत येऊ शकते. परंतु जर मृत्यूच्या तावडीत ते सापडले असल तर त्यातून ते मुक्त व्हावे म्हणून ऋषींनी प्रार्थना केली.

'हे प्रभो, निर्ऋति–मृत्यू सर्वनाशक आहे. तथापि तुम्ही कृपा केली तर सुबंधुला नवजीवन प्राप्त होऊ शकेल. त्याचे प्राण हरण करणारी निर्ऋति देवी याचे प्राण मुक्त करून दूर दूर जावो. आम्ही तिच्या मनात दयाभाव जागवण्यासाठी तिची करुणा भाकतो. तिची भेटपूजा करून तिला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करतो आम्ही दिलेल्या भेटी स्वीकारून ती दूर दूर जावो.

जीवनात रस निर्माण करणाऱ्या सोमराजा, तुम्ही जीवनरसाचे दान देता. कृपा करून आम्हाला मृत्यूच्या आधीन होऊ देऊ नका. जीवित राहून दीर्घकाल सूर्याचे दर्शन करण्याचे भाग्य आम्हाला लाभो व रात्रंदिवस आमच्या शक्तीचे हरण करणारी निर्ऋति आमच्यापासून दूर राहो.

हे प्राणदायिनी देवी, या शरीरात मनाची पुन: स्थापना करा. आम्हाला दीर्घ जीवन लाभावे म्हणून आमचे आयुष्य वाढवा. आमचे जीवन सूर्याच्या प्रकाशाने उजळो व आमचे आयुष्य वाढो.

पृथ्वी या शरीरात नवे प्राण घालून नवजीवन देवो. त्याचप्रमाणे द्यौ-पिता व अंतरिक्षातील देव आम्हाला प्राणदान देवोत. राजा सोम या शरीराला नव जीवन देवो. लोकांचे हित व कल्याण करून मानवांना उत्तम मार्ग दाखवणारे देव पूषा आम्हाला स्वस्ति आशिर्वाद देवोत.'

याप्रमाणे त्या ऋषींनी मनाला परत बोलावण्यासाठी मन आवर्तन सूत्र गाऊन शिवाय निर्ऋति देवीची अनुकंपा जागृत व्हावी म्हणून तिची स्तुतिही केली. ऋषींच्या मंत्रवाणीचा इच्छित परिणाम होत होता. सुबंधुच्या शरीराचे हलन चलन बंद होऊन तो गतप्राण झाला होता. पण हळू हळू त्या शरीरात चैतन्य येईल अशी आशास्पद लक्षणे दिसू लागली.

गोपायन ऋषि व माता गोपा आतुरतेने त्याच्याकडे पहात होती. त्यांनी राजा आसमतिकडे पाहिले. तोही दु:खित झाला होता. पुरोहिताच्या मृत्यूला तोच निमित्त झाला होता. त्याला आपली चूक उमगली होती. व त्याच्या मनात सद्भाव जागा झाला होता. ते पाहून ऋषींनी स्नेहभावाने म्हटले, 'हे राजन्, आम्ही तुझ्याबरोबर यज्ञकार्य करण्यासाठी या खांडववनात येऊन राहिलो. आपण राजे आहात. समर्थ आहात. आम्ही तुम्हाला वंदन करतो. तुम्ही शत्रूंचा नाश करणारे असून स्नेहीजनांच्या हितासाठी तत्पर असता.

'हे देवराज इंद्र, आकाशात तुम्ही सूर्याची स्थापना केली त्याप्रमाणे आम्हा प्रजाजनांच्या भल्यासाठी तुम्ही राजा आसमतीला शक्ति द्या.

अगस्त्यमुनींची बहीण गोपा हिने पण राजाची स्तुति केली. त्यामुळे राजा प्रसन्न झाला. त्याच्याबरोबर आलेल्या अत्रींनी यज्ञशाळेत प्रदिप्त झालेल्या अग्निनारायणाची स्तुति केली. गोपायनांनीही आपला सूर त्यात मिसळला त्यामुळे प्रसन्न होऊन अग्निनारायण प्रगट झाले व म्हणाले,

'तुम्ही सर्व भाग्यशाली आहात. सुबंधूचा जीवात्मा त्याच्या शरीरात पुनः आलेला आहे. यज्ञशाळेत मी त्याचे रक्षण केले होते. तुम्ही त्याला बोलवा. तो सजीवन होईल.' याप्रमाणे सांगून व ऋषीना शुभ आशीर्वाद देऊन अग्निदेव अदृश्य झाले. सुबंधूच्या शरीरावर हात फिरवीत गोपायन त्याच्या जीवात्म्याला आवाहन करू लागले.

'हे सुबंधु या वेळी अग्निदेव हेच तुझे जन्मदाते आई बाप आहेत. कारण त्यांनी तुझ्या प्राणांचे रक्षण करून तुला पुनर्जन्म दिला आहे.'

'अग्निशालेत तुझे शरीर सुरक्षित आहे. त्यात हे जीवात्म्या तू पुनरपि प्रवेश कर. कारण ते सोडून तू दूर गेला होतास. पण अग्निने तुला बांधून ठेवले व तुझे आयुष्य वाढवले. मृत्यु तुझ्यापासून दूर राहो. तुझे जीवन दीर्घ व मंगल होवो· पृथ्वी जशी विशाल वृक्ष धारण करते तसे अग्निने तुझे प्राण धारण करून तुला वाचवले आहे.

तू यमराजाच्या वैवस्वत लोकात विश्राम घेत होतास तेथून आम्ही तुला बोलावून आणले आहे, आता मृत्यु दूर सरला आहे. व तू पुनर्जीवन प्राप्त करून घेतले आहेस. वायु ज्याप्रमाणे सर्वत्र संचार करतो, सूर्य जसा सर्वत्र प्रकाशतो, गाई जशा इच्छेप्रमाणे दूध देतात त्याप्रमाणे तू परोपकार करीत दीर्घकाल हे नवजीवन भोग. तुझी सर्व पापे नष्ट झाली आहेत.

सुबंधूच्या शरीरात मनाने व जीवात्म्याने प्रवेश करताच तो सजीव झाला. त्याच्या कायेत चैतन्य निर्माण झाले. मुखावर प्रसन्नता दिसू लागली. तें पाहून ऋषि म्हणू लागले,

'हे सुबधु आम्ही तुझ्या अंगावरून हात फिरवीत आहो. आमचे हातही भाग्यशाली आहेत. तुझ्या शरीरात प्राणांचा संचार झाला म्हणून आम्हाला अत्यानंद होतो आहे. एखादी जडीबुट्टी नाकाशी धरताच निष्प्राण झालेला माणूस सजीवन होतो तसा आमच्या स्पर्शाने तू जिवंत झाला आहेस. तुला पाहून आम्ही सर्व तुष्ट झालो आहोत आमच्या स्पर्शाने तुझे जीवन मंगलकारी होवो.'

गाढ झोपलेला माणूस झोपेतून उठावा त्याप्रमाणे सुबंधु उठला. ऋषींना प्रणाम करून माता गोपा व गोपायन बंधूना भेटून तो खूपच प्रसन्न झाला.

★★

# ३३ / नारी तू नारायणी

(ऋग्वेद १० वे मंडल)

## प्रेमळ पुत्रवधू

आदि प्रजापतीचा पुत्र वसुक्र मोठा अद्भुत ऋषि होता. त्याने देवराज इंद्राला पितृस्थानी मानले होते. इतकेच नाही पण 'आत्माच पुत्र या नावाने विचारतो' या भावनेने पिता आणि पुत्र एकात्मक आहेत या भावदर्शनातून हे ऋषि निसर्गात रहाणाऱ्या चेतन पुरुषाकडे पहात होते.

एक आदि पुरुष आहे. तो निर्गुण निराकार आहे. त्याचा पुत्र सगुण पुरुष आहे प्रकृती त्याला पसंत करते. त्यांच्या संयोगातून विश्व निर्माण होते. पुरुष हा पुत्ररुप असला तर प्रकृति पुत्रवधूच झाली की !

ऋषींना मूलतत्वाचे जे ऐक्य जाणवले त्याचबरोबर पुरुष प्रकृतिची विविधता पण त्यानी निरखली आहे. त्यांनी त्यावर काव्ये रचली आहेत.

'हे मूळ पुरुष इन्द्र, तूच सर्वात आधी प्रगट झालेला पुरुष असून तूच ही पृथ्वी निर्माण केली आहेस. विविध प्रकारच्या जीवसृष्टीचा विस्तार करणारा पुरातन पुरुष तूच आहेस. तुझ्याहून पर-श्रेष्ठ कोणी नाही.

हे इन्द्र, तू कारण-रूप असून प्रकृति तुझ्या ठायी लीन झाली आहे. तू सगुण रुप धारण केलेस तेव्हा तुझा व प्रकृतीचा संयोग झाला. प्रकृति अंध असून जड आहे. चेतन पुरुषाने तिला पसंत केली की तिने त्याला पसंत केले कोण जाणे !

कामना करणाऱ्या पुरुषाला वश होणारी नारी म्हणजे खरोखरी कोण असावी बरे ? खरे पहाता ती कल्याणमयी आहे. स्वयंवरात जिने पतीला पसंत करून वरले आहे व त्याला मित्र, सहचर केले आहे ती कल्याणीच असते.

इन्द्र म्हणा किंवा प्रजापति म्हणा तो सृष्टीचा निर्माता आहे. पिता आहे. त्याने सात ऋषि, आठ मुनी, नऊ भृगु, दहा अंगिरा वगैरे निर्माण केले. त्यात वसिष्ठ, विश्वामित्र, बालखिल्य, कपिल आदि मुख्य होते.

हे अंतरात्मन, तूच इंद्र आहेस. तूच आदित्य आहेस. सृष्टीतील झाडाझाडावर वनावनातून तुझीच विविध रुपे दृष्टीस पडतात. प्रकृति चेतनासह जीवनाचा प्रारंभ करते.'

ऋषि वसुक्र याप्रमाणे पुरुष व प्रकृति यांचे दर्शन करून जीवनात आनंदाचा शोध घेतात. आत्म्याचे ऐक्य त्यांच्या हृदयात नांदते आहे व ते जीवनाला यज्ञरुप मानणारे आहेत. आत्म पुरुषाचे यजन करणे हे त्यांच्या दृष्टीने जीवन आहे.

ऋषि विद्येच्या योगाने आत्मज्ञानी झाले होते. त्यांना जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव घ्यायचा होता. त्यांना अनुरुप प्रेमळ पत्नीही लाभली व त्यांनी सुखाने संसार केला.

ऋषीच्या अंगणात कामधेनू बांधलेली होती. त्यांच्या घरात कामधेनू-सारखीच गृहिणी होती आणि कंठात तशीच सर्व कामना पूर्ण करणारी वाणी वास करीत होती. धनसाधन समृद्ध झालेल्या वसुक ऋषींना आपण सोमयाग करावा अशी इच्छा झाली. उंच पर्वत शिखरावरून सोमवल्ली आणली. यजमान व त्यांची पत्नी दोघांनी विधीपूर्वक सोमरस तयार करून चमस पात्रे भरली व पवमान सोमाचे पान करण्यासाठी एकेका देवाचे आवाहन करून त्यांना आसने देऊन स्थानापन्न केले. सोमयागाची मुख्य देवता इंद्र आहे. सोमरस निघू लागला, पवमान पवित्र होऊन पात्रे भरू लागली की आवाहन करताच इन्द्र त्वरेने त्या ठिकाणी जाऊन पोचतो व दुसरे देव त्याच्या मागून येतात.

परंतु या ठिकाणी इतर सर्व देव उपस्थित झाले. इंद्रच आला नाही. यजमान सोमरस देण्यास उठले तेव्हा पत्नीने मधुर वाणीने विचारले, 'स्वामीनाथ, सारे देव आले आहेत ना ?'

'होय देवी, आपण विश्वेदेवांना आवाहन केले व सर्व देव त्याप्रमाणे उपस्थित झाले आहेत.'

'पण महाराज, देवराज इन्द्र कोठे आहेत ? आपण त्यांना बोलावले नव्हते काय ?'

'देव इन्द्र म्हणजे माझा पिता. पिता व पुत्र यांच्यात भेद नाही. मी उपस्थित आहे तेव्हा इन्द्राची उपस्थिति असल्यासारखीच आहे.'

'हे खरे असले तरी आपले तात म्हणजे माझे श्वशुर ना? मी इन्द्र म्हणून काय आपले पूजन करू ?'

'हं. ही गोष्टही विचार करण्यासारखी आहे. आत्मीय भावाने मला पिता व पुत्र एकच आहेत असे वाटले व मी पित्याला आमंत्रण दिले नाही.'

'पण स्वामीनाथ, तसे पाहिले तर आत्मीयभावाने हे इतर विश्वेदेवही वेगळे थोडेच आहेत? आत्म्याचेच यजन करायचे असेल तर कोठल्याच देवाला आवाहन करण्याची आवश्यकता नाही. आपल्या घरी सोमयाग केला आहे. इतर देव आले आहेत आणि माझे श्वशुर, आपले तातच उपस्थित नाहीत. तर यागाची शोभा ती काय ?'

'देवी, मी चुकलो. पण आता काय करायचे ? सारे देव तर आलेले आहेत. आता शेवटी देवराजाला बोलवायचे म्हटले तर तीही चूकच होणार नाही का?'

'पिता पुत्राला क्षमा केल्याशिवाय कसा राहील ? माझे श्वशुर निश्चित येतील. सोमपान करून प्रसन्न होऊन जातील. आपण त्यांना आवाहन तर करा.'.

ऋषींनी आवाहन करताच देवराज तेथे जाऊन पोचले व प्रसन्न होऊन गोड शब्दात म्हणाले,

'पुत्र वसुक, आणि प्रेमळ स्नुषे, सोमयाग मला विशेष प्रिय आहे. माझ्या पुत्राने सोमयाग करावा आणि माझीच उपस्थिति नाही हे कसे होईल ? परंतु मला तुमची परीक्षा करायची होती. मी येथेच होतो. तुमचा संवाद ऐकून मी प्रसन्न झालो. तुमचा सोमयाग सफल होवो.

ऋषिपत्नीने प्रेमादरःपूर्वक देवराजाचे आतिथ्य करून त्याला सोमरस अर्पण केला. त्या उभयताना शुभाशिर्वाद देऊन इन्द्राने निरोप घेतला.

## २ जुगाऱ्याची पत्नी :

'अरे पहा पहा. माझ्या हातात खेळणारे हे फासे कसे चमकत आहेत. त्यांना स्वतःला डोळे नसले तरी भलभल्या डोळस माणसांना आंधळे करण्याचे सामर्थ्य या फाशांच्या ठिकाणी आहे म्हणून तर फाशांना 'अक्ष' असे म्हणतात. त्याना स्वतःला हात नसले तरी माझ्या हातानी ते खेळतात व ते फेकले की भलभल्यांचे हात ते असून नसल्यासारखे करून टाकतात. विरोधकांना हार देण्यात त्यांच्यासारखे कोणी नाही.

या फाशातच माझा विजय आहे. अरे हो! तो देवांचा राजा इंद्र आहे, त्याला सोम केवढा प्रिय आहे. कारण काय माहिती आहे ? सोम चमकतो. माझे

फासेही सोमासारखेच चमकणारे, चकचकीत आहेत. त्यांचें व सोमाचे जन्मस्थान पण मुंजवान पर्वतावरच आहे. सोमामुळे देव प्रसन्न होतात. माझा देव हे माझे अक्ष आणि त्याना पाहून प्रसन्न होणारा मीही देव. इंद्र नाचतो, तशी इंद्रिये नाचतात !

जुगार खेळणारा तो जुगारी धुंद झाला होता. हातात खेळणाऱ्या त्या फाशाकडे पहात तो मनासारखे डाव टाकीत होता व विजय मदाने धुंद होऊन त्या फाशांचा महिमा गात होता.

'अरे जुगारी माणसा ! फाशावर तुझे येवढे प्रेम ? तुझ्या पत्नीला देखील त्यांच्यामुळे विसरलास ? तुझ्या कुटुंबियांना विसरलास ? लोक लाजही सोडलीस! तुला काहीच कसे वाटत नाही ?'

त्याच्या हितचिंतक मित्राने त्याला विचारले. पण त्या मित्राची चेष्टा करून तो हसत हसत म्हणाला,

'अरे भल्या माणसा, डाव जिंकून धन दिले की बायको राजी होते. त्यात काय मोठे ? तिचा माझ्यावर रागही नाही आणि मी जुगारी आहे याची तिला काही लाजही वाटत नाही अरे तिचे पाठबळ आहे म्हणून तर मी डाव जिंकतो. मी हरलो तर ते मात्र तिला आवडणार नाही हं !'

'अरे वेड्या, डाव हरल्यावर तुझी दशा काय होईल, तुला माहिती आहे ? तुझी पत्नी कदाचित् काही म्हणणार नाही. पण तिची आई तुला दोष देऊ लागेल व नंतर पत्नीही तुझी निंदा करू लागेल आणि मग हे फासेही तुला असे सुखद वाटेनासे होतील.'

'मी तसे मानत नाही. डाव जिंकलो की जी साथ देते ती पत्नी मी हरलो की साथ देईनाशी होईल ? डाव हरलोच तर मी माझे सारे धन पैजेला लावीन. अरे बायकोला देखील पणाला लावताना मला काही संकोच वाटणार नाही. जीवन हरलो तरी चालेल. पण हे फासे मी सोडणार नाही. तेच माझे दैवत आहेत.'

जुगारी जिंकतो तेव्हा सारेजण त्याला साथ देतात. पण तो हरू लागला की एक एक जण दूर जाऊ लागतो. जुगार हरला, कर्ज झाले, राजसेवक येऊन त्याला पकडून नेऊ लागले की त्याला सोडवण्यासाठी कोणीही पुढे येत नाही. सर्व आप्त संबंधी अशावेळी मागे सरतात. फार काय पण भाऊ, बाप देखील संबंध ठेवीनासे होतात.

अशा जुगाऱ्याची पत्नी रडून कल्पांत करू लागते. तिचे सर्वस्व लुटले गेले तरी जुगाऱ्यास त्याचे काहीच वाटत नाही. फासे खेळणे तो सोडूच शकत नाही.

तो पटाची पूजा करून फाशांनाच हात जोडीत रहातो. भलभल्यांचा गर्व उतरतो. अभिमान जातो पण जुगाराची सवय सुटत नाही.

याप्रमाणे जुगारी हरला, त्याची अशी दुर्दशा झाली, त्याच्या पत्नीच्या अंगावर लक्तरे लोंबून तिची दशा भिकारणीसारखी झाली. इतर स्त्रीया नटून सजून समोरून जाताना पाहून त्याला संताप येऊ लागला पश्चात्ताप होऊ लागला— अशा अवस्थेत ऋषि त्याला उपदेश करतात,

' अरे बाबा, फाशांनी जुगार खेळणे तू सोडून दे. जमीन नांगरून शेती कर. त्यामुळे तन सुधारेल. साधन व धन प्राप्त होईल. प्राप्ती थोडी झाली तरी त्यात आनंद मानून रहा. त्यामुळे तुला संतोष मिळेल. मन शांत होईल. तुझ्या स्त्रीवर रडण्याचा प्रसंग येणार नाही. तुझ्या दारी गायी येतील व सदैव तळपणारा सूर्य तुझ्या भाग्योदयाला साह्य करील.' हे अक्षसूक्त गाणारे ऋषि आहेत. कवष ऐलूष. माता इलूषाचा हा पुत्र मंत्रद्रष्टा ऋषि आहे. जुगाऱ्याच्या बायकोची दशा पाहून वाटलेल्या अनुकंपेतून हे सूक्त निर्माण झाले. जुगाऱ्याला व्यसनमुक्त करून त्यांनी शेतीच्या धंद्यास लावले व त्याचे कल्याण केले.

## ३ कायाकल्प :

घोषा राजकुमारी होती. तिचा पिता कक्षिवान मंत्रद्रष्टा राजर्षि होता. वाढत्या चंद्रकलेप्रमाणे घोषा दिवस मासानी मोठी होत होती. राजभवनात ती वाढली व तिने यौवनात प्रवेश केला. त्या अवस्थेत तिचे मन चंचल होऊन नवे नवे मनोरथ रचू लागले. पण मनाशी तनाचा सुमेळ मात्र नव्हता.

घोषेच्या शरीरावर कोडाचा एक डाग होता. तोही दिवसेंदिवस वाढत चालला. कायेचा तो कलंक दूर व्हावा म्हणून अनेक औषधोपचार केले, परंतु ते सारे निष्फळ ठरले. डाग वाढतच गेले व घोषा कुरुप झाली.

घोषा गुणी होती. मधुर भाषिणी होती. अनेक विद्या व कला तिला अवगत होत्या. विनयाने त्या अधिकच शोभत होत्या. पण त्या सर्वाहून बलवत्तर असा हा एक दोष तिच्या सुखा आड येत होता. तिच्याशी लग्न करण्यासही कोणी तयार झाले नाही.

घोषेने आपल्या मनाची तयारी केली होती. लहानपणीच तिने आपल्या आजोबांना, ऋषि दीर्घतमाना पाहिले होते. त्यांच्या अंगाखांद्यावर ती खेळली होती. त्यांची दृष्टी गेली तरी त्यानी जीवनाचा विकास रोधला नव्हता. ते तिने प्रत्यक्ष पाहिलेले होते.

तिच्या आजोबांनी हसत खेळत आयुष्य पुरे करून जगाचा निरोप घेतला' पित्याच्या शरीरावर वृद्धत्वाच्या खुणा दिसू लागल्या. मुलावर राज्याचा भार सोपवून राजा कक्षीवानाने वानप्रस्थाश्रम स्वीकारला. घोषा पण पित्यासह आश्रमात राहू लागली.

तिच्याविषयी पित्याला पूर्ण अनुकंपा होती. तिला उणे वाटावे असे वाणीत किंवा वर्तनात काही येऊ नये म्हणून ते सावधान रहात. राजर्षींने स्वतः अश्विनी-कुमारांची स्तुति करून आपल्या तनामनाचे आरोग्य उत्तम प्रकारे सांभाळले होते. भट्टीत तापून सोने शुद्ध होते, त्याप्रमाणे तपाचरणाने त्यांची काया कांचनासारखी झाली होती.

घोषेचे शरीर बेडौल व वृद्धही दिसू लागले. तिला पहाताच मुलाबाळांना तर तिची भितीच वाटे. मृग व त्यांची शावके तिच्यापासून दूर पळून जात, निसर्गही जणू तिचा तिरस्कार करू लागला. तिची स्थिती असह्य होती. ती एकटी पडली होती. ती कुमारी होती. ब्रह्मवादिनी होती. पित्याने उत्तम विद्या दिली होती. मनात दिव्य मंत्र घोळत होते. तरीही ही दशा सहन होईना. तिने दिव्य मंत्र वाणीने देवांचे वैद्य जे अश्विनीकुमार त्यांची स्तुति करण्यास सुरुवात केली.

'हे अश्विनीकुमारांनो, तुम्ही दोघे रथावर आरुढ होऊन यजमानाचे आमंत्रण स्वीकारून त्याच्याकडे त्वरेने जाऊन पोचता व त्यांच्या कामना परिपूर्ण करता. हे भल्या देवानो तुमचा वेळ तरी कसा जातो? रात्रंदिवस, पक्षमास. ऋतू आणि वर्षे या कालक्रमणेतून पसार होताना मला असह्य वेदना होत आहेत.

हे कृपाळू देवांनो, माझ्यावर कृपा करा. माझी वाणी मधुर असो. माझे सारे मनोरथ पूर्ण होवोत. माझ्या कार्यात सफलता मिळून माझे जीवन धन्य होवो.

भगवन् आपण अनेकजणांच्यावर अनेकपरींनी उपकार केलेले आहेत. वृद्ध कवि च्यवन भार्गवांना तुम्ही नवजीवन दिले. विश्पलेला लोखंडी पाय दिले. पुरु-मित्राची कन्या कमद्यु हिला विमदासारखा पति दिला. अत्रि ऋषींना बंधमुक्त केले. वध्रिमतीला प्रसूतिवेदनातून सोडविले. कुत्साला तुम्ही विजय मिळवून दिला. अशी आणखीही किती तरी परोपकाराची कामे तुम्ही केली आहेत.'

घोषेने केलेली ही स्तुति ऐकून अश्विनीकुमार प्रसन्न झाले. ते तिच्या समीप प्रगट झाले व तिच्या रोगजर्जर कायेवरून हळूवारपणे हात फिरवून ते म्हणाले,

'हे पुत्री, तू आमचे स्मरण का बरे केलेस ? तुझी मनोवांछना काय आह ?'

आपली अपंग, बेडौल रोगिष्ट झालेली काया तिने त्या देवांच्या पायावर लोटून दिली व ती हात जोडून त्यांना म्हणाली,

'हे कृपावंत देवानो, अपंग, पतितांचे तुम्ही उद्धारक आहात. तुम्हाला शरण येणाऱ्या अनाथांचे नाथ आहात. नेत्रहीन, निर्बलांना तुम्ही तारून नेता. मी अभागिनी अगदी एकाकी आहे. मला कोणी बांधव नाही. स्नेही वा सखी नाही. जीवनात कोणाचांही आधार नाही. मी तुम्हाला शरण आले आहे. तुम्हीच काय तो माझा आधार आहात.'

'कुमारी तुझी इच्छा काय आहे ते आम्हाला सांग.'

'भगवन्, आपण दोघे देवांचे भीषग्वर आहात. कुशल कारागिर मोडका रथही पूर्ववत् करतो त्याप्रमाणे तुम्ही च्यवनांची जीर्ण काया निरामय केली होती. कायाकल्प करून त्यांना नवजीवन दिले होते. माझ्या जीर्णशीर्ण कायेवरही कृपा करून ती निरोगी करा.'

'हे कुमारी तुझे जीवन निर्मल असून तुझी भावनाही शुद्ध आहे. तू उत्तम प्रकारे तप करून कायेलाही वळवलें आहेस. या सर्वांच्या योगाने तुझ्या कायेचा निश्चितच कल्प होईल. साप कात टाकतो त्याप्रमाणे ही जर्जर काया टाकून तू तेजस्वी व रोगमुक्त शरीर प्राप्त करून घेशील.'

'कृपावंत देवानो, कायेचा कल्प झाला, ती निरोगी झाली तरी पुढे काय ? जीवन प्राप्त झाले तरी त्याचे साफल्य कसे होईल ?'

'हे सुभगे, तुझे भाग्य उज्वल आहे. अर्जुन नावाचा उत्तम लक्षणी पुरुष स्वतःच तुला शोधीत येईल व तुझा पुत्र मंत्रद्रष्टा सुहस्त्य या नावाने प्रख्यात होईल. अशाप्रकारे तुझ्या जीवनाचे सार्थक होईल.'

या प्रमाणे घोषेला निरोगी असे नवजीवन प्राप्त झाले. योग्य काळी ऋषि अर्जुनाबरोबर तिचा विवाह झाला. राजर्षि कुक्षिवानालाही धन्य धन्य झाले व घोषा आणि अर्जुन यांच्या मंगल सहजीवनाचा आरंभ झाला.

## ४ वीर पुत्राची कामना :

ती असुर कन्या होती. तिचे नाव होते विकुंठा. विश्वकर्मा प्रजापतींने तिला पत्नी म्हणून पसंत केले. त्यांच्या विवाहाने सुर व असुर कुले जोडली गेली हे पाहून ऋषि प्रसन्न झाले.

त्या ऋषींमध्ये सप्तगु नावाचे ऋषि प्रजापतीचे मित्र होते. विकुंठा त्याचे खूप अगत्याने आतिथ्य करी व आदराने त्यांना मान देई. एकदा ऋषि व प्रजापति गोष्टी करीत असता विकुंठा विनयाने म्हणाली, 'भगवन, माझा एक मनोदय आहे.'

'सांग ना तुझी मनीषा तरी ऐकू दे.' प्रजापति उत्साहाने म्हणाले, 'हे आपले ऋषिवर ती पूर्ण करण्याचा मार्गही दाखवतील.'

त्या दोघांचेही मनोगत जाणून सप्तगु म्हणाले,

'तुम्हा दोघांच्या मीलनाने सर्वांनाच मोठे समाधान झाले आहे. विकुंठेची कामना पण जगाला कल्याणकारी होईल अशीच असेल.'

ऋषिवर, खरे पहाता सुर आणि असुर हे एकाच प्रजापतीचे पुत्र. परंतु गुण व स्वभाव वेगळे असल्यामुळे त्यांचे जीवनमार्ग बदलले. त्या उभयतांना मार्गदर्शन करु शकेल व सर्वांचे कल्याण करील असा प्रतापी वीरपुत्र माझ्या पोटी जन्माला यावा अशी माझी इच्छा आहे.'

'तुझी कामना उच्च प्रकारची व उत्तम आहे. पण त्यासाठी तशीच उत्तम साधनाही हवी. दीर्घकाल तप व व्रत करुन काया शुद्ध करावी लागेल.'

'ऋषिवर, आपण सांगाल ते कठोर व्रत मी निष्ठापूर्वक करीन.'

विकुंठेला कायेची आंतरबाह्य शुद्धी व्हावी म्हणून चांद्रायण व्रत करण्यास सांगितले व योग्य ते मनोभाव जागृत व्हावे म्हणून तिला इन्द्रस्तुति ऐकवली.

'हे इन्द्र, आम्ही ऋषिगण तुझी स्तुति करीत आहो. देवही आदरपूर्वक तुमचा मान ठेवतात व असुरही तुम्हाला नमन करतात. तुम्ही सर्व लोकांची संकटे दूर करता. तुमची यशोकीर्ति सप्तसागरांच्याही पलिकडे जाऊन पोचली आहे व सर्व प्रकारचे लोक तुम्हाला मनोभावे मानतात.

मी, अंगिरा गोत्राचा ऋषि सप्तगु सर्व देवांच्यात श्रेष्ठ व ऋषींना पूज्य इंद्राला वंदन करतो. तो आमची इच्छा पूर्ण करो. त्याच्या कृपेने आम्हाला उत्तम प्रजा व साधने प्राप्त होवोत.'

दीर्घ तपाने पवित्र झालेल्या विकुंठेने इन्द्राची प्रतिमा आपल्या हृदयांत स्थापन केली होती. इन्द्राचे रूप, गुण, नाम, आकार तिच्या ध्यानी मनी वसले होते. इन्द्रासारखा पुत्र पोटी यावा या सुंदर भावनेने ती विशेषच शुद्ध झाली होती. तिच्या तपस्येने संतुष्ट होऊन इन्द्र तिच्या पुढे प्रगट झाला.

'माते विकुंठे, मी प्रसन्न झालो आहे. तुमची काय इच्छा असेल ती सांगा.' तो म्हणाला.

'भगवन् इन्द्र, तू अंतर्यामी आहेस. माझ्या मनातील इच्छा तू जाणतोस. तुझ्या प्रतिमेने माझे मन चित्त हरण केले आहे. तुझ्यासारखा शूर वीर, पराक्रमी, प्राज्ञ व परोपकारी पुत्र मला व्हावा हेच माझे मागणे आहे.'

'तथास्तु.' म्हणून इन्द्रराजाने निरोप घेतला. विकुंठेने आपले घेतलेले व्रत पूर्ण केले. ऋषींनी तिला शुभाशिर्वाद दिले. पति प्रजापतीने आदराने तिचे स्वागत केले.

इन्द्र स्वतःसारखा पुरुष शोधू लागला. देव सुंदर होते, बुद्धिमान व गुणी होते. पण ते त्याच्यासारखे पराक्रमी नव्हते. संग्रामात ते टिकत नव्हते. असुर पराक्रमी होते पण परोपकारी नव्हते. गंधर्व सुंदर, परोपकारी आणि पराक्रमीही होते. पण गुणी नव्हते. इन्द्र प्रत्येकाची स्वतःशी तुलना करून पहात होता. पण प्रतिमा, रुप व गुणाचा समन्वय कोठेच मिळेना. शेवटी इन्द्राने स्वतःच विकुंठेच्या पोटी जन्म घ्यावा असे ठरवले

आपला पुत्र होऊन अवतरलेल्या इन्द्राला प्रजापतीने आनंदाने व प्रेमाने स्वीकारले. आपल्या इष्टदेव इन्द्राचे बालरूप पाहून ऋषींनी हर्षभराने त्याचे गुण गान केले. विकुंठेच्या पोटी आला म्हणून वैकुंठ इन्द्र या नावाने तो पुढे प्रख्यात झाला. मातेच्या इच्छेप्रमाणे वैकुंठ इन्द्राचीच हुबेहुब प्रतिमा असावी तसा... स्वतः इन्द्रच होता. त्याचबरोबर त्याच्यात एक विशेष गुणही या या अवतारामुळे निर्माण झाला. वैकुंठ इंद्राने ऋषि होऊन मंत्र दर्शनही केले. त्याच्या तोंडून ते दिव्य मंत्र बाहेर पडले.

'मी स्वतःच इंद्र आहे. मी कधी कोणापुढे मस्तक नमवले नाही. मी संग्राम करतो तेव्हा पराक्रम करून शत्रूचा पूर्ण पराजय करतो. दोन्ही कडून दोन शत्रू येवोत वा तीन एकत्र होऊन चालून येवोत, माझ्या केसालाही त्यामुळे धक्का लागत नाही. शेतकरी कापणी झालेले पीक झोडतात त्या प्रमाणे मी शत्रूंना झोडपून काढतो.'

'जी माणसे यज्ञासारखी परहिताची कामे करीत नाहीत त्यांचा मी पराजय करतो. मी शत्रु–विजेता आहे. धनसाधनांचा स्वामी आहे. सात शत्रूंची नगरे मी धुळीला मिळवली. नव्याण्णव किल्ले तोडून मोडून सात नद्यांचे प्रवाह मुक्त केले. माझे पराक्रम सर्वच जाणून आहेत.'

पराक्रमी पुत्राचे शब्द ऐकून मातेला हर्ष होई. पित्याला मोठाच गौरव वाटे. ऋषि सप्तगु आनंदभराने आपल्या इष्ट देवाचे त्याच्या ठिकाणी दर्शन करीत. त्या वैकुंठ इंद्राने या प्रमाणे सुर–असुर यांचे एकछत्री साम्राज्य स्थापन करून मातेची मनोकामना पूर्ण केली.

## ५ लग्नाच्या मांडवात :

सूर्या ही विवस्वान सूर्याची पुत्री. तिचा विवाह राजा सोमाशी झाला. लाडकी कन्या झरोक्यातून डोकावून येणाऱ्या वऱ्हाडातील उठून दिसणाऱ्या वर-राजाकडे डोळे भरून पहात होती. ती स्वतः ऋषि होती. आपल्या मनोभावांचे आणि लग्नोत्सवाचे वर्णन तिने काव्यात केले आहे.

वऱ्हाडाबरोबर आपल्या घरी येणाऱ्या सोमराजाची ती स्तुति करते. तिचे माता पिता दारी आलेल्या जावयाचे पूजन करून स्वागत करतात. विवाहासाठी विविध प्रकारची साधन सामुग्री व वस्त्रे प्रावरणे, अलंकार वगैरे आणले आहेत. ते सारे कन्येला देण्यासाठी जमवले आहे. नवपरिणितांची पाठवणी करण्यासाठी दिव्य रथ सिद्ध केला आहे. नवऱ्या मुलाबरोबर त्याचा सखाही आहे. वऱ्हाडही आहे. रथ स्पर्धा झाली. त्यात वराने विजय प्राप्त केला आहे. कन्येने त्याचे विधी पूर्वक स्वागत केले. त्यानंतर तिच्या माता पित्यांनी कन्यादान केले. विवाह यज्ञाला प्रारंभ झाला. अग्नि प्रदक्षिणा, पाणी ग्रहण, सप्तपदी हे विधी झाल्यावर वडील व आप्त संबंधीयाना प्रणाम करून, त्यांचे शुभाशिर्वाद घेऊन कन्या वरासह त्याच्या घरी गेली. त्या घरी जाताच तिला ओवाळून तिचे मोठ्या मानाने स्वागत केले. या विवाह विधीचे मूलमंत्र गाणारी ऋषि सूर्या आहे. ते मंत्र याप्रमाणे आहेत.

'खरोखर सत्याच्या आधारे पृथ्वी व सूर्याच्या आधाराने आकाश टिकून रहाते. ऋत-सरळ नीतिमुळे देवांचे दैवत टिकते. त्याचप्रमाणे वरराजा सोम आकाशात शोभत आहेत. त्यांच्यामुळे आदित्य देवांना बळ प्राप्त होते. सोम राजामुळे पृथ्वीची महत्ता वाढली असून आकाशात नक्षत्रांच्या मेळाव्यात ते विराजमान झालेले आहेत.'

मांडवाच्या महाद्वारी आलेल्या वरराजाच्या स्वागतासाठी कन्या सजली आहे. तिच्यासाठी अनुदानाची साधनसामुग्री जतन केलेली आहे. दास-दासी सारी तयारी करण्यात गुंतले आहेत. तिला भेट देण्याशाठी एक पलंग शृंगारला आहे. नेत्रांजन तयार केले आहे. धरणी व आकाशाचे पेटारे भरले आहेत. ते सारे वैभव घेऊन सूर्या सोमराजाकडे निघाली आहे.

प्रजापति सूर्य आपली कन्या सोमराजाला देत आहेत. देव गण त्यांचे वऱ्हाडी आहेत. अश्विनी कुमार करवले होऊन लग्नमंडपात आलेले आहेत. सूर्येने सोमराजाला स्वतःच्या मनाने पसंत केले आहे. म्हणून आज तिचे मनोरथ या विवाहमंगलामुळे पूर्ण होत आहेत.

सूर्या व सोम यांची पाठवणी ज्या दिव्य रथातून होत आहे, तो रथ म्हणजे वस्तुतः सूर्येचा मनोरथच आहे. त्या दिव्य रथाला शृंगारताना त्यावर द्युलोकाचे आच्छादन घातले. तेजस्वी सूर्य व चंद्र अश्वरुपाने त्याला जोडले. ऋचा व मंगल साम गीत गाणारी व सर्व कामना पूर्ण करणारी कामधेनू गाय होऊन आली. आकाशाच्या विस्तीर्ण पटावर कोठल्याही प्रकारचा अडथळा न येता तो रथ उत्तम गतीने चालू लागला.

वाऱ्याचे पंख असावे तसे दोन श्रोत्र त्या रथाला जोडले होते व प्राण हे त्या रथाची चाके जोडणारी धरी होऊन राहिले होते. अशा त्या मनोमय रथात बसून सूर्या सोमाला भेटण्यासाठी निघाली.

'हे देवांनो, प्रजापति पित्याने रचलेल्या विशाल दिव्य रथात बसून वर राजा सोम व नववधू सूर्या गृहस्थाश्रमाच्या मार्गावर प्रयाण करीत आहेत. त्या दोघाना तुम्ही सर्वजण साह्य करा. त्यांच्या मार्गातील सर्व विघ्नें दूर होवोत. नव परिणित पतिपत्नीला घेऊन वऱ्हाड निरोप घेईल तेव्हा अर्यमा, भग वगैरे देव त्यांचे रक्षण करोत. त्यांचे सहजीवन सुखी होवो.'

सविता नारायण हा सर्वांचा पिता आहे. त्यांच्याच प्रेरणेने वरुण सर्व प्राणिमात्रांना मायापाशाने बांधतो. त्या पाशातून मुक्त झाल्यावर गहस्थाश्रम स्वीकारावा म्हणून कन्येचा संबंध तो पतीशी जोडून देत आहे व कन्येचे पितृकुल सोडवून तिला पति कुलाकडे पाठवून देत आहे.

'हे नववधू, गहस्थ धर्माचे पालक पूषादेव तुझा हात धरून तुला रथामध्ये बसवीत आहेत. अश्विनीकुमार त्याचे सारथ्य करून तुला पतिगृही पोचवीत आहेत त्या घरी पतीच्या स्वभावाशी मिळते घेऊन तू गृहकृत्ये करण्यास प्रारंभ कर.'

'हे कुलवधू, या पतिकुलाची स्वामिनी होऊन तू प्रजाजनांनी समृद्ध हो. या गृहस्थाश्रमातील कर्तव्ये तू सावधान राहून पूर्ण कर. पतीची सहचरी होऊन जीवन वार्ता विनोदात, आनंदाने व्यतीत कर.'

'हे नवविवाहित वर-वधू गृहस्थाश्रमाच्या मार्गावर प्रयाण करीत आहेत. त्यांच्या मार्गात विघ्ने आणणारे शत्रु दूर होवोत. व त्यांचे जीवनक्रम सरळपणे चालोत.'

'हे स्नेही जनांनो व आप्तांनो तुम्ही सर्व आपल्या घरी येणाऱ्या या नव वधूचे दर्शन करा. तुम्हा सर्वांचे मंगल करण्यासाठी ती येथे येत आहे. तुम्ही तिला चिर सौभाग्य लाभावे म्हणून शुभ आशीर्वाद द्या. व मग निरोप घ्या.'

जीवन मार्गावर पावले टाकताना नववधूचा मनोदय काय आहे ते वर्णन करताना ऋषि सूर्या लग्न मंडपातील अखंड मांगल्याची भावना व्यक्त करते. ती म्हणते,

' माता पित्यांनी कन्यादान केले. अग्नि प्रज्वलित करून वर राजाने विवाह होम केला. कन्येने त्यात आहुति देऊन लाजाहोम केला. अग्नि साक्षीने वराने वधूच्या उजव्या हाताचे ग्रहण करून तिचा स्वीकार केला. एकमेकांच्या हातात हात घालून जीवन मार्गावर पुढे जाण्याची भावना म्हणजे पाणी–ग्रहण करून वर राजा संकल्प करतो,

' हे वधू, आपल्या भाग्याचे चांगल्या प्रकारे रक्षण व्हावे, अखंड सौभाग्य आपल्याला प्राप्त व्हावे या भावनेने मी तुझा हात हाती घेत आहे. आपण एकमेकाच्या निकट राहून वृद्धावस्थेपर्यंतच्या मर्यादा उत्तम रीतीने पाळू या. आपण दोघे मिळून गृहस्थाश्रमाची जीवन व्रते चांगल्या प्रकारे पालन करू या. त्यासाठीच भग, अर्यमा, पूषा, सविता वगैरे देवतांनी मिळून आपला संयोग घडवून आणला आहे.

हे वधू, जीवनात मंगल कार्य करण्याची प्रेरणा मला तुझ्याकडून मिळत राहो. माझ्या कुलाची वृद्धि व्हावी म्हणून तू या घरात प्रवेश करीत आहेस. आपण एकमेकांच्या सहवासात येथे सुखाने राहू.

हे वधू, या लोकात मला तुझा सहवास लाभो. आपला कधीही वियोग होऊ नये. या घरात पुत्र, पौत्र व प्रजाजनांच्या समवेत आपण सुखाने दीर्घकाळ जीवन व्यतित करू.

हे नववधू, तुझ्या डोळयातून सतत प्रेमदृष्टीच भरलेली राहो. मादक विषाराला तेथे प्रवेश नसो. तुझी वृद्धि पति व परिवाराचे आरोग्य वाढवणारी असो. पतिला आपघातजनक वाटणारे असे तुझ्याकडून काहीही घडू नये. तुझ्या पोटी वीर संतति जन्म घेवो. नेहमी परोपकार करण्याची इच्छा तुझ्या मनात असो. '

गृहस्थाश्रमात प्रवेश करताना पुरुषाच्या मनातील ही मंगल कामना आहे. त्यातच त्याने केलेली प्रतिज्ञाही आहे व तिचे पालन करण्यासाठी त्याने पत्नीचा सहकार मागितला आहे. मंगल विवाहविधी पूर्ण झाल्यावर लग्न मंडपात सुवासिनी स्त्री नवदंपतीला आशीर्वाद देते.

ऋषि सूर्या स्त्रीचा गौरव वाढवणारी आहे. माता पिता व पितृगृहीचे स्नेहीसंबंधी सोडून पतिकुलात प्रवेश करणाऱ्या नारीचा त्याग घरदार सोडून

वनात जाणाऱ्या पुरुषाहून रेसभरही उणा नाही. ती आपले सारे जीवनच पतिह कुलाला वहाते. त्याविषयी सूर्या म्हणते,

'स्त्री ही घराची राणी आहे. स्वामीनी आहे सासू, सासरे, दीर, नणंदा सर्वांनी तिचा मानपूर्वक स्वीकार करावा. सर्व देवांनी तिचे आयुष्य मंगलमय करावे. जीवनमार्गावर जोडीने पावले टाकणाऱ्या दंपतीचे हृदय एकरूप होवो. जीवनात सहचर्याची भावना सतत वाढत राहो.

## ६ स्त्रीची प्रेरणा :

उर्वशी ही अप्सरा होती. आदिनारायणाच्या 'उरु'पासून–म्हणजे मांडीतून ती निर्माण झाली होती. ती अत्यंत गुणानुरागी व देवसभेची शोभा असल्याप्रमाणे होती.

पुरुरवा हा माणूस होता. इला व बुध यांचा तो पुत्र. तो चंद्रवंशी राजा होता. त्याला रूपाचे फार आकर्षण होते.

पृथ्वीवरील हा मानव राजा व स्वर्गातील अप्सरा यांची भेट अकस्मातच अंतरिक्षात झाली. त्यांना एकमेकाबद्दल ओढ वाटू लागली आणि त्यांच्यात संवाद झाला.

'देवी, तुझे लावण्य, कांति, चरणांची गति व नयनांचा विलास यांनी मी आकर्षित झालो आहे.'

'जरा धीर धरावा राजन्, तुम्ही मानव आहात. मी अप्सरा आहे. तुमचे गुण, शील, स्वभाव, सदाचार पाहून मलाही तुमच्याविषयी ओढ वाटू लागली. परंतु स्वर्गात तो माझा अपराध समजला गेला.'

'खरेच ? पण हे कसे मानता येईल ?'

'नरवीर, ती सारी घटना अशी घडली.' उर्वशी मंद स्वराने सांगू लागली,

'एकदा इन्द्र सभेत नारदमुनी आले व त्यांनी तुमच्या गुणांची खूप प्रशंसा केली. ती ऐकून मला तुमच्याविषयी आकर्षण वाटू लागले.'

एक दिव्य अप्सरा याप्रमाणे मानवाकडे आकर्षित व्हावी हे मित्र व वरुण यांना आवडले नाही. क्रुद्ध होऊन त्यांनी मला शाप दिला. 'देव लोक सोडून तू मृत्यूलोकात चालती हो. अमानुषी राहून तू मानवाचा सहचार मिळवशील.' म्हणून मी मृत्युलोकात आले आहे.'

पृथ्वीलोकावर उर्वशी प्रतिष्ठानपुराचा राजा पुरुरवा याची राणी व त्याची प्रेरणामूर्ती होऊन राहू लागली. तिच्या सहवासामुळे राजाला नवी नवी कामे सुचू

लागली. पराक्रम करावासा वाटू लागला. शत्रूंच्यावर जय मिळवून तो परत फिरू लागला.

गंधर्व लोकातून येताना उर्वशीने आपल्या काही सख्या बरोबर आणल्या होत्या त्याचबरोबर ती दोन कोकरेही घेऊन आली होती. त्यांच्यावर तिचे प्राणापलिकडे प्रेम होते. ती कोकरे हिमराशीप्रमाणे शुभ्र व रेशमासारखी मऊ होती. तिने ती राजाकडे संभाळण्यासाठी सोपवली होती.

उर्वशी गेली आणि देवसभा तिच्यावाचून फिक्की वाटू लागली. देवराज उदास झाला. त्याची प्रेरणाच नाहीशी झाली होती. ते पाहून गंधर्वांनी तिला परत देवलोकी आणण्यासाठी युक्ति शोधून काढली.

मध्यरात्री शयनागारात उर्वशी झोपली होती. शेजारी पुरुरवा झोपला होता. बाजूला ती दोन कोकरे होती. गंधर्व आत शिरला आणि त्याने एक कोकरू उचलले ते बँ बँ ओरडू लागले. त्याच्या आवाजाने उर्वशी जागी झाली व एक कोकरू नाही असे पाहून ती रागाने म्हणाली,

' माझे लेकरू कोणी नेले ? शेजारी झोपलेला हा पुरुष इतका निर्माल्य आहे की त्याला माझे रक्षण करता येत नाही ? त्याला झाले आहे तरी काय ?'

पुरुरव्याने डोळे उघडले. जांभई देऊन कूस बदलली व तो परत झोपून गेला. गंधर्वाने ते पाहिले व परत आत येऊन दुसरे कोकरूही उचलून नेले. प्राणच जावे तशा आकांताने उर्वशी ओरडू लागली तेव्हा कोठे पुरुरवा उठला आणि तलवार घेऊन कोकरांचा शोध करण्यासाठी बाहेर पडला. तेवढ्यात गंधर्वाने आपल्या विद्येने वीज कडाडून चमकावी असे केले. विजेच्या प्रकाशात पुरुरव्याची नग्न काया दृष्टीस पडताच उर्वशी विजेत सामावून गेली व गंधर्व नगरीत जाऊन पोचली. निराश झालेला पुरुरवा परत फिरला. त्याला सारे राजभवन शून्य वाटू लागले.

' उर्वशी, माझ्या प्रेरणामूर्ति– तू कोठे गेलीस ?' म्हणून राजा व्याकूळ होऊन सैरावैरा शोधीत फिरू लागला. विरहव्यथेने तो तहान भूकही विसरला व वन उपवनातून भटकू लागला.

असाच भटकत तो कुरुक्षेत्रातील विश्वयोजन सरोवरापर्यंत जाऊन पोचला. कमलांनी पूर्ण अशा त्या सरोवरात हंस व हंसिनी विहार करीत होत्या. त्यातील एका हंसिनीला पाहून तो चकित झाला. त्याने आपल्या सहचरीला त्या रूपातही ओळखले. त्या सर्व हंसिनी राजाला पाहून लज्जित झाल्याप्रमाणे कमल दलांच्या आड जाऊन कूजन करू लागल्या. जणु प्रेमळ शब्दांनी त्या त्याला बोलावीतच होत्या.

सरोवराच्या पाण्यात पाय सोडून राजा काठावर बसला. त्याच्या दृष्टीत प्रेम होते. मनात आदर होता. वाणीत गोडवा होता. तो उर्वशीला बोलावून म्हणाला,

'हे प्रिये, क्षणभर थांब. हे कठोर स्त्रीये मला तुझ्याशी चार शब्द बोलून घेऊ दे. कालपर्यंत आपण एकमेकांशी सुख संवाद करीत होतो. तुला वाईट वाटेल असेही मी काही केलेले नाही. किती तरी दिवस आपण सुखाने राहिलो!'

हंसिनी रूपातल्या उर्वशीने राजाला आदरपूर्वक उत्तर दिले.

'राजन्, याप्रमाणे माझ्याशी बोलत राहून काहीच लाभ होणार नाही. उषा पहाता पहाता नाहीशी व्हावी त्याप्रमाणे मी तुझ्या पासून कितीतरी दूर जाऊन पोचले आहे. वायुचे गाठोडे बांधणे शक्य नाही त्याप्रमाणे मला बांधणेही अशक्य आहे. माझी आशा सोडून तू घरी जा व सुखाने काल क्रमणा कर.'

'प्रिये, तू हे काय सांगते आहेस? तुझ्या प्रेरणेने प्रेरित होऊन मी युद्धे केली आणि विजयी झालो. तुझ्या सहचर्याने किती तरी परोपकाराची कामे मी केली. तुझे सहकार्य नसते तर त्यातील काहीच झाले नसते.'

राजा उर्वशीचे गुण वर्णन करीत होता. तिच्यासारखी स्वर्गीय सुंदरी त्याला प्राप्त झाली होती. तरी तो विलासी वा प्रमादी झाला नव्हता. त्याचे कारणही उर्वशीच होती. रणांगणावरही ती त्याच्या पाठीशी राही. यज्ञयागात ती पुढाकार घेई. त्याच्या घरी स्वर्गातही अप्राप्य असे भोजन व सुखसोयी तिला मिळाल्या याचा तिला कधीच विसर पडला नव्हता. राजा करीत असलेले आपले गुणगान ऐकून ती संकोचली व उषेला संबोधन करून म्हणाली,

'अग उषे, नित्य नवे पदार्थ करून मी स्वतः पतीला वाढून त्याला संतुष्ट करीत असे. भोजनगृहात मी किती मिष्टान्न भोजने केली, शयनगृहात किती सुख भोगले त्याची काही गणनाच नाही.

शयनगृहाचे नाव येताच तिचा संकोच जरा दूर झाला. स्वर्गातही दुर्लभ असे सुख राजाने तिला दिले होते. त्याचे स्मरण करून ती म्हणाली,

'हे राजा, तू मला तीन तीनदा दिलेली सुखसाधने मी विसरले नाही. तू किती प्रयासाने माझ्या सुखसोयी संभाळल्या होत्यास. तू केवढा उत्साही आहेस. तरी आता असा निराश का बरे होतोस?'

तिचे ते गोड शब्द ऐकून राजाला एक जुना प्रसंग आठवला.

'प्रिये तू स्वर्गातून मृत्यू लोकात आलीस तेंव्हा तुझ्या सख्याही तुझ्याबरोबर आल्या होत्या. त्यांची नावेही कशी गोड होती. श्रेणि, सुम्नआपि, हृदेचक्षु आणि

ग्रथिनी. जशी नावे तसेच त्यांचे गुणही होते. मर्त्य लोकातील सुखसोयी व साधने त्यांना आवडली व त्यानीही मर्त्य मानवाना स्वर्गीय सुख दिले. त्या सख्यांच्यासह विजेच्या चपलतेने तू माझ्या राजभवनात वावरत होतीस, तेव्हा ते भवन स्वर्गासारखेच भासत होते. गोशाळेतील गाईनी मधुर शब्द करावा तसे माझे महालय तुमच्या मंजुल शब्दांनी गजबजून जाई.'

'राजा, पृथ्वीचे पालन करील अशा पुत्राची कामना तुझ्या मनात होती. ती सफल होईल. पण त्यासाठी एक वर्षभर वाट पहावी लागेल. तरी तू घरी परत जा.'

पण राजा अधीर झाला होता.

'उर्वशी, तुला घेतल्या शिवाय मी परत जाणार नाही. मेलो तरी चालेल. हिंस्त्र जनावरांनी मला फाडून खाल्ले तरी मी येथून जाणार नाही.'

'नाही राजन्, अशा प्रकारे अपमृत्युची कामना करू नये. तुम्ही धरणीवर ढळणार नाही. वाघ सिंह कोणी तुम्हाला खाणारही नाही. तुम्ही घरी परत जा.

राजा, आम्ही अप्सरा. आम्ही जलपऱ्या. आम्ही बांधलेल्या रहाणे शक्य नाही. आमची मने कठोर असतात.'

'असे नको म्हणू उर्वशी. जलामध्ये तुम्हा पऱ्यांचा जन्म झाला. आणि सारे अंतरिक्ष तुम्ही भारून टाकले. देवी, तू वीज आहेस व मी मेघ आहे. तू उषा आहेस तर मी सूर्य आहे. आपण एकमेकाच्या योगाने पूर्ण आहोत.'

'राजा, पुत्र प्राप्तीने मृत्यूवर विजय मिळवून, पुण्यकार्ये करून तू देव लोकात ये. तेथे आपले पुनः मिलन होईल.'

असे म्हणून सरोवरात क्रीडा करणारी ती हंसी उडून गेली. पुरुरवा आक्रोश करीत मूर्छित होऊन पडला. गंधर्वांनी जल शिंपडून त्याला शुद्धीवर आणले. दिव्य मंत्र देऊन त्याचा जप करण्यास सांगितले व एका वर्षाचा अवधि देऊन प्रतिष्ठान पुरास परत पाठवले.

दिव्य मंत्राचा जप व तप करताना हां हां म्हणता एक वर्ष पूर्ण झाले. हातात बालक घेऊन उर्वशी व थाळीत अग्नि घेऊन गंधर्व त्याच्याकडे येऊन पोचले.

राजकुमार आयु व गृहस्थाची चेतना सचेत ठेवणारा अग्नि घेऊन पुरुरवा घरी परतला. योग्य समयी आयुला राज्य देऊन अग्निचे रक्षण करण्याचे कार्य सोपवून तो निघाला. गंधर्व त्याची वाट पहातच होते. मानव देह सोडून तो गंधर्व लोकात गेला. व त्याच्या प्रेरणा मूर्तीचा, उर्वशीचा चिरसहवास त्याला प्राप्त झाला.

## ७ संकटसमयी साह्य :

त्या ऋषींचे नाव होते मुद्गल. त्यांची पत्नी ती मुद्गलानी. निर्जन वनात ते दोघेच रहात. त्यांनी बऱ्याच गायी पाळल्या होत्या. गायीवर त्यांचा फार जीव होता. संध्याकाळी गायी वनातून परतल्या की वासरे दूध पीत. देवांना दुधातुपाची आहुति मिळे. पति पत्नी अग्निपूजा करीत. दिवस उजाडताच अग्नि पूजा करून गायीच्या दुधातुपाची आहुनि देत. व ऋषी गायींना चरावयास नेत. सकाळ संध्याकाळ दूध काढावे, दुपारी गायी चाराव्या, व गोरज काळापासून सूर्योदयापर्यंत आश्रमात रहावे हा त्यांचा क्रम होता. त्या दोघांचे जीवन या प्रमाणे एकरूप होऊन गेले होते. गोधनाची समृद्धि उत्तरोत्तर वाढत चालली होती.

वनात वसणाऱ्या चोरांचे लक्ष त्यांच्या पुष्ट गोधनावर होते. रात्री अग्नि त्यांचे रक्षण करतो व दुपारी ते वनात असतात हे त्यांनी हेरून ठेवले. वनात ऋषी होते तेथून चरत चरत गायी दूर गेल्या, ती संधी साधून त्यांनी ऋषींना हात पाय बांधून एका खड्ड्यात लोटले व गायींना ते हाकून घेऊन गेले. ऋषि कसेबसे बंधनातून स्वतःला सोडवून घेऊन घायाळ व निराश झालेले असे एकटेच आश्रमात जाऊन पोचले.

अद्याप सूर्य कलला नव्हता. अशा अवेळीच त्यांना परत येताना पाहून मुद्गलानी धावतच सामोरी गेली. ऋषि कल्पांत करीत सारे सांगू लागले,

ऋषि पत्नीने हात धरून त्यांना अंगणात नेले. खाली बसवले. गार पाणी पाजले व गोड शब्दांनी आदराने सांत्वन केले.

'देवी, चोरानी आपल्या गायी नेल्या. आता काय करायचे?'

'ऋषिवर, त्यात येवढे निराश होण्यासारखे काय आहे? आपण त्यांचा माग काढू.'

'पण आपला कसला टिकाव लागणार त्यांच्यापुढे? आपले बलिष्ठ असे बैलही त्यांनी नेले. हा एक म्हातारा बैल तेवढा घरी बांधलेला होता, तो उरला आहे! त्या एकट्याच्या जोरावर आपण काय करणार?'

'तोही कामाला येईल आणि ज्या खिळ्याला त्याला बांधले आहे, त्याचाही उपयोग होईल.'

'हंः ते तर जुनाट मुद्गर! त्याचा कसला उपयोग? त्याला काय तू गाड्याला जोडणार? आणि ते गाडे हाकणार कोण?'

'ऋषिवर संकटाच्या वेळी असे हरलात तर कसे होईल? ज्याच्या मनात

उत्साह आहे त्याला देवांचे साहय लाभते. तुम्ही रथात बसा. मी रथ हाकीन. तुम्ही माझे रथी. मी तुमची सारथी आणि हाच आपला ' रथ.'

मुदगालानीचे हे धीराचे व उत्साहाचे शब्द ऐकून ऋषीनाही साहस करण्यास जोर चढला. त्यांनी म्हातारा बैल गाड्याला जुंपला दुसऱ्या बाजूला तो जुना खिळा बांधला. मुद्गलानीने लगाम हाती घेतले. ऋषींनी त्यावर चढून मंत्राचा उच्चार केला.

' हे मुद्गला, या मोडक्या तोडक्या, असहाय अशा ' रथाला ' देवराज इंद्राचे साह्य लाभो. हे पुरहूत देवराज इंद्र, चोर आमच्या गायींना जेथे घेऊन गेले असतील तेथे तू हा रथ ने.'

मुद्गलानी रथाचे सारथ्य करीत होती. तो ' रथ ' वाऱ्याच्या वेगाने धाव लागला. दुरून तो गाडा अशा वेगाने आपल्या दिशेने येत असलेला पाहून चोर आश्चर्य चकित झाले व जागच्या जागी खिळून गेल्यासारखे होऊन एकमेकांना विचारू लागले,

' अरे हा रथ की गाडे ? म्हातारा बैल जोडलेला आहे आणि दुसऱ्या बाजूला तर जुनाट लाकूडच दिसते आहे. पण त्याला हा वेग, ही शक्ति कोठून मिळाली ? आणि ही स्त्री गाडा हाकते आहे ?'

चोर दिसताच त्या दोघांचा उत्साह आणखीनच वाढला. त्यांनी त्यांना आव्हान देऊन आपल्या गायी रोखून धरल्या. त्या गायी पण ऋषि दंपत्तीला पहाताच त्यांच्या दिशेने वळल्या. ते पाहून चोर भयभीत होऊन पळून गेले.

घरसंसाराचे गाडेही असेच चालते. साधने पुरती असोत वा नसोत गृहिणी संकटाच्या वेळी सावधान राहून पतीला प्रेरणा देते व प्रसंग निभावून नेते.

## ८ नारी गुप्तचर वेषात :

ही घटना स्वर्गात घडलेली आहे. देवांचे पुरोहित बृहस्पति यांच्या त्या गायी होत्या. चोरांनी त्या चोरल्या. इन्द्राने शोध केला तेव्हा त्याला कळले की दूर रसा नदीच्या पैलतीरावर रहाणारे पणि गायी घेऊन गेले असून त्यांचा ठाव ठिकाणा शोधून काढणे देवदूतांनाही शक्य नव्हते.

देवराजाने देवदूती सरमेला बोलावले. तिने आजवर अनेक गुप्तस्थाने शोधून काढली होती. पणींच्या मुक्कामी जाऊन गायींचा शोध लावून सुरक्षितपणे परत यणे हे फारच अवघड काम होते. इन्द्राची आज्ञा मान्य करून सरमेने ते स्वीकारले. अनेक अडचणींना तोंड देत तिने पणींचा मुक्काम गाठला.

तिला पाहून पणींना मोठे आश्चर्य वाटले. सरमेच्या साहसाचे त्यांनी कौतुक केले व तिला लालूच दाखवून आपली बहीण होऊन गोधनात भागीदार होण्याविषयी गोड गोड बोलून वळवण्याचा प्रयत्न करून पाहिला पण सरमा त्यांना बधली नाही. पणींनी तिला विचारले,

'सरमे तू येवढया दूरवर येऊन पोचली आहेस ती कोठल्या इच्छेने ते तरी सांग. कारण येथवर येणे सामान्यत: कोणालाही अवघड वाटण्यासारखे आहे. तुझी इच्छा पूर्ण करण्यासाठी आम्ही काय करावे बरे? येथवर येताना मार्गात कितीतरी अडचणी आल्या असतील. कष्ट झाले असतील, रसा नदीचा विशाल प्रवाह मधे असताना तो तरून तू येथवर आलीस म्हणून आम्हाला मोठे नवल वाटते आहे.'

पणींचे बोलणे मोठे गोड होते. पण त्यांच्या मनात कपट होते ते ओळखण्यास सरमेला विलंब लागला नाही. ती म्हणाली,

'पणींनो मी इंद्रदेवाची दूती आहे. आणि त्याच्या इच्छेनुसार मी सगळीकडे जाते. तुमच्या प्रदेशात देव पुरोहित बृहस्पतींचे गोधन लपवून ठेवलेले आहे असे कळल्यावरून मी येथे आले आहे. येथवर कसे काय येता येते ही शंका व भय मनात होतेच. परंतु त्यामुळेच माझी साहसी वृत्ति बळावली आणि मी येथवर येऊन पोचले.'

तिचे बोलणे सरळ व स्पष्ट होते. लालच दाखवून ती वश होईल असे दिसेना. तरीही पणींनी पुन: तिला समजावण्याचा प्रयत्न करून पाहिला.

'सरमे, ज्याची दूती म्हणून तू येवढया दूर आलीस तो इंद्र आहे तरी कोण? गुप्त शोध करू शकतील असे कितीसे हेर त्याच्या पदरी आहेत? आम्ही तर त्याचे नाव देखील ऐकलेले नाही. आणि त्याचा कोणी गुप्तचर असल्याचेही आमच्या ऐकीवात नाही.'

पणि कपटी होते. देवराज इंद्राचा प्रताप ते जाणून होते. पण जाणत नसल्याचा आव आणून ते सरमेला आपल्या बाजूस वळवू पहात होते. म्हणून ते आपसात बोलू लागले,

'ही सरमा आपल्याकडे अनायासे आली आहे तर आपण तिच्याशी मैत्री करू या. तिची इच्छा असली तर गोधनाचा भागही आपण तिला देऊ.'

पणींचे ते बोलणे हसण्यावारी नेऊन ती ठामपणे म्हणाली,

'पणीनो, देवराज इंद्र अजिंक्य आहे त्याच्या प्रभावामुळेच माझ्या सारखी दूती येथवर येऊन पोचली आहे. कोठलेही विशाल वा सखोल प्रवाह त्याला अडवू

शकत नाहीत म्हणून तर मी रसा नदी ओलांडू शकले. त्याच्याशी युद्ध करू पहाल तर तुम्ही मात्र प्राणाला मुकाल.'

तिचे बोलणे ऐकून पणि रागावले व म्हणाले,

'भाग्यशाली सरमे, स्वर्ग लोकाहून या दुर्गम स्थळी आलेल्या गायींना तू परत नेणार? त्यासाठी तू येथवर आली आहेस? परंतु तुझे धाडस आणि इच्छा निष्फळच ठरतील. आमच्याशी युद्ध केल्याशिवाय गायी मिळवता येणार नाहीत. आमची आयुधे किती तीक्ष्ण आहेत तें युद्ध करूनच पहा.'

बढाई मारणाऱ्या त्या पणींना सरमेने न डगमगता उत्तर दिले,

'या मोठ्या मोठ्या गोष्टी तुमच्या तोंडी शोभत नाहीत. खरे सैनिकच युद्ध करू जाणोत. धनुष्यातून बाण सुटण्या आधी तुमच्या पापानेच तुम्ही मरणार आहात. कपट फार काळ तग धरीत नसते. तुमचे वर्तन व कार्य देवगुरु बृहस्पति अटकावतील. तुम्ही सुखी होऊ शकणार नाही.'

पणीनी सरमेला वळवण्यासाठी अखेरचा डाव टाकला.

'तू काही स्वतःच्या इच्छेने येथवर आलेली नाहीस. इंद्रादि देवानी बळजबरीने तुला पाठवले आहे. आता तू येथेच रहा. आम्ही तुला पाठची बहीण मानू. आम्ही आणलेल्या गोधनाचा भागही देऊ. तरी हे सुभगे आता तू येथून जाऊच नको. येथेच मानाने रहा.'

हे बोलणे चालले असतानाच चतुर सरमेने गुप्त स्थानाचा सुगावा काढला होता. आता तिला त्वरेने इंद्राकडे जावयाचे होते.

'पणीनो, मी बोलून चालून दूती, गुप्तचर. आम्हाला भाऊ कोण नी बहीण कोठली! व्यक्तिगत संबंधच आम्हाला नसतात. मी जाणते ती एका इंद्राला. त्याची आज्ञा पाळणे येवढाच माझा धर्म. पुढचे काय ते त्याचे तो पाहून घेईल.'

याप्रमाणे मोहजालात न फसता सरमा पणींच्या निवासातून परतली. रसा नदीचा दुस्तर प्रवाह ओलांडून स्वर्गात जाऊन पोचली. तिने सांगितल्या स्थळी देवराज इंद्र व बृहस्पति जाऊन पोचले व त्यांनी पणींचा पराभव करून आपल्या गायी परत आणल्या.

## ९ प्राण व वाणीचा सुमेळ :

विश्वकल्याणासाठी देवांनी यज्ञ करायचे ठरवले. सूर्य, सोम, अग्नि, इंद्र, मित्र व वरुण हे ऋत्विज झाले. यज्ञाचे यजमान अथवा ब्रम्ह्याचे पद बृहस्पतीनी घ्यावे असे ठरले. पण यजमानासह त्याची पत्नीही असायला हवी. देवानी प्रजा-

पतीची कन्या जुहूशी बृहस्पतीचे लग्न करुन दिले व त्या दोघांनी मिळून यज्ञाचा संकल्प केला.

ब्रह्मणस्पति ब्रह्मा हे मनाचेच स्वरूप. ब्रह्मजाया जुहू ही वाणी. यज्ञाची भावना मनात आली व शब्दावाटे ती प्रगट झाली.

ब्रह्मा व ब्रह्मजाया यज्ञ करीत होते. देव त्यांचे ऋत्विज होऊन स्तुति व शंसन करीत होते. त्याप्रसंगी ब्रह्मजाया घाईत न बोलण्यासारखे बोलून गेली. एरवी सामान्य स्त्रीने असे केले असते तर त्यात विशेष असे काही नव्हते. कारण सामान्य स्त्री चंचल असते. भोगाकडे तिची दृष्टि लगेच वळते. पण ही तर ब्रह्मजाया. हे पद केवढे मोठे. त्या पदाची केवढी दिव्य प्रतिष्ठा ! ती सामान्य स्त्रीप्रमाणे वर्तन करून लागली तर ते कसे चालेल ? ब्रम्ह्याने तिचा त्याग केला. यज्ञ अर्धाच राहिला. तेव्हा देव जुहूकडे गेले. तीहीं ब्रह्मजायाच होती. तिला जापली चूक उमगली. व ब्रम्ह्याबद्दलचा आदरभाव तिच्या मनात वाढला.

'मनातले विचार असतील तसेच वर्तन व तशीच वाणी असायला हवी. विश्वहितासाठी हा मेळ आवश्यक आहे.' तिने मान्य केले.

देवांनी तिच्या चुकीचे परिमार्जन केले. सूर्य, वरूण, अग्नि या देवांनी तिला दोषमुक्त केले. त्या पवित्र ब्रह्मजायेचा ब्रह्माने पुन: स्वीकार केला. व विश्वहिता-साठी सुरू केलेला यज्ञ पूर्ण केला. मन व वाणी यांचा सुमेळ साधला गेला.

## १० राष्ट्राची प्रभावक शक्ति :

त्या ऋषींचे नाव आहे वागांभृणी. पित्याचे नाव अंभृण. त्यांची कन्या वाणी. म्हणून ती वागांभृणी. अंभृण ऋषींचे वय झाले होते. त्यांची दृष्टी गेली, वाणी अंधपित्याची काठी होती. पित्याची सेवा करता करता त्यातून तिने ब्रह्मविद्या मिळवली होती. प्राणिमात्रात वसणाऱ्या चैतन्यात तिला प्रभु दर्शन झाले होते. व तेच तत्व ती स्वत:च्या ठिकाणीही पाहू लागली होती.

त्या कन्येने एक विशेष विद्या मिळवली होती. तिने आपल्या वृद्ध पित्याची सेवा ही एका सामान्य माणसाची सेवा म्हणून न करता राष्ट्र पुरुषाची सेवा करावी तशा भावनेने केली होती. त्यांचा मान ठेवताना, त्यांना वंदन करताना तिच्या मनात राष्ट्रीय भावना निर्माण होई.

'राष्ट्र अंध, अपंग, जड असेल तर प्रजाजनांनी राष्ट्राची सेवा केली पाहिजे. एक एक व्यक्ति अंधळ्याची काठी होऊन समग्र राष्ट्राला प्रजेचा आधार लाभला पाहिजे. व्यक्तींचा समुदाय मिळूनच समाज घडतो. समाज रचता रचता व्यक्ति व राष्ट्र एकाकार होत जातात.'

याप्रमाणे वागांभृणीची ब्रह्मविद्या राष्ट्रसेवेच्या रंगाने रंगली होती. पित्याच्या सेवेला तिने जीवन वाहिले होते.

'वाणी अंभृणी' एकटे पडलेले ऋषि तिला मंद स्वराने हाक मारीत.

'ही मी आलेच तात !' म्हणून तत्परतेने जवळ जाऊन ती त्यांच्या पाया-वरून हात फिरवू लागे. मायाळु पिता तिच्या केसावरून हात फिरवीत तिला विचारी.

'काय करीत होतीस बाळ एकटी एकटी ?'

त्या दिवशी तिने सांगितले.

'तात, गुंफेत बसल्या बसल्या मी एक मूर्ती घडवीत होते.'

'कोणाची मूर्ती गं बाळा ?'

'दुसऱ्या कोणाची ? तुमचीच !'

'माझ्यात ते असं काय पाहिलस पोरी ?'

'तुमच्यात ? तुमच्या ठिकाणी मला राष्ट्र पुरुष दिसतो तात ! तुमच्या शरीरात देव वसत आहेत शरीर हा महाभूतांचा पिंड असला तरी त्यातच ब्रम्हांडाचा वास आहे.' वाणी मोठ्या उत्साहाने सांगू लागली.

'अरे, तू तर पिंडी ते ब्रम्हांडी ' हे तत्वच सांगते आहेस !'

'होय तात ! मला तुमच्या ठायी मध्यभागी वसणाऱ्या पुरुषाचे स्वरूप दिसते. पिंड आणि ब्रह्मांड याना जोडणारा तो पुरुष–तोच राष्ट्र पुरुष ! राष्ट्रात मानवांची वस्ती आहे त्याच प्रमाणे पशु, पक्षी, जलचर, स्थलचर, वगैरेचीही वस्ती आहे. राष्ट्र शक्ति जागृत झाली की त्या सर्वांच्यात चैतन्याचा संचार होतो त्यांच्या ठायी असलेल्या दैवतांना जाग येते. त्याच राष्ट्राचे उत्थान होते. तेच राष्ट्र बलशाली होते.

ज्या राष्ट्राची शक्ति सुप्त आहे ते राष्ट्र अंध, जड आणि पांगळे होते. राष्ट्राचा अपमान करणारा समाज वा व्यक्ति कधी स्वतःचे कल्याण साधू शकत नाही. वाणी उत्साहाने सांगू लागली. ऋषि मधेच म्हणाले,

'वाणी, तू राष्ट्र भावनेविषयी म्हणतेस ते ठीक. पण प्रतिमा म्हटली की तिची आकार–व्यवस्थाही असावी लागते. तिचे काय ?'

'ते सांगण्याठी मी काव्य रचना करीन. आधी प्रतिमा घडवीन ती घडव-ताना मनात मंद मधुर गीत आपोआप उमटू लागते. राष्ट्राच्या चरणात समाज सामावलेला आहे. त्याच्या बाहूत क्षात्र बळ स्फुरते आहे. मस्तकात ब्रह्मविद्या मुखरित होत आहे व मध्य शरीरात प्रजाजन निवास करीत आहेत.

या प्रतिमेशी मी एकरूप होते आहे. माझे आत्मस्वरूप त्या मूर्तीत प्राण प्रतिष्ठा करीत आहे. तुम्हाला मी हाताला धरून नेते तशी या राष्ट्र पुरुषाची पण मी राष्ट्र शक्ति होईन.'

वाणीच्या या भावनेने पिता अंभृणी प्रसन्न झाले. तिला आत्मभाव कळला होता. तिने केलेल्या स्तुतीत ती स्वत:ला ' अहम् म्हणून संबोधते.'

' मी ब्रह्मविद्या, राष्ट्राच्या शक्तिरुपाने मी रहाते. अकरा रुद्र व आठ वसु यांच्यासह मी संचार करते. बारा आदित्य व तेहतीस विश्वेदेवांच्या बरोबर मी विहार करते. मी राष्ट्रशक्ति, विकास पावण्यासाठी मित्र, वरुण, इन्द्र, अग्नि, अश्विनीकुमार या राष्ट्र प्रतिनिधी देवतांनाही धारण करतें.'

' मी स्वत: राष्ट्रशक्ति आहे. वसु–संग्रह करण्यायोग्य धनसाधनाचे संगमस्थान मीच आहे. परोपकाराच्या कामातून मी आत्मसाक्षात्काराचा अनुभव घेते. देवांनी राष्ट्राच्या वेगवेगळ्या विभागात चेतनारूपे माझी स्थापना केली आहे.'

' राष्ट्राच्या प्रजाजनांच्या ठायी राष्ट्र शक्तिरूपाने माझे दर्शन करतात ते माझ्या प्रेरणेनें अन्नादि साधने प्राप्त करून घेतात. माझे गुणगान ऐकतात त्यांना मी नवजीवन देते. याप्रकारे मी राष्ट्र प्रतिमेत प्राणप्रतिष्ठा करते.'

' जें प्रजाजन मला मान देत नाहीत ते आत्मनाश करून घेतात. हे सत्य मी तुम्हाला सांगते.'

' मी स्वत:च राष्ट्र शक्तीचे संपादन करून सांगते की इन्द्रादि देव व मानव आदराने माझा मोठा सन्मान करतात. राष्ट्राच्या रक्षणार्थं मी ज्यांची योजना करते त्यांचा स्वभाव मी उग्र बनवते. राष्ट्राचे कल्याण करणाऱ्यांना मी मंत्रद्रष्टे ऋषि बनवते. कवि आणि मेधावी बनवते.'

' राष्ट्राची वेगवेगळी कार्ये करण्यासाठी मी राष्ट्रशक्ति वायुवेगाने सगळी-कडे जाऊन पोचते. राष्ट्रसेवा करण्यासाठी राष्ट्र शक्तिरुपाने व्यापक होऊन मी सर्व कामे उरकते. त्यामुळेच माझा महिमा आकाश व पृथ्वीच्या अंतराळात सर्वत्र गायला जातो.'

या प्रमाणे वागांभृणीने राष्ट्रशक्तीच्या रुपात आपल्या आत्मशक्तीचे दर्शन केले आहे. वाणी सावधान राहून वृद्ध व अंध पित्याची सेवा करते व त्याच भावनेने प्रत्येक व्यक्तीने राष्ट्रपुरुषाची सेवा करावी असा ती सर्वांना उपदेश करते.'

## ११ जीवनाची आधारशीला :

ज्योतीतून ज्योत प्रगट होते तसे नारी जीवनातील हे समर्पण आहे. माता

होऊन ती संतानांचे पालन पोषण करते. पत्नी होऊन ती पतीला प्रेरणा देते. समाजाला ती जागृत करेते. राष्ट्राला ती टिकवून धरते व विश्वाला ती संदेश देते. तिच्या ठायी करुणा आहे. सहानुभूति आहे.

त्या नारीची व्यथा तीच जाणे. नारीची संवेदना जाणून घेण्यासाठी स्त्रीचेच हृदय असावे लागते. तिचे जीवन चंदनासारखे, सतत झिजणे हेच तिचे काम. जळत राहूनही ती सुवास देते. त्याग, बलिदान करून ती आपले जीवन सफल करते.

तिला हा त्याग कोणी शिकवला ? तिच्या या कष्टमय जीवनाचा आधार तरी कोठला आहे ? या प्रश्नांची उत्तरे एका स्त्रीनेच दिली आहेत. त्या ऋषीचे नाव आहे श्रद्धा. तिच्या पित्याचे नाव काम. मातेचे नाव अभिलाषा. काम व अभिलाषा यांच्या संभोगातून ती निर्माण झाली. त्या माता पित्याने तिचे पालन पोषण केले.

याप्रमाणे श्रद्धा कमायनी ही कामाची पुत्री. ती स्वत: ऋषि आहे. देवी आहे. ती स्वत:वर प्रेम करते. ती स्वत:च जीवनाला आधार देणारी आहे. ती डळमळीत झाली तर जीवन टिकणे कष्टाचे होते. पण तसे होत नाही. श्रद्धाच श्रद्धेला दृढ ठेवते. तिचे हे शब्द आहेत.

'ही श्रद्धा, हिच्यामुळेच गृह-अग्नि समिद्ध, प्रज्वलित रहातो. श्रद्धेमुळेच त्याला हवि मिळतो. त्या श्रद्धेला वाणीच्या योगाने ओळखता येते.'

'ज्याने जीवनात काही ना काही त्याग केला. आहे, समर्पण केले आहे, आपले बलिदान केले आहे तोच श्रद्धेला प्रिय आहे. काही तरी करण्यासाठी तळमळणारी, एकमेकांना खाऊ पिऊ घालणारी, एकमेकासाठी झटणारी माणसे तिला आवडतात.'

'प्राणामुळे जीवनात चैतन्य निर्माण करणारे देव आणि मानव श्रद्धेची स्तुति करतात. श्रद्धेला पारखण्याची इच्छा मनात जागते. तिच्या प्रभावाने परोपकाराची, सेवेची कामे माणसाच्या हातून होतात. ज्याच्या ठायी श्रद्धा आहे त्याला धन साधनादि सारेच लाभ होतात.'

'सकाळी उठल्याबरोबर आम्ही श्रद्धादेवीला आवाहन करीत आहो. मध्यान्हीच्या वेळी सर्वजण आपल्या कामात व्यस्त असतात तेव्हा व सूर्यास्ताच्या वेळीही आम्ही श्रद्धादेवीला आमंत्रण देतो.'

'हे देवी आमच्या मनातून श्रद्धा चलित ना होवो ही एकच अभिलाषा आहे. कारण श्रद्धेच्या बळावरच आम्ही टिकून रहातो श्रद्धा हीच आमच्या जीवनाची आधार शिला आहे.'

## १२ वेदमातेची शिकवण :

ऋषींनी ऋचांचे, मंत्रांचे दर्शन केले. ती वाणी त्यांनी कानांनी ऐकली. वेदांची वाणी श्रुति रुपानें एका ऋषीपासून दुसऱ्या याप्रमाणे चालत आली. त्यातून श्रुतिपरंपरा निर्माण झाली. मातापुत्राचे हित व्हावे म्हणून सावधान असते. त्याला सन्मार्गी लावते. त्याप्रमाणेच वेदवाणी आपल्याला उपदेश करते.

त्या ऋषींच्यातले एक ऋषि. त्यांचे नाव संवनन. त्यांच्या वाणीतून प्रत्यक्ष श्रुति भगवतीच जणू प्रगट झाली आहे. करुणासभर मानवी हिताचा उपदेश त्या शब्दातून बाहेर पडत आहे.

'हे मानवांनो, तुम्ही सारे एका समान भूमिकेवर एकत्र या. परस्पर हितासाठी संवाद रचा. तुम्ही सारे एकमेकांची मते जाणून घ्या. पूर्वी देव पण अशाच प्रकारे एकत्र जमून संवाद रचून, मनमेळ साधून परस्परांच्या सेवेची कामे करीत. त्याचप्रमाणे तुम्हीही करावे.'

'हे मानवांनो, तुमचे मन समान असो. तुमची हृदये भाव सभर असोत. परस्परांच्या हितासाठी जी साधनसामुग्री तयार केली आहे, तिच्यामुळे एकमत साधून सहयोग वाढत राहो.'

श्रुति भगवती वेदमातेचे हे सुभाषित सर्व जनांचे खरे हितसाहित्य, समान हित-साहित्य व साहित्य संघटनाचे दान देऊन ऋग्वेद संहितेची पूर्णाहुति करते आहे.

ॐ स्वस्ति श्री

★ ★

ऐतरेय ब्राह्मण :

# विद्येची प्रतिष्ठा

## १ ऐतरेय महिदास :

होय. सुदास आणि दिवोदास हे दोघे ऋषि आहेत. राजर्षि आहेत. दास म्हणा किंवा दस्यु म्हणा चोरी व लुटफाट करणारी ती जात होती. त्यांचा नाश करण्यासाठी वसिष्ठ व विश्वामित्रांनी या राजांना दिव्य बल दिले.

त्याचप्रमाणे कवण ऐलूष व लुश धानाक ऋषी आहेत. मंत्रद्रष्टे आहेत. इलूषा व धनाका त्यांच्या माता आहेत. त्याचप्रमाणे ममतेचा पुत्र मामतेय दीर्घतमा पण ऋषि आहे.

महिदास ऐतरेय हा पण याच प्रकारचा ऋषि आहे. द्रष्टा आहे. मंत्र ब्रह्माचा व्याख्याता आहे. 'ऐतरेय ब्राह्मण' ऋग्वेद मंत्राचे व्याख्यारूप आहे. ऐतरेय ऋषींच्या नावावरूनच त्याला 'ऐतरेय ब्राह्मण' हे नाव मिळाले आहे. त्या विषयीची कथा अशी आहे.

पुरातन काली एक मोठे ऋषि होऊन गेले. यज्ञयागाच्या कामी साह्य सहकार करण्यासाठी त्यांना अनेक स्त्रीया होत्या. त्यांत इतरा नावाची पत्नी होती. तिच्या पुत्राचे नाव महिदास.

हा कुमार महिदास तेजस्वी होता. पण त्याच्यावर पित्याचे प्रेम नव्हते. सर्व ऋषिकुमार खेळत होते. महिदासालाही खेळावेसे वाटले पण ऋषिकुमारांनी त्याला अडवले. ते माता इतरेने पाहिले.

तिने आपली कुलदेवता भूमिमाता, तिची प्रार्थना केली. भूमाता मूर्तरूपाने प्रत्यक्ष आली. तिने महिदासाला मोठ्या सिंहासनावर बसवले व त्याला वर दिला.

''मंत्र ब्रह्माच्या 'व्याख्यारूप ब्राह्मणा'चे तुला दर्शन होईल."

## २ दीर्घ जीवन :

याप्रमाणे कुमार महिदासाला ऐतरेय ब्राह्मणाचे दर्शन झाले. हा कुमार दीर्घायुषी होता व त्याच्या विद्येस प्रतिष्ठा मिळाली होती. त्याची गणना ऋषि म्हणून होऊ लागली.

त्या ऋषिला जीवनात देवांचे व छंदांचे संरक्षण लाभले होते. त्याच्या कुमार वयाची चोवीस वर्षे म्हणजे गायत्री छंदाची चोवीस अक्षरे. एक देव, एक वसु तीन वर्षे रक्षण करतो. या प्रमाणे आठ वसुंनी कुमार वयात त्याचे रक्षण केले. यौवनाची चव्वेचाळीस वर्षे म्हणजे त्रिष्टुपाची चव्वेचाळीस अक्षरे. एका रुद्राने चार

वर्षे याप्रमाणे अकरा रुद्रांनी अडुसष्ठ वर्षे होईपर्यंत त्याचे रक्षण केले. नंतर येते शरीराची वृध्दावस्था ती अठ्ठेचाळीस वर्षे जगती छंदाची अठ्ठेचाळीस अक्षरे व प्रत्येक आदित्य चार वर्षे या प्रमाणे बारा आदित्यांनी त्याचे म्हातारपण संभाळले होते.

माणसाला मिळू शकणारे एकशेसोळा वर्षाचे जास्तीत जास्त आयुष्य मिळवून ऐतरेय महिदासाने केले तरी काय ?

## ३ जीवनाचे रहस्य :

त्याने मानवी जीवनाचे रहस्य उकलले. यज्ञाच्या परिभाषेत त्याने जीवनाचा प्रयोग केला. यज्ञाचे विधिविधान जीवनात उतरवले.

अजून उषेचा उदय झाल नाही, रात्र अद्याप संपलेली नाही, पक्ष्यांची किलबिल सुरू झालेली नाही, अशा ब्राह्म मुहूर्ती ऋषींनी यज्ञशाळेत प्रभात गीते गाण्यास सुरुवात केली. त्या गीतांना प्रातरनुवाक म्हणतात. अग्नि, अश्विनीकुमार व उषा हे या अनुवाकांचे देव, दिवस उगवेपर्यंत त्यांचे गान करावयाचा समय तीन सूक्ते म्हणून झाल्यावर दिवस उगवण्यास अवधि असला तर तर तो पर्यंत ऋग्वेदाच्या ऋचा गाव्यात.

हे प्रातरनुवाक म्हणजे काय ? मानवी जीवनांची ती प्रभात. पशुपक्षी, जलचर, स्थलचर यांची हालचाल सुरू होण्या आधी माणसाने आपली दिनचर्या सुरू करावी कारण त्याची जीवन यात्रा दीर्घ आहे ' हे प्रवासी, ऊठ. जाग, जरा पहा–' म्हणून त्याला कोणी तरी हाक घालीत असते.

ऐतरेयाने सर्वप्रथम सोमयागाची प्रक्रिया दाखवली आहे. सोमयागाची सुरूवात अग्निष्टोम यागाने होते त्याचे काळ तीन. सकाळ, दुपार व संध्याकाळ. प्रातःसवन माध्यंदिन सवन, व सायंसवन.

अग्नि म्हणजे जीवनाची चेतना आहे. ज्योति आहे. त्याची वारंवार स्तुति करा. त्याला ष्टोम म्हणतात. या अग्निष्टोमास ज्योतिष्टोम म्हटले जाते.

मानवी जीवनाच्या रहस्याची ही गुरुकिल्ली आहे. प्रातःसवनाचा छंद गायत्री तीन चरणांचा व आठ अक्षरांचा आहे. बालपणात एक एक वसु तीन तीन चरणांचे म्हणजे वर्षाचे रक्षण करतात. अर्थात् मानवाचे बालपण हे जीवनाचे प्रातःसवन त्याचा अवधि चोवीस वर्षाचा.

माध्यंदिन सवनाचा छंद त्रिष्टुप. चार चरणांचा व आकरा अक्षरांचा. यौवनात एक एक रुद्र चार चार वर्षे रक्षण करतो. याप्रमाणे अकरा रुद्र चव्वेचाळीस वर्षे रक्षण करतात. माणसाचे यौवन हे जीवनाचे माध्यंदिन सवन. त्याचा अवधि वयाच्या अडुसष्ठ वर्षापर्यंतचा.

सायंसवनाचा जगती हा छंद चार चरणांचा व बारा अक्षरांचा आहे. जीवनाच्या सायंकाळी, वार्धक्यात एक एक आदित्य चार वर्षे रक्षण करतात. अशा प्रकारे बारा आदित्य अठ्ठेचाळीस वर्षे माणसाचे रक्षण करतात. वार्धक्य हे मानवी आयुष्याचे सायंसवन. जीवनाचा काल एकशेसोळा वर्षांचा. सातव्या किंवा आठव्या वर्षापासून संस्कारांचा प्रारंभ धरला तर आयुष्यमान एकशे पंचवीस वर्षांचे होते.

## ४ अग्निष्टोम :

अग्निष्टोम–ज्योतिष्टोमाला प्रकृतियाग म्हणतात. कारण इतर सारे सोम-याग त्याच्या प्रक्रियेचे अनुकरण करतात. ऋषींना मानवी जीवनाच्या प्रकृतिचे या जगात दर्शन झाले. त्यानुसार त्यांनी मंत्रांचे रहस्य पण उकलले आहे. म्हणून ऋग्वेदाचे सर्वच मंत्र यज्ञपूरक आहेत असे याचे तात्पर्य नाही. मंत्र समजून घेण्याची यज्ञ ही गुरूकिल्ली आहे असे म्हणता येईल. त्या साठीच मंत्रांची विविध रूपे, पर्याय व त्यांची परिभाषा समजावण्यासाठी ऐतरेय ब्राह्मणाने साक्षेपाने निरुपण केले आहे. ते मितभाषी आहे हे ही सांगावे लागेल.

अग्निष्टोम याग पूर्ण केल्यानंतर कित्येकजण उकथ्य, षोडशी व अतिरात्र याग करणे चालू ठेवतात. संध्याकाळ झाली आहे, सायंसवन झाले आहे. चला उकथ्याची तीन स्तोत्रे आणखी म्हणूया प्रातः सवनाची व माध्यांदिन सवनाची पाच पाच व सायंसवनाची दोन व ही जास्तीची तीन मिळून पंधरा स्तोत्रे होतात तोंवर रात्र होते एक स्तोत्र आणखी म्हटले तर तो षोऽशी याग होतो. नंतर रात्रभर चालणाऱ्या अतिरात्र यागात तीन प्रहरात तीन तीन स्तोत्रे व संधिकाळची चार मिळून तेरा स्तोत्रे म्हटली तर एक अहोरात्र याग होतो.

## ५ सोमयाग :

ब्रम्हचाच्या दिवसाच्या कालात माणूस जन्माला येतो. जगतो व रात्री मरण पावतो. तो एक सोमयागच होतो ना ? पुनः नवे जीवन. नवा सोमयाग. वर्षभर हा क्रम चालला तर तो संवत्सर याग त्याला गवामयन पण म्हटले आहे. बारा दिवस चाललेल्या यागाला द्वादशाह याग किंवा दशरात्र म्हणतात. त्यांचा पहिला दिवस तो प्रायणाय तो उदयनीय म्हटला जातो.

## ६ यागाचे देव :

माणसाने सकाळ संध्याकाळ अग्निहोत्र करायचे, प्रत्येक पक्षास इष्टि करा-वयाची. अहोरात्र सोमयाग एक वर्ष करावयाचा, अग्नि इंद्र आणि सोम हे त्या त्या

त्या यागांचे देव आहेत, वसु, रुद्र व आदित्य हे गणदेव मानले आहेत. गायत्री, त्रिष्टुप व जगती हे छंद देव व देवांची स्तुति छंदोबध्द करून शब्दात व्यक्त करणारे त्यांना मंत्रद्रष्टे ऋषि म्हटले आहे. याप्रमाणे देव व छंदाचे विवेचन यज्ञाच्या परिभाषेनुसार ब्राह्मण ग्रंथ करतात. व त्याचबरोबर त्यातील रहस्ये स्पष्ट करणाऱ्या कथाही त्याला जोडतात.

## ७ ऐतरेयब्राह्मण :

ऐतरेय ब्राह्मण ग्रंथाचे चाळीस अध्याय आहेत. पांच अध्यायांची एक पंचिका या प्रमाणे त्याच्या आठ पंचिका आहेत. पहिल्या सोळा अध्यायात सोमयागाची प्रकृति, अग्निष्टोम–ज्योतिष्टोम, सतराव्या व अठराव्या अध्यायात गवामयन–संवत्सरयाग, एकोणीस ते चोवीस या अध्यायात व्दादशाहयाग (त्यातच अग्निहोत्राचेही निरूपण येऊन गेले आहे) त्याच बरोबर तिसाव्य अध्यायापर्यंत अनेक दिवस चालणारे सोमयाग, पस्तिसाव्या अध्यायापर्यंत राजसूय व शेवटच्या पाच अध्यायात ऐन्द्रमहाभिषेक, या प्रमाणे त्यातील विषयांच्या सामान्य रूपरेषेची कल्पना देता येईल.

## ८ आग्नि आणि विष्णु:

'अग्नि हा देवामध्ये अवम् (प्रथम आहे व विष्णू हा उत्तर) अंतिम आहे' हे ऐतरेय ब्राह्मणाचे पहिले वाक्य आहे. वरवर पाहाता या कथनात विष्णूला उत्तम व अग्निला अधम लेखले आहे असे वाटले तरी तसे तात्पर्य त्यात नाही. ते कळण्यासाठी यज्ञाची परिभाषा समजावयास हवी.

कोणा यजमानाला सोमयाग करावयाचा आहे. त्यासाठी त्याला प्रथम दिक्षा घ्यावयाची आहे. ऐतरेयाने दिलेल्या माहितीनुसार अग्नि व विष्णु हे दोन्ही देव दिक्षा–रक्षक, दीक्षा–पाल समजले जातात. आता या दीक्षेच्या पालनासाठी अग्नि व विष्णूस प्रसन्न करणे भाग आहे. त्यासाठी इष्टि हवन करावयाचे त्यास दीक्षणी येष्टि म्हणतात. त्याचे मुख्य देव अग्नि व विष्णु यांची स्तुति करणाऱ्या दोन मंत्रांचा भाव असा आहे.

'अग्नि' जो मुख रूपाने प्रगट होतो तो यज्ञातील सर्व देवात प्रथम आहे. त्याचप्रमाणे विष्णु हा सर्व देवांचे मुख असल्यामुळे उत्तम आहे. अंतिम आहे. अग्नि व विष्णु हे दोन्ही देव, इतर देवांच्या सहित यजमानास दीक्षा देवोत. या दोन्ही देवांसाठी माझा हवि सिध्द आहे. ते दोघे आमच्या कडे येवोत.

'हे अग्नि, हे विष्णो, तुम्ही दोघे तप आणि महर्:–उत्तम तेजाची रूपे आहात. जे यजमान दीक्षेचे पालन करू इच्छितात ते पण दीक्षापाल आहेत.

म्हणून हे समर्थ देवांनो तुम्ही दीक्षापाल यजमानाचे वरण करावे. यज्ञासाठी येणाऱ्या अनेक यज्ञीय विश्वेदेवांसहीत तुम्ही उभयता मिळून यज्ञास या व यजमानास दीक्षा द्या.

या दीक्षणीयेष्टि मध्ये प्रथम आवाहन अग्निला केलेले आहे. त्यानंतर इतर विश्वेदेव व शेवटी विष्णूचे आवाहन केले आहे. या दोन्ही देवांच्यासाठी पुरोडाश हवि तयार करावयाचा त्याला आग्नावैष्णव असे म्हणतात. त्याचा संबंध अग्नि व विष्णु या दोघांशी आहे. मंत्रात म्हटल्याप्रमाणे अग्नि तपाच्या रूपाने आणि विष्णु महराच्या रूपाने यजमानास तप व महर देतात. दीक्षेच्या पालनासाठी या दोहींचे महत्व आहे.

ऋग्वेदाच्या प्रथम मंडलाच्या पहिल्या सूक्तात अग्नीची व बाविसाव्या सूक्ताच्या शेवटच्या तीन ऋचात विष्णूची स्तुति केलेली आहे. मधल्या भागात इंद्र, मरुत्, अश्विनीकुमार, सविता वगैरे देवांची स्तुति आहे. या प्रकारे पण अवम–उत्तर यज्ञाचे अनुसंधान केल्यास ऋचाच्या विनियोगाचा निर्देश येऊन जातो.

## ९ यज्ञाची व्याख्या :

'यज्ञात मंत्राचा विनियोग करावा' हे सांगण्याचे काम ब्राह्मण ग्रंथ करतात. त्याच बरोबर यज्ञ हा काय आहे. मंत्र म्हणजे काय, त्यांचा विनियोग म्हणजे काय हे ही ब्राह्मण ग्रंथांना सांगावयाचे आहे.

यज्ञाच्या साध्या सरळ व्याख्येत तीन शब्द येतात. द्रव्य, देव, आणि त्याग. तूप, जव, तीळ या सारखे एखादे द्रव्य घ्या. आता ज्या देवास प्रसन्न करावयाचे असेल त्याचे नाव घ्या. त्याची स्तुति करा. प्रार्थना करा व त्या देवास ते द्रव्य अर्पण करा. अग्नि हा सर्व देवांचा प्रतिनिधी आहे. साक्षी आहे. त्यात होम केलेले द्रव्य त्या त्या देवाला पोचते. या प्रमाणे एक यजमान दीक्षा व्रत घेऊन पवित्र होऊन, द्रव्यास शुद्ध संस्कृत करून, मंत्रांचा उच्चार करून, देवासाठी त्याचा त्याग करतो हे अत्यंत श्रेष्ठ कर्म. त्याला यज्ञ म्हणतात.

## १० मंत्राची व्याख्या :

'एक ऋषि स्वतः यजमान होऊन एखादी कामना पूर्ण करण्याचे सामर्थ्य ज्या देवापाशी असेल त्याला प्रसन्न करण्यासाठी जी स्तुति करतो त्या स्तुतीस मंत्र म्हणतात. उदाहरणार्थ ऋषींना सत्य बोलावे अशी कामना आहे. सत्याचे रक्षण करणारा देव अग्नि आहे. त्या अग्निला प्रसन्न करण्यासाठी ऋषि स्तुति करून सत्यव्रताचे रक्षण मागून घेतात' अशी मंत्राची व्याख्या आहे. या प्रकारे यज्ञ हे आपले श्रेष्ठतम व इष्टतम कर्म आहे.

## ११ अग्निहोत्र :

अग्निहोत्र हा सकाळ संध्याकाळ करण्यात येणारा यज्ञ आहे. त्याविषयी ऐतरेय ब्राह्मणात सांगितले आहे.

' सायंकालीन अग्निहोत्र सूर्यास्ता आधी व प्रातःकालीन अग्निहोत्र सूर्योदयानंतर करतात. कारण जो यजमान वाणीने सत्यमंत्राचा उच्चार करतो तो सत्यरुप देवात होम करतो. हे कसे ?

भूर्भुवः स्व ॐ हा संध्याकाळी होम करताना म्हणावयाचा मंत्र आहे ' येथे जो अग्नि आहे तो स्वतः देव–दिव्य पदार्थ आहे. तो ज्योतिरूप आहे. तेव्हा येथे ही जी दीपज्योति तेवत आहे ते अग्निदेवाचे स्वरूप आहे. त्याला ही आहुति चांगल्या प्रकारे मिळो. माझा होम चांगला होवो. स्वाहा सुहुतम् अस्तु ।

त्याचप्रमाणे प्रभाती करावयाच्या होमाचा मंत्र आहे.

भूर्भुवः स्वरोम् सूर्यो ज्योतिः ज्योतिः सूर्यः स्वाहा ।

त्याचा अर्थ आहे, हे भूलोकादि, माझ्या होमाचा स्वीकार करा. जो सूर्य आहे तो देव आहे. तीच ज्योति आहे. अर्थात दिवसाचा तो प्रकाश आहे. त्याच प्रमाणे ज्योति--जो दिवसाचा प्रकाश तो तर हा सूर्य देवच आहे. त्याना माझा हा होम उत्तम रितीने पोहोचावा.'

## १२ सत्याचा स्वीकार :

जो यजमान हा अग्निहोत्र यज्ञ व त्याचा विनियोग मंत्र चांगल्या प्रकारे जाणतो व होम करतो तो हे ही जाणतो की सायंकालीन ज्योति अग्नि आहे व प्रातःकालीन ज्योति सूर्य आहे. हे सत्य जाणल्याने तो स्वतः सत्यवक्ता पुरुष होतो. व तेणे करून तो आपल्या अंतरीच्या परमार्थरूप अग्नि व सूर्याचाही होम करतो म्हणून सूर्योदयानंतर होम करावयाचा असतो.

सूर्योदयाआधी होम करू नये. या विषयी एक जुनी यज्ञगाथा आहे. ' समजा काही अग्निहोत्री सूर्योदय होण्याआधीच होम करू लागले तर ते सारे सकाळीच खोटे बोलतात असे होईल. कारण मंत्रात सूर्यो ज्योतिः असे म्हटलेले आहे. सूर्य दिवसा उगवतो. तो उगवण्या आधीच सूर्यो ज्योतिः म्हणून दिवसा ज्याचे किर्तन करावयाचे ते दिवस नसतानाच केले तर ते परमार्थ सत्य नाही. ती वाणी असत्यच म्हटली पाहिजे.

## १३ प्रजापतिची सृष्टि :

' भूर्भुवः स्वरोम् ' ॐकार सहित तीन व्याहृतिंना मंत्र म्हणतात. ऐतरेय ब्राह्मणाने एक सुंदर कथा सांगितली आहे.

' प्रथम प्रजापतीने इच्छा केली 'मी एक आहे' प्रजाजन मिळवून मी ' अनक ' व्हावे. त्याने तप केले. त्यामुळे पृथ्वी, अंतरिक्ष व आकाश हे तीन लोक त्याने निर्माण केले. ते तापवण्यात आले. त्यातून तीन ज्योति प्रगटल्या. पृथ्वीपासून अग्नि, अंतरिक्षातून वायु व आकाशातून आदित्य. त्या तीन ज्योतींना तापवले तेव्हा त्यातील अग्निपासून ऋग्वेद, वायुपासून यजुर्वेद व आदित्यापासून सामवेद निर्माण झाले. हे तीन वेद तापवले त्यातून तीन शुक्र तेजस्वी अशा व्याहृति प्रगटल्या. ऋग्वेदातून भूर, यजुर्वेदातून भुवः व सामवेदातून स्वः त्या तिन्ही व्याहृति तापवल्या तेव्हा त्यातून तीन वर्ण उत्पन्न झाले. अकार, उकार व मकार ते तीन एकत्र केल्यावर त्यातून ॐकार उमटला. ॐ हे सर्वांचे साररूप आहे. म्हणून होता ॐ म्हणून मग प्रयोग करतो. ॐ हा स्वर्ग लोक आहे. स्वर्गात तळपणारा सूर्य हा ॐकार आहे.

## १४ यज्ञाचे ऋत्विज :

' त्या प्रजापतीने प्रथम यज्ञांचा विस्तार केला होता. त्यांनी ऋचे ने होत्याचे यजुने अध्वर्युचे, व सामाद्वारे उद्गात्याचे काम केले. याप्रमाणे ऋक्, यजु व, साम या विद्यात्रयीचे सार शुक्र होते म्हणून ब्रह्माचे कर्म अथर्व वेद द्वारा झाले.

यज्ञ करताना त्यात काही चूक झाली किंवा उणीव राहिली तर ब्रम्हयाने प्रायश्चित म्हणून व्याहृति होम करावयाचा असतो. असे सांगून ऐतरेय ब्राह्मणात चारही वेदांचे सूचन केले आहे. ब्रम्हयाचे स्थान महत्वाचे आहे. अथर्व वेद हा तीन वेदाहून वेगळा दाखवण्याचे तात्पर्य या प्रमाणे दिलेले आहे.

प्रायश्चित्ताची वेळ आली तेव्हा महाविद्-ब्रह्मवाद्यांनी विचार केला की ऋचेने होत्याचे, यजुने अध्वर्युचे व सामाने उद्गात्याचे कर्म करावयाचे. या प्रमाणे तीन वेदांचे विवेचन झाले तर मग ब्रह्मयाचे कर्म कोणत्या विद्येने करायचे त्याचे उत्तर दिले आहे. या तीनही विद्यांनी ब्रम्हयाचे कर्म करावयाचे.

सायनाने रूढिवाद रुजू करणारा एक श्लोक या विषयी दिला आहे. त्याचा भावार्थ असा–

तसे पहाता ब्रम्हयाचे कार्यक्षेत्र अथर्व वेद हे आहे. पण दुसऱ्या वेदांचाही भाग त्यात आहे. म्हणून ब्रम्हयाला आरण्यकात ब्रह्मनिष्ठ म्हटले आहे.

## १५) यज्ञाचे दोन मार्ग :

वेद परंपरेत कर्मानुसार एकाच वेदाचे चार विभाग मानले आहेत. ब्राह्मण ग्रंथात त्याला आधार देणारी अनेक विधाने मिळतील. येथे त्यांनी म्हटले आहे ' खरोखरीच जो यज्ञ वायुप्रमाणे संचार करतो तो दोन मार्गांनी प्रवृत्ती करतो.

वाणी व मन, मंत्ररूप वाणी आणि प्रयोगाचे अनुसंधान साधणारे मन-यातून यज्ञाची प्रवृत्ति होते. वाणी ही पृथ्वी असून मन हे आकाश आहे. यज्ञ हा रथ आहे असे मानले तर तर त्याचे हे दोन मार्ग त्याच्या दोन चाकासारखे आहेत. त्यातील एक मार्ग वाणीत्रयाने ऋत्विज घडवतात व ब्रह्मा मनाच्या योगाने दुसरा पक्ष घडवतो.

येथे सायणाने छांदोग्य उपनिषदाचे प्रमाण देऊन स्पष्टता केली आहे 'हा तर खरोखरीच यज्ञ आहे. मन व वाणी हे त्याचे दोन मार्ग. त्यातील एका मार्गाच्या प्रवृत्तीस ब्रह्मा मनाच्या योगाने व दुसऱ्या मार्गास होता, अध्वर्यु व उद्गाता हे वाणीच्या योगाने घडवतात.

यज्ञाच्या प्रक्रियेप्रमाणे होता हा ऋचा म्हणतो उद्गाता स्तोत्र गातो व अध्वर्यु हा यजुचे मंत्र म्हणतो. ऋचांचे शस्त्र म्हणजे शंसन प्रशंसेसाठी, स्तुतिस्तोत्र प्रार्थनेसाठी व यजु हे गद्य मंत्रासाठी योजलेले शब्द आहेत.

## १६ छंदाचा महिमा :

ऋचा छंदात व साम गीतात रूजू करतात या प्रमाणे छंदाचे स्थान महत्वाचे आहे. ऐतरेय ब्राह्मण गायत्री वगैरे छंदांचा महिमा व कथानक चांगल्याप्रकारे सांगते.

सुरुवातीस सांगितल्याप्रमाणे गायत्री हा अग्निचा छंद आहे. अग्नि व गायत्री दोन्ही प्रजापतीच्या मुखातून निघाले आहेत. अग्नीची सूक्ते पण बहुधा गायत्री छंदातच असतात. दुसरा त्रिष्टुप हा इंद्राचा छंद आहे व तिसरा जगती हा विश्वेदेवांचा छंद आहे. या छंदांचे पक्षीरूपाने वर्णन करणारी एक कथा ऐतरेयात आहे.

'पूर्वी सोम राजा दुसऱ्याच लोकात होता. देवांनी व ऋषींनी त्याला या लोकात कसे आणावे याचा विचार केला. त्यांनी छंदांना सांगितले की तुम्ही सोमराजाला आमच्याकडे घेऊन या. तेव्हा छंद हे सुवर्ण पक्षी होऊन उडाले त्या काळी जगती, त्रिष्टुप व गायत्री हे चार चारच अक्षरांचे छंद होते. प्रथम जे दोन छंद गेले ते सोमाला आणू शकले नाहीत उलट आपली अक्षरेच तेथे टाकून आले शेवटी गायत्री छंदाला सोमाला आणण्यात यश मिळाले.

जगतीने तीन अक्षरे व त्रिष्टुपाने एक अक्षर सोमाकडे टाकले होते ती चार अक्षरे गायत्रीने परत आणली. तेव्हापासून गायत्रीची आठ अक्षरे झाली. गायत्रीने आठ अक्षरे त्रिष्टुपाला दिली तेव्हा त्रिष्टुपाची ११ अक्षरे झाली. त्याने जगतीला अकरा अक्षरे दिली त्यामुळे जगती छंदाची बारा अक्षरें झाली.

या प्रमाणे मुख्य छंद तीन आहेत व यज्ञात त्यांचा विशेष उपयोग आहे. या तीन छंदात केलेल्या यज्ञात सर्व छंद सामावून जातात. पहिल्या सवनाची समृध्दि गायत्री, माध्यंदिन सवनाची त्रिष्टुप व सायंसवनाची समृध्दि जगती या प्रमाणे मान्यता आहे.

## १७ यज्ञाचे देव :

ऐतरेय ब्राह्मणात वेगवेगळ्या क्रियांचे निरूपण आहे. त्यात देवांचे आवाहन करण्यासाठी असलेल्या विविध शस्त्रांची नावे दिलेली आहेत या परिभाषेत शस्त्र याचा अर्थ शंसन–प्रशंसा–स्तुति ऋग्वेदाचा होता हा शब्दप्रयोग करतो.

अग्नि वगैरे देव अज्ञान व अंधकार दूर करतात. त्यांचे आचरण नीतिनियम व ऋत–व्रताच्या पालनाने दृढ झालेले आहे. सत्याची त्यांना आवड असून ते अतिशय शक्तिशाली आहेत. यजमानाची जी काही मनोकामना असेल ती ते पूर्ण करतात. परंतु त्यांना छलकपट मात्र आवडत नाही नियमांचे उल्लंघन करणाऱ्यांना व वाईट कर्मे करणाऱ्यांना ते शासन करतात.

ऐतरेय ब्राह्मणात तेहतीस देवांची गणना केलेली आहे. आठ वसु, अकरा रुद्र, बारा आदित्य, प्रजापति व वषट्कार, वसु रुद्र व आदित्य हे गण देव आहेत. परंतु त्या सर्वांची नावे सापडत नाहीत. ऋग्वेदाच्या ऋचात पण ही नावे निश्चित अशी आढळत नाहीत. परंतु ते देव प्रसिध्द आहेत. इतर देवांची नांवे ऋग्वेद व एतरेय दोन्हीत सापडतात.

## १८ मुख्य देव–अग्निः सोम व इंद्र :

यज्ञाच्या दृष्टीने अग्निच मुख्य देव आहे. देवांनी ज्याला समिध्द, म्हणजे प्रज्वलित केला तो स्वर्गाचा व मानवाने समिध्द केलेला अग्नि पृथ्वीचा. परंतु ऋचांमध्ये ज्ञानशक्तीचे प्रतिक म्हणून अग्नि स्वीकारला आहे. ' अग्नि मुळे सृष्टीतील सारे निर्माण झाले. अग्नि स्वतः श्रेष्ठ अन्न बीज आहे. व तो अन्नपति आहे. अग्नि स्वतःची शक्ति केंन्द्रस्थानी ठेवून सर्व देवांचे रक्षण करतो. नित्य निरंतर चालणाऱ्या नैसर्गिक हवनाचा तो होता असून सर्व देवांचे तो मुख आहे.

येथे अग्निबरोबर सोमाचे निरुपण केलेले आहे. कारण वैदिक यज्ञात सोमयाग प्रथम आहे. त्यातील द्रव सोमवल्ली असून अग्नि व सोम हे यज्ञाचे दोन डोळे असून त्यांच्या द्वारे देव यज्ञाकडे पाहतात.

सोमरस यज्ञाचा पेय पदार्थ आहे. त्या सह सोमाचे स्थान देवांच्यात आहे. हा सोम ब्रम्हांडभर आहे. अमरत्व व प्रकाश हे त्याचे गुण आहेत. अग्निप्रमाणेच सोमही सर्व देवांच्या ठायी आहे.

इंद्र हा बहुस्तुत देव आहे. अग्नि हा यज्ञरूप आहे. तर इंद्र हा अग्निचा स्वामी आहे. याप्रकारे इन्द्र सर्व देवात विशेष ओजस्वी साहसी भाग्यवान–भगवान आहे. याने महाभिषेक कर्म करून सर्व देवांना जिंकून घेतले व तिन्ही लोकांवर सत्ता प्रस्थापित केली आहे.

इंद्राबरोबर अग्नि, वरुण, मरुत, वसु, रुद्र आणि आदित्य वगैरे देव असतात.

## १९ प्रजापति कोण ?:

देवात प्रथम व सर्वोच्च देव प्रजापति मानला जातो. तो सर्वाहून आधी प्रगट झाला आहे. व म्हणून सर्व पदार्थ, लोक, देव, वगैरे उत्पन्न करणारा आहे. इंद्र, अग्नि, सोम वगैरे देव त्यांच्या नावाने ओळखले जातात परंतु प्रजापति 'क' या नावाने ओळखला जातो. सामान्य रितीने 'क' म्हणजे प्रजापति परंतु ऋषि 'क' च्या भोवती समस्या, प्रश्न सूचन रचतात तिचे उत्तर देत नाहीत. 'क' हा अव्यक्त, अपरिमित, अतीत देव असून तो सर्वांना एक सारख्या गतिने व्यापून रहातो.

त्याच प्रमाणे आदित्य, सविता, अश्विनीकुमार, मरुत, वरूण बृहस्पति वायु रुद्र, विष्णु, विश्वेदेव वगैरे देवांचे निरुपण या ब्राह्मणात केले आहे.

## २० संहिता आणि ब्राह्मण :

ऋग्वेद संहितेचा विस्तार खूप मोठा आहे. तथापि त्याला एका वर्तुळात गुंफण्याचे काम ब्राह्मणाने केल आहे. यज्ञाची मर्यादा स्वीकारून त्यात सफलता मिळवली आहे. शिवाय देवाच्या शक्तींचे गुप्त रहस्य शोधण्याची किल्ली पण ब्राह्मण ग्रंथ दाखवतात.

## २१ वेदाचे ऋषि :

मंत्रांचे रहस्य जाणून घेण्यासाठी ऋषिंचा परिचय महत्वाचा आहे. ज्यांना ऋषि कळले नाहीत त्यांचे मंत्र ज्ञान अपुरे रहाते. ऋषिंच्या विशेष नामाबरोबरच पिता, पितामह, कुल, गोत्र इ. उल्लेख पण परंपरेच्या दृष्टीने करण्यात आलेला आहे.

'ऋषि हे मंत्र द्रष्टे आहेत. त्यांनी सूक्ते रचली आहेत. त्याचबरोबर यज्ञात नानाप्रकारच्या कार्याची व्यवस्था करण्यात व त्यातील रहस्ये जाणून घेण्यासाठी ऋषींचा फार उपयोग होतो. ऋषींची नावे ही निरर्थक नाहीत. विश्वामित्र हे विश्वाचे मित्र आहेत. गृत्समद हे स्तुति करून मदरहित होतात. भरद्वाज हे 'वाज' भरणारे. हे सारे ऋषि म्हणजे प्राणाचे, शक्तिचे अविष्कृत रूप आहे. प्राण हेच खरे ऋषि आहेत–'

या प्रमाणे ऐतरेय ब्राह्मण ऋषि व छंद यांचा परिचय करून देते. त्यातील खुबी ही की त्याने यज्ञाच्या माध्यमातून त्याची आधिभौतिक, आधिदैविक व अध्यात्मिक रहस्ये उकलून दाखवली आहेत. यज्ञाच्या प्रक्रियेत जीवनाची जडण घडण सूचित केली आहे.

दीर्घायुषि ऐतरेय महिदास विद्येची प्रतिष्ठा करून यज्ञाची परिभाषा उकलून अनेक शब्दांची व्याख्या या ग्रंथात देतो. त्याचबरोबर लहान लहान कथा व आख्याने सांगून त्या व्याख्या सोप्या, सरळ आणि मधुर करतो. ऐतरेय ब्राह्मणात दोन मोठी आख्याने आहेत. त्यातील सुपर्ण आख्यान छंदाच्या व्याख्येत दिलेले आहे. दुसरे शुनःशेपाचे आख्यान विस्ताराने दिलेले आहे. ते वेदावरील ग्रंथात व ब्राह्मणात खूप महत्वाचे असल्याने येथे विस्तृत रूपाने दिलेले आहे.

# श्रमाची प्रतिष्ठा

## १ आळशाच्या मनातील तरंग :

धर्मारण्यात अजिगर्त नावाचा एक दरिद्री ब्राह्मण रहात होता. तो एकटाच भटकत होता. एका वृद्ध ब्राह्मणाला त्याची दया आली व त्याने आपल्या मुलीशी त्याचे लग्न लावून दिले.

तिचे नाव शमना. ती साक्षात श्रमाचीच प्रतिमा होती. लग्नानंतर तिने एक गाय पाळली व नवऱ्याला निरोगी केले. त्याला प्रेरणा देऊन शेती करावयास सुरुवात केली. तो मनाने दुर्बल होता व त्याचे नशीबही तसेच होते. कमनशीबी अशा त्या अजिगर्ताने आळस आणि प्रमाद जवळ केले होते. त्याच्या नशीबाशी शमना एकटी टक्कर देत होती.

अजिगर्त तरंगी होता. तो दूर रानावनात एकटाच बसून मनोराज्ये रचीत राही. 'या रानात मी गोशाळा उभी करीन. रानभर पसरलेले गोधन आणि त्यात आमचा दोघांचा मंगल, समृद्ध संसार ! मी आणि शमना–'

शमनेची आठवण होताच त्याचे मनोराज्य विरून जाई. डोळे उघडून पाहिले की समोर शमना उभीच असे. ती गोड शब्दात विचारी,

'अरे, इथे काय करता ? भूक नाही का लागली ?'

पडल्या जागेवरूनच तो आळशी उत्तर देई–

'भूक लागली आहे गं. पण शमने, हे असं किती दिवस चालायचं ? तू नव्हतीस ना तेव्हाही मला भूक लागायचीच आणि मी आपला उपाशीच पडून रहायचो. रोग माझे शरीर कुरतडायचा. मी आपला पहातच राहायचो. भूक साऱ्या जगाला गिळत रहाते. ही तहान भूक का कपाळी लिहिलेली असते ? तुला काही कळतंय् शमने ?'

'हे पहा, कल्पनेचे तरंग आता मग. आधी भाकरी आणली आहे ती खाऊन घ्या. उन्हे उतरली की तुमचे तरंगही ओसरतील. हात पाय हालत नाहीत पण मन बरे घोडयाच्या वेगाने धावते !'

'तुझं म्हणणं अगदी खरंय् ! हात पाय हलवून तुझे की माझे काही बरे होणार नाही. तू इतकी श्रमतेस पण होतंय काही ? तुझ्या, माझ्या, साऱ्या जगाच्या मागे लागलेल्या भुकेला पळवून लावीन—तरच मी नावाचा अजिगर्त !'

'आणि शमने, तुला खरं नाही वाटायचं पण मी एक योजनाही आखली आहे. त्याने तुझे, माझे साऱ्या जगाचे भले होईल बघ.'

आपल्या नवऱ्याचा हा तरंगी स्वभाव शमना ओळखून होती. ती त्याच्या तोंडी घास भरवी. वर ताकाचा घोट पाजी आणि मग त्याची भूक शांत होई.

शमनेला लहानपणापासूनच हे कळून चुकले होते. कारण तिचे वडील म्हातारे आणि अपंगही होते. शमनाच श्रम करून स्वयंपाकही करी. अशा प्रकारे आपल्या पित्याचे पालन करणारी शमना आता आपल्या नवऱ्याचे पालन करीत होती. तिने आपल्या नशीबाला कधी बोल लावला नव्हता. तिला त्याचा विचार करायला वेळच होत नव्हता !

त्या आळशी ब्राह्मणाचा संसार शमनेमुळे उजळला होता. तिला पहिला मुलगा झाला तेव्हा अजिगर्त आनंदातिशयाने उडया मारू लागला. गेला दिवस तो विसरला होता. आजचा भार त्याने शमनेवर टाकलेला होता. कारण तो होता भविष्यकालाकडे पहाणारा द्रष्टा !

त्याला वाटे 'उद्यांचा दिवस उगवेल नी माझा भाग्योदय होईल' पण असे कितीतरी दिवस उगवले आणि मावळले तरी त्याची 'उद्याची आशा' मात्र विराम पावली नव्हती.

त्याला आपल्या पुत्राकडे पाहून नवीच कल्पना सुचली. 'बस. माझा उद्याचा दिवस वाढवणारा हा माझा पुत्र ! त्यालाच माझी भावना काय आहे ती कळू शकेल' आणि त्याने मुलाचे नांव ठेवले 'शुनो लांगूल'

शमनेला नवल वाटले. 'अरे ! तुम्हाला नाव तरी ठेवता येतं का ? इतर ऋषिकुमारांची नावे कशी सुंदर असतात !'

'अग माझ्या शमने ! तुला नाही कळायच ते. मी पण ऋषि आहे आणि दृष्टा आहे. उद्याचा दिवस म्हणजे श्वा. तो वाढवणार. मंगलमय करणारा म्हणून याचे नाव शुनो लांगूल. माझ्या मुलाचे जसे नाव तसे गुण. बोल. आवडलं की नाही नाही नाव तुला ?'

शमना न बोलता तो म्हणेल त्याला संमतीच दर्शवी. कारण या तरंगी माणसापुढे तिच्या समजुतदारपणाला काही अर्थ नव्हता. तरीही तिने आशा सोडली नव्हती.

शमनेवर अजिगर्त जीव ओवाळून टाकी. कारण एक तर ती कधी काही मागत नसे आणि त्याला कधी विरोध करीत नसे. आपला संसार कसा चालतो याचा त्याने कधी विचारच केला नव्हता. शमनेने अजिगर्ताला दुसरा पुत्र दिला. त्याचे नाव ठेवले शुनःशेप.

शमने ! माझ्या उज्वल आशेला वाढवणारा पुत्र शुनोलांगूल आणि हा, माझ्या उद्याच्या आशेचा मुगुटमणि. मोराच्या डोक्यावर तुरा असतो तो शेपा-शमने हा मुलगा तुलाही आनंद देईल. जीवनात दैवाने मला मदत केली नाही. पण या शुनःशेपाला देव मदत करतील.

मुलांचे नाव ठेवण्यास आता शमनेची कोठलीच हरकत नव्हती. आपला नवरा 'क्रांतद्रष्टा ऋषि' आहे हे लग्नाआधीपासून ती जाणून होती !

थोड्या वर्षांनी शमनेला तिसरा मुलगा झाला. अजिर्गत परत आनंदून गेला. शमनेला तो कामधेनू मानू लागला. तिने त्याच्या तनामनाचा संताप दूर केला होता व ती त्याचा संसार समृध्द करीत होती.

'बस ! शमने हा माझा तिसरा पुत्र शुनःपुच्छा. माझ्या आशेचा आता अंत होत आला. आणि तू निश्चित मान की तुझ्या श्रमांचा पण अंत होत आहे. आता तुला शेतात कामावर जावे लागणार नाही आणि माझ्या मनाचे तरंगही चालवून घ्यावे लागणार नाहीत. आपले पुत्र आता पुरुषार्थ करतील आणि आपण दोघे स्वर्गाच्या झोपाळ्यावर झोके घेत राहू. तेथे ना तहान ना भूक !'

या तुरंगी नवऱ्याशी वाद घालण्याचे शमनेच्या कधी मनातच आले नव्हते परंतु संसाराचा भार वाढत चालला होता. पतीला त्या विषयी कधी जाणीवच झाली नाही तर मुलांचे कसे होईल हा प्रश्न तिच्या मनात घोळत होता. पुत्र मोठे होतील व पित्याच्या कामास येतील परंतु त्यांच्या लहानपणी मातापित्याने तर त्यांचे पालन पोषण तर करावयास हवे !

कधीतरी ती अजिर्गताजवळ तीं मनातली वेदना बोलून दाखवी आणि तोही मनोराज्यात गुंगला नसला तर तिचे म्हणणे ऐकूनही घेई.

'उद्याचा दिवस' उगवायचा तेव्हा उगवेल पण आजचे काय ? आपण दोघेच होतो तेव्हा मिळेल त्यावर चालवले. पण या तीन मुलांचे पालन पोषण तरी करायला हवे ना ?'

शमनेचे बोलणे ऐकून अजिगर्ताच्या स्वप्नाचा निरास होई. आळोखे पिळोखे देत तो उठे. व नांगर घेऊन शेतावर जाई. पण तेथे विशाल आकाश आणि गार हिरवे वातावरण त्याला परत मनोराज्यात खेचून नेत. थोडी फार नांगरणी होई आणि धान्याची रास पडे. अजिर्गत आनंदून जाई.

शमनेला आता थकवा वाटू लागला होता. तिचे कामही वाढले होते. मोठा शुनो लांगूल वडिलांच्या बरोबरच असे. धाकटा शुन:पुच्छ तिची मांडीच सोडीत नसे. मधला शुन शेप आपल्याच नादात असे. त्याला माता वा पिता भावंडे, सवंगडी कोणाची आवश्यकताच नव्हती. तो अंगणात नाहीतर शेताच्या बांधावर बसून दूरवर नुसता पहात राही. कोणीतरी दुरून आपल्याला बोलावीत आहे असा त्याला भास होई. पक्षांच्या पंखावर बसून त्या अनंत दिशेकडे त्याला झेप घ्यांवीशी वाटे. बागडणाऱ्या हरीणांच्या गळ्यात हात घालून दूर दिसणाऱ्या पर्वतांच्या पलिकडे धाव घ्यावीशी वाटे. एकाच गोष्टीने त्याचे पाऊल मागे पडे. भूक लागली की त्याला आई आठवे. आईने त्याच्यासाठी जी भाजी भाकरी ठेवलेली असे ती तो खाऊन घेई.

अजिगर्ताने आजवर शमनेच्या प्रकृतिकडे कधी पाहिलेच नव्हते. ती धट्टीकट्टी आणि सदा हसतमुख असायची. तिला पहाताच सारे विसरून अजिगर्त केवळ तिचाच होऊन जाई.

आता त्याला वाटू लागले, 'माझी शमना आता पहिल्यासारखी राहिली नाही. तिच्या अंगावर सुरकुत्या पडू लागल्या आहेत. ती आताशी फारशी हसतही नाही. तिच्या मनात कोठली तरी वेदना आहे. एका रात्री तो तिच्या कण्हण्याने ' जागा झाला. त्याने मायेने तिला जवळ घेतले व तो तिला विचारू लागला, शमने, काय होतंय् तुला ?'

पण शमना काय सांगणार? घरात नव्हते धान्य. शेतातही काही पिकले नव्हते. अजिगर्त हे जाणीत नव्हता असे नाही. पण तो लाचार होता, आशावादी होता. पण नशिबाने त्याला हात दिला नव्हता.

शमनेची मनोवेदना त्याने ओळखली. कालपासून तिने काही खाल्लेही नव्हते. एका भाकरीसाठी तिन्ही मुले भांडली होती. 'हिने कधी खाल्ले असेल ?' शमनेचे कण्हणे ऐकून पहिल्यांदाच त्याच्या मनात विचार आला. पण शेवटी तो होता तरंगीच ! क्रांत द्रष्टा ऋषि ना तो ! त्याने मनाशी कसलासा निश्चय केला आणि अंगावरच्या कपड्यानिशी उठून चालू लागला. शमना त्याच्याकडे पहात राहिली तिनेही त्याला 'तुम्ही कोठे जाता व कधी येणार' म्हणून विचारले नाही.

सकाळी ती शेतावर गेली. थोडी कंदमुळे वेचून आणली मुलांची भूक न भागली तरी तहानेला तरी तेवढाच आधार ! दुपार झाली तरी अजिगर्त परतला नव्हता.

मोठा शूनोलांगूल एकटाच शेतावर गेला. धाकटा घरीच आईजवळ होता. आणि मधला शुनःशेप केव्हाच बाहेर पडला होता. त्याला काही फळे मुळे मिळाली. भूकही लागली होती. पण आईला विचारल्या शिवाय खाऊ नये इतपत विवेक मनात जागा झाला होता. तो धावतच आईकडे गेला व त्याने ती फळेमुळे तिला दिली. तिने फळांचा रस काढला. मुळे शिजवली. त्या वेळेपुरती तरी तिन्ही मुलांची तहान भूक भागली.

अजिगर्ताला जाऊन तीन दिवस झाले. शमनेने खूप शोधले पण कोठे पत्ता लागेना. तिची तहान भूक, झोप उडून गेली. ती अजिगर्ताशिवाय कधीच एकटी राहिली नव्हती. तीन तीन मुले जवळ असूनही ती एकाकी पडली होती. मुलेही पित्याविना अस्वस्थ होऊन गेली. थोरला तर सारखा विचारी, ' आई, तात शेतात असतील. मी धावत जाऊन त्यांना घेऊन येतो. पण आई शेतात कोठे ते दिसतच नाहीत. कुठे गेले असतील ते ?'

मुलाचे बोलणे ऐकूण शमनेच्या डोळ्यांना पाणी येई. तिच्या तोंडून शब्दही फुटत नसे.

मध्यरात्रीच्या वेळी शमनेच्या दारावर तीनदां ठोकलेले ऐकून ती लगबगीने उठली. तिची झोप तर उडालेलीच होती. मुलांचे वडीलच आलेले असणार ही खात्री होती. तिने दार उघडले अजिगर्त आत आला आणि त्याच्या मागून एक अतिथीही आला.

' शमने मी आलो आणि आपली तहानभूक शमवणाऱ्या या मित्रालाही घेऊन आलो '

अजिगर्त आला म्हणून शमनेला आनंद झाला होता. पण बरोबर आलेला हा मित्र तहान भूक कशी शमवणार ते काही तिला कळेना. अजिगर्त व त्याचा तो मित्र दोघेही झोपले. सकाळी मुले जागी झाली तेव्हा अजिगर्त व शमना बोलत असताना पाहून थोरला धावत जाऊन बापाच्या गळ्यात पडला. धाकटा आईच्या मांडीवर चढला. मधला मात्र दुरूनच झोपलेल्या पाहुण्याकडे पहात राहिला.

'ये बाळ शुन:शेपा ! हे आपले अतिथी आहेत ते आपली तहान भूक भागवण्यासाठीच आलेले आहेत.'

तेवढ्यात पाहुणाही उठला. शमनेने त्याला प्रणाम केला. तिने पाहिले तो हा अतिथी वयाने तिच्या मधल्या मुला येवढाच वाटत होता. अजिगर्ताने मुलांच्या व अतिथीच्या देखतच शमनेला सांगितले.

'हे बघ शमने, माझ्या तिघा मुलांनी माझा 'उद्याचा दिवस' आणला नाही पण या अतिथीने तो पाळून पोसून आणलेला आहे. त्याची गोड फळे आपल्याला मिळणार आहेत. तहान भूक सारे भागणार आहे.'

'तात, यांच्या जवळ आपली तहान भूक भागवील असे आहे तरी काय ? थोरल्याने विचारले, त्यावर अजिगर्ताने सांगितले.

'वत्सा, अरे यांच्याजवळ शंभर गाई आहेत. ते त्या आपल्याला देतील मग आपल्याकडें त्या शंभर गाई वाढत वाढत सहस्त्र होतील. मग कसली भूक नी कसली तहान !'

'तात !' शुन:शेपाने विचारले 'हे गाई घेऊन आले आहेत का ?'

'नाही बाळा. गाई काही तशाच थोड्या मिळतात कोणाला ? आपल्याला त्याचे मूल्य चुकवावे लागेल.' अजिगर्ताला बोलण्याची संधी मिळाली.

'तुम्ही माझे तीन पुत्र. एक एक पुत्र म्हणजे एकेक पुरुषार्थ. तुमच्या आईची तुमच्यावर केवढी भिस्त. या गाईंचे मूल्य तुम्ही नाही चुकवणार ? अतिथीचे मागणे आहे की तुमचा एक पुत्र द्या मी शंभर गाई देतो. मग तुमच्यातल्या कोणाला द्यायचे ? सांगा.'

शमना हे सारे ऐकत होती. अतिथीच्या पावलावरूनच तिने त्याची मनोमन परीक्षा केली होती. ती जाणून होती की आपल्या झोपड्यात स्वार्थाशिवाय कोणी फिरकणारे नाही.

सकाळी उठल्यापासून अजिगर्त तिची समजूत घालत होता, परंतु पुत्राच्या मोलाने गाई घेणे तिच्या मनास रुचत नव्हते पण तिचा निरुपाय होता. आजवर तिने नवऱ्याची आज्ञा मोडली नव्हती. आजही तो प्रसंग येऊ नये म्हणून ती

गप्पच राहिली होती.

धाकटा मुलगा काहीतरी अनिष्ट घडत आहे या जाणिवेने थरथर कापू लागला. त्याला धड काही कळत नव्हते. तो आईच्या कुशीत तोंड लपवून बसला. थोरला शुनोलांगूल जरा वाचाळ होता, तो म्हणाला,

'तात, शेतावर जाताना तुम्ही नेहमी मला बरोबर नेता. धाकटा आईजवळ असतो पण या शुनःशेपाचा तसा काहीच उपयोग नाही खरे ना ?'

भावाच्या म्हणण्याचा अर्थ शुनःशेपाला उमगला. तो वयाने लहान असला तरी शहाणा व समजुतदार होता. त्याने लगेच संमती दर्शविली.

'खरंय तात, माझ्या बदली तुम्हाला शंभर गाई मिळणार असतील तर मी अतिथीबरोबर जाण्यास तयार आहे.'

अजिगर्त हे ऐकून राजी झाला. शमनेच्या मनातील वेदनेचा विचार करायला त्याला वेळच नव्हता.

अजिगर्ताला परत आलेला पाहून आजुबाजूचे ऋषि मुनी त्याला भेटण्यासाठी आले. त्यांना अजिगर्ताने शंभर गाई घेऊन आपला पुत्र विकल्याचे कळले. हे वृत्त पसरताच सगळीकडे हाहाकार उडाला. आश्रमाचे कुलपती गौतम ऋषि होते. त्यांना अजिगर्ताविषयी सहानुभूति होती. त्यांनी विरोध शांत केला. दुपारी शुनःशेपाला घेऊन अजिगर्त अतिथीबरोबर निघाला तेव्हा शमना व दोघे पुत्र यांच्यासाठी धान्य वगैरे ठेवून निघाला. शमना त्याच्या मागे दूरवर पहात राहिली कामधेनूचा नंदी अदृश्य कालाला वश होऊन त्याच्या मागे चालला आहे असा तिला भास होत होता.

## २ मृत्यूपासून दूर :

रोहिताच्या मनात अपार दुःख होते. अजिगर्त व शुनःशेप त्याच्या बाजूलाच झोपले होते. पण त्याला मात्र झोप येत नव्हती. तो पहिल्यांदा रानात पळून गेला तेव्हा त्याला वाटले होते की तो एका महा आपत्तीतून वाचला. त्याच्या पित्याने हरिश्चंद्रानेच त्याला तो मार्ग दाखवला होता.

'बाळ रोहित तुझ्या माथी मृत्युचे भय आहे. राजमहाल सोडून तू पळून जा,' आणि राजभवनातील अपरंपार सुख संपत्ती सोडून त्याला पळून जावे लागले

होते. खाणे पिणे, सखे सोबती, दास दासी, रथ घोडे, सारे त्याच्या सेवेसाठी सिद्ध होते. ते सारे त्याला सोडावे लागले कारण त्याच्या पित्याचे त्याच्यावर अपार प्रेम होते. त्याचे वडील रोज त्याला मांडीवर घेऊन प्रेमाने त्याला कुरवाळीत व जडसा निःश्वास टाकीत.

आपल्यासाठी आपल्या पित्याला एवढी खंत का हे त्याला कळत नसे. तो थोडा मोठा व समजुतदार झाल्यावर एक दिवस त्याने पित्याला त्या विषयी विचारले. ते ऐकताच राजा पहिल्यांदा खूप रडला. मन जरासे हलके झाल्यावर त्याने सांगितले,

'बाळा वरुणदेव तुझ्या मागे लागले आहेत. ते तुझा बळी घेणार आहेत. मला भिती आहे ती हीच की मला माझ्या हाताने तुला मृत्युमुखी द्यावे लागेल ! बाळा ! माझे एक काम करशील ? राजभवन हे तुझ्यासाठी मृत्यु मुख आहे. ते सोडून तू दूर दूर निघून जा. जेथे मृत्युची छाया नसेल जी वरुणाच्या मर्यादे पलिकडे असेल अशा जागी जा. तू मला प्राणाइतका प्रिय आहेस. तुला मृत्युमुखी द्यायचे नाही. बाळा तू निघून जा. चिरंजीव हो.

'पित्याने सांगितल्यावरून मी राजभवन सोडून पळालो. दिवसचे दिवस भटकत राहिलो. शरीर थकून गेले. तहान भुकेने त्रस्त झालो. रात्रीच्या रात्री झोपे शिवाय काढल्या. परंतु मृत्युचे भय प्रत्येक क्षणी मला सतावीत होते. मृत्यु म्हणजे काय तेही मला माहिती नव्हते. वरुण देव माझ्या मागे का लागावे तेही मला कळत नव्हते. पण माझ्या वत्सल पित्याची आठवण झाली की वाटे मृत्यु भयंकर आहे. त्याला चुकवून पळायलाच हवे. शेवटी मी या वनात येऊन पोचलो. या गुहेत राहू लागलो. पहिल्या रात्री खूप झोप आली. सकाळी उठलो तेव्हा थकवा दूर झाला होता. झऱ्याचे पाणी प्यालो. झाडाची फळे खाल्ली. राजभवनासारखे वैभव येथे कोठले असायला ? परंतु माझ्या लेखी ते विषय विषासारखे ठरले होते. ज्या सुखाभोवती मृत्यु घिरट्या घालीत होता ते सुख काय कामाचे ? पण या वनातही विटंबना काही कमी नाही ! नाचत बागडत खेळणाऱ्या निर्दोष हरणावर एखाद्या झुडपा आडून वाघ झडप घालतो. हरणाची किंकाळी आणि वाघाचे गुरगुरणे ऐकून माझा नुसता थरकाप होई. मग वाटे वरुण देव काय मला अशाच मार्गाने घेऊन जाणार की काय ? वरूण देवाचे हात या वनापर्यंत पोचतात की काय ?'

एकदा गुहेत शिरलो की मी निश्चित झोपी जात होतो. अशा किती रात्री आणि दिवस गेले कोण जाणे. एके दिवशी अनोळखी माणूस माझ्याकडे आला. मी

त्याला ओळखत नव्हतो पण तो मात्र मला ओळखत होता. त्याला माझ्या पित्याने पाठवले होते. पित्याचा समाचार ऐकण्यास मी ही आतुर होतो.

'तुझ्या पित्याचा तुझ्यावर फार जीव आहे म्हणून तर त्यांनी तुला इकडे पाठवून दिले. पण ते स्वत: मात्र जलोदराने आजारी असून असह्य पीडेने दु:खी आहेत.' त्याने सांगितले.

'माझे वडील दु:खात आहेत ? त्यांना हा जलोदरासारखा रोग का झाला? मला त्यांच्याकडे घेऊन जा. मला नाही इथे रहायचे' मी घरी जाण्यासाठी अधीर झालो होतो. पण त्या अनोळखी पुरुषाने मला घेऊन जाण्यास नकार दिला व सांगितले,

'नाही, रोहिता ! तुझ्या पित्याने तसे करण्यास नकार दिला आहे. तुझ्यासाठी तर त्यांनी हे दु:ख स्वत:वर ओढवून घेतले आहे. तुझ्यामुळे त्यांच्यावर वरूण देवांचा कोप झाला. तुझ्यासाठी हे वनच मंगल आहे.'

असे बोलून तो अनोळखी पुरुष चालता झाला. अरेरे ! त्याने मला त्याच्या बरोबर नेले नाही ते नाहीच ! माझ्यामुळे माझे वडील दु:खी होत असताना मी इकडे निश्चित कसा बरे राहू ? ते शक्य तरी आहे ? मला त्यांच्या जवळ जायलाच हवे !'

'तुम्ही कोणाशी बोलत आहात ?'

'माझ्या तोंडून शब्द बाहेर पडले. त्यामुळे अजिगंत ब्राह्मण जागा झाला. त्याला काय सांगायचे ? तरी मी सांगून टाकले.

'दुसऱ्या कोणाशी ? हे ब्राह्मणा मी आपल्या नशीबाशी बोलत होतो ! माझी कर्मकथा ऐकायची आहे तुम्हाला ?'

आणि तो ब्राह्मण उठून माझ्याजवळ येऊन बसला. मलाही माझे मन मोकळे करायचे होते ! मी त्याला सांगू लागलो.

'माझ्या पित्याचे नाव हरिश्चंद्र. मी माझ्या पित्याचा एकुलता एक पुत्र. त्यांनी फार लाडाकोडाने माझे लालन पालन करून मला वाढवले. आणि मला समजू लागताच वनात पाठवून दिले. तेव्हा पासून मी या गुहेत रहातो. येथे कष्ट नव्हते. शीण नव्हता. जाग्रण, तहान, भूक कसलेच दु:ख नव्हते.

मी निश्चितपणे रहात होतो. पण एके दिवशी एक अनोळखी पुरुष आला आणि त्याने माझी मन:शांती हिरावून नेली. माझी झोपही त्या क्षणापासून उडाली.

'त्या अनोळखी माणसाने असे ते काय सांगितले !'

'तेच तुम्हाला सांगतो. मला जरा श्वास तरी घेऊ द्या ! हुश्श ! माझ्यामुळे माझ्या पित्याला जलोदर झाला आहे व त्या पीडेने तो तळमळत आहे. बस्स. इतके बोलून तो माणूस निघून गेला आणि माझ्या अंत:करणात वेदना जागवून गेला. या गुंफेचे पाषाणही जणू म्हणू लागले,

'अरे ! तुझा पिता वेदनेने तळमळतो आहे आणि तू येथे निश्चित घोरतो आहेस !'

अेके दिवशी मी निर्धार केला आणि ती गुहा सोडून वनाबाहेर पडलो. माझ्या पायात वेग होता, मनात उत्साह संचारला होता. मनात मृत्यूचे भय नव्हते. कारण मी आता पित्याला साह्य करण्यासाठी जात होतो. त्याला रोगमुक्त करण्यासाठी चाललो होतो.

काही अंतर चालून गेल्यावर अेका वृद्ध ब्राह्मणाने येऊन माझा हात धरला आणि मला अडवून त्याने उपदेश केला,

'रोहिता, अरें किती परिश्रम करून तू या वनात आलास व तुझ्या जीवनाचे सार्थकहीं येथेच होईल. जे जग सोडून आलास तिकडे परत जाऊ नकोस. तुझे कल्याण तिकडे नाही. या वनातच आहे, परत फिर.'

'पण आपण कोण आहात ?' माझ्या तोंडून सहजच प्रश्न बाहेर पडला.

'मी देवांचा राजा इंद्र आहे. आळशी व प्रमादी लोकाना मी दिसू शकत नाही. उद्यमी माणसानाच मी दर्शन देतो. परिश्रम करतात त्यानाच मी प्रेरणा देतो.'

'किती भाग्यवान आहात तुम्ही रोहित !' अजिगर्त ब्राह्मण उद्‌गारला. 'तुम्हाला देवांचा राजा इंद्र प्रत्यक्ष भेटला ! अरे माझा सारा जन्म गेला. मला त्या देवराजाचे दर्शन झाले असते तर येवढी दु:खे सहन करावी लागली नसती.'

बिचारा अजिगर्त आपलीच कर्मकथा सांगू लागला. त्याला थांबवून मी परत सांगू लागलो.

'देवराज इंद्राचे बोलणे अैकून मी परतलो, वनात आलो. पण आता मला चैन पडेना. आपला पिता रोगाने जर्जर झाला असताना आपण इकडे भटकत रहावे हे कसे शक्य आहे ?'

आणि मी परत अेकदा धीर करून राजनगरीच्या दिशेने पाऊल उचलले देवराजांनी फिरून मला दर्शन दिले. आता मी त्यांना लगेच ओळखले व हात जोडून विनंती केली.

'मला जाऊ द्या देवराज ! माझ्या पित्याचे दु:ख दूर करून मी माझे पितृऋण पुरे करीन.'

' नाही रोहिता ! तू अशक्त, दुर्बल, हडकुळा होतास. या रानावनात राहून तुझी काया सशक्त झाली. तू त्या राजभवनाकडे जाऊ नकोस. तेथे निष्क्रीयता आहे, प्रमाद आहे, मृत्यु आहे. मृत्युला चुकवण्यासाठी तर तू इतका दूरवर आलास. आता त्या पापराशीत परत नाही जायचे. तो मार्गच सोड. तू वनात जा. त्याच मार्गाने पुढे पाऊल टाक. तोच तुझ्यासाठी कल्याणकारी मार्ग आहे. '

देवराज इन्द्र सांगत होते ते खरेच होते. मला सुख हवे होते. पण ते मिळत नव्हते. पाप आडवे येत होते. मला नशीबाचा दोष दिसत होता. तेच आडवे येत होते.

बिचाऱ्या ब्राह्मणाला तहान भूक त्रस्त करीत होती तर माझ्या पित्याला जलोदराची व्याधी पीडा देत होती ! या दोहोत केवढे अंतर ! आणि तरीही वेदना दोघांचीही सारखीच. मी माझ्या मनाची समजूत घातली व पुढे बोलू लागलो.

' अजिगर्त, देवरायाची आज्ञा मला मानावी लागली व मी वनाकडे परतलो. पुढे जाऊ लागलो. गुहा सोडून या झोपडीत राहू लागलो. कोण्या ऋषिने ही बांधली असावी. मला वाटते ते हा लोक सोडून कदाचित् परलोकीही गेले असावे. गुहेपेक्षा येथे या कुटीत शांती लाभेल असे वाटले होते. पण पित्यासाठी झुरणारे, त्याच्या वेदनेत सहभागी होणारे मन, ते तर येथेही होतेच. त्याची काही केल्या समजूत पटत नव्हती. उलट उद्वेग आणि आवेग वाढतच होता. त्या आवेगाने आणि उद्वेगानेच शरीरात बळ संचारले. मनोवेगाने शरीराला चेतना दिली. मनातून वाटत होते की देवराज इन्द्र फिरून भेटतील त्या आधीच हा वनाचा मार्ग सोडून राजमार्गावर पोचावे. या विचाराने चालणाऱ्या गतिचा वेग वाढला, रथ चौखूर धावावा त्याहून वेगाने तरंगावर धावणारा मनोरथ धावत सुटला.

हा राजमार्ग आलाच असा विचार करीत होतो तोच समोरून देवराज इंन्द्र आलेच. मला वाटत होते की मी बचावलो. आता त्याच्या हाती मी लागता कामा नये असा विचार करून मी दुप्पट वेगाने धावू लागलो. देवराज बोलून चालून वृद्ध ब्राह्मण- ते कसले धावतात असे मला वाटत होते पण काय सांगू ? ते स्वतः जागच्या जागीच उभे राहिले आणि मीच वेगाने धावत जाऊन त्यांच्या पसरलेल्या हाताच्या मधे जाऊन उभा राहिलो ! देवराज इंद्र मोठमोठ्यांदा हसू लागले.

' बाळा रोहिता तुझा धावण्याचा वेग बरोबर आहे. पण तुझे मुख चुकीच्या दिशेला आहे. विमुख आहे. ते अभिमुख कर. तू पुढे न जाता मागे धावत चालला

आहेस. तिकडे जरा पहा तर खरे. जो बसून राहतो त्याचे नशीब बसून रहात. जो उठून उभा रहातो त्याचे नशीब वर चढते. जो झोपतो त्याचे नशीबही झोपून रहाते. तुला तर ते फिरवायचे आहे. चालायचे आहे चाल. आणि तुझे नशीबही फिरेल. पण राजमार्गावरून नाही. रानावनाच्या या अज्ञात अनोळखी मार्गावरून पुढे चल.'

'वा....वा....वा.' अजिगर्त उद्गारला. 'काय सांगितले आहे म्हणता देवराजाने ! मी आजवर माझ्या नशीबालाच दोष देत होतो. पण मी झोपून राहिलो म्हणून बेटे तेही झोपून गेले ! देवराजाने मला जर हे समजावून सांगितले असते तर माझे तरंग विराम पावले असते आणि मी उठून कामाला लागलो असतो ! रोहित ! तुम्ही खरोखरीच फार भाग्यशाली आहात. देवराज एकदाच नाही पण सारखा, वारंवार भेटतो तुम्हाला ! बरे पण तुम्ही काय सांगितले देवराजाला ?' त्याने उत्सुकतेने विचारले.

अजिगर्ताला माझ्या कर्म कहाणीतून खरेच प्रेरणा मिळत होती की त्याचे तरंगच वाढत होते ते मी सांगू शकत नाही. पण त्याला माझ्या कहाणीत स्वारस्य वाटू लागले होते व मलाही त्या दुःखी, दरिद्री ब्राह्मणाविषयी अनुकंपा वाटू लागली होती. म्हणून मी पुढे सांगू लागलो,

'देवराजापुढे माझे काही चालेना. माझा मनोवेग, उद्वेग सारे शमून गेले. मी परतलो व झोपडीत जाऊन झोपी गेलो. आता आपण येथून पुढे काहीही करावयाचे नाही. पित्याचे जे व्हायचे असेल ते होवो. आणि मला तरी आता काय करायचे आहे ? जीवनातला सारा आनंदच लुटून नेला आहे ! मला काहीच सुचत नव्हते. खूप उलट सुलट विचार केला. खाणे पिणे सोडून दिले. असेही काही दिवस गेले आणि परत अेके दिवशी माझ्या झोपडीच्या दारावर तीनदा ठोकल्याचा आवाज आला. येथे कोण बरे आले असावे ? विचार करीत मी उठलो. कसले तरी अदृश्य भय वाटू लागले वरुणदेव तर मला शोधीत आले नाहीत ? त्यांना मी येथे आहे हे कळले की काय ? जाऊ दे आपण मुळी दार उघडूच नये. 'तुम्ही जे कोणी असाल ते परत जा. तुम्हाला माझ्याकडून काहीच मिळण्यासारखे नाही' म्हणून दारापर्यंत गेलेला मी, ते उघडताच परत फिरलो. मन आणि मति यांच्यातल्या कलहाचा परिणाम !

'अरे रोहिता ! असला कलह मांडून बसलास तर कसे व्हायचे ? कलि कलह माणसाला आडवे पाडतो, झोपवतो. द्वापर अनृताला दूर करून त्याला जागे करतो. उठवून बसवतो. त्रेता मायेला दूर सारून त्याला उभे करतो. आणि सत्य माणसाला हिंडता फिरता करते. तू फिरत रहा. सत्याला अनुसर.'

हा शब्द परिचित होता. देवराज इंद्र माझ्या दाराशी आले होते. पण का? आता तर मी राजमार्गाकडे धाव घेत नव्हतो. तरी येथेही मला अडवण्यासाठी आले? मी दार उघडले. देवराजांनी येऊन माझा हात हाती घेतला व ते म्हणाले, 'बाळा रोहिता, तू कोठेही गेला नसलास तरी अद्याप राजमार्गवरच धावत आहेस! काही न करता झोपून रहाणे हाच तो राजमार्ग. आणि कार्य करीत रहाणे हा प्रगतीचा मार्ग. कलह करीत असा पडून राहिलास तर जीवनाची नासाडी होईल! तू फिरत रहा. तुझी प्रगती होईल. तू फिरत राहिलास तर जीवनाचे फळ तुला चाखता येईल. हा पहा सूर्य. आकाशात सतत फिरत असतो. त्याला वेदना होत नाही. त्याला प्रमाद स्पर्शही करू शकत नाही. तुझा मार्ग तो आहे. उठ फिरत रहा.'

'अरे! रोहिता! देवांच्या त्या राजाने तुला जीवनाचे रहस्यच समजावून सांगितले, केवढी त्याची कृपा तुझ्यावर! अरे मला कधी दुरून दर्शन देखील नाही झाले. त्यांचे सत्य कार्य समजावून सांगणारा देखील कोणा भाग्यवंतालाच भेटतो. बरे पुढे तुम्ही काय केले?'

अजिगर्ताची उत्सुकता वाढत चालली.

'येवढे बोलून देवराज इन्द्र निघून गेले. मी उठलो. आळस झटकून टाकला. माझ्या मनात आता नवाच उत्साह प्रगटला. हातापायात त्राण आले. मी आता राजमार्गाची दिशा सोडून बिकट वनाची वाट धरली. पावला पावलाने पुढे जात चाललो. माझ्या प्रगतीचा हा मार्ग कोठे जात होता, तो कोठे जाऊन संपणार होता मी काहीच जाणत नव्हतो. त्या भयंकर मार्गावर मला अडवणारे कोणी नव्हते. माझे नशीब जागे झाले होते. जाता जाता अजिगर्त, तुमची भेट झाली. एका झाडाच्या फांदीवर खाली डोके वर पाय अशा स्थितीत लोंबकळताना मी तुम्हाला पाहिले. तुम्हाला पाहून मला मोठे नवल वाटले. अशा भयानक मार्गावर हा माणूस, आणि तोही अशा स्थितीत लोंबकळणारा? मी तुमच्या जवळ आलो.

'रोहिता! मी माझ्या नशीबा पुढे हरलो होतो. घरी पत्नी आणि मुले उपाशी होती. त्यांना टाकून मी हा मार्ग धरला. व झाडावर प्राण सोडण्याच्या बेतात होतो. तोच तुम्हाला दुरून येताना पाहिले व माझ्या जीवनात अेका नव्या आशेचा संचार झाला. मला वाटले की पावला पावलाने माझ्या जवळ येणारा हा पुरुष भाग्यशाली आहे. त्याच्या आधारे माझेही नशीब फिरेल.'

'तुम्ही पण अद्भुत ब्राह्मण आहात अजिगर्त! तुम्ही त्या झाडावर तसे

लोंबकळत होता. मी हात देऊन तुम्हाला उतरवले. मग आपण अेकमेकांनी परस्पर दु:ख सांगून अेकमेकाविषयी समभावना प्रगट केली. खरोखरीच माझ्या पित्याला अतिशय भोग भोगण्यास मिळाले व त्याना जलोदर झाला. तर तुम्हाला तहान भुकेने पीडले आणि तुम्ही मृत्यूचा आसरा घ्यायला निघाला. तुम्हाला पहाताच मला तुम्हा दोघांच्या मधला अेक मार्ग दिसू लागला. माझ्या पित्यापाशी अपार समृद्धि आहे. त्यातील शे-दोनशे गाई मिळाल्या तर तुमच्या तहान-भुकेचा प्रश्न सुटेल आणि वरुण देवाला तुमच्या पुत्राचे बलिदान देऊन माझा जीव वाचवता येईल.'

'खरोखरीच! तुमची योजना पार पडण्याजोगीच आहे! माझा पुत्र शुन:शेप भारी शहाणा आहे. पित्याची आज्ञा पाळण्यासाठी तो सदा उत्सुक असतो. तुमचाही तुमच्या पित्यावर भारी जीव आहे ना?'

'अर्थात! या शुन:शेपाकडे पाहून मात्र मोठे वाईट वाटते. मनाला वेदना होतात. मला पित्याचे ऋण फेडायचे आहे. पण या शुन:शेपांचा कोठल्याच प्रकारचा स्वार्थ नसताना त्याने वरुणाला बळी जायचे?'

'तुम्ही त्याची काळजी नका करू रोहित! त्याच्याही माथी पित्याचे ऋण आहेच की. आमची तहान-भूक भागली की त्याचे बलिदान सफल झाल्या-सारखेच आहे, खरे ना बाळा शुन:शेपा?'

सुन:शेप त्या दोघांच्या जवळच पडला होता. पण त्याला झोप येत नव्हती. तो त्या दोघांचे सारे बोलणे अैकत होता. तोही अेका अगम पथावरचाच यात्रिक होता ना? मृत्यू म्हणजे काय? जीवन हे काय आहे? याचा विचार त्याला समजू लागल्यापासून तो करीत होता. पण त्याला जीवन मरणाचे रहस्य काही कळत नव्हते. पित्याने बोलावताच तो उठून बसला व म्हणाला,

'तुमचे सारे बोलणे मी अैकले आहे, तात! रोहिताचे आपल्या पित्यावर प्रेम आहे, तितकेच माझेही तुमच्यावर आहे. वरुणाला मात्र बलिदान देण्यास माझी तयारी आहे. मृत्यू म्हणजे काय ते मला माहिती नाही. पण रोहित नेईल तिकडे मी जाण्यास तयार आहे.

'धन्य आहे शुन:शेपा! रोहित, हा माझा पुत्र मी तुमच्या स्वाधीन करतो त्याच्या बदली मला शंभर गाई मिळाल्या पाहिजेत. माझ्या जीवनातली तीव्र इच्छा पूर्ण करणाऱ्या त्या गाई मिळाल्या की तहान-भूक कोठच्या कोठे हरपून जाईल.

रोहिताला वाटले की हा अजिगर्त परत विचारांच्या तरंगात गुरफटला तर ठिकाणावर येणे कठीण. बिचारा ब्राह्मण आपले तीनही पुत्र त्याला देऊन टाकायला

निघाला होता. गाईंची इच्छा त्याच्या मनात केवढी अदम्य आहे. तहान भुकेचा केवढा प्रभाव आहे ! रोहित त्याला शांत करून म्हणाला,

'हे पहा ब्राह्मण देव ! गाई काही येथे माझ्याजवळ नाहीत. तुम्ही जाणताच आहात. माझ्या पित्याकडे हजारो गाई आहेत. त्यातून शंभर गाई निवडून तुम्हाला देऊ आणि माझे काम झाले तर आणखीही काही गाई देऊ. तुम्ही तुमच्या पुत्राला घेऊन माझ्या बरोबर चला. आपण आजच नगरीत जाऊन पहोचू.'

'पण देवराज इंद्र आला आणि त्याने तुम्हाला अडवले तर ?'

बिचाऱ्या ब्राह्मणाला देवराजाचे भय वाटले– इंद्र मधे आला तर हा लाभदायक व्यवहार मोडून जाईल. पण त्याचबरोबर देवराजाला पहाण्या–भेटण्याची इच्छाही मनात होतीच. माझी खात्री होती की यावेळी देवराज येणार नाहीत. कारण ते माझ्या प्राणशक्तीचे देव होते आणि आता माझे प्राण वाचणार तेव्हा आता ते निश्चित झाले असणार.

आणि घडलेही तसेच. अजिगर्त ब्राह्मणाला व शुनःशेपाला घेऊन रोहित राजमार्गाने कोशल देशाच्या राजनगरीत जाऊन पोचला.

## ३ पुत्राची लालसा :

'महाराज ! रोहित आला' राणी एकदम म्हणाली.

'रोहित आला ?' महाराज हरिश्चंद्र लगबगीने उठून बसत म्हणाले जलोदराने ते इतके जर्जर झाले होते की एरवी दोन माणसे धरून त्यांना आधार देत तेव्हा कोठे ते उठून बसू शकत. पण पुत्राचे नाव ऐकताच त्यांना त्या रोगा-चेही विस्मरण झाले.

'मी आलो आहे पिता !' म्हणून रोहिताने जाऊन पित्याच्या मांडीवर डोके ठेवले. पित्याने प्रेमभराने त्याला आपल्या बाहुपाशात घेतले. महाराणी पितापुत्राचे ते अपार प्रेम भरल्या डोळ्यांनी पहात होती. त्या तिघांचेही डोळे वहात होते. घडीभर सारे वातावरण निस्तब्ध होऊन गेले. दासदासी देखील जागच्या जागीच खिळून गेल्यासारख्या झाल्या. त्या वातावरणाचे गांभिर्य कमी करण्यासाठीच केवळ नाही पण स्वतःच्या मनातील दुःखाचा भार हलका करण्या-साठी राजा हरिश्चंद्राने हळू हळू बोलायला सुरुवात केली. रोहितही पित्याशी बोलू लागला.

'तू इथे कशाला आलास बाळा ? तुला मार्गात कोणी अडवले नाही ?'

'तात ! आपल्या सेवेसाठी मी या पूर्वीच येणार होतो. पण मला माझ्या. प्राणदेवाने अडवून धरले होते, प्राणाहूनही पिता अधिक आहे हे मी त्यांना समजावण्याचा प्रयत्न करीत होतो. पण प्राणदेव देवराज इंद्र होऊन आले. वृद्ध ब्राह्मण वेशाने गुरु होऊन आले. त्यांच्या उपदेशाने माझ्या प्राणाचा आवेग ओसरून जाई. व मी परत फिरे.

'सत्य आहे वत्स ! तुझे प्राण तेच माझेही प्राण. देवराज म्हण, वृद्ध ब्राह्मण म्हण, गुरु म्हण माझेच म्हणणे ते तुझ्यापुढ मांडीत होते. मलाही जलोदराची व्याधी जडली काय आणि माझे प्राण गेले काय ? मला त्याची पर्वा नाही. पण तू जिवंत राहिलास तर मला जिवंत ठेवशील तू मला तीन ऋणातून सोडवशील. तू मला नरकापासून सोडवशील, तारशील पुत्र म्हणजे पित्याचाच नूतन जन्म. अकाचा अस्त झाला तरी दुसऱ्याचा उदय होईल.

'तात, तुम्ही येवढे दु:खी असताना, रोगाने पीडले जात असताना मी माझ्या प्राणाचा विचार करू ? हे कसे शक्य आहे ? तुमचे शरीर माझ्या शरीराहून भिन्न नाही का ? पिता आणि पुत्र अेक कसे होऊ शकतील ?'

'ते मलाही कळत नाही. पण मला नारदमुनींनी तसे सांगितले होते. शंभर राण्या असूनही माझ्या पोटी पुत्र नव्हता. नशीबाला दोष देऊन मी माझ्या मनाची समजूत घालीत होतो. अेकदा नारद आणि पर्वत हे दोघे भाऊ माझ्याकडे आले. हे दोघे ब्रह्मदेवाचे पुत्र. त्यांनी सांगितले ते खरेंच असायला पाहिजे. नारद मुनींनी मला समजावले होते,

'पित्याला स्वत:च्या जीवनकालात पुत्र सुख मिळाले तर पृथ्वीवरील सर्व सुखे भोगल्या इतके सुख होते. अग्निला दिलेल्या आहुतींचे पुण्य त्याला लाभते. जलाने तर्पण केलेल्या पितरांच्यामुळे त्याची श्रद्धा व भावना जागी होते. पुत्र नसला तर हा लोक व परलोक दोन्ही पाण्यात गेल्यासारखे. पुत्र असला तर पुरुषार्थ ज्वलंत रहातात. स्वत: केलेल्या प्रयत्नांचे साफल्य स्वत:ला न लाभले तरी पुत्राला लाभते. ज्याला पुत्र नाही तो पशुसारखाच. तो जगला काय आणि मेला काय सारखेच.'

मी त्यावर नारदांना विचारले,

'तुम्ही हा सारा पुत्राचा महिमा गायलात पण मला पुत्र नाही. त्यासाठी काय उपाय ?'

नारदांच्या सांगण्यावरून माझ्या मनात पुत्राची लालसा जागी झाली. मला वाटू लागले माझं नशीब चांगले म्हणून नारद भेटले. आता ते मला पुत्रही मिळवून देतील. नारदांनी मला धीर देऊन सांगितले,

' असे कर की तू वरुण देवाला साकडे घाल. वरुण तुला पुत्र देईल. बाळा रोहिता ! मला काय माहिती साकडे घालायचे, नवस करायचा म्हणजे त्या देवाला पुत्राचे बलिदानच द्यावे लागते ! माझा नारदावर विश्वास होता. म्हणून मी त्याने सांगितले ते ऐकून त्याप्रमाणे वरूण देवाला नवस केला. नारद व पर्वत निरोप घेऊन गेले. कालांतराने वरूण देवाने कृपा केली आणि तुझी माता--'

फार दिवसांनी भेटलेल्या पुत्राशी बोलण्याच्या भरात राजाला उत्साहाचे भरते आले होते. एका दमात त्याला सारे सांगून टाकावेसे वाटत होते. पण दुसऱ्या बाजूला आपले हे बोलणे चालले असताच वरूण देव येऊन पोचला तर ?' हे भयही मनात होते. त्याने बोलता बोलता एक जड निःश्वास टाकला आणि राणीकडे पाहिले.

त्याच्या मनातले विचार जाणून राणीने पुढे सांगण्यास सुरूवात केली. खरोखरीच पुत्रावर पित्याचे प्रेम असते त्याहून मातेचे रेसभर देखील कमी नसते पुत्रामुळे पित्याला लाभणाऱ्या आनंदाहूनही विशेष आनंद मातेला लाभत असतो. माता-पुत्राच्या या नैसर्गिक नात्याची अवगणना कोण बरे करू शकेल ? राजाला फार वेळ बसवेना म्हणून राणीच्या मांडीवर डोके ठेवून तो पडला. पुत्र रोहित त्याच्या जवळ बसला. राणी त्याला सांगू लागली.

' बाळा, तुझा जन्म झाला आणि आम्ही हर्षभराने अगदी वेडावून गेलो तुझ्या पित्याला तर नवजीवन लाभल्यासारखा उत्साह वाटू लागला. राज्यात सगळीकडे हा आनंदाचा समाचार पाठवला. येवढासा तू माझ्या कुशीत पडल्या पडल्या माझ्या मनातील भाव झेलीत होतास.

तू दहा दिवसाचा पण झाला नव्हतास आणि राजभवनात एका दिव्य पुरुषाने प्रवेश केला. त्याच्या शरीरातून तेज नुसते ओसंडत होते. तुझ्या पित्याकडे जाऊन तो म्हणाला,

' मला ओळखलेस ? मी वरुण !'

तुझे वडील त्याच्या तेजाने दिपून गेले होते. ते उठून उभे राहिले व वरुण देवाला प्रणाम करून सिंहासनावर बसण्यासाठी विनंती केली.

' राजा, मी येथे बसण्यासाठी आलेलो नाही. तू पुत्राचे बलिदान केव्हा देतोस ?'

तुझे वडील हा प्रश्न ऐकून भयभीत झाले. ' पुत्राचे बलिदान ?'

' नारदमुनींच्या सांगण्याप्रमाणे साकडे घालून मला नवस केला होतास ते विसरलास ? माझ्या कृपेने तुला पुत्र झाला. आता त्याचे बलिदान द्यायला हवे.

वरुणाचे हे शब्द अेकून तुझे वडील अवाक्‌च झाले. त्यांना काहीच सुचेनासे झाले होते. पण शेवटी स्वाभाविकच प्रेरणेने त्यांनी वरुण देवाला हात जोडून विनंती केली.

'देवा, आपण म्हणता ते खरेच आहे. माझ्या पुत्राचे बलिदान आपल्याला करावयास हवे ते मी अवश्य करीन. पण यावेळी (जातकामुळे) त्याला हातही लावता येण्यासारखा नाही आपण अेक मासानंतर याल ?'

'येईन. तुझ्या म्हणण्याप्रमाणे मी अेक मासानंतर येईन.' असे म्हणून वरुण-देव गेले. तुझे वडील लगेच आत आले व तुझ्याकडे प्रेमभराने पहात तुला खेळवू लागले. ते पाहून मला वाटले,

'हे असे का बरे करतात ? पुत्र जन्माने वेडावले तर नाहीत ? मी त्यांच्या-कडे पहातच राहिले. तुला मनसोक्त खेळवून त्यांनी परत माझ्याकडे दिले तरी मी पहातच होते. त्यानाही ते कळले, ते म्हणाले,

'राणी, तुम्हाला आठवतंय ? याच्यासाठी आपण वरुणाला नवस केला होता !'

वरुणाचें नाव कानावर पडताच मी दचकले व उद्‌गारले, 'हो. पण त्याचे आता यावेळी काय ?'

'आहे. म्हणून तर तुला आठवण दिली. आताच आपल्या भवनात वरुणदेव आले होते. म्हणाले, 'पुत्राचे बलिदान घेण्यासाठी आलो आहे.'

'आई गं !' ते शब्द ऐकून माझ्या तोंडून किंकाळीच बाहेर पडली. पण यांनी माझी समजूत घातली.

'अशी घाबरतेस काय ? मी जातकाचे निमित्त काढून त्याना परत पाठवले आहे. आता पुढे कसे करायचे ?'

ते ऐकून माझा जीव भांड्यात पडला. मी हळूच म्हटले, 'आपण हेच निमित्त चालवून अशीच चालढकल करू या.'

'मला पण तसेच वाटते. आजचा प्रसंग तर धड पार पडला. उद्याचे कोणी पाहिले आहे ?' महाराज म्हणाले.

'नंतर तू तीन महिन्यांचा झालास. आमचा तुझ्यावर किती जीव जडला तुला कल्पनाही येण्यासारखी नाही. आम्ही दोघे तुला क्षणभरही डोळ्याआड करीत नव्हतो. एके दिवशी असेच आम्ही तुला खेळवीत होतो आणि वरुणदेव आले. त्यांना पहाताच मी तर घाबरूनच गेले.

'राणी घाबरण्याचे काहीच कारण नाही.' वरुण देव मला म्हणाले. तुला व राजाला पुत्र हवा होता. हो ना ? तो तुम्ही मागून घेतलात. पण तो जिवंत रहावा म्हणून मागितले होते ? तुम्ही मला साकडे घातले. पण होणाऱ्या मुलाच्या जीवनाचा काही विचार केला होता ?'

हे वरुण देव इतके कठोर आहेत का ? आम्ही पुत्र मागितला तेव्हा तो जिवंत रहावा हेही मागायला हवे ही कल्पनाही कोणाच्या मनात येण्यासारखी होती ? वरुण देवांनी महाराजांच्याकडे वळून म्हटले,

'राजन ! आता तयार आहेस ना ? केव्हा देतोस बलिदान ?' तुझ्या वडिलांचे सारे शरीर थरथर कापत होते. थोडा वेळ तर त्यांच्या तोंडून शब्दच फुटेना. शेवटी जेमतेम जिवाचा धडा करून ते म्हणाले, 'होय महाराज ! आपणच आम्हाला हा पुत्र दिला आहे. आणि आपण तो परत घेणार यात नवल ते काय ? पण याने जन्म घेतला आहे. याला दात तरी येऊ देत !'

'बरे आहे. पण पहा हो. पुन: बोल फिरवू नको. तुला पुत्र हवा होता तो स्वर्गप्राप्ती व्हावी म्हणून. मर्त्य लोकातल्या आयुष्याचा विचार तुझ्या मनात नव्हता. मी आज जातो, पुन: येईन.'

आणि तेजाचा शुभ्र पुंज राजभवनातून दूर सरत सरत नाहीसा झाला. आणि आमच्या जीवात जीव आला पण वरुण देवाचे शब्द मात्र आमच्या काना मनात घुमत राहिले. नारद म्हणाले होतें की पुत्र प्राप्ती झाली की स्वर्ग मिळतो. पण जन्मदात्या माता पित्यांना पुत्र किती प्रिय असतो ही गोष्ट त्यावेळी कोणाच्याच मनात आली नव्हती. माणूस स्वर्ग आणि नरक यांचा विचार नेहमी करतो. पण आजच्या घडीला जे जीवन जगावयाचे, ते किती सुखाचे आहे हा विचार कोणीच का बरे करीत नाही ?'

बोलता बोलता राणी जरा थांबली. राजाला औषध दिले. रोहित समोर बसला होता. त्याला पाणी पिण्यास दिले व नंतर ती सांगू लागली.

'त्यानंतर बाळा, तुला दुधाचे दात फुटले. आणि वरुण देव येऊन उभे राहिले. हे बोलून चालून दुधाचे दात. हे पडून खरे दात आल्यावर बलिदान देऊ म्हणून सांगून आम्ही त्यांची बोलवण केली.

पण बाळा, दिवस फार भराभर जातात. दुधाचे दात पडून तुला दुसरे दातही हा हा म्हणता आले आणि खरोखरीच वरुण देव तुला नेण्यासाठी येऊन उभे राहिले. ते आम्ही दिलेल्या आश्वासनाप्रमाणे दिल्या वेळेवरच प्रत्येक वेळी येत होते. पण आम्हाला मात्र ते आले असा भास रोज होत होता. कोठे

खट्ट झाले तरी वाटे आले वरुण देवच आले ! तुझ्या प्राप्तीमुळे जेवढा आनंद आणि सुख मिळाले त्याच्या दिडीदुपटीने वरुणदेवाच्या येण्याचा शोक संताप होत होता. प्रत्येक खेपेस आम्ही नवे निमित्त शोधून काढीत होतो आणि तेही ते मान्य करून परत जात होते. त्याबद्दल मोठा विस्मय वाटत होता. आमचे न ऐकता ते हट्टाने उभेच राहिले तर त्यांच्यापुढे आमचे काहीच चालण्यासारखे नव्हते.

हा तुझा पिता. क्षत्रीय राजा. आपल्या बाहुबळाच्या जोरावर भलभल्या शत्रूंचा त्यांनी पराजय केलेला आहे. त्यांच्या पदरी धुरंधर असे वीरपुरुषही काही कमी नाहीत. पण वरुणदेव ही दैवी शक्ति आहे. मानवी बळाचा तिच्या पुढे काही उपाय चालत नाही.

त्यानंतर तीन वर्षांनी क्षत्रीय कुमाराला उचित असे संस्कार करून सुंदर वेष घालून, खांद्यावर चिमुकले धनुष्य देऊन, बाणांचा भाता पाठीवर बांधून तुला घोड्यावर बसवले. राजभवनाच्या प्रांगणातच तू घोडा फिरवीत होतास. मी वरच्या सज्जातून कौतुकाने तुझ्याकडे पहात होते. राजाने तर प्रेमभराने तुला उचलून हृदयाशी धरले.

तेवढ्यात वरुणदेव येऊन उभे राहिले ! इतक्या सगळ्या लोकांच्या मधे ते उभे राहिले. त्यांना पहाताच भीतिने मूर्छित होऊन मी जमिनीवर कोसळले. त्यानंतर काय झाले ते मला कळलेच नव्हते. मी शुद्धीवर आले तेव्हा महाराजांनी प्रेमाने गोड शब्दात मला सांगितले,

'राणी भिऊ नकोस वरुणदेव गेले.'

मी तुला माझ्या मांडीवर घेतले. तूही मला प्रेमाने मिठी मारलीस. मायलेकरांचे हे प्रेम तुझे वडील डोळे भरून पहात राहिले. पण माझ्या डोळ्यात अजूनही भीति तरळत होती. मला विचारायचे होते, या वेळेस कोठले निमित्त पुढे केले ?' तुझ्या वडिलांना माझ्या मनातला प्रश्न कळला व त्यांनी सांगितले, 'यावेळी बरी लांबलचक मुदत मागून घेतली आहे. ह्याचा व्रतबंध झाल्यावर मग बघू.'

'तर काय ! जिता माणूस सारे काही मिळवील.' मी बोलून गेले. बाळा तुझ्या वडिलांचा जीव तर असा साशंक झाला की ते तुला कोठे जाऊ देईनात. की कोणाच्याही हाती सोपवण्यास तयार होईनात. एक माझ्याखेरीज तुझ्या बाबतीत त्यांचा कोणावरही विश्वास नव्हता. त्यांनी स्वतःच तुला शिकवण्यास सुरुवात केरी तुझ्या ठायी शांति, धैर्य व उत्साह बाणावा अशा प्रकारचे ते शिक्षण

होते. त्याच बरोबर विरोधाला तोंड कसे द्यावे, आपत्तीच्या वेळी सावधानता कशी ठेवावी हे ही ते तुला शिकवीत होते.

पाच वर्षे लोटली तरी तुझा व्रतबंध करण्याविषयी आमच्या मनात उत्साह नव्हता. तसेच तुला गुरुगृही पाठवण्याचा विचारही आमच्या मनात नव्हता वरुण देवाच्या छायेखालून तुला कसे बाहेर काढावे यासाठी तुझे वडील मार्ग शोधीत होते. परंतु त्यांना तसा मार्ग कोणीच दाखवला नाही.

वरुणाचा वास चराचरात सर्वत्रच आहे. वरुण हा सदाचाराचा देव. रात्रंदिवस जागृत रहाणारे दैवत. त्याच्या विस्ताराची वा व्यापकतेची कोणतीही मर्यादा नाही. त्याची धारणा असेल तसे होते.' असेच सर्व ज्ञानी ऋषिमुनी सांगत.

तुझ्या व्रतबंधाची वयोमर्यादा झाली. सात वर्षे झाली. आता मौंजिबंधन करायचे. सात सात वर्षे निमित्ते काढून तुझ्या पित्याने वरुण देवाला टाळले. पण त्याचीही मर्यादा होती. तुला अद्याप काही समजत नव्हते. तुझ्या पित्याने तुला बोलावून सांगितले, ते तुला आठवते का ?'

रोहित खूप धीराने आपल्या आईचे बोलणे ऐकत होता. माता-पित्याचे त्याच्यावर केवढे अपार प्रेम होते त्याचे तो दर्शन करीत होता. वरुणाचे भय त्याच्या शिरावर लटकतच होते. वरुणाला बळी दिला तर माता पिता निश्चित होतील. पण त्यांच्या हातून ते कसे होईल ? जे रोप लावले, वाढवले त्याचा बळी त्यांनी कसा द्यावा ? मातेसमोर त्याने स्वतःची निर्बलता आणि जगण्याची इच्छा व्यक्त करून म्हटले,

'होय माते. मला सारे काही आठतते. माझ्या पित्याने मला सांगितले होते की ' बाळा आजवर आम्ही तुझा सांभाळ केला. आता तुझा व्रतबंध होईल. लगेच वरुणदेव येऊन उभे रहातील. तुझे बलिदान दिल्यावर आम्ही केलेला नवस फिटेल. बाळा, त्यासाठी तू तयार रहा.'

पित्याने अत्यंत प्रेमाने मला हे सांगितले व त्यांच्या मनातील विचारही त्यांनी मला सांगितला. पण माझ्या मनाची तयारी नव्हती. मी वरुण देवांना पाहिले होते. त्यांना माझे बलिदान द्यायचे हें मला पटत नव्हते. मी पित्याला सांगितले,

'नाही तात ! मी बलिदानासाठी तयार नाही. माझा व्रतबंध केला नाहीत तरी चालेल. मी तसाच जिवंत राहिलो तरी पुरे. आजवर व येथून पुढेही जीव वाचवण्याचा उपाय मला दाखवा.

माते, या प्रमाणे त्याच रात्री माझा व्रतबंध केला व मला एक उंच तेजस्वी व वेगवान असा घोडाही तातांनी दिला. त्यावर बसून दूर दूर अज्ञात वनाच्या

मार्गावर मी निघून गेलो. मला सारखी भीति वाटत होती की वरुण देव माझ्या मागून येतील व मला धरून नेतील. पण वनप्रदेशात गेल्यावर मी पाहिले की माझ्या जिवाला तेथे कसलेही भय नव्हते. आता जीवनभर मी निश्चित झालो होतो!'

'खरंय् पुत्रा! म्हणून तर मुनि, तपस्वी अरण्यात जातात. रणसंग्राम गावात, नगरीतच खेळले जातात. माणसाला माणसाच्या जिवावर उठण्यात येथे काहीच वाटत नाही. पण बाळा तुला सोडून वरुण देवांनी तुझ्या पित्यालाच पकडले. त्यांना जलोदराची व्याधी जडली. त्यांच्या जीवनाची शाश्वतीच उरली नाही. कोठलाच उपाय राहिला नाही.'

'नाही आई. अशी हार खाऊन कसे चालेल? तुम्ही दोघांनी मला वाचवले, आता मी तुम्हाला वाचवणार आहे! तात, त्यासाठीं मला एक उपाय पण सापडला आहे.'

मायलेकरांचे सारे बोलणे राजा धीराने ध्यान देऊन ऐकत होता. त्याच्या स्वतःच्या मनातून पुत्राला जे काही सांगावयाचे होते तेच सारे राणी त्याला मायेने समजावून सांगत होती. माया ममतेची गोडी मातेच्या प्रेमात सहाजिकच अधिक होती. राजाने एक दीर्घ निश्वास सोडला व तो म्हणाला,

'पुत्रा, वरुणदेवापुढे आपला कोठलाच उपाय चालत नाही. त्याला बलिदान हवे आहे. तुझे नाहीतर माझे. पण आता एका परीने मी निश्चित झालो आहे. मला भिती वाटत होती की वरुणदेव तुझ्या मागे लागतील. तू जाशील तेथून तुला शोधून काढतील. पण तू त्यांच्या तडाख्यातून वाचलास. माझ्या लेखी हेच पुरेसे आहे. आता वरुण देवाला बळी हवा तो भले घेऊदे. माझा बळी सुखाने घेऊदे. मी मेलो तरी तू माझा पुत्र तु आहेस. तुझ्या रुपात मीच आहे. माझी प्रतिष्ठा तुझ्या हाती आहे. तू यावास, भेटावास म्हणून तळमळत होतो. आता मला आराम वाटतो आहे. तन व मन ही आता शांत झाले आहे.'

'तात! आपण वरुणदेवाना बलिदान दिले की झाले. हो ना? हे पहा. अरे अजिगर्त, शुनःशेपा, इकडे या बरे.

पिताजी, अरण्यात भटकत असता मला हे अजिगर्त ब्राह्मण भेटले. ते जिवाला कंटाळून आत्मघात करायला निघाले होते. मी त्याना शंभर गाई देण्याचे अभिवचन दिले आहे. त्या नेण्यासाठी ते माझ्या बरोबर आले आहेत. हा त्यांचा मुलगा शुनःशेप फारच भला आणि शहाणा मुलगा आहे.

पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानून तो येथवर आला आहे. वरुणदेवांना याचे बलिदान माझ्याहूनही अधिक आवडेल.

हरिश्चंद्राने त्या ब्राह्मण पितापुत्राना पाहून परत जडसा निःश्वास टाकला आणि ते म्हणाले,

' या प्रकरणी आपले काही चालण्यासारखे नाही. धर्मशास्त्र जाणणाऱ्या ब्राह्मणानी जर हे मान्य केले तर वरुणदेव प्रसन्न होतील व याचा स्वीकार करतील. आपण त्याना विचारून पाहू. आता यानाही विश्रांती घेऊ दे व मलाही विश्राम करू दे. राणी, मला थोडे पाणी हवे आहे. भले वैद्य काही म्हणोत. पण आता मला जरा बरे वाटते आहे. निवांत वाटते आहे.'

## ४ आत्मबलिदान :

'महाराजांची जलोदराची व्याधी दूर करण्याचा उपाय मला कृपा करून दाखवा ब्रह्मन् !' रोहिताने प्रार्थनापूर्व ज्ञानी ब्राह्मणाना विनवले. समोर हो विश्वामित्र आणि जमदग्नि. वसिष्ठ आणि अयास्य. राजा हरिश्चंद्र जेव्हा जेव्हा यज्ञ करीत तेव्हा वसिष्ठ ब्रह्मा असत. विश्वामित्र होता. जमदग्नि अध्वर्यु आणि अयास्य उद्गाता होई. इतर ऋत्विज या चौघाना साह्य करीत.

कुलगुरु वसिष्ठांनी रोहिताला उत्तर दिले,

' राजकुमार ! हा वरुणदेवाचा कोप आहे. तेव्हा तो असाध्य आहे.' आपण वरुण देवाना प्रसन्न करून त्यांची कृपा प्राप्त करून घेतली तर ?'

' वरुण येथून रागावून परत गेले आहेत. त्याना परत आणायचे कसे ? आणि ते तर बलिदान मागत आहेत. राजाची परीक्षा करण्यासाठी ते स्वतवे चारदा त्याच्या दारी आले. प्रत्येक वेळी काही ना काही निमित्त पुढे करून राजाने त्याना विन्मुख परत पाठवले.

वरुण देवाला असत्य भाषण मुळीच आवडत नाही. ते स्वतः सदाचाराचे रक्षक देव आहेत. धर्म आणि नीतीचे पोषक आहेत. त्यांची दृष्टी सर्वत्र फिरत असते. रात्रंदिवस त्यांचे दूत जागे असतात. पापी जनांचा त्यांच्यापुढे टिकाव लागत नाही, असे ते धर्मप्रिय दैवत आहे !'

' आपण सांगता ते सत्य आहे गुरुदेव ! आमची चूक झाली. आम्ही वरुण देवांचा मोठाच अपराध केला आहे. हे मान्य आहे. पण आता त्याच्या क्षालनाचा काही उपाय कृपा करून दाखवाना.'

' उपाय उघडच आहे. तो सगळयांनाच माहीत आहे कुमार ! वरुण देव

बलिदान मागत आहेत. त्यांना तुझे बलिदान हवे आहे. पण तू पळ काढलास त्याचे प्रायश्चित्त राजा भोगीत आहे.'

'मी बलिदान देण्यास तयार आहे गुरुदेव! आपण वरुणदेवांना बोलवा.' रोहिताने सांगितले.

'आजवर वरुण देव न बोलावता आपल्या पायाने येत होते. पण आता त्यांना बोलावण्यासाठी यज्ञ करावा लागेल. त्या आधी तुझीही शुद्धी करावी लागेल. बलिदानाची सिद्धता करायला हवी ना?'

गुरुदेव, बलिदान पशुचेही देता येते ना? माझ्या ऐवजी माझ्यासारखाच दुसरा नरपशु बलिदान देण्यास तयार आहे!'

'पशु की नरपशु हा प्रश्न येथें महत्वाचा नाही. राजाने दिलेले वचन पाळले पाहिजे हा वरुणदेवाचा आग्रह आहे. 'आपण मला पुत्र द्या. मी त्याचे बलिदान देईन' असे साकडे घालतानाच राजाने विचार करावयास हवा होता ना? तेव्हा त्याच्या मनात होते की पुत्र झाला म्हणजे मला पुत्रवान म्हणतील. निपुत्रिक पणाचे लांछन दूर होईल. तुझ्या जन्मानंतर राजाला व तुझ्या मातेला तुझ्या जीवनाचा मोह वाटू लागला. आणि मोहाच्या मोहाच्या गर्तेत ते उभयता घसरत गेले. व तुलाही त्यांनी त्यात ओढले. याप्रमाणे तुम्हा तिघांचे जीवन असह्य होऊन गेले.

आता विचार येवढाच करावयाचा की तुझ्या जागी दुसऱ्या नरपशुचे बलिदान दिले तर ते चालेल की नाही? पहिली गोष्ट म्हणजे अशा प्रकारचे अभिचारिक यज्ञ अधम प्रकारचे असतात. पशुबलीचा तर स्पष्ट निषेध आहे. पुरोडाश देता येतो आज्य-घृत, आणि चरू यांचा हवि देता येतो. त्यामुळे देव विशेष प्रसन्न होतात. ती सात्विक स्वभावना! पण माणसेच कोठें चांगल्या स्वभावाची आहेत? क्रूर, घातकी, एकमेकांचे गळे कापणारी! यालाच म्हणायचे पशुबलि की नरबलि! राजकुमार, आपण यज्ञ करू. आणि त्या नर-पशुला सादर करू. वरुणदेवांना तो मान्य असला तर ते येतील व त्याचा स्वीकार करतील. मान्य नसेल तर ते येणार नाहीत. निर्णय संभावने वरच सोडून देऊ.'

गुरुदेव वसिष्ठांची याप्रमाणे संमति मिळताच राजकुमार यज्ञाच्या सिद्धतेस लागला. अजिगर्त व शुनःशेप दोघांना अग्निशाळेमधे ठेवले होते. अजिगर्त तेथील राज समृद्धि पाहून थक्कच झाला होता. धनधान्याची भांडारेची भांडारे भरलेली होती. दूध, तूप हंडेच्या हंडे भरून ओसंडत होतें. सुखसाधने अगणित होती. अजिगर्त साऱ्या जन्मभराची तहान भूक घेऊन आला होता. जेवढे भोगता येईल

तेवढे भोगून घेऊन मग गाई घेऊन घरी जावे म्हणजे भुकेचा प्रश्न कायमचा मिटेल. हरिश्चंद्र राजा आहे. मीही उद्या राजा होईन ! तरंगी अजिगर्त तेथे पडल्या पडल्या मनोरथ रचीतच होता तर शहाणा समजुतदार असलेला त्याचा पुत्र शुनःशेप जीवनाचे रहस्य शोधीत होता. त्याला त्या ठिकाणी कशासाठी आणले गेले होते ते तो जाणत होता. 'वरुणदेवाला माझे बलिदान अर्पण करायचें आहे. पण गुरुदेव वसिष्ठ त्याच बरोबर संभावनेविषयीही सांगत होते. माझे बलिदान मान्य असले तर ते स्वीकारण्यासाठी वरुणदेव येतील. पण ते नाहीच आलें तर ? तर मग बळी कोणाला, कोणासाठी द्यायचा ?

खरे पाहता आपण जगतो हे जीवनच बलिदान नाही ? एकाच्या सर्जना. साठी एकाचे विसर्जन होतच असते. एकीकडे हजारो प्राणी जन्माला येतात तर हजारो प्राणी त्याचप्रमाणे गतप्राणही होत असतात. जन्ममरण ही जगनिर्मात्याची लीला आहे. येणे आणि जाणे हा सतत क्रम आहे. मग माणसे मृत्यूला इतकी का बरे भितात ?

हा माझा पिता अजिगर्त. बिचारा जिवंत असूनही मेल्यासारखा आहे. सारा वेळ भूक भूक. त्याच्या ध्यानी मनी दुसरे काहीच नाही. आपण कशासाठी जगत आहोत याचा कधी त्याने विचार तरी केला आहे ? दुसऱ्या बाजूस पहावे तर हा राजा हरिश्चंद्र. भोग वैभव अमाप आहे. तरी बिचारा रोगाने त्रस्त. एकिकडे भूक आणि एकिकडे भोग पण भोगी हा रोगी खराच !

मग जीवन कशाला म्हणायचे ? आंणि मरण म्हणजे काय ? हे ऋषि अरण्यातले आपले आश्रम गुरुकुले सोडून इकडे राजभवनात का आलें असावे बरे ? त्यांच्या मनात मानवी हिताचे विचार असलेच पाहिजेत. त्या साठीच ते आले असावेत. आपण एकटयाने ज्ञान मिळवले त्याचा काय उपयोग ? ज्ञान चंदनासारखे आहे स्वतःला आणि त्या बरोबरच इतरांनाही थंडावा व सुगंध देणारे आहे. स्वतः तरून इतरांनाही तारावे याचे नाव जीवन !

चला. या रोहिताच्या बरोबर आलो आणि जीवनाचा विकास साधला गेला. आता ऋषिवरांचा संग लाभला तर जीवनाचे रहस्यही उमगेल. जीवन हे जात्या प्रगतिशील आहे ना ?

या प्रमाणे अजिगर्त आणि शुनःशेप दोघेही आपआपल्या ठिकाणी प्रसन्न होते. पण राजभवनातील माणसांना मात्र दोघांची कीव येई. कोणाच्या तोंडून करुणेपोटी शब्दही निघत.

'पाप केले कोणी नी दंड कोणाला !'

राजा हरिश्चंद्र रोगी तर होताच. रोहित परत आला व तो आता वाचला याची आता खात्री पटल्यासारखी होती. पण त्याला स्वतःच्या मरणाची चाहूल लागत होती. तो मनाशी ठरवीत होता–

'खूप जगलो आता मरणाला सामोरे जायचे.'

राणी राजाच्या सेवेत मग्न होती. रोहित परत आलेला पाहून तिचे मन स्वस्थ झाले होते. राजकुमार रोहित यज्ञाची साधन सामुग्री जमवण्यात गुंतला होता. वनात असताना त्याच्या मनात दुःखाने घर केले होते. अजिगर्तीविषयी नावड आणि शुनःशेपाविषयी वाईट वाटत होते. पण राजभवनात आल्यावर आणि यज्ञाच्या कामात पडल्यापासून तर तो त्या दोघांनाही विसरूनच गेला होता. राजपुरुष त्या दोघांची व्यवस्था चांगल्या प्रकारे ठेवीत होते. दिवसातून एकदा कुमार थोडावेळ त्यांना भेटून जाई. सर्व नीट आहेना व बलिदान देण्याच्या निर्णयापासून ते दोघे विचलित झाले नाहीत ना येवढी खात्री करून घेण्यापुरते त्यांचे स्मरण त्याला होई. कारण शेवटी यज्ञाचा सारा आधार त्या बलिदानावर तर होता !

ऋषि मुनी जमले. त्यानी यज्ञाच्या पूर्वसंस्काराना सुरुवात केली. देश शुद्धि कालशुद्धि द्रव्य शुद्धि, यज्ञाच्या सामुग्रीची शुद्धि सारे काही मेध्य–पवित्र करून घ्यावे लागते. यज्ञाच्या सामुग्रीत बलि देण्यात येणाऱ्या पशु, नरपशुंचाही समावेश होतो. त्यांचीही शुद्धि करून घ्यावयाची. पशुंना मन नसते. तेव्हा त्यांची शुद्धि करायला कसला वेळ लागतो. पण या यज्ञासाठी बलि होता नरपशु ! त्याची शुद्धी करायला अवधि लागेल. तन आणि मनही शुद्ध करायला हवे ना ?

शुनःशेप आजवर मोकळाच असे पण आता तो यज्ञ पशु होणार होता. तेव्हा त्याला बांधण्यात आले. यज्ञशाळेत एक यूप–खांब रोवण्यात आला. त्यावर तीन आडवी लाकडे ठोकली. येथे पशु नाही पण नरपशुला बांधायचे होते. त्याचे मस्तक उंच व ताठ रहावे, दोन हात लांब पसरलेले सरळ रहावे, पाय ताठ अधांतरी रहावे अशी त्या यूपाची रचना होती. त्याला बांधण्यासाठी पुरे हजार पाश होते. एखादे अंग जरी चळले, वाकडे तिकडे झाले व दोष लागला तर वरुणदेव अप्रसन्न होऊन परत जायचे. ते अप्रसन्न तर झालेलेच आहेत. त्यांचा रोष दूर करायचा आहे. तेव्हा प्रत्येक विधि सावधान राहून साक्षेपाने करायला हवा.

अजिगर्त शुनःशेपाला यूपापाशी घेऊन आला. ब्राह्मणानी अत्यंत दयादृष्टीने त्याच्याकडे पाहिले, त्याच्या विषयीं त्यांच्या मनात करुणा दाटून आली. त्याना

वाटले, 'किती निष्पाप आहे हा ब्रह्मकुमार!' पण ऋत्विजांच्या मनात अशा प्रकारच्या समवेदनेची आशा ठेवून कसे चालेल? जर तशी भावना असली तर यज्ञाचे विधान चालायचे कसे? म्हणून काही ऋत्विजांचा अभिप्राय वेगळा होता. 'चला राजकुमारापेक्षा हा ब्रह्मकुमार अधिक चांगला आहे!' 'वरुणदेव सात्विक त्यांना द्यावयाचा बलि देखील असा सात्विकच हवा!'

एवढा मोठा राजसूय यज्ञ आणि त्यात वरुण देवाला नरबलि अर्पण करणार म्हणून कुतूहलवश होऊन अनेक लोक यज्ञ पहाण्यासाठी जमले. त्यांना काय वाटत होते याची पर्वा कोणाला वाटणार?

'चला. पशूला यज्ञस्थानी घेऊन जा.'

यज्ञाच्या अध्वर्यु जमदग्नींनी आज्ञा केली. पण त्याला यूपापाशी कोणी न्यायचे? वसिष्ठांनी विश्वामित्राकडे पाहिले. त्यानी डोळ्यानीच नकार दर्शवला अयास्य मुनि सामगानाच्या प्रयासात होते, त्यांना दुसरे काही सुचतच नव्हते.

'विलंब कशाचा?' राजकुमाराला क्षणाचा उशीर सहन होत नव्हता. या यज्ञाच्या प्रारंभासाठी शुभमुहूर्त काढलेला होता. सर्व क्रिया मंगल मुहूर्तावरच सुरू व्हायला हव्या ना?

'राजकुमार, या पशुला बांधायला कोणी ऋत्विज पुढे येत नाही. एखादा अवर ब्राह्मण त्या साठी शोधावा लागेल.'

राजकुमार उठून उभा राहिला. त्याने सगळीकडे पाहिले. लोकांची खूप गर्दी जमलेली होती. त्याने मोठ्यांदा घोषणा केली.

'अरे, या पशूला यूपाला बांधायचे आहे. जो ब्राह्मण हे काम करील त्याला दक्षिणा दहा गाई मिळतील.'

ऋत्विजा व्यतिरिक्त इतर बरेच ब्राह्मण तेथे आलेले होते. गाय हे त्या काळी सर्वात उत्तम धन मानले जाई. पदरी गाई असणे ही मोठी प्रतिष्ठेची गोष्ट समजली जाई. ज्याच्या गोशाळेत गाई असत त्याच्या घरी सर्व प्रकारची साधन सामुग्री असे. सुख समृद्धी असे. राजा महाराजांच्या गोशाळेत गोधनाचे कळपच्या कळप असत. ब्राह्मणांना दक्षिणा म्हणून गोदान देण्याची पद्धत होती. गांय मिळाली की त्यांची सुख समृद्धि वाढे.

जमलेल्या ब्राह्मणांनी राजकुमाराने केलेली घोषणा ऐकली. सारे एकमेकाच्या तोंडाकडे पाहू लागले. कोणालाही मोह व्हावा अशीच ही दक्षिणा होती. पण माणसाच्या मनात प्रेमभाव जागा झाला की तो विचार करू लागतो व मग कोठल्याही प्रकारची लोभ-लालसा त्याला मोह घालू शकत नाही. कोणी ब्राह्मण पुढे येईना.

मंगल मुहूर्त क्षणाक्षणाने चालला होता. अध्वर्यु घाई करू लागले. रोहिताने परत उठून घोषणा केली.

'पंचवीस गाई दईन. नाही ? पन्नास गाई देईन. पण लवकर या. मुहूर्त साधायला हवा. अरे येथे इतके ब्राह्मण असून एकाच्याने येवढे काम होत नाही ? त्यात असे काय मोठेसे आहे ? कोणी तरी या. मी शंभर गाई देईन. या एका विधीची दक्षिणा शंभर गाई. चला या.'

राजकुमाराने येवढे मोठे अमिष दाखवले तरी कोणी पुढे आले नाही. सारेच शुन:शेपाकडे पहात होते. किती भला, भोळा, निर्मळ जीव ! सारेजण जागच्या जागी खिळून गेल्यासारखे उभे राहिले.

'मला द्याल शंभर गाईंची दक्षिणा ?'

अजिगर्त राजकुमारासमोर येऊन उभा राहिला.

'ब्रह्मदेव ! तुम्हाला तर शंभर गाई दिलेल्याच आहेत !' राजकुमार विस्मयाने उद्गारला.

'त्या शुन:शेपाचे मूल्य म्हणून दिल्यात. ही दक्षिणा !'

अजिगर्ताच्या गुणदोषांचा विचार करायला वेळ नव्हता. राजकुमाराला या क्षणी मुहूर्त साधायचा होता. त्याने तत्क्षणी होकार दिला.

'तुम्हाला आणखी शंभर गाई मिळतील अजिगर्त ! शुन:शेपाला बांधा.'

अजिगर्त शुन:शेपाचा हात धरून यूपाकडे जाण्यास निघाला. लोकांच्या डोळ्यातून त्याच्या विषयीचा धिक्कार व तिरस्कार बाहेर पडत होता.

'हा पिता म्हणायचा की नरराक्षस ?'

'अरे नरराक्षस याच्याहून बरा. आपल्या पुत्राला नाही खात तो !'

'अरे बाबा–हा धनाचा मोह बरं–'

'पण माणसाने काही सारासार विचार तरी करावा की नाही ?'

अजिगर्ताने आपले कान झाकल्यासारखे दुर्लक्ष करून शुन:शेपाला यूपावर नेऊन उभे केले. चारी बाजूला लोंबणारे पाश त्याच्या शरीराभोवती चांगले घट्ट बांधले.

'आता तुमचा स्फरय (सुरा) शुद्ध करून घ्या.'

एका ऋत्विजाने अजिगर्ताजवळ जाऊन त्याला आज्ञा केली त्याप्रमाणे अजिगर्त सुरा स्वच्छ करू लागला.

'राजकुमार ! आजचा मंगल मुहूर्त टळला. आता उद्या !' अध्वर्यु गंभीरपणे म्हणाले,

'मग या पशुचे काय ? त्याला असाच यूपाला बांधून ठेवायचा ?' कुमाराने गोंधळून जाऊन विचारले.

'होय. नाहीतर उद्या पुन: त्याला कोणी बांधायचे ? आणि बरे आहे. बांधलेला असला म्हणजे पळून जायचीही शक्यता नाही.'

राजकुमार बिचारा या साऱ्या प्रकारामुळे निराश झाला होता. त्याला यज्ञाच्या प्रारंभापेक्षा पूर्णाहुति विषयीच उत्सुकता होती. वरुण या नरपशूचा स्वीकार करणार किंवा नाही हा गोंधळ पूर्णाहुतीच्या वेळीच संपणार होता.

ऋत्विजांना वंदन करून राजकुमार माता पित्याकडे गेला. पित्याचा रोग वाढत चालला होता. माता त्याच्या शुश्रुषेत व्यस्त होती. यज्ञाची सारी माहिती सांगावी अशी कुमाराची भारी इच्छा होती. पण ती ऐकायला येथे कोणालाच वेळ नव्हता. उत्सुकता तरी कोणाला होती ? तो मुकाट्याने शयनागारात गेला. त्याच्या मनात अतिशय उलथा पालथ चाललेली होती. आपण हे सारे करीत आहो हे चांगले आहे की वाईट ? मनाशी कोठलेच निर्णायक उत्तर तो ठरवू शकत नव्हता. पण त्याचा अंतरात्मा त्याला खात होता. तो आतल्या आत म्हणत होता, 'रोहिता ! तू करीत आहेस हे काम बरे नाही. तू क्षत्रीय कुमार आहेस. इतरांचा जीव वाचवावा हा तुझा धर्म ! आणि आज स्वत:चा जीव मोलाचा मानून तो वाचवण्यासाठी तू एका ब्राह्मण कुमाराला यूपावर चढवलेस ?'

रात्रभर त्याच्या कानात, मनात शब्द उमटत राहिले.

'सोडून दे. त्या भल्या भोळ्या ब्राह्मण कुमाराला तू सोडून दे.'

यज्ञात देवांचे आवाहन करून झालेले होते. देव आले होते तेव्हा ऋत्विजांनाही देवांच्या उपस्थितीत तेथे राहून जागरण करावयाचे होते. यज्ञाची सारी साधने सामुग्री व्यवस्थित लावायची होती. 'ती ग्रह यज्ञाची पात्रे इकडे ठेवा.' 'उपग्रहांना तिकडे बाजूला जाऊ द्या' 'हे पहा, ते दर्भ जरा नीट लावून ठेवा.' 'समिधा येथे हाताशी तयार असू देत' 'इष्टिची तयारी आहे ना ?' 'मध्यरात्री परत हवन करावे लागेल' 'हा तो दक्षिणाग्नि तेवढा नीट संभाळा. हो. गार्हपत्य आणि आहवनीय अग्नि आपले नेहमीचे. आपल्या कह्यातले काम आहे ते. पण हा दक्षिणाग्नि म्हणजे आभिचारिक प्रयोगाचाच अग्नि ! त्याला चांगला प्रदीप्त ठेवा !' अशी त्यांची कामे व धावपळ चालली होती.

शुन:शेप यूपावरून हे सारे पहात होता. ऋत्विजांची ती घाई व धावपळ त्याला एखाद्या खेळागारखी वाटत होती त्या खेळाचे मुख्य यश सारे त्यालाच मिळणार असे तो मानीत होता. बाजूला अजिगर्त गाढ झोपला होता. कदाचित् स्वप्नात तो कोणी समृद्ध राजा देखील झाला असेल !

अकस्मात म्हणा की काही कामासाठी म्हणा मुनिवर विश्वामित्र यूपाच्या जवळून जात होते. त्यांना पाहून शुनःशेपाने त्यांना बोलावले.

'जरा या बाजूला पहा तरी, मुनिवर !'

त्याचा तो गोड कोवळा स्वर ऐकून विश्वामित्र तेथेच उभे राहिले व म्हणाले

'मला क्षमा कर ब्रह्मकुमार ! तुला बांधणारे पाश वरुणदेवाचे पाश आहेत. त्यातून तुला सोडवण्याची शक्ति माझ्यात नाही.'

'पण मुक्त करा असे मी कुठे म्हणतोय ? माझे म्हणणे जरा ऐका तरी !' मुनिवर ! तुम्ही असे मानता की तुम्ही स्वतः मुक्त आहात आणि हा ब्रह्मकुमार बंधनात आहे ? मुक्ती आणि बंधन यांच्या मर्यादा इतक्या ढोबळ आहेत ?'

'बोल, बोल ब्रह्मकुमार ! तू तर तत्वज्ञानी दिसतोस !' विश्वामित्र त्यांच्या शब्दांनी चकित होऊन म्हणाले,

'तत्वज्ञानी तुमच्यासारखे मोठे ऋषिमुनी असतात ! तुम्ही तर किती तरी सूक्ते रचली आहेत. तुम्ही आर्ष द्रष्टे आहात मुनिवर ! म्हणून तर तुमच्याशी चार शद्व बोलावेसे वाटतात. जर थोडा समय असेल आणि माझे बोलणे ऐकण्याजोगे वाटत असेल तर बोलतो.'

'बोल. बोल कुमार. हे ज्ञान तुला कसे झाले ?'

'माझ्या आईमुळे. तिचे नाव आहे शमना. रात्रंदिवस ती कष्टच करीत असते आणि हा माझा पिता अजिगर्त आपल्या विचारांच्या तरंगावरच तरंगत असतो–रात्रंदिवस. तरीही त्या दोघांच्यात कधी कलह होत नाही. माझ्या जीवनाच्या या दोन बाजू. त्यांच्या मधल्या मार्गाला मानणारा मी त्यांच्यामधे एकटा उभा आहे.'

अद्‌भूत आहेस ब्रह्मकुमार ! पण मला एक सांग तुला या वरुणपाशातून सुटावेसे नाही वाटत ? तुला मरणाची भिती नाही वाटत ? साक्षात मृत्यूच्या मुखात उभा आहेस तरी किती शांत आहेस. कसा राहू शकतोस तू असा शांत–तटस्थ ?'

'आपण याला तत्वज्ञान म्हणत असाल नाहीं ? पण मी एक विचारू ?' या वरुण पाशातून कोण मुक्त आहे, मला सांगाल ? तुम्हाला वाटते माझे पिता जिवंत आहे. पण त्याला भुकेने मारलेले आहे. राजा हरिश्चंद्र जिवंत आहे ! त्यांना भोगाने अर्धमेले करून टाकले आहे. हा राजकुमार जिवंत आहे ? जर तो जिवंत असता तर मला मारायला तयार झाला असता ?'

तुम्ही तुमचाच विचार करा ना ! कितीदा मेलात आणि जगलात ? आणि अद्यापही जीवन-संजीवन दूरच आहे !

माझ्या शरीरा भोवती हे हजार पाश टाकलेले आहेत मला या यूपावर माझे ' बलिदान देण्यासाठी म्हणून उभे केले आहे. यूपाला तीन आडवी लाकडे ज्याला तुम्ही द्रुपद म्हणता ती कशासाठी बांधली आहेत ? संसारात कोठेही जा, हिंडा, फिरा, खेळा, खा, प्या, पण शेवटी तुमचे द्रुपद कोणते ? तीन गुणांच्या संमिश्रणाने झालेला. हा संसार. माणसात तामस गुण प्रबळ झाला तर दानव होतो राजस गुणाचा विकास झाला तर तो माणूस म्हटला जातो. आणि सत्वगुण वृद्धिगत झाला तर तो देवपदी पोचतो. परंतु या तीन गुणांच्या हजार पाशातून कोठला जीव सुटला आहे ?

या यूपाची वेदी ही अदिती आहे. ती यूपाला आधार देणारी शक्ति आहे. तशी या त्रिगुणाने युक्त अशा संसाराची आदिती कोण ? जीवनाची भावना ! ज्याने या जीवन्भातेला ओळखले तोच संसार तरुन गेला. त्याला मरणाची भीति वाटत नाही. त्याला यूपाची वा संसाराची हजार बंधने काही करु शकत नाहीत हेच जीवनाचे रहस्य आहे. मग त्याला तुम्ही तत्वज्ञान म्हणा वा दुसरे काही म्हणा. '

' तुला नमस्कार करतो मी कुमार ! तू मरणासाठी घडलेला नाहीस. तुला तर अनंत जीवनाचे प्रत्यक्ष दर्शन झाले आहे. तू अजर आहेस. अमर आहेस. तुझ्या शरीराभोवती पडलेले हे पाश तोडून टाकावेत असे मला वाटते आहे !' विश्वामित्र भारावून जाऊन म्हणाले.

' नाही मुनिवर कृपा करून अशी अनधिकार चेष्टा करू नका. तुम्ही आणि ते यज्ञाचे ब्रह्मपद मुनि वसिष्ठ, प्रत्येक विधीत बारीक सारीक चुका शोधून त्याकडे बोट दाखवता. ते बोलत नाहीत. पण न बोलताच बरेच काही दर्शवतात. मला तुमची सर्वांचीच कीव येते आहे. तुम्ही सारे हे असले यज्ञयाग करण्यातच जीवन वाया घालवणार आहात ? जीवनात दुसरे कोठलेच उच्च ध्येय तुमच्या-पुढे नाही ?

' कुमार ! तुझ्या शब्दात जादू आहे. भले या शरीराने तू जिवंत राहिलास वा न राहिलास तरी तू अनंत जीवनाचा प्रवासी आहेस परंतु या समाजाच्या कल्याणासाठी हेच शरीर धारण करून तू जिवंत रहा. आमची प्रेरक शक्ति हो. आमच्या चुकल्या माकल्या मार्गावर तू नवा प्रकाश टाक.

तू स्वस्थ आहेस. जरा सावधान हो आणि माझे म्हणणे ऐकून घे. वरुण-पाशातून तुला सोडवण्यास मी समर्थ नाही. हे सत्य तूही जाणून आहेस. पण मी तुला सांगतो. येथे यज्ञासाठी देव आलेले आहेत. एक एक देव म्हणजे एकेका

दिव्य शक्तीचा अविष्कार ! रात्र पडली आहे. परंतु देव झोपत नाहीत. तुझी दिव्य वाणी ऐकून ते तुझ्याकडे येतील. वरुणाच्या पाशातून तुला सोडवण्याची शक्ति कोठल्या देवात आहे ते मी जाणत नाही. परंतु येथे जे देव आहेत त्यांची नावे मी तुला सांगतो. प्रथम तर येथे प्रजापति आहेत. त्यांच्याबरोबर अग्नि आणि सविता आहेत. वरुण आणि त्यांच्याबरोबर आलेले विश्वेदेव पण आहेत. त्याच प्रमाणे देवराज इंद्र, आणि नंतर अश्विनीकुमार आणि उषाही येथे आलेल्या आहेत.

हे ब्रह्मकुमार तुझी स्तुतिवचने निष्फळ ठरणार नाहीत. हे मध्यरात्री आकाशात चमकणारे तारे तुला शुभाशिर्वाद देत आहेत. तुझे कल्याण असो.'

'गेले ! मुनिवर विश्वामित्र प्रेरणा देऊन गेले. आता आपण काय बरे करावे ?' शुन:शेप स्वत:शीच विचार करू लागला. मला खरोखरीच मरणाची भीति वाटते आहे का ? वरुणाचे हे पाश मला खरोखरीच जखडून ठेवीत आहेत का ? मनात जगण्याची इच्छा असेल तोवर मरण्याची इच्छाही व्हायचीच. पण जर जीवन आणि मरण दोहींच्या पलिकडे जावयाचे असेल तर त्यासाठी आपण काय करायला हवे ?

विश्वामित्रानी मला ज्ञान दिले. ते माझे गुरु झाले. त्यांच्या वचनावर श्रद्धा ठेवायला हवी. त्यांना वाटते त्याप्रमाणे माझ्या जगण्याने समाजाला काही उपयोग होणार असेल तर वरुणाचे हे पाश सुटल्याशिवाय रहाणार नाहीत. निराशा माझ्या मनास शिवतही नाही.'

शुन:शेप खरोखरीच शांत आणि स्वस्थ होता. तो सावधान झाला त्याने मस्तक वर उचलून कोण्या ऋषिने आवाहन करावे त्याप्रमाणे धीर गंभीर वाणीने प्रजापतीस उद्देशून आवाहन केले.

यज्ञाच्या वेदीवरून एक तेजाचा पुंज साकार होऊन त्याच्या दिशेने सरकू लागला.

'तुझे कल्याण असो ब्रह्मकुमार ! मी प्रजापति. मी निर्मितीचे कार्य करतो. रचना करून त्यात रममाण व्हावे हे माझे काम. तुझी रचना मीच केलेली आहे. परंतु जीविताची दोरी मात्र माझ्या हाती नाही ! तू अनंत जीवनाचा यात्री आहेस. एक काम कर. माझ्याच बरोबर रहाणाऱ्या अग्निदेवाचे तू आवाहन कर. ते तुला मार्ग सुचवतील.

एवढे सांगून तो तेज:पुंज पुरुष परत यज्ञवेदीकडे फिरला. ब्रह्मकुमार शुन:-शेपाने स्वस्थ व सावधान चित्ताने अग्नीस पाचारण केले व त्याची स्तुति केली. अग्निदेव त्याच्या समोर प्रगट झाले.

'शांत हो ब्रह्मकुमार! प्रजापतिने दिलेले जीवन निर्विघ्न पार पडावे, चांगल्या मार्गाने जावे म्हणून मी कार्य करतो. तुझ्याही जीवनाचा मी साक्षी आहे. तुझ्या जीवनाचा मार्ग अविरत पुढे चाललेला आहे. पण तो कोठे संपतो ते मला माहीत नाही. माझेच दुसरे स्वरुप आहे. सविता त्याला बोलाव तो तुला पुढे जाण्यास साह्य करील.'

ब्रह्मकुमाराला प्रेरणाच हवी होती. आपल्या जीवनाची गति थांबते की पुढे जाते याची चिंताच त्याच्या मनात नव्हती. त्याविषयी तो विचारही करीत नव्हता. 'चला तर आता सविता नारायणाचे दर्शन.' म्हणून तो मधुर वाणीने सविता देवाची सूक्ते म्हणू लागला. ती ऐकून सविता नारायण त्याच्या समोर प्रगट झाले.

'तुझी मति व तुझी धारणा शुद्ध असो. हे ब्रह्मकुमार! मानवाचे आंतर जीवन उजळावे हे माझे काम. हृदय शुद्ध असेल तर माणसाला त्याच्या अंतरातूनच प्रेरणा मिळतच राहते. देह जावो अथवा राहो. त्याच्याशी माझा फारसा संबंध नाही. तुझ्या अंतरीचा अंतर्यामी मी आहे. तुझ्यासारखा निर्भय व स्वस्थ जीव विरळाच असतो. व असा जीव संसारी जीवांना प्रेरणा देतो. तुझ्या देहाभोवती पडलेले पाश मला दिसत आहेत. पण ते तोडण्याची शक्ति वा अधिकार माझ्याजवळ नाही!'

'या यज्ञाचा अधिष्ठाता देव वरुण आहे. त्यालाच बोलाव ना! वरुणाची भिती नाही ना वाटत?'

'छे छे. सवितानारायण! तुम्ही तर माझे अंतर्यामी देव आहात. मग मला भय कशाचे? पण मी बोलावले तर वरुणदेव येतील? ते रुष्ट आहेत असे ऐकतो'

असले तरी तुझ्यावर थोडेच रुष्ट झाले आहेत ते? तू तर निर्दोष आणि निष्कपट आहेस.' असे म्हणून सवितानारायणही निघून गेले. आता वरुण देवांना बोलवावे? ते भद्र पुरुष कसे बरे असतील? सलीलासारखेच सरल आणि तरल! कुमार विचार करू लागला.

'तू माझे स्मरण केलेस शुन:शेपा? असा गोंधळून नको जाऊ मी वरुण.'

'अरे, महाराज–आपण? आपल्याला बोलावण्याआधीच आपण आलात? आपल्याला कसे बोलवावे तेच मला सुचत नव्हते!'

'कुमार! मला बोलावणे लागतच नाही. आणि कोणी बोलावले म्हणून मी कोणाकडे जातही नाही. तुझे जीवनच माझ्यात ओतप्रोत झालेले आहे. ऋत आणि सदाचार यावर तुझी अनन्य निष्ठा आहे आणि म्हणूनच तुझ्या शरीराभोवती

वरुणाचे पाश पडलेले दिसत असूनही तू त्यापासून मुक्त आहेस. शरीराच्या बंधनाला तू बंधन मानलेले नाहीस. पण एक आहे. तुला या पाशातून सुटावयाचे असेल तर तू विश्वेदेवांना सांग. या यज्ञाचा अधिष्ठाता देव जरी मी आहे आणि हे पाश देखील माझेच म्हटले जातात तरी ते पाश सोडवण्याचे काम मी विश्वेदेवांच्यावर सोपवलेले आहे. तू म्हणत असशील तर मीच त्यांना पाठवून देतो!'

'वरुणदेव! हे आपण काय बोलत आहात? मला वरुणपाशापासून सुटण्याची इच्छाच कोठे आहे? मुनिवर विश्वामित्रांनी मला उपदेश केला आणि मी त्यांना गुरुस्थानी मानले म्हणून देवांना आवाहन केले. परंतु मला या पाशातून सोडवा असे मी कोणाकडेच मागितले नाही.'

'विश्वामित्रांनी तुला सांगितले ते सत्यच आहे. तुझ्या मृत्यूने व बलिदानाने एक आदर्श निर्माण होईल हे खरे. परंतु या देहीच तू जिवंत राहिलास तर अनेकांना जगण्यासाठी प्रेरणा मिळेल. त्यात तुला संकोच बाळगण्याचे काहीच कारण नाही. मी जातो. तू विश्वेदेवांना बोलावून घे.' असे सांगून वरुणदेव यज्ञवेदीकडे परतले.

'या विश्वेदेवानो! माझ्याकडे या. वरुण देवांच्या प्रेरणेने मी तुम्हाला बोलावतो आहे.'

शुन:शेपाची स्वाभाविक गोड वाणी ऐकून सर्व विश्वेदेव एकदमच त्याच्या आजूबाजूस येऊन उभे राहिले.

धन्य आहेस ब्रह्मकुमारा! आम्ही विश्वेदेव. तुझ्या जीवनाचे साक्षी. दिव्याच्या साक्षीने बरी आणि वाईट कामेही होतात. दीपक त्याची नोंद घेत नाही. पण आम्ही साक्षीरूप असलो तरी बऱ्यावाईटाची नोंद घेतो.

ही पहा मध्यरात्र उलटून गेली आहे. तुझ्या जीवनाची गति येथेच थांबली आहे. तुझे मनोराज्य जरी विशाल असले तरी तुझ्या शरीराला वरुणपाशांनी जखडलेले आहे. तुझे प्राण तुझ्या शरीरात स्तंभित झाले आहे. प्राणांचा देव आहे इंद्र. देवांचा राजा इंद्रच त्यांना परत गतिमान करू शकेल.' असे सांगून विश्वेदेवांनी त्याचा निरोप घेतला. कळत न कळत का होईना पण शुन:शेपाच्या हृदयात आता जिजीविषा जागृत झाली होती. 'देव खरेच किती प्रेमळ आणि मायाळू आहेत. मानवाविषयी त्यांना किती सहानुभूति वाटते. हे पाहून देवांच्या विषयीचे त्याचे कुतूहल पण जागे झाले होते. 'तर मग देवांच्यात श्रेष्ठ अशा देवराज इन्द्रालाही बोलवावे' असा विचार करून त्याने एक सुमधुर सूक्त गायले. यज्ञवेदीवरून नाही पण अंतरिक्षातून एक दिव्य रथ उतरला. त्यातून देवराज इन्द्र बाहेर पडले.

'तू माझे स्मरण केलेस ब्रह्मकुमार? तुझ्या देहाभोवती तर वरुणपाश पडले आहेत. ते कसे सुटतील? या पाशात एकदा सापडलेला जीव सुटल्याचे कधी ऐकले नाही. पण म्हणून तू हरलास असे धरून चालायची आवश्यकता नाही. अद्याप रात्र संपली नाही. तोवर प्रयत्न करून पहा. तुझ्या प्राणात माझ्या दिव्यशक्तीचा संचार होवो. तुझ्यासाठी मी हा दिव्यरथ आणला आहे कल्याणमार्गावर प्रवास करणाऱ्या यात्रिकाला या रथाचे फार साह्य होते. आता मी हा घेऊन जातो. पण पुन: तू माझे स्मरण करशील तेव्हा मी हा रथ तुझ्याकडे पाठवून देईन.

आणि हे पहा. अश्विनीकुमार हे देवांचे वैद्य आहेत. त्यांचे स्मरण केलेस तर ते तुला साह्य करतील व उपायही सुचवतील' म्हणून देवराज इंद्रही गेले.

'हे देवही सारे अद्‌भुतच आहेत,' शुन:शेपाला वाटले. वरुणाच्या पाशांची यांना इतकी भीति का बरे वाटत असावी? चला आता अश्विनी कुमारांना बोलावून पाहू ते काय सांगतात. असा विचार करून त्याने मधुर सूक्ताने अश्विनी-कुमारांचे आवाहन केले.

'तत जीव: भद्र!' आशीर्वाद देत अश्विनीकुमार त्याच्या समोर उभे राहिले. 'वरुण पाशातून सुटायला अद्याप अवकाश आहे! पण त्यानंतर काय? याचा विचार केला आहेस? अरे, त्या राजाचा जलोदर रोग बरा झाला तर तुझे बलिदान देण्याचा प्रश्नच उरणार नाही. तू सांगत असशील तर या क्षणी त्याला रोग मुक्त करू. बोल.'

'कोणाचेही भले होत असेल तर ते काम प्रथम करा देव! माझे जे व्हायचे असेल ते होवो. पण राजा वाचला तर किती तरी प्रजाजनांचे कल्याण करू शकेल.'

'तर मग आम्ही आताच राजाकडे जातो. पण तू उषादेवतांना बोलावून घे. जी कामे देवांच्याने होत नाहीत ती त्या देवता करतात. आणि बंधनातून कोणालाही मुक्त करण्याचे काम तर त्यांना भारी प्रिय आहे. आम्ही फिरून तुला भेटायला येऊच.' असे आश्वासन देऊन ते उभयता देव गेले.

'अश्विनीकुमार राजाला बरे करण्यासाठी गेले. राजकुमाराला केवढा आनंद होईल. राजा आणि राणी दोघे किती प्रेमळ आहेत!' शुन:शेपाच्या मनात आले. 'रात्र मावळते आहे. पूर्व दिशेला लालिमा फाकत आहे. उषा देवता प्रगट होत आहेत. दूर क्षितिजावर आणि माझ्या अंत:करणातही उषेची कुंकुमर्चित मंगल पावले पडत आहेत. नवे आशेचे अंकुर जागवणाऱ्या, नवी चेतना देणाऱ्या या देवतांना मी कोणत्या शब्दांनी बोलावू?'

'मानवी जीवनाला नवी प्रेरणा देणाऱ्या कुमारा, जागृत रहा. जरा

बारकाईने विचार करून पहा. वरुणाचे पाश वस्तुतः तुला स्पर्शूच शकलेले नाहीत. तूच तुझ्या मतिने कल्पना केली आहेस तुझ्या भोवती पडलेले पाश केव्हाच शिथिल झाले आहेत. जरा आमच्या जवळ तरी ये ' त्या देवतांनी त्याला बोलावले.

'तुम्हीच मला पाशातून सोडवले आहे ! माझ्या अंतरीचा अंधार दूर करणाऱ्या उषा देवतांनो, तुम्हाला मी साष्टांग दंडवत प्रणाम करतो. आता मला उपदेश द्यावा ही माझी प्रार्थना कृपा करून मान्य करा.'

'चिरंजीव हो आणि इतराना जीवन देणारा हो. झोपलेल्यांना उठवून बसवणारा हो. आणि जे जागे होतील त्यांना जीवनाचा मार्ग दाखव. तोच तुझ्या जीवनाचा संदेश होवो.

हे पहा अश्विनी कुमार परत येत आहेत. त्यांनी काय संदेश आणला आहे बरे ?'

'ब्रह्मकुमार ! राजा रोगमुक्त झाला असून वरुणदेवही त्याच्यावर प्रसन्न झाले आहेत. उषा देवतांनो तुमचेही कार्य सिद्ध झाले आहे.'

'शुनःशेपा, आता आम्ही परत जातो. पण तुझे काम अजून पुरे झालेले नाही तू अजूनही पाशांनी जखडल्या सारखाच त्या यूपावर उभा रहा. आणि जे जे होईल तें पहा. अचानक मुक्ति नवी बंधने निर्माण करते.'

'देव हो तुमची आज्ञा मला शिरसावंद्य आहे. देव देवतांनो माझे तुम्हा सर्वांना शतशः प्रणाम.

पूर्व क्षितिजावर सविता नारायणही प्रगट झाले. आता तर नावापुरते नाटकच करावयाचे आहे. 'पशु ' होण्यातही आनंद आहे !'

★ ★

राजकुमार रोहित धावतच यज्ञशाळेत आला व सांगू लागला, 'सोड. ऋत्विजांनो, ब्रह्मदेवानो, कुमार शुनःशेपाचे बंध सोडून त्याला सोडून द्या.'

'अरे, पण राजकुमार एवढी घाई कसली ?'

'घाई ? घाई काल मुहूर्त साधला असता तर झाली असती ! रात्रभर मला चैन पडले नाही. स्वप्नात मी देवांना यज्ञवेदीवरून उठून शुनःशेपाकडे जाताना पाहिले. त्यातील देवराज इंद्र आणि वरुणदेव या दोघाना तर मी ओळखले देखील. आणि अश्विनी कुमाराना तर मी तातांच्याकडे जाताना पाहिले. त्यांच्या कृपेनें तात रोगमुक्त झाले !'

शुनःशेप मुक्त असूनही बांधल्या सारखा त्या यूपावर मुकाट्याने उभा

राहून सारे काही पहात होता. यावेळे पर्यंत झोपलेला अजिगर्त जागा होऊन आश्चर्य चकित होऊन उभा होता.

यज्ञाच्या अध्वर्यू जमदग्नींनी राजकुमाराला धीर दिला व त्याची समजूत घातली.

'कुमार! यज्ञाचा आरंभ होऊन चुकला आहे. आता तो असाच अर्धवट टाकता येणार नाही. आपण वरुणदेवांना यज्ञासाठी आवाहन केले आहे आणि आता तर इष्टदेव तुमच्यावर प्रसन्नही झालेले आहेत. तेव्हा ते निश्चित येतील. त्यांच्या सूचनेप्रमाणेच आपण जे करायचे ते करावे हे योग्य आहे.'

त्याच वेळी रोगमुक्त झालेला राजा व राणी तेथे येऊन पोचले. राजकुमाराने व राजाने मुनींचे म्हणणे योग्य मानून यज्ञ विधींना अनुमति दिली. ऋत्विजांनी अध्वर्युंच्या आज्ञेनुसार प्रातःसवन करून अग्निदेवाचे आवाहन केले. विश्वामित्र ऋषि ऋग्वेदाचे होते. त्यांनी वरुणाच्या आवाहनासाठी सूक्ते म्हटली आणि त्या यज्ञस्थानी वरुणदेव प्रगट झाले.

राजा, राणी, कुमार सर्वांनी त्यांना प्रणाम केला. त्यांनी या पूर्वी पाहिला होता तो उग्रभाव या वेळी वरुणदेवांच्या मुखावर नव्हता. सरळ, सौम्य, प्रसन्नतेची ती मूर्ती त्या सर्वांना शुभ आशीर्वाद देत होती.

'तुम्हा सर्वांना शुभाशिष असोत. राजन, या ऋषिकुमार शुनःशेपाच्या पुण्यप्रतापाने तुम्हाला रोगापासून मुक्ति लाभली आहे. हा ब्रह्मकुमार भला आणि भोळा आह. त्यामुळे त्याला स्वतःला मृत्यूचे भय वाटत नाही. त्याचे ऋत, व्रत, आचार व चरित् निर्दोष आहे. पापी आणि कपटी जीवांना माझे पाश जखडून टाकतात. पण सज्जनांना त्यांचे कधीच बंधन पडत नाही. ब्रह्मदेव जमदग्नि, या शुनःशेपाला तुम्ही बांधलेल्या बंधनातून मुक्त करा.'

वरुणदेव आणि मुनि जमदग्नि यांची अनुज्ञा मिळताच वसिष्ठ आणि विश्वामित्र दोघेही यूपाजवळ गेले व त्यांनी पाशाच्या गाठी सोडल्या. अजिगर्त हे काय चालले आहे हे न कळल्यामुळे मूढासारखा जागच्या जागी खिळून गेला होता.

वरुणदेवाने ब्रह्मकुमार शुनःशेपाला शुभाशीर्वाद देऊन म्हटले, 'कुमार, तू सत्य आणि सदाचाराचे पालन करणारा आहेस म्हणून मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. अज्ञानी व जड माणसे पशु अथवा नरपशूचे बलिदान देतात. परंतु खरे पहाता माणसांनी इतरांचे कल्याण करून स्वतःला यज्ञरुप करावयास हवे.

आपल्या अग्रजात पुरुषाने, नारायणाने यज्ञात स्वतःचे बलिदान दिले होते.

त्यांच्या कायेच्या समर्पणातून चार वेद, चार वर्ण, चार पशु व चार देव निर्माण झाले. नारायणाच्या त्या महान निर्मितीला पुरुष मेध असे म्हणतात. जो माणूस स्वत:चे जीवन यज्ञरुप करतो. तो मेध– पवित्र आणि पुण्यशाली होतो.

ऋषींच्याकडे पाहून वरुणदेवांनी त्यांना सांगितले,

' ब्रह्मकुमार शुन:शेपाने आत्म्याचे बलिदान देऊन यज्ञभावना शुद्ध केली आहे. तुम्ही या यज्ञातील अभिचार दोष दूर करा आणि या ब्रह्मकुमाराला ऋत्विज करून शुद्ध, सात्विक यज्ञाची भावना परिपूर्ण करा.

* *

# परिशिष्ट १

काव्य साहित्याच्या दृष्टीने पाहता ऋग्वेदसंहिता हा एक काव्यसंग्रह असून त्यातील ऋचा, मंत्र ही मंत्रद्रष्टचा ऋषींनी रचलेली काव्ये आहेत. तथापि ऋचा ही केवळ काव्यरचना नाही. मनन, चिंतन करून ऋषींनी जो दिव्य अनुभव मिळवला तो शब्दरुपात साकार केला. म्हणूनच ऋचांना मंत्र म्हणतात. व त्यांच्या निर्मात्या ऋषींना मंत्रद्रष्टे ऋषी म्हणतात.

ऋग्वेद संहितेच्या दहा मंडलांत एकूण दहा हजार पाचशे बावन्न ऋचा, किंवा मंत्र आहेत. त्या दहा मंडलांना अनुवाक आणि सूक्तांत गुंफले आहे. चार अथवा बारा ऋचांच्या संकलनाला सूक्त म्हणतात. अशा दहा बारा सूक्तांचे एक अनुवाक (प्रकरण) होते.

ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळात दोन हजार सहा ऋचा आहेत. चोवीस अनुवाकात एकशे एक्याण्णव सूक्ते याप्रमाणे त्यांची रचना केलेली आहे.

प्रत्येक सूक्ताच्या प्रारंभी १) सूक्ताचा क्रम २) त्यातील ऋचांची संख्या ३) ऋषि ४) देव ५) छंद यांचा निर्देश केलेला असतो.

## सूक्तांतील ऋचांचे ऋषी

ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळात मधुच्छंदा, जेता, मेधातिथी वगैरे ऋषींची नावे सार्थ आहेत. त्यांनी रचलेल्या ऋचांतून त्यांच्या नावाला अनुरूप असेच गुण, कर्म व जीवनाचे अनुभव व्यक्त झालेले आहेत.

ऋग्वेदाच्या अनुक्रमणिकेप्रमाणे (५, ८, २) मधुच्छंदानी मधुर व उत्तम मंत्रांचे दर्शन केलेले आहे. म्हणूनच त्यांना मधुच्छंदा असे संबोधलेले आहे. या ऋषींच्या मधुर मंगल सूक्तांनी प्रथम मंडलाचा प्रारंभ झालेला आहे. नावाला सार्थ करतील अशीच ती सूक्ते आहेत.

प्रत्येक ऋषीच्या दर्शनात, अनुभवात भिन्नता आढळून येते. एका अग्नीचेच वर्णन पण प्रत्येकाने ते वेगवेगळया रीतीने केलेले आहे. त्यावरून ऋषींच्या जीवनाची व त्यांच्या अनुभवाची कल्पना अभ्यासकांना करता येण्यासारखी आहे.

या ठिकाणी जी कथानके घेतलेली आहेत. त्यातून ऋषि, त्यांची जीवनदृष्टी, त्या दृष्टीनुसार रचलेल्या सूक्तांचा सारांश, त्या देव-देवतांशी त्यांचे संबंध व त्यांची सफलता यांचे विवेचन मुख्यत: आलेले दिसून येते.

यज्ञप्रसंगी देवांची स्तुतिस्तोत्रे गाऊन त्यांना प्रसन्न करण्यासाठी या ऋचा, रचल्या असून त्याप्रमाणे वेदांचे संकलन यज्ञविधिनुसार केलेले आहे असे एक मत आहे. परंतु वेद हे यज्ञविधिपुरतेच मर्यादित आहेत असे तात्पर्य त्यांतून निघत नाही. वेदांच्या या ऋचा जीवनाच्या विविध बाजू दाखविणाऱ्या आहेत. त्यांत व्यक्तिगत विकास, समाजाशी सहकार्य, राष्ट्राचे संघटन आणि विश्वकल्याण अशा कितीतरी विविध व्यापक गोष्टी आहेत. या ऋचांवरून त्या रचणाऱ्या ऋषींच्या उदरचरिताची कल्पना येते.

## सूक्त व ऋचेच्या देवता

ऋचांमधून ज्यांची स्तुती केलेली आहे, ज्यांचा महिमा वर्णन केलेला आहे त्यांना देव अशी संज्ञा आहे. त्यांत मुख्यत्वेकरून अग्नि, इंद्र, सोम, मित्र, वरुण, सूर्य, अदिति, उषा हे देव व वसु, रुद्र, आदित्य, मरुत, विश्वेदेव हे देवगण-देव-समूह आहेत. त्याखेरीज जड आणि चेतनात वसणाऱ्या दिव्य चैतन्याचे आरोपण केलेली तत्त्वेही देव मानलेली दिसून येतात.

मधुच्छंदा ऋषि अग्नीला पुरोहित, यज्ञाचा देव व ऋत्विज म्हणतात आणि त्याप्रमाणे अग्नीचे ते सर्व गुण स्वतःच्या जीवनात उतरवण्याची भावना बाळगतात. देवांची स्तुति करीत करीत स्वतः देवपद पावण्याची भावना येथे व्यक्त झाली आहे.

मधुच्छंदाचा पुत्र इंद्राला 'अपराजित जेता' या रूपात पहातो. म्हणूनच विश्वामित्र त्याला 'जेता' संबोधन करीत आहे. या दृष्टीने पाहिले असता ऋषींचे नाव, रुप, लक्षण, गुण वगैरे त्यांनी रचलेल्या ऋचांना अनुरुप असेच आहे.

## सूक्त व ऋचांचे छंद

ज्याप्रमाणे ऋचांचे ऋषि व देव जाणून घेणे आवश्यक आहे त्याचप्रमाणे ज्या छंदात त्या रचल्या आहेत ती छंदोरचना, तिचे स्वर, वर्ण, मात्रा वगैरेही त्यांचे रहस्य जाणून घेण्याच्या दृष्टीने महत्वाच्या आहेत.

ऋचा मुख्यत्वे तीन छंदांच्या गणांत रचलेल्या आहेत. गायत्री, त्रिष्टुप व जगती असे हे छंदगण आहेत. गायत्री गणातील छंदात प्रत्येक चरणाची आठ अक्षरे असतात. त्रिष्टुपात अकरा व जगतीची बारा अशी अक्षरे असतात.

गायत्री गणातील गायत्री छंदांत आठ अक्षरांचे तीन चरण उष्णिग छंदांचे ८-८-१२ असे तीन चरण अनुष्टुपाचे आठाचे चार चरण, पंक्तीचे ५ पाच, महापंक्तीचे सहा व शकवरीचे सात चरण प्रत्येकी आठ अक्षरांचे असतात.

त्रिष्टुपगणाची चार पदे व प्रत्येक चरणात अकरा अक्षरे असतात. जगती गणाचीही चार पदे व प्रत्येक चरणाची बारा अक्षरे असतात.

अष्टि, अत्यष्टि, शकवरी, धृति, अतिधृति या मोठ्या छंदातही काही ऋचा आहेत. दोन पदांची द्विपदा गायत्री आणि एकाच पदाची ऋचाही क्वचित आढळते· बृहती आणि सतोबृहतीच्या मिश्र छंदाला प्रगाथ असे नाव आहे. त्रिष्टुप पण काही ठिकाणी आहे.

सामान्यत: छंदात चरणांची संख्या सम असते. तथापि विषम पदांचे छंदही आहेत. ऋचा छंदाच्यामुळे गेय होतात व मनोभाव शब्दात उतरण्यास त्यांची मदत होते.

## प्रथम मंडलाचे ऋषि

पहिल्या मंडळात एकूण अठरा ऋषि आहेत. त्यातील पंधरा जणांनी शंभर शंभर सूक्ते रचलेली आहेत. त्यामुळे या मंडलाला शतर्ची ऋषींचे मंडल असे म्हटले आहे. आर्षानुक्रमणी व अश्वलायन सूत्र (३, ४) यात उल्लेख आहे.

अग्निमीळ इत्यादि प्रथमं मंडलं प्रति ।
शर्तार्चिनस्तु विज्ञेया कवय: सुखसिद्धये ।।

याला अपवाद म्हणजे जेता (सू. ११) कश्यप मारीच (सू. ९९) व धार्षागिर (पाच ऋषि सू. १००) या सर्वांचे एक एक सूक्त, असून कश्यपाच्या सूक्तात तर एकच ऋचा आहे.

दीर्घतमाच्या २४० ऋचा, कुत्साच्या दोनशे तीस, अगस्त्याच्या दोनशे सदतीस, गोतमाच्या दोनशे दोन ऋचा आहेत. मेधातिथीच्या एकशे चव्वेचाळीस, शुन:शेपाच्या चौऱ्याण्णव, हिरण्यस्तूपाच्या सत्तर, कण्वाच्या पंचाण्णव, प्रस्कण्वाच्या एक्याऐंशी, सव्याच्या एकाहत्तर, पराशराच्या नव्वद व परुच्छेपाच्या अठ्ठ्याण्णव ऋचा आहेत.

## नऊ कथानकांची रचना

या पुस्तकात पहिल्या मंडलातील ऋषींच्या जीवनाचा आलेख देणाऱ्या नऊ कथा आहेत. वेदांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना सदाचार, नीति, आरोग्य, दीर्घ जीवन, परिश्रम, समाजसेवा, राष्ट्रप्रेम, कल्याण भावना हे गुण वेदांत शिकवलेल आढळतील. अशा प्रकारे जीवन घडवावे यासाठी मदत व्हावी म्हणून वेदांचा परिचय देण्यासाठी हा प्रयत्न केलेला आहे.

पहिल्या मंडलातील ऋषींची संख्या तेवीस आहे. शंभराव्या सूक्ताच्या वृषागिरीचे पाच पुत्र ऋजास्व, अंबरिष, सहदेव, भयमान व सुराधस यांना एकत्र मोजून, त्याचप्रमाणे १०५ व्या सूक्तात कुत्स अंगिरसाचा विकल्प त्रित आप्त्य ऋषी आहे, त्याला न धरल्यास ही संख्या अठरा होते.

या कथांच्या रचनेबरोबर ऋषींचे कुलही जोडलेले आहे. त्यामुळे कथानक सरळ झाले आहे. पहिल्या कथेत ऋषि मधुच्छंदा, दुसऱ्या कथेत त्याचा पुत्र जेता, चौथ्या कथेत जेत्याचा गुरु विश्वामित्रांचा पुत्र शुनःशेप आहे

तिसऱ्या कथेत ऋषि मेधातिथी, कण्व व प्रस्कण्व यांचे कुल कण्व असून पिता कण्व आहे.

पाचव्या कथेतील हिरण्यस्तूप, सव्य व कुत्स अंगिरा कुलातील आहेत कुत्साच्या कथेत मारिच कश्यप (९९) व धार्षागिर (१००) यांचाही उल्लेख केलेला आहे.

सहाव्या कथेत रहूगणाचा पुत्र गौतम व त्याचा पुत्र नोधा यांची कथा असून त्यात शाक्त्य पाराशराच्या सूक्तांचा उल्लेख आहे. सातव्या कथेतील परुच्छेप दैवोदास व नवव्या कथेतील अगस्त्य मैत्रावरुणि एक एकटेच आहेत.

आठव्या कथेत औचथ्य दीर्घतमा व त्याचा पुत्र कक्षीवान आहे. पुढील कोष्टकात अनुवाक्, सूक्त, ऋचा, ऋचामंत्राची संख्या, ऋषि व कथानक दाखवले आहे. त्याप्रमाणे ऋग्वेद संहिता ग्रंथ समोर ठेवून अभ्यास केल्यास पहिल्या मंडलाचा अभ्यास बऱ्याच सुगमतेने करता येईल.

०००

| अनुवाक | सूक्तक्रम | मंत्रक्रम | एकूण सूक्ते | एकूण मंत्र | सूक्तमंत्र ऋषिप्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | १-३ | १-३० | ३ | ३० | |
| २ | ४-७ | ३१-७० | ४ | ४० | ११,११० |
| ३ | ८-११ | ७१-११० | ४ | ४० | |
| ४ | १२-१७ | १११-१७६ | ६ | ६५ | १२,१४४ |
| ५ | १८-२३ | १७७-२५३ | ६ | ७० | |
| ६ | २४-३० | २५४-३५० | ७ | ९४ | ७९४ |
| ७ | ३१-३५ | ३५१-४२१ | ५ | ७० | ५७० |
| ८ | ३६-४३ | ४२२-५१७ | ८ | ९५ | ८९५ |
| ९ | ४४-५० | ५१८-५९९ | ७ | ८१ | ७८१ |
| १० | ५१-५७ | ६००-६७१ | ७ | ७१ | ७७१ |
| ११ | ५८-६४ | ६७२-७४५ | ७ | ७३ | ७७३ |
| १२ | ६५-७३ | ७४६-८३६ | ९ | ९० | ९९० |
| १३ | ७४-८४ | ८३७-९३४ | ११ | ९७ | २०,२०० |
| १४ | ८५-९३ | ९३५-१०४० | ९ | १०५ | |
| १५ | ९४-१०५ | १०४१-११६५ | १२ | १२४ | २२,२३० |
| १६ | १०६-११५ | ११६६-१२७२ | १० | १०६ | |
| १७ | ११६-१२० | १२७३-१३५५ | ५ | ८२ | ११,२५१ |
| १८ | १२१-१२६ | १३५६-१४२५ | ६ | ६९ | |
| १९ | १२७-१३३ | १४२६-१४८५ | ७ | ५९ | १३,९८ |
| २० | १३४-१३९ | १४८६-१५२५ | ६ | ३९ | |
| २१ | १४०-१५६ | १५२६-१६४४ | १० | ११८ | १८,२४० |
| २२ | १५७-१६४ | १६४५-१७६७ | ८ | १२२ | |
| २३ | १६५-१७९ | १७६८-१८९१ | १५ | १२३ | २७,२३७ |
| २४ | १८०-१९१ | १८९२-२००८ | १२ | ११४ | |

| ऋषि | कथानक | विशेषता |
|---|---|---|
| | (१) | |
| १ मधुच्छंदा वैश्वामित्र | जीवन एक प्रयोगशाळा | एक ऋषि |
| | (२) | |
| २ जेता माधुच्छंदस् | जन्मभूमीचे स्मरण | एक ऋषि |
| | (३) | |
| ३ मेधातिथि कण्व | मोठी विद्या कोणती ? | मेधातिथि, कण्व, प्रस्कण्व |
| | (४) | |
| ४ शुन:शेप | जीवनसिद्धि | एक ऋषि |
| ५ हिरण्यस्तूप आंगिरस | संध्या. सकाळी-सायंकाळी | हिरण्यस्तूप सव्य कुत्स |
| ६ कण्व घोर | मोठी विद्या (३) | कश्यप, मारिच, धार्षागिरी |
| ७ प्रस्कण्व | मोठी विद्या (३) | मेधातिथी व कण्वाबरोबर |
| ८ सव्य आंगिरस | संध्या. सकाळी सायं. (५) | हिरण्यस्तूपाबरोबर |
| | (६) | |
| ९ नोधा गोतम | सर्वांचे कल्याण | नोधा, पराशर गोतमाबरोबर |
| १० पराशर शाक्त्य | ,, (६) | ,, ,, ,, |
| ११ गोतम राहूगण | ,, (६) | ,, ,, ,, |
| १२ कुत्स आंगिरस | संध्या. सकाळी सायं. (५) | हिरण्यस्तूपाबरोबर |
| १३ कश्यप मारिच (९९) | ,, (५) | कण्व घोराबरोबर |
| १४ धार्षागिर (१००) | ,, (५) | ,, ,, |
| | (८) | |
| १५ कक्षिवान दैर्घतमस् औशिक | अंतरीचा प्रकाश | कक्षीवान व दीर्घतमा |
| | (७) | |
| १६ परुच्छेप दैवोदास | जन्मांतरीचे सहकारी | एक ऋषि |
| | (८) | |
| १७ दीर्घतमा, औचथ्य मामतेय | अंतरीचा प्रकाश | दीर्घतमा व कक्षीवान |
| | (९) | |
| १८ अगस्त्य, मैत्रावरुणि | संधिदूताचे साहस | एक ऋषि |

# पहिल्या मंडलाची कथानके

## १ जीवन एक प्रयोग शाळा

पहिल्या मंडलातील पहिल्या दहा सूक्तांचे (मंत्र १०२) ऋषि मधुच्छंदा आहेत. ऋग्वेदानुक्रमणी (५, ८, २) मध्ये त्यांच्याबद्दल मधुच्छंदा ऋषी उत्तम व मधुर मंत्राचे द्रष्टे आहेत. अशी माहिती आहे. म्हणूनच वेदांचे मंगलाचरण मधुच्छंदांच्या सूक्तांनी केलेले आहे.

ऐतरेय ब्राह्मणात (६–७) असा निर्देश आहे की विश्वामित्र ऋषींना शंभर पुत्र होते. त्यांतील मोठे पन्नास मधुच्छंदा नावाचे होते.

ऐतरेयारण्यकात (१, ३, ४) मधुच्छंदा या नावाची व्याख्या, 'मधुच्छंदा नावाचे ऋषी– दुसऱ्या सर्व ऋषिगणांच्यासाठी 'मधु' मधुर भोग्य पदार्थांचे संपादन करण्याची ज्यांना इच्छा आहे ते– च्छन्दति; ज्या भावनेने ऋषि मधुची इच्छा करतात त्यावरून त्यांना मधुच्छंदा हे नाव मिळाले. मधमाशीने गोळा केलेला मध अन्नभोजनाला रुचकर बनवतो. म्हणून आवडणाऱ्या पदार्थांना 'मधु' असे म्हणतात. माणसांना सर्व कामना मधुरच वाटतात. त्या सर्व इच्छा पूर्ण करून इप्सित प्राप्त करून घेता यावे म्हणून मधुच्छंदानी सूक्ते रचली आहेत.

पहिल्या सूक्तांत देव अग्नि. छंद गायत्री व नऊ ऋचा आहेत. त्यांतील १, २, ९ या ऋचा सरळ व सोप्या आहेत.

दुसऱ्या सूक्तातील ९ ऋचा व तिसऱ्यातील १२ गायत्री छंदात रचलेल्या आहेत. तीन ऋचांचा एक याप्रमाणे सात 'तृचा' त इंद्र, वायु, मित्र, वरुण, अश्विनीकुमार, इंद्र, विश्वेदेव व सरस्वती यांची स्तुति केलेली आहे.

ऐतरेय ब्राह्मणाच्या अकराव्या अध्यायात या दोन्ही सूक्तांना 'प्रउग शस्त्र' म्हणून योजलेले आहे. शिवाय नवजात बालकामध्ये वायुमुळे प्राण, इंद्रवायुमुळे श्वासनिश्वास, मित्र व वरुणामुळे डोळे, इंद्रामुळे इंद्रिये, विश्वदेवामुळे स्फूर्ति आणि सरस्वतीच्या कृपेमुळे वाणीचा संचार होते. ही भावनाही त्यात रूजू केलेली आहे, त्याला अनुसरूनच पहिल्या कथानकाला 'जीवन एक प्रयोग शाळा' असे म्हटले आहे.

चार ते दहा सूक्तांत देवराज इंद्राची स्तुति असून सहा सूक्तांचा छंद गायत्री व सातव्याचा अनुष्टुप आहे. ऋषि मधुच्छंदाना जे जीवन दर्शन घडले त्याची प्रेरक देवता इंद्र आहे. त्या इंद्राला सोमरस अर्पण करून जीवनसाफल्याची

भावना नवव्या सूक्तांत व्यक्त केली आहे.

बृहदारण्यक उपनिषदाच्या दुसऱ्या अध्यायाच्या पांचव्या ब्राह्मणात उल्लेख असलेली मधुविद्या ' इयं पृथिवी सर्वेषां भूतानां मधु ' कथानकाच्या शेवटी दिलेली आहे.

## २ जन्मभूमीचे स्मरण

पहिल्या मंडलाच्या सुरवातीला तीन अनुवाक आहेत त्यात अकरा सूक्ते असून एकशें दहा मंत्र आहेत. पहिल्या दहा सूक्तांचे ऋषि मधुच्छंदा असून अकराव्या सूक्ताचे ऋषि जेता–मधुछंदाचा पुत्र–आहेत. सूक्ताचा देव इंद्र व छंद अनुष्टुप आहे. त्यात आठ ऋचा मंत्र असून त्यातील दुसऱ्या मंत्रात इंद्राला ' अपराजित जेता ' असे विशेषण दिलेले आहे. अशा रीतीने ऋषींचे स्वतःचे नावही सूक्तात गुंफलेले आहे.

ऐतरेय आरण्यक (१, २, ६ व २, २, १) यात विश्व ज्यांचे मित्र आहे ते विश्वामित्र अशी व्याख्या असून ऐतेरयारण्यक (१, ५, २) मध्येही या सूक्ताचा उल्लेख आहे.

## ३ मोठी विद्या कोणती

कण्व ऋषींच्या कुलातील तीन ऋषींचा परिचय या कथानकात करून दिलेला आहे. चौथ्या अनुवाकातील (१२–१७) सहा व पाचव्या अनुवाकातील (१८–२३) सहा अशा बारा सूक्तात ऋषि काण्व मेधातिथी असून त्यांतील अकरा सूक्तांचा छंद गायत्री आहे व तेविसाव्या सूक्तात गायत्री, पूर उष्णिग, प्रतिष्ठा व अनुष्टुप असे छंद आहेत. अग्नि, इंद्र, मरुत, मित्र, वरुण व अश्विनी-कुमार हे सूक्तांचे देव आहेत.

आठव्या अनुवाकातील (३६–४३) आठ सूक्तांचे ऋषि घोर कण्व असून ३६ व्या सूक्ताचा छंद प्रगाथ व देवता, अग्नि, ३७, ३८ चा छंद गायत्री, ३९ चा प्रगाथ व या चार सूक्तांचे देव मरुत आहेत. ४० व्या सूक्ताचा छंद प्रगाथ व ब्रह्मणस्पति ४१ चा छंद गायत्री व देव वरुण, मित्र, अर्यमा व आदित्य आहेत. ४२ चा छंद गायत्री व देव पूजा, ४३ चा छंद गायत्री व (९ अनुष्टुप) देव रुद्र, मित्रावरुण व सोम.

नवव्या अनुवाकाच्या (४४, ५०) सात सूक्तांत ऋषी प्रस्कण्व काण्व असून ४४ चा छंद प्रगाथ देव. अग्नि. अश्विनीकुमार व उषा, ४५ चा छंद अनुष्टुप देव,

अग्नि. ४६ चा छंद गायत्री देव अश्विनीकुमार. ४७ चा छंद प्रगाथ व देव अश्विनी कुमार. ४८ चा छंद प्रगाथ, देव उषा, ४९ चा छंद अनुष्टुप-देव उषा. ५० चा छंद गायत्री (१०-१३ अनुष्टुप) देव सूर्य (११-१३ रोगघ्न उपनिषद्)

१) १ ल्या सूक्तात सदसस्पति, ब्रह्मणस्पति वगैरे शब्द आहेत. त्यावरून वाचस्पती, ब्रह्मस्पती, ब्रह्मणपती व सदसस्पतींची व्याख्या केली आहे.

१) १३ व्या सूक्तात 'आप्री सूक्त' असा निर्देश आहे. अशी दहा सूक्ते ऋग्वेदात येतात. त्याचे द्रष्टे वेगवेगळे असून बारा देवांची नावे व क्रम जवळजवळ एकसारखाच आहे.

१) २२ या सूक्तात विविध वर्णने आहेत. सविता, देवपत्नी, विष्णु वगैरेंची अद्‌भूत वर्णने आहेत.

ऋग्वेद (१, ३६, १०) मध्ये काण्व मेघातिथी, (१, ४५, ३) मध्ये प्रस्कण्व व (१, ३६, १०) मध्ये कण्वांचे नाव आहे. बृहद् देवतात घोर पुत्र कण्वांची कथा आहे.

प्रसन्न झालेल्या इंद्राने मेषरुप धारण करून मेधातिथीला स्वर्गास नेले अशी कथा षड्विंश ब्राह्मण (१, १) जैमिनीय ब्राह्मण (२, ७९) शतपथ ब्राह्मण (३, ३, ४, १८) व ऐतरेय ब्राह्मण (१, १२, ३) मध्ये आढळते.

## ४ जीवन सिद्धी

आजिगर्ति शुनःशेप म्हणजेच कृत्रिम वेवरात ऋषि प्रथम अजिगर्ताचा पुत्र असा उल्लेख असून त्यानंतर त्यांना विश्वामित्रांचे पुत्र म्हटलेले आहे. पहिल्या मंडलाच्या सहाव्या अनुवाकातील (२४-३०) सात सूक्तांचे ते ऋषि आहेत. २४ व्या सूक्ताचा छंद १, २, ६-१५ अनुष्टुप व ३-५ गायत्री असून देव प्रजापति, अग्नि, सविता भग व वरुण आहे. सूक्त २५ छंद गायत्री. देव वरुण. सूक्त २६ गायत्री व अग्नि. सूक्त २७ (१-१२) गायत्री, १३ त्रिष्टुप, देव अग्नि. सूक्त २८ (१-६) अनुष्टुप (७-९) गायत्री, देव इंद्र, उलूखल. प्रजापति, हरिश्चंद्र, सोम. सूक्त २९ छंद पंक्ती, देव इंद्र. सूक्त ३०, गायत्री व त्रिष्टुप, देव, इंद्र, अश्विनीकुमार व उषा.

शुनःशेपाची कथा ऐतरेय ब्राह्मणात विस्तारपूर्वक आलेली आहे. मंत्रद्रष्टा ऋषि असा त्यांचा उल्लेख ऋग्वेद प्रथम मंडल चोविसाव्या सूक्ताच्या १२/१३

मंत्रात व ५/२/७ या ठिकाणी आहे. काठक संहिता (१९ ११ २७) मध्येही हा उल्लेख आहे.

## ५ संध्या-सकाळी सायंकाळी

या कथानकात अंगिरा कुलातील तीन ऋषि, हिरण्यस्तूप, सव्य व कुत्स यांच्या सूक्तांचा समावेश आहे. त्याच बरोबर कश्यप मारिच व घर्षागिर राजाचे पाच कुमार ऋजाश्व, अंबरीष, सहदेव, भयमान व सुराध यांचीही सूक्ते याच कथेत घेतलेली आहेत.

पहिल्या मंडलातील सातव्या अनुवाकातील (३१-३५) सूक्ताचे ऋषी हिरण्यस्तूप अंगिरस ३१ व्या सूक्तात देव अग्नि छंद जगती व त्रिष्टुप ३१-३२ देव इंद्र व छंद त्रिष्टुप ३४ देव अश्विनीकुमार छंद जगती-त्रिष्टुप ३५ देव अग्नि. मित्र वरुण, रात्री व सविता (२-११) देव सविता छंद त्रिष्टुप जगती.

दहाव्या अनुवाकातील (५१-५७) सात सूक्तांचे ऋषि सत्य, देव इंद्र व छंद जगती त्रिष्टुप.

पंधराव्या अनुवाकातील (९५-९८) चार सूक्तांचे ऋषि कुत्स देव अग्नि छंद त्रिष्टुप (९५-९६) व गायत्री (९७-९८)

सूक्त ९९ एकच मंत्र असून ऋषी कश्यप मारीच देव जातवेदा अग्नि छंद त्रिष्टुप सूक्त १०० चे ऋषि वार्षागिर ऋजाश्व, अंबरीष, सहदेव, भयमान व सुराध. देव इंद्र व छंद त्रिष्टुप.

१५ व्या अनुवाकातील (१०१-१०५) सूक्तांचे ऋषि कुत्स चार सूक्तांचा देव इंद्र. छंद जगती त्रिष्टुप १०५ व्या सूक्ताचे देव विश्वेदेव छंद पंक्ति, बृहती व त्रिष्टुप या सूक्ताचे वैकल्पिक ऋषि त्रित आप्त्य आहेत.

आंगिरस हिरण्यस्तूपाचा उल्लेख ऋग्वेद (१०, १४९, ५) मध्ये आहे त्यांचे द्रष्टे ऋषि अर्चन. शतपथ ब्राह्मणात (१, ६, ४, २) म्हटले आहे. 'अग्निर्देवतानां हिरण्यस्तूप ऋषीणां बृहती छंदसाम्'!

१.३१ अग्निसूक्त व १.३२ इंद्र सूक्त प्रसिद्ध आहेत. त्यानंतर सव्य आंगिरसाची सूक्ते आहेत. सुरुवातीस सायण भाष्यात सव्य ऋषींची जन्मकथा दिलेली आहे.

१.९४ पासून पुढे कुत्स आंगिरसाची सूक्ते आहेत. अंगिरा ऋषींचा हा दुसरा पुत्र कुत्स इंद्रासारखा पराक्रमी आहे. त्याचे रूप, गुण व आकृतीही इंद्रा-

सारखी आहे. त्याची कथा (३, १६, १६) ऋग्वेद, सायणभाष्यात दिलेली आहे. कुत्स ऋषींची सूक्ते मोठी आकर्षक आहेत.

## ६ सर्वांचे कल्याण असो

या कथानकात राहूगण गौतम, नोधा गौतम व शाकल्य या तीन ऋषींची सूक्ते आहेत.

अकराव्या अनुवाकाच्या (५८-६४) सात सूक्तांचा ऋषी नोधा गौतम. ५८-६० तीन सूक्तांचा देव अग्नि ६१-६३ देव इंद्र व ६४ व्या सूक्ताचे देव मरुत असून साती सूक्तांचा छंद त्रिष्टुप आहे.

बाराव्या अनुवाकाच्या (६५-७३) नऊ सुक्तांचा ऋषी पराशर शाकत्य देव अग्नि व सहा सूक्तांचा छंद द्विपदा विराट असून तीन सूक्तांचा त्रिष्टुप आहे.

तेरा व चवदाव्या अनुवाकातील (७४-९३) वीस सूक्तांचा ऋषि गौतम राहूगण असून देव क्रमश: अग्नि इंद्र, मरुत, विश्वेदेव, सोम, उषा व अग्नि सोम आहेत व छंद अनुक्रमे गायत्रि त्रिष्टुप, पंक्ती, जगती, अनुष्टुप, उष्णिग, प्रगाथ असे आहेत. सूक्त ८९ 'आ नो भद्रा:' हा शांतिपाठ प्रसिद्ध आहे.

गौतम व गौतम कुलातील 'गौतमास:' यांचा निर्देश ऋग्वेदात वारंवार आलेला आहे. 'सेनापते गौतम' (१, ६२, १३) 'एवाग्नि गौतमेभि:' (१.७७.५) वसिष्ठ पुत्र शक्ति व त्याचा पुत्र पराशर विशेष प्रसिद्ध आहे.

## ७ जन्मोजन्मीचे सहकारी

एकोणीस व वीस अनुवाकांतील (१२७-१३९) तेरा सुक्तांचे ऋषि परुच्छेप दैवोदासि आहेत. १२७ व २८ चा देव अग्नि. १२९ ते ३३ इंद्र, १३४ ते ३५ वायु-१३६, ३७ मित्रावरुण १३८ पूषा व १३९ विश्वेदेव आहेत.

१२७ (६ अतिधृति) १२८, १२९ (८, ९ अतिशकवरी) १३० (१० त्रिष्टुप) १३१, १३२ या सहा सूक्तांचा छंद अत्यष्टि १३३ व्या सूक्तात १ त्रिष्टुप, २, ३, ४ अनुष्टुप, ५ गायत्री ६ धृति, ७ अष्टि, असे छंद आहेत. १३४ व्या सूक्तात (६ अष्टि) १३५ (७-८ अष्टि) १३६ (७ त्रिष्टुप) व १३८-अत्यष्टी छंद आहे. १३७ व्या सुक्ताचा छंद अतिशकवरी व १३९ अत्यष्टि (५ बृहती व ११ त्रिष्टुप) याप्रमाणे छंद आहेत.

या सूक्तातील लांबलचक छंदरचना ध्यानात घेण्यासारखी आहे. पिंगल सूत्रात दाखवल्याप्रमाणे उत्कृति (१०४ अक्षरे) अभिकृति (१०० अक्षरे) संकृति (९६) विकृति (९२) आकृति (८८) प्रकृति (८४) कृति (८०) अतिवृति

(७६) वृति (७२) अत्यष्टि (६८) आष्टि (६४) अशा अक्षरांचे मोठे मोठे छंद या सूक्तात आहेत.

सामान्यतः गायत्री, उष्णिग, अनुष्टुप, त्रिष्टुप, जगती वगैरे छंदाचे तीन अथवा चार चरण असतात. वर उल्लेखिलेल्या अत्यष्टि (६८) अतिधृति (७६) या छंदाचे सात चरण असून गेयतेच्या दृष्टीने एक सारखी पदे वारंवार येताना दिसतात. (१,१३९,९)या मंत्रात दध्यंग, अंगिरा, प्रियमेध. कण्व, अत्री व मनु या या नावाचा निर्देश आहे त्याचप्रमाणे 'मे जनुषम्' हे पद गीतेची आठवण करून देते.

पुनर्जन्माचा स्पष्ट उल्लेख या कथानकात आहे परुच्छेप ऋषींची व्याख्या निरूक्त (१०-४२) मध्ये परुच्छेप ऋषिः। परुषत् शेपः परूषि परूंषि, शेप अस्य इति वा। अशी केलेली आहे. त्यावरून 'तेजाची झळकती ध्वजा' असा अर्थ केला आहे.

निरुक्त (१०-४२) परुच्छेप ऋषि एकाच पदाची आवृत्ति करण्याविषयी प्रसिद्ध असल्याचा निर्देश आहे.

'अभ्यास भूयांसमर्थं मन्यन्ते। तत् परुच्छेपस्य शीलम्।

## ८ अंतरीचा प्रकाश

अनुवाक १७-१८ यातील (११६-१२६) या ११ सूक्तांचे ऋषि कक्षीवान दैर्घतमस् औशिक आहेत. सूक्त ११६ ते २० चे देव आश्विनीकुमार छंद त्रिष्टुप जगती, गायत्री व इतर विविध छंद. १२१-देव इंद्र (विश्वेदेव) १२२ विश्वेदेव, १२३ उषा, १२५२६ स्वनय - दान स्तुति १२१ ते २६ मध्ये (१२२-५, ६ विराट रुप, १२५, ४, ५ जगती, १२६, ६-७ अनुष्टुप) सामान्यतः त्रिष्टुप छंद आहे.

अनुवाक् २१-२२ मध्ये (१४०-६४) अठरा सूक्तांचे ऋषी दीर्घतमा औचथ्य मामतेय १४०-५० सूक्तांचा देव अग्नि. १५१-५३ मित्रावरुण १५४-५६ विष्णु १५७-५८ आश्विनीकुमार १५९-६० द्यावा पृथिवी. १६१ ऋभु, १६२-६३ अश्व, १६४ विश्वेदेव.

१४० ते ४५ (१४०, १२-१२ त्रिष्टुप १४१, १२-१३ त्रिष्टुप) १४२ अनुष्टुप, १४३, त्रिष्टुप १४५ (५ त्रिष्टुप) सामान्य छंद जगती १४६-४८ त्रिष्टुप १४९ विराट १५० जगती १५२ त्रिष्टुप १५५ ते १६२ जगती, १६३ त्रिष्टुप, १६४ त्रिष्टूप अनुष्टुप छंद आहेत. बृहद देवताच्या तिसऱ्या अध्यायात

कक्षीवान व दीर्घतमाची कथा आहे. प्रथम मंडलाच्या (१५८, ४-५-६) मंत्रात दीर्घतमाची कथा आहे. त्यात औचथ्य (४) व मामतेय (६) यावरुन उचथ व ममता ही मातापित्यांची नावे कळून येतात. पाचव्या मंत्रात दास, अनुचरांच्या त्रासाचा उल्लेख असून त्रैतन हे दासाचे नाव आहे.

मेघातिथीच्या मंत्रात ' औशिक कक्षीवान ' असा उल्लेख आहे. त्याचप्रमाणे (१,१२६) सूक्तात स्वतःचे नाव व दान देणाऱ्या राजा स्वनयाच्या नावाचा उल्लेख आहे.

सूक्त १-१६४ अत्यंत भव्य, तत्वज्ञानपूर्ण सूक्त आहे. त्यातील कित्येक मंत्र उदा. द्वा सुपर्णा, चत्वारिवाक्, एकं सत् वगैरे उपनिषदातही आढळतात.

## ९ संधिदूताचे साहस

अनुवाक २३-२४ मध्ये (१६५-९१) या सत्तावीस सूक्तांचे ऋषी अगस्त्य मैत्रावरुणि आहेत. १६५ व्या सूक्तात इंद्र व मरुतांचा संवाद आहे. १६६-६८ देव (१६७-१ इंद्र) मरुत असून १६९ मध्ये इंद्र अगस्त्य संवाद आहे. १७०-७१ (१७१, ३-६ मरुत्वान इंद्र) १७२ चे देव मरुत आहेत. १७३-७८ देव इंद्र. १७९ अगस्त्य लोपामुद्रा संवाद, १८०-८४ अश्विनीकुमार १८५, द्यावा पृथिवी, १८६ विश्वेदेव, १८७ अन्न, १८८ आप्री सूक्त, १८९ अग्नि, १९० बृहस्पति १९१ विषघ्नोपनिषद आहे. १६५ चा छंद त्रिष्टुप १६६ (१४-१५ त्रिष्टुप) जगती १६७-त्रिष्टुप, १६८ (८-१० त्रिष्टुप) जगती. १६९ (२ चतुष्पदा विराट) त्रिष्टुप. १७० बृहति (२-४ त्रिष्टुप अनुष्टुप) १७१, त्रिष्टुप १७२ गायत्री १७३ (४ विराट) त्रिष्टुप, १७४ त्रिष्टुप १७५ (१ बृहती २-५ अनुष्टुप ६ त्रिष्टुप) १७६ (६ त्रिष्टुप) अनुष्टुप. १७७-१८६) त्रिष्टुप, १८७ उष्णिग, अनुष्टुप, गायत्री, १८८ गायत्री, १८९-९० त्रिष्टुप, १९१ अनुष्टुप (११-१२ महापंक्ति १३ महाबृहत्ती).

अगत्स्य ऋषि हे मित्र व वरुण यांचे पुत्र. त्यांचा जन्म यज्ञाच्या कुंभातून, झाला म्हणून त्यांना कुंभयोनीही म्हणतात. त्यांचे गोत्र नावावरुन मान्य केलेले दिसते. (१, १६५, १५)

इंद्र व मरुतांच्या मधील वैमनस्य दूर करण्याच्या कामी या ऋषींनी मोठेच काम केले आहे. त्या विषयीचा उल्लेख (१६५, १७०, १७१) मध्ये येतो, याशिवाय तैत्तिरीय संहिता (७, ५, ५, २) तैत्तिरीय ब्राह्मण (२, ७, २, १.)

मैत्रायणी संहिता (२, १, ८) काठक संहिता (१०, ११) तांडय महाब्राह्मण (२०, २१, १४, ५) ऐतरेय ब्राह्मण (५, १६) व कौषीतकि ब्राह्मण (३६, ९) या सर्व ठिकाणी असून रामायण, महाभारत व पुराणांतही ही कथा आढळते. इतिहासात पहिले समुद्रयात्री म्हणून अगस्त्य ऋषींची गणना केलेली असून उत्तर व दक्षिण भारताचे ते सर्वमान्य ऋषि आहेत 'अगस्तींचा वायदा' या लोकोक्तीचे मूळ १६९ व्या सूक्तांत मिळते.

या ऋषींचे तीन संवाद (१६५, १७२, १७९) काव्यदृष्टया खूप महत्वाचे आहेत. हे ऋषि आहेत, कवि आहेत व श्रमिक शेतकरीही आहेत. त्यांचे वर्णन.-

अगस्त्य: खनमान: खनित्रैः प्रजाम् अपत्यं बलमिच्छमान: ।
उभौ वर्णौ ऋषिरुग्र: पुपोष सत्या देवेषु आशिषो जगाम ।
(१-१७९-६)

या सूक्तात केलेले आहे त्याला अनुसरून कथानकाची सुरुवात केलेली आहे.

★ ★

## द्वितीय मंडल : सूक्ते ४३, मंत्र ४२९ ऋषि–गृत्समद

गृत्समद हे अंगिरस कुलातील शुनहोत्र मुनीचे पुत्र–भृगु कुलातील शुनक मुनींनी त्याना दत्तक घेतले होते. म्हणून अंगिरस शौनहोत्र व भार्गव शौनक अशी त्यांची दोन नावे आहेत. सायण भाष्यात त्यांच्याबद्दल उल्लेख आहे. 'हे ऋषि पहिल्यांदा अंगिरस कुलातील शुनहोत्राचे पुत्र. त्या गृत्समद ऋषींना यज्ञाच्या वेळी असुरांनी पकडले होते व इंद्राने त्यांची सुटका केली होती. देवराजाच्याच सांगण्यावरून भृगु कुलातील शुनक मुनींनी ऋषीना दत्तक घेतले होते.

दुसऱ्या मंडलातील एकोणिसाव्या सूक्ताच्या आठव्या मंत्रात गृत्समद या नावाचा निर्देश आहे. त्या शब्दाची व्याख्या निरुक्त (९, ५) मध्ये पुढीलप्रमाणे आहे. 'गृत्समदो गृत्समदनो गृत्स इति मेधावि नाम गृणातेः स्तुतिकर्मणः। गृत्स = स्तुति करणारा, मद = आनंद मिळवणारा, गृणन् = स्तुति करून देवांना आनंद देणारा.'

ऐतरेय आरण्यक (२, २, १) मध्ये गृत्स हा प्राण व मद हा अपान. प्राण व अपान (श्वासोच्छ्वास) ज्याला वश आहेत तो योगी पुरुष = गृत्समद असे स्पष्टीकरण आहे.

या मंडलांतील ४३ सुक्तांपैकी ३६ सूक्तांचा मंत्रद्रष्टा गृत्समद असून ४ ते ७ या सूक्तांचा द्रष्टा गृत्समदाचा पुत्र कूर्म (विकल्प गृत्समद स्वतः) आहे. पहिल्या १ ते १० सूक्तांचा देव–अग्नि, ११ ते २१–इंद्र, २३ ते २६–बृहस्पती २७–आदित्य, २८–वरुण, २९–विश्वेदेव, ३०–इंद्रसोम, ३१ व ३२–विविध विश्वेदेव, ३३–रुद्र, ३४–मरुद्गण, ३५–अग्नि, ३६–ऋतु, ३७–द्रविणोदा, ३८–सविता, ३९–अश्विनीकुमार, ४०–सोमापूषा, ४१–विविध, ४२ व ४३–कपिंजल इंद्र देव असून बहुतेक सूक्ते जगती व त्रिष्टुप छंदात आहेत. त्याशिवाय गायत्री, अनुष्टुप, बृहती व अष्टि हे छंदही आहेत.

### १ : भक्त व भगवान

पहिल्या कथेतील वर्णनात अग्नि व इन्द्राची बावीस सूक्ते आहेत. कथा बीज बृहद् देवता (२–६५–७९) या ग्रंथात आहे.

### २ कर्म हाच धर्म

और्णवाभम् (२–११–१८) ऊर्णवाभि– ऊर्णनाभि– कोळी व त्याचे जाळे, (और्णवाभम्) श्वेतश्वातर उपनिषदात सूर्याला 'जालवान्' व त्याच्या किरणांना

जाळे म्हटलेले आहे. (२–३–६) ऋचेत उल्लेख आहे त्याप्रमाणे उषा व रात्री या दोघींना कुशल विणकर स्त्रीयांची उपमा दिली असून यज्ञासाठी लागणारे वस्त्र त्या दोघी तंतू पसरून विणून काढीत आहेत असे वर्णन आहे. गृत्समद ऋषींच्या आश्रमात वस्त्र विणण्याचे काम चाले असा निर्देश (२–१४–३) आढळतो. 'और्णुत जूर्नं वस्त्रैः' शरीर झाकण्यासाठी विणून तयार केलेले वस्त्र असे सूचन दिसते.

## ३ : ऋतुक्रमानुसार

(२–१८–२) ऋचेत प्रथम, द्वितीय, तृतीय (२–१८–४) मध्ये, २, ४ ६, ८, १० त्याचप्रमाणे (५, ६) मध्ये २०, ३०, ४०, ५०, ६०, ७०, ८०, ९० व १०० या अंकाचा निर्देश आहे.

(२–३९) हे सूक्त 'युगल गीत' म्हणून प्रसिद्ध आहे. अश्विनीकुमारांच्या जोडीला अनुलक्षून इतर जोड्यांचा निर्देश या ऋचात आहे.

(२–३६) या सूक्तात मधु व माधव, शुक्र व शोचि, नभ व नभस्य, ऋतु व त्यांचे अधिष्ठाते देव, इंद्र व मरुत, त्वष्टा व अग्नी, इंद्र व मित्रा वरुण यांचा संबंध स्पष्ट केलेला आहे.

## ४ : चंद्र व चकोर

(२–३२) या सूक्ता राका सिनीवालीचे वर्णन आहे. पौर्णिमेला राका व चंद्रकलेसह असणाऱ्या अमावस्येस सिनीवाली म्हटले आहे.

(२–३२–४) या ऋचेत 'सीव्यति' शब्द आहे.

(२–४०) सूक्तात सोम व पूषाची स्तुति आहे. त्यात सोम तो चंद्र व पूषा हा सूर्य असा चंद्र–सूर्याच्या संबंधाचा निर्देश आहे.

शेवटच्या दोन सूक्तांत शकुनि पक्षी मंगल शकुनगान गात आहे. सायण भाष्यात या शकुनीला कपिंजल पक्षाच्या रूपाने आलेला इंद्र असे म्हटले आहे. त्यावरून कथानकात कपिंजला ऐवजी चकोर म्हटले आहे.

या सूक्ताबरोबर खील (परिशिष्ट) मंत्रही जोडलेला आहे. त्याचा भावार्थ, हे कपिंजल पक्षा, तू दक्षिणेकडून शुभ बोल. उत्तरेकडून व पुढून आणि मागूनही तू शुभ बोल.'

निरुक्त (९–३) मध्ये शकुनि शब्दाचा अर्थ दिलेला आहे व वरील ऋचेचे गृत्समद ऋषींना दर्शन झाल्याचा उल्लेखही निरुक्तात (९–४) आहे.

गृत्समद चकोराच्या शब्दाचा पण इंद्राच्या शब्दाइतकाच आदर करीत आहेत पक्षांविषयीची भावना त्यातून प्रतीत होते.

आचार्य श्री विनोबा भावे यांनी (विनोबा के विचार : भाग २–पृष्ठ ६१) या विषयी म्हटले आहे, ' गृत्समद चौमुखी अविष्कारक होते. पौराणिकांनी त्यांना महान अविष्कारक असे म्हणून पुढे म्हटले आहे की, गर्भाच्या वृद्धीवर चंद्राचा विशेष परिणाम होतो. वेदांच्या मंत्रातही हा भाव ध्वनित आहे. चंद्रात मातृवृत्ती असते. तो कलावान तर आहेच. सूर्याच्या प्रखर ज्ञानमय किरणांना पचवून त्यांना भावनामय सौम्य रुपात मातेच्या हृदयात पोचवून कोमल गर्भापर्यंत जीवनामृत पोचवण्याचे प्रेमळ व कुशल कार्य चंद्रच करू शकतो. हा गृत्समदाचा आविष्कार आहे. आधुनिक विज्ञानाने या विषयावर अद्याप नवा प्रकाश टाकलेला नाही.

परावृत्त किरण विज्ञान, प्राणविज्ञान व मनोविज्ञान या तीन विज्ञान शाखांचे मिलन मिश्रण या सूक्तात असल्याने गुंतागुंत जरा अधिक झाली आहे. तथापि गृत्समदांचा सिद्धांत सामान्यांनाही पटवण्यासारखा आहे. बालकाला त्याचे सौम्य रूप सोमापासून मिळाले असले तर त्यात आश्चर्य ते काय !'

## तृतीय मंडल : सूक्ते–६२, मंत्र–६१७, ऋषि–विश्वामित्र

विश्वामित्रांचे कुल गाथी असल्यामुळे त्यांचा उल्लेख ' गाथिन् ' असा केलेला आहे. त्यांचा पिता गाथी कुशिक पण ऋषी होते. म्हणून त्यांना कौशिक विश्वामित्र असेही म्हटलेले आहे. पुराणात ज्यांचा उल्लेख गाधिराज असा आहे तेच हे गाथी होत. बृहद् देवता (४–९५) मध्ये, पृथ्वीवर शासन केल्यानंतर तपश्चर्येच्या योगाने ब्रह्मर्षिपद मिळवून गाथिपुत्र विश्वामित्राने अग्नि वगैरे देवांची स्तुति केली होती; असा उल्लेख आहे. विश्वामित्र शद्बाची व्याख्या ऐतरेय आरण्यक (१–२–१५) मध्मे ' विश्वस्य ह वै मित्रम् ' (३–१–२१) या ऋचेत ' विश्वामित्रभिः ' असा बहुवचनी उल्लेख आहे. त्यावरून विश्वामित्र ऋषी आश्रमवासीयांनापण विश्वामित्र म्हणून संबोधीत असावेत असे दिसते.

**विश्वामित्र–** हे या तृतीय मंडलाचे मुख्य मंत्रद्रष्टे ऋषि आहेत. त्यांच्यासह दुसऱ्या सात ऋषींची बारा सूक्ते या मंडलात आहेत. बाकीच्या ५० सूक्तांचे ऋषि–विश्वामित्र आहेत. सूक्त १३–१४; ऋषभ वैश्वामित्र, १५–१६ : कात्य उत्कील, १७–१८ : कत–वैश्वामित्र, १९–२२ : गाथिक कौशिक व ३८ वे सूक्त वाच्य प्रजापती अथवा वैश्वामित्र प्रजापतीचे आहे. ३१ वे सूक्त कुशिक अषीरथी अथवा गाथीन विश्वामित्रांचे आहे.

या मंडलातील पहिल्या १ ते २९ सूक्तांचा देव अग्नी आहे. ३० ते ५२ देव इन्द्र आहे. आठव्या सूक्तात यूपाचे वर्णन आहे. ३३ व्या सूक्तात विश्वामित्र व नद्यांचा संवाद आहे. ५३ व्या सूक्तात इन्द्र, पर्वत, वाणी, रथ यांचे वर्णन आहे. ५४–५७–विश्वेदेव, ५८–अश्विनीकुमार, ५९–मित्र, ६०–ऋतु, ६१–उषा, ६२–विविध देवांचे वर्णन आहे. ६२ व्या शेवटच्या सूक्तात प्रसिद्ध गायत्री मंत्र आहे.

दुसऱ्या मंडलाप्रमाणेच तिसऱ्या मंडलाचा मुख्य छंद त्रिष्टुप व जगती आहे. त्याशिवाय गायत्री. अनुष्टुप व बृहती हे छंदही अधूनमधून आहेत.

## ५ : जीवन– एक यज्ञ

पश्चिम प्रदेशात सिंधु नदीच्या तीरावर ऋषि विश्वामित्र ब्रह्मर्षिपद मिळाल्यानंतर प्रतिष्ठित झालेले आहेत. तिसऱ्या मंडलाच्या पहिल्या सूक्तातील वैश्वानर रुप आदर्श पुरुषाचे दर्शन म्हणजे विश्वामित्रांच्या उत्तम ज्ञानाचा दृष्टांत आहे. नंतरच्या सूक्तातून त्यांच्या जीवनदृष्टीच्या विविध भावनांचे दर्शन होते. या कथेत त्यांच्या आश्रमात रहाणाऱ्या सर्व ऋषींच्या व्यापक भावनेचे चित्र वैश्वानर अग्नीच्या रुपात दिसून येते. पहिल्या सूक्तातील ऋचांता हा भाव व्यक्त झालेला आहे.

## ६ : दहा हातांचे बळ

ऋषि विश्वामित्र तपश्चर्या करण्यासाठी गंगा–यमुनेच्या तीरावर जाऊन राहिले. तप केल्याने व्यक्तिगत राग–द्वेष नाहीसे होऊन सर्वांच्या विषयी समान प्रेमभावना निर्माण झाली. त्यामुळे समाजाचे संघटन करण्याच्या कामी ऋषींची वाणी प्रभावी ठरली. अग्नि संबंधीच्या पहिल्या २९ सूत्रांचे सार या कथेत आहे.

## ७ समस्त विश्वाच्या कल्याण यज्ञासाठी

निरुक्त (२–२४) मध्ये या कथेचा निर्देश आहे. राजा पिजवनाचा पुत्र सुदास याच्या यज्ञाचे पुरोहितपद विश्वामित्रांनी घेतले. विश्वामित्र हे सगळयांचेच मित्र. यज्ञ सामुग्री घेऊन जात असता वाटेत विपाट् व शुतुद्री नद्यांचा संगम आडवा आला. त्या प्रवाहातून साधनसामुग्री वाहून नेणाऱ्या गाडया पसार व्हाव्या म्हणून ऋषींनी त्या नद्यांची स्तुती केली.

विपाट् म्हणजे मानवांचे मोहपाश तोडणारी व शुतुद्री म्हणजे वेगवती अशी' व्युत्पत्ती निरुक्तात (९–२६) आहे. त्यावरून कामक्रोधादी आवेगांना बंध घालून संसार सागर तरून जावा लागतो असा भावार्थ निघतो.

(३-५३-१०) या ऋचेत 'हंसा इव कृणुथ श्लोकम्' असा 'श्लोक।' या शब्दाचा उल्लेख आहे. सामान्यतः संस्कृत साहित्य श्लोकबद्धच आहे. परंतु वेदातील मंत्राना श्लोक असे संबोधण्याची पद्धत नाही. या ऋचेत श्लोक हा शब्द प्रशंसावाचक आहे. सायण त्याची उत्पत्ती याप्रमाणे देतो– 'श्लोक शब्दे' श्लोक्यते शस्यते अनेनेति श्लोकः।'

(४-२४-८) या ऋचेत पण 'ऋतस्य श्लोकः' असे पद आहे. त्याचा अर्थ 'स्तुतिरुप वाणी' असा सायणाने दिला आहे. श्लोक याचा अर्थ मंत्र असाही निघू शकतो.

## ८ : समाज जीवनाचा मानदंड

महाभारत व पुराणात विश्वामित्रांची कथा प्रसिद्ध आहे. तिसऱ्या मंडलाच्या सूक्तात त्यांच्या जीवनाच्या विविध पैलूंचे दर्शन होते. प्रारंभीच्या सूक्तात त्यांच्या जीवनाची दृढसिद्ध भूमिका दिसून येते. गंगा-यमुनेच्या काठी त्यांनी राज्य केले असावे व राज्यत्याग केल्यावर पूर्व भारतात तपश्चर्या केली असावी असे दिसते. त्यानंतर उत्तराखंड, सिंधुप्रदेश व दक्षिणापथातही त्यांनी आश्रम स्थापन करून वास केल्याचा निर्देश या कथेत आहे.

या मंडलात इतर सात ऋषींची सूक्ते (१३ ते २३) व (३८-५४-५५) आहेत. त्यांचाही समावेश या कथेतच केला आहे. (३-२३-२)या ऋचेत 'भारत' शब्दाचा निर्देश आहे–
'अमन्थिष्टां भारता रेवदग्निम्।'

'यूप' शब्दाची व्युत्पत्ती सांगून ऐतरेय ब्राह्मणात (६-१) 'अंजन्ति त्वांमध्वरे (३-८-१)' असा निर्देश आहे. सामान्यतः सोमयागात यूप हा बलिदानासाठी पशु बांधण्यासाठी रोवलेला खांब असतो. परंतु या ऋचात ऐतरेय ब्राह्मणाच्या व्याख्येप्रमाणे यूपाला मानदंड मानून पुढील कथा रचली आहे. ऋषि विश्वामित्रांच्या प्रेरणेनुसार भारतीयांनी हा महायाग केलेला आहे. त्यात भारताचे प्रतिनिधी उपस्थित आहेत. यूपाला राष्ट्रध्वज मानून अग्रणी नेत्याची निवड करून त्याच्या हस्ते हा ध्वज चढवला आहे हे वर्णन मूळ ऋचांवरूनच केलेले आहे.

यूपामध्ये राष्ट्रध्वजाचे आरोपण करून विदथ समितीची रचना करून गद्य मंत्राचा निविद करण्याचा निर्देश ऐतरेय ब्राह्मणा (१०–२०) मध्ये आढळतो. अशा प्रकारे यूप हा राष्ट्रातील प्रजाजनांचा मानदंड व तो शृंगारण्यासाठी त्यावर ध्वज व पताका लावून त्यातून राष्ट्रध्वज निर्माण झाल्याचे सूचन त्यातून मिळते.

विश्वामित्राने स्वतः ऋषिपद मिळवले व पिता आणि पितामह यांनाही मिळवून दिले हा उल्लेख पांतजल महाभाष्य (पाणिनीय सूत्र ४, १, १०४) मध्ये आहे. विश्वामित्राने 'मी अनृषि होऊ नये' या हेतूने तप केले व ते ऋषि झाले. त्यांनी पुन्हा तप करून 'मी अनृषि पुत्र असू नये' अशी सिद्धी मिळवून गाधि राजास ऋषिपद मिळवून दिले व आपण अनृषिचा पौत्रही नसावे म्हणून तिसऱ्यांदा तप करून कुशिकांनाही ऋषिपद मिळवून दिले.

## चतुर्थ मंडल : सूक्ते ५८, मंत्र-५८९, ऋषि-वामदेव

रहूगणाचा पुत्र गौतम ऋषीची सूक्ते प्रथम मंडलात (७४ ते ९३) आहेत. गौतमाचा पुत्र वामदेव. तेच चतुर्थ मंडलाचे ऋषि वामदेव. ४२ व्या सूक्ताचे ऋषि पौरुकुत्स्य, त्रसदस्यु व ४३-४४ व्या सूक्ताचे ऋषि सुहोत्राचे पुत्र पुरुमीढ व आजमीढ हे आहेत-

पहिली १५ सूक्ते अग्नीची स्तुति असून १६ ते ३३ इंद्र, ३४ ते ३७ ऋभु ३८ ते ४० दधिक्रा, ४१ ते ४२ इंद्र-वरुण, ४३ ते ४५ अश्विनीकुमार, ४६ ते ४८ वायु, ४९ ते ५० इंद्र व बृहस्पती, ५१ व ५२ उषा, ५३ ते ५४ सविता, ५५ विश्वेदेव, ५६ आकाश-पृथ्वी, ५७ क्षेत्रपती, ५८ अग्नि, जल, घृत, गो, सूर्य वगैरे देवांची स्तुति आहे.

पहिल्या मंडलांच्याप्रमाणेच या मंडलातही त्रष्टुप व जगती छंदात बहुतेक सूक्ते आहेत. गायत्री, अनुष्टुप, ऊष्णिक, धृती, अष्टी वगैरे छंदही आहेत. प्रथम सूक्ताच्या पहिल्या मंत्रचा छंद अष्टी आहे. पहिल्या दोन चरणात 'त्येरिर,' चौथ्या चरणात 'आदेवंजनत प्रचेतसम्' ही पदे दोनदा आहेत. त्याचप्रमाणे दुसऱ्या व तिसऱ्या सूक्तात दोन दोनदा पदे आलेली आहेत. त्यावरून गीतीची परंपरा सूचित होते.

'तन्मा पितुर्गोतमाद् अन्वियाय' (४-४-११) या ऋचेत पिता गौतमाकडून ऋचा प्राप्त झाल्याचा निर्देश आहे. त्याचप्रमाणे 'भुवो ऽ विता वामदेवस्य (४-१६-१८) असा स्वतःच्या नावाचा निर्देशही आहे.

## ९ : भविष्याचे चिंतक

'अवर्त्या शुन अंत्राणि पेचे' (८-१८-१३) या ऋचात ऋषि स्वतःच्या दारिद्र्याचे वर्णन करीत आहेत. अवर्त्या=निर्वाहवृत्ती मिळत नाही अशा स्थितीत मिळेल ती ओली-कोरडी भाकरी खाऊन तहान भूक भागवावी लागते. या अर्थी

' शुन अंत्राणि ' हे शद्ब वापरले आहेत. त्याचा शद्बशः अर्थ कुत्र्याची आतडी असा होतो. खाण्याच्या दृष्टीने निरुपयोगी असा भावार्थ. कवी वामदेव हे अलौकिक मार्गाचे शोधक, क्रांतद्रष्टे ऋषि आहेत. वर्तमानाची चिंता सोडून ते भविष्य उज्ज्वल करण्यामागे लागले आहेत. त्या संदर्भाने विचार करता ' शुनः ' याचा अर्थ कुत्रा न करता श्वा–श्वस्तन, ज्याप्रमाणे उद्या–उद्याचा दिवस, असा होतो. आजच्या घडीची गोष्ट सर्वांना रुचते. पण उद्याची गोष्ट रुक्ष वाटते. नीरस वाटते, असा भावार्थ या कथेत घेतलेला आहे. अग्नि, इन्द्र, वरुण, वायु वगैरे देवांची स्तुती याच भावार्थाने घेतलेली आहे.

' अकारि ते हरि वो ब्रह्म नव्यं धिया स्याम रथ्यः सदासाः । ' ही एकच ऋचा १९ ते २५ या सात सूक्तांच्या अकरा ऋचांत पुनः पुनः आलेली आहे. वामदेवाच्या सूक्तांचे हे वैशिष्टय आहे.

वामदेवांच्या या विलक्षण जीवन यज्ञात त्यांच्या पत्नीचे उशतीचे पण सहकार्य त्यांना लाभलेले आहे. समाजाकडून झालेली अवहेलना तिने सहन केलेली आहे. अंती श्येन रूपाने आलेल्या इन्द्राने त्यांच्या जीवनास माधुर्य प्राप्त करून दिले याचे वर्णन खालील ऋचेत आहे–

' अपश्यं जायां अमहीयमानाम् । अधा मे श्येनो मध्वा जभार ' (४-१८-१३)

## १० : नवल वर्तले

२६, २७ व ४२ या तीन सूक्तांच्या अनुसंधानाने ही कथा रुजू केलेली आहे. २७ व्या सूक्ताच्या सुरुवातीस सायणाने एक प्राचीन श्लोक उधृत केला काहे. ' ऋषि वामदेव श्येन पक्षाचे रूप घेऊन मातेच्या गर्भातून बाहेर पडले. गर्भवासातच त्यांनी सूक्ते रचली होती.' अशा अर्थाचा तो श्लोक आहे. ( गर्भे नु सन्)

ऐतरेय आरण्यक (२–५) ही पहिली ऋचा देऊन त्यावर म्हटले आहे. ' गर्भवासातील वामदेव ज्याप्रमाणे म्हणाले होते, त्याप्रमाणे आत्मज्ञानी शरीर-बंधनातून सुटून उर्ध्वगति करतात व कामना पूर्ण करतात.'

' अहं मनुरभवम् ' (२६) वामदेवांच्या आत्मनिष्ठेचे सुंदर दर्शन.

' मम द्विता राष्ट्र ' (४२) या सूक्ताचा द्रष्टा पौरुकुत्स्य त्रसदस्यु आहे. या सूक्ताच्या ८ व्या ऋचेत सायणाने प्राचीन श्लोक दिले आहेत. त्यावरून ' राजा पुरुकुत्साच्या राणीने सप्तर्षींचे पूजन करून त्रसदस्यु नावाचा पुत्र मिळवला ' असा अर्थ निघतो.

राजा ऋसदस्यु पण वामदेवाप्रमाणेच आत्मज्ञानी आहे. म्हणूनच त्यांच्या संवादांनी जोडलेल्या या कथा एकत्र केल्या आहेत.

## पंचम मंडळ : भौम अत्रि ऋषि सूक्त ८७, मंत्र ७२७

आदि प्रजापति व वाणी यांच्या पोटी भृगु, अंगिरा व अत्रि ऋषींचा जन्म झाला. (बृहद् देवता ५-१००) अत्रि कुलांत जन्मलेल्या सर्व ऋषींना अत्रि म्हणत. अत्रिचा पुत्र अर्चनानस्, त्याचा पुत्र श्यावाश्व, त्याचा गविष्ठर, त्याचा अविर्होत्र व त्याचा पुत्र पूर्वातिथी हे सर्वच ऋषि होते.

८७ सूक्तांत देव अग्नि (१-२८) इन्द्र (२९-४०) विश्वेदेव (४१-५१) मरुत (५२-६१ व ८७) मित्रावरुण (६२-७२) अश्विनीकुमार (७३-७८) उषा (७९-८०) सविता (८१-८२) पर्जन्य (८३) पृथ्वी (८४) वरुण (८५) इन्द्रग्नि (८६) असा क्रम असून त्रिष्टुप, जगती, अनुष्टुप, गायत्री, उष्णिह आणि पंक्ति असे छंद आहेत.

अत्रिभौम या मंडलाचे मुख्य ऋषि आहेत. त्याशिवाय इतर आत्रेयांचीही सूक्ते आहेत. बुध आणि गविष्ठर १ वृषजान २, वसुश्रुत ३, ६ ईश ७-८ गय ९-१०, ६३-६४, सुतंभर ११-१४ धरुण १५, पुरु १६-१७, द्वित मुक्तवाहस १८, वाव्रि १९, प्रयस्ववान २०, शश २१, विश्वसाम २२, द्युम्न २३, बंधु, सुबंधु, श्रुतबंधु, विप्रबंधु २४, वसूयु २५-२६, भौम अत्रि २७, ३७-४३, ७६-७७, ८३-८६, विश्ववारा २८, गौरिवीती २९, बभ्रु ३० अवस्यु ३१, गातु ३२, संवरण ३३-३४ प्रभुवसु ३५-३६ अवत्सार सदापूर्ण सुतंभर, ४४ सदापृण ४५ प्रतिक्षत्र ४६ प्रतिरथ ४७, प्रतिभानु ४८, प्रतिप्रभ ४९, स्वस्ति ५०-५१ श्यावाश्व ५२-६१, ८१-८२ श्रुतविद् ६२, अर्चनानस् ६३-६४, रातहव्य ६५-६६, यजत ६७-६८, उरुचक्री ६९-७०, बाहुवृक्त ७१-७२, पौर ७३-७४, अवस्यु ७५, सप्तवध्रि ७८, सत्यश्रवस् ७९-८० व एवया मरुत ८७ या प्रमाणे सूक्तांचे ऋषि आहेत.

### १ : परिसाचा स्पर्श

स्वर्भानूमुळे सूर्याला ग्रहण लागले होते. तो अंधःकार दूर करण्यासाठी अत्रींनी 'अबोधि' (५, १, १) पासून सुरुवात करून २७ सूक्तात अग्निची स्तुति केली आहे. (बृहद् देवता ५-१२) सुरुवातीची १-२८ सूक्ते अग्निची असून २९-४० या सूक्तात इन्द्राची स्तुति केली आहे. ४० व्या सूक्तात स्वर्भानु (राहू) ने सूर्य मंडलाला घेरा घातला असे सूर्य ग्रहणाचे वर्णन असून अत्रीने सूर्याला मुक्त केल्याचा निर्देश आहे.

सेनगुप्ता (जे. अे. अेल्. बी. अेल्. ७, पृ. ९२) मध्ये उल्लेख आहे त्यावरून हे सूर्य ग्रहण इ. स. च्या पूर्वी २६ जुलाई ३९२८ रोजी लागले असले पाहिजे. त्याचप्रमाणे हिमालयाच्या काराकोरम शिखरमालेच्या पायथ्याशी अत्रींचा निवास असावा.

शतपथ ब्राह्मण (५.३.२.२) मध्ये अत्रींनी सूर्याला स्वर्भानुच्या बंधनातून मुक्त केल्याचा निर्देश आहे.

चाळीसाव्या सूक्ताचा संबंध जोडून घेतल्यास सोमयाग एक वर्षभर चालला. त्याचा मधला दिवस भाद्रपदात येतो. विषुवानाच्या दुपारनंतर हे ग्रहण लागले हा उल्लेख व इंद्राची स्तुति हे सर्व संदर्भ बरोबर जमतात. त्याच प्रमाणे १–४० अग्नि व इन्द्राची स्तुति आहे त्याचीही संगती लागते. दुसऱ्या सूक्तात अग्निकुमाराला राणीने लपवून ठेवल्याचा निर्देश आहे.

## २ : मंत्रदर्शन : जीवनाची परमसिद्धी

दर्भपुत्र रथवीतिने भौम अत्रिच्या आज्ञेने महायाग केला. त्यात अत्रिपुत्र अर्चनानस् व पौत्र श्यावाश्व यांनी भाग घेतला होता. श्यावाश्वाच्या मनातील भाव जाणून पिता अर्चनानसाने राजकन्येला मागणी घातली. तेव्हा राणीने उत्तर दिले 'मी राजर्षिच्या कुळात जन्म घेतला आहे. राजर्षिची मी पत्नी आहे. माझा जावई राजर्षि नसला तरी मंत्रद्रष्टा ऋषि असायला हवा.' त्यानंतर श्यावाश्वाने तपश्चर्या केली. त्याला मरुतांचे दर्शन झाले. तो मंत्रद्रष्टा झाल्यावर राजाने त्याला आपली कन्या दिली. (बृहद्देवता ५, ५०, ८१) कन्यादान करताना राजा अर्चनानसाला म्हणतो, 'आपण ऋषि पुत्र आहा. आपण स्वतः ऋषि आहा. व ऋषि पिताही आहात. (बृहद् दे. ५, ७८) ५, ६१ या सूक्तात श्यावाश्य आत्रेयाने मरुतांचे दर्शन घेतले, तरंग राजाची राणी शशीयसी हिने धन अर्पण केले, रात्रीने त्याचे दूतीकर्म केले वगैरे घटनांचे वर्णन आहे.

## ३ : या बंधनातून कसे सुटावे ?

अत्रींनी अश्विनी कुमारांची स्तुति करून बंधमुक्त करण्याविषयी त्यांची प्रार्थना केली आहे. ही घटना ५, ७८ या सूक्तांत वर्णन केली आहे. सायणाचार्यांच्या माहिती प्रमाणे कुटुंबीयांनी अत्रीना पेटीत कोंडले होते. बृहद् देवतेमध्ये राजाने अत्रींना खोल खड्यात ढकलण्याचा उल्लेख आहे. सप्तवध्रि, सध्रि व अत्रि भौम ही एकाच ऋषींची नावे आहेत किंवा या भिन्न व्यक्ति असाव्यात या

विषयी विद्वानांचे एकमत नाही. या प्रकरणात सर्व कथा एकत्र गुंफून बंधनातून मुक्त होण्यासाठी ज्ञान आवश्यक आहे असा सारांश त्यातून काढलेला आहे

## षष्ठ मंडल : सूक्ते ७५. मंत्र ७६५. ऋषि भरद्वाज

आदि प्रजापति पासून आदित्य सूर्याची उत्पत्ति झाली व आदित्य देवही निर्माण झाले अग्निच्या अंगारातून अंगिरा व त्यांच्या पासून बृहस्पति झाले. (ऐतरेय ब्राह्मण १३, १०, १) त्या बृहस्पतींचे पुत्र ते भरद्वाज सहाव्या मंडलाचे ऋषि आहेत. त्यांना बार्हस्पत्य भरद्वाज म्हटलेले असून त्यांचा भाऊ शंयु बार्हस्पत्य ४४–४६ सूक्तांचा ऋषि आहे.

भरद्वाजाचा पुत्र गर्ग ४७, सुहोत्र ३१–३२, शुनहोत्र ३३–३४, नर ३५–३६ ऋजिश्वा ४९–५२ व पायु ७५ त्या सूक्तांचे ऋषि असून हे सर्व भारद्वाज आहेत.

या सर्व सूक्तात अग्नि १–१६, इंद्र १७–४७ अग्नि, मरुत वगैरे ४८, विश्वेदेव ४९–५२, पूषा ५३–५६, इंद्रपूषणा ५७, पूषा ५८, इंद्राग्नि ५९–६०, सरस्वति ६१, अश्विनीकुमार ६२–६३, उषा ६४–६५, मरुत ६६, मित्रावरुण ६७, इन्द्रावरुण ६८, इन्द्राविष्णु ६९, द्यावापृथ्वी ७०, सविता ७१, इंद्रसोम ७२, बृहस्पति ७३. सोमारुद्र ७४–७५ यांची स्तुति असून त्रिष्टुप, जगती, बृहती गायत्री छंद आहेत

## ४ : सूर्य व नक्षत्र माला

ऐतरेय ब्राह्मणातील आदित्य व बृहस्पतीची जी उत्पत्ति कथा आहे, त्यात सौर जगातील सूर्य व गुरू या ग्रहांचीही उत्पत्ति सूचित आहे. ऋग्वेदाच्या सहाव्या मंडलात भरद्वाज ऋषींनी सौर जगतातील सूर्य, सूर्याचा मार्ग, सत्तावीस नक्षत्रे व त्यांची आधिदैवते यांचे निरुपण केले आहे. त्याचप्रमाणे वर्ष संवत्सराची दोन अयने, दोन संपात, सहा ऋतु, बारा महिने, बारा राशी, बारा सूर्य, महिने, पक्ष, दिवस, रात्र यांचेही वर्णन केले आहे. ज्योतिष शास्त्र व खगोल विद्या यांच्या विषयीची प्रमाणे ऋग्वेदात आहेत. त्या दृष्टीने सहाव्या मंडलातील सूक्ते व मंत्र यांच्या आधारे सौर जगाची सामान्य कल्पना या प्रकरणात दिली आहे.

विश्वेदेवांच्या सुक्तात सत्तावीस नक्षत्रांच्या अधिष्ठात्या देवतांची नावे, वर्णने आहेत. निऋति व सर्प यांचा उल्लेख स्पष्ट नाही, इतर पंचवीस नावे जाहेत.

लगधकृत वेदांग ज्योतिषात सत्तावीस देवांची नावे असून तैत्तरीय संहितेत (४, ४, १०) नक्षत्रे व त्यांचे स्वामी यांची नावे खालील क्रमाने दिलेली आहेत.

(१) अग्नि-कृत्तिका. (२) प्रजापति-रोहिणी. (३) सोम-मृगशीर्ष. (४) रुद्र-आर्द्रा. (५) अदिति-पुनर्वसु (६) बृहस्पति-पुष्य (७) सर्प-अश्लेशा (८) पितृ-मघा (९) अर्यमा-पू. फाल्गुनी (१०) भगउत्तरा-फाल्गुनी (११) सविता-हस्त (१२) त्वष्टा-चित्रा (१३) वायु-स्वाति (१४) इंद्राग्नि-विशाखा (१५) मित्र-अनुराधा (१६) इंद्र-ज्येष्ठा (१७) निर्ऋति-मूळ (१८) आप-पूर्वाषाढा (१९) विश्वेदेव- उ. आषाढा (२०) विष्णु--श्रवण (२१) वसु--धनिष्ठा (२२) वरुण--शतभिषा (२३) अज एकपात्-पूर्वा भाद्रपदा (२४) अहि- उ. भाद्रपदा (२५) पूषा-रेवती (२६) अश्विनी कुमार-अश्विनी (२७) यम-भरणी

या प्रमाणे पूषा रेवती नक्षत्राचा स्वामी असून रेवती मीन राशीत येते मीन राशीचा स्वामि बृहस्पति- गुरू आहे. बृहस्पतीचा पुत्र भरद्-वाज ऋषि असा हा संबंध आहे. प्रजा, पशु, वनस्पति वगैरेचे पोषण करणारा देव पूषा. त्याची स्तुति भरद्वाजानी केली आहे वाज = अन्न, भरद् = भरणारा = भरद्वाज या अर्थाने जे जे नक्षत्र स्वामी पशु-अन्न वगैरे समृद्ध करतात ते सर्व भरद्वाज. त्यांचे दर्शन करणारे ते भरद्वाज ऋषि.

या मंडलाचे ऋषि सूक्तद्वारा अग्नि इंद्र वगैरे देवांची स्तुति करून प्रजा, पशु, अन्न, वाज वगैरे संपत्ती भरून ठेवणारे आहेत. अग्नि, इंद्र हे देव मुख्यत्वे भरद्वाज ' आहेत असा भाव त्यात व्यक्त होतो.

सूर्य सिद्धांत ज्योतिष ग्रंथाप्रमाणे हल्ली अश्विनी पासून नक्षत्रांची गणना करतात. परंतु प्राचीन काळी कृत्तिका नक्षत्रापासून गणना करीत. व अग्नि वगैरे स्वामींचा क्रमही त्याच्याशी सुसंगत आहे. त्याच प्रमाणे वर्ष, ऋतु वगैरेंच्या गणनेतही फरक पडतो. बारा राशीत सत्तावीस नक्षत्रे ज्या प्रमाणे विभागली जात त्याप्रमाणे पहाता सूर्य वसंत ऋतूत राशिचक्राच्या ज्या स्थानी येतो त्या ठिकाणी दिवस व रात्र सारखी असते. ती मेष राशीची सुरुवात व तिचा योगतारा रेवती नक्षत्र व स्वामी पूषा अशी गणना केलेली आहे. त्या गणनेप्रमाणे उत्तरायणात शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा व दक्षिणायनात शरद् हेमंत ऋतु येतात.

ऋषि हा शब्द ऋक्ष नक्षत्र या अर्थी शतपथ ब्राह्मणांत (२ रे कांड) योजलेला आहे. इतर नक्षत्र एक, दोन चार अशा ताऱ्यांची आहेत. पण कृत्तिकेचे तारे बरेच आहेत. त्या सर्व ऋषिपत्न्या-अशी कल्पना आहे. उत्तरेकडे उगवलेल्या सप्तर्षिना ऋक्ष म्हणत.

## ५ : दैवत जगाडो

या प्रकरणातील हरियुपिया नदी किनारी हडप्पा नगरी असावी व ते पंचजनांचे मूळ निवासस्थान असावे. शस्त्र, साधनांचा उपयोग त्यांना अभिमंत्रि,

करून त्यांची दैवी शक्ति जागृत करून केला असता विजय प्राप्ति होते हा या सूक्तांतील भाव आहे.

## सप्तम मंडल : ऋषि वसिष्ठ सूक्ते १४० मंत्र ८४१

मित्र व वरुण यांचा पुत्र वसिष्ठ. यांची जन्मकथा या मंडलाच्या ३३ व्या सूक्तांत वर्णन केली आहे. त्या कथेनुसार वसिष्ठांचा एक जन्म प्रजापति प्राण व दुसरा जन्म मित्र, वरुण यांच्या पुत्राचा आहे.

ऋषींना इन्द्राचे प्रत्यक्ष दर्शन घडत नव्हते. प्रत्यक्ष दर्शन घेणारे वसिष्ठ हेच पहिले ऋषि (तैत्तिरीय संहिता ३, ५, २)

विश्वामित्र आणि जमदग्नि, वसिष्ठ आणि भरद्वाज, गौतम आणि वामदेव व अत्रि हे सप्तर्षि आम्हाला सुखी करोत. (अथर्ववेद १८, ३, १६)

वसिष्ठाने आपली विद्या सुदासपिजवनाला शिकवली. त्याच्या योगाने त्या राजांनी दिग्विजय करून पृथ्वीचे राज्य मिळवले. ऐन्द्र नावाचा महाभिषेक वसिष्ठांनी पिजवनाचा पुत्र सुदास याला केला होता. (ऐतरेय ब्राह्मण ७, ३४, ८, २१)

या मंडलातील सूक्तांचे देव, अग्नि २-१८ इन्द्र १९-३३ विश्वेदेव ३४-४३ दधिक्रा ४४, सविता ४५, रुद्र ४६, आप ४७, ४९, ऋतु ४८ विश्वेदेव ५० आदित्य ५१-५२, द्यावापृथिवी ५३, वास्तोष्पति ५४-५५, मरुत ५६-५९ सूर्य व मित्रावरुण ६०-६६, अश्विनीकुमार ६७-७४, उषा ७५-८५, इन्द्रावरुण ८६-८९, वायु ९०-९२, इन्द्राग्नि ९३-९४, सरस्वती ९५-९६, इन्द्राबृहस्पति ९७-९८, विष्णु ९९-१००, पर्जन्य १०१-१०३, राक्षोघ्न सूक्त १ ४.

छंदात विशेषेकरून विराट, त्रिष्टुप, प्रगाथ, गायत्री व अनुष्टुप. सातव्या मंडलातील सर्व सूक्तांचे ऋषि वसिष्ठ मैत्रावरुणी आहेत. विकल्प मात्र शक्ति, वसिष्ठ पुत्र व कुमार आग्नेय यांचा आहे. ३३ व्या सूक्तातील १०-१३ ऋचांचे ऋषि वसिष्ठ पुत्र, ३२ व्या सूक्तातील २६ व्या ऋचेचे ऋषि शक्ति व १०१, १०२ या ऋचांचा आग्नेयकुमार ऋषि आहे.

## ६ : दिव्य जन्म व कर्म

या मंडलाचे ३३ वे सूक्त हे आख्यान सूक्त असून इतर सूक्तांहून वेगळे पडते. यात वसिष्ठ कुलातील ऋषींना ओळखण्याची लक्षणे दिलेली आहेत. वर्णाने गौर, उजव्या बाजूला जटा बांधणारे, बुद्धीशाली वगैरे. तुत्सु, भरत वगैरे पंचजनांनी दाशराज्ञ युद्धात विजय मिळविला ती ही कथा आहे.

## ७ : अपराधी कोण ?

या मंडलाच्या ५५ व्या सूक्तात वर्णन केल्याप्रमाणे वसिष्ठाने वरुणाचे दर्शन घेतले व प्रस्वापिनी उपनिषदाच्या योगाने वरुण लोकातील सर्वांना निद्रावश करून टाकले हा प्रसंग आहे. यात वसिष्ठांची भक्ति भावना व निर्भयता स्पष्ट होते.

## ८ : मलीन तत्वांचा नाश

या मंडलाचे शेवटचे सूक्त राक्षोघ्न सूक्त. वसिष्ठाच्या शक्तिसह शंभर पुत्रांना राक्षसानी मारून टाकले, तेव्हा संतापून त्यानी या सूक्ताचा जप केला.

वसिष्ठ पुत्र शक्तिने इंद्राची स्तुती करण्यासाठी उच्चारलेली ऋचा अर्धी राहिली. ती वसिष्ठांनी पुरी केली आहे.

इन्द्र क्रतुं न आभर पिता पुत्रेभ्यो यथा ।
शिक्षाणो अस्मिन् पुरुहूत यानि जीवा ज्योतिरशीमहि ।

(ऋग्वेद ७.३२.२६)

## आठवे मंडलः सूक्ते १०३, मंत्र १७१६ ऋषि : काण्व परिवार

या मंडलातील ४९ ते ५९ या अकरा सूक्तात ८० मंत्र आहेत. त्याना वालखिल्य सूत्रे म्हणतात. त्यांच्यावर सायणाचार्यांनी भाष्य केलेले नाही. म्हणून ती सूत्रे परिशिष्टात जमा केली जातात. परंतु प्रसिद्ध झालेल्या संहितेत ती क्रमवार घेतलेली आहेत.

दोन ते सात मंडलात गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज व वसिष्ठ हे सहा ऋषि त्या त्या मंडलाचे द्रष्टे आहेत. त्या प्रमाणे आठव्या मंडलाचे मंत्रद्रष्टे ऋषि काण्व प्रगाथ. परंतु त्यांच्याबरोबर दुसऱ्याही चार ऋषि परिवारांची सूक्ते या मंडलात आहेत. (१) काण्व ३२ (२) आंगिरस १७ (३) आत्रेय ४ (४) भार्गव ४. असा त्यांचा क्रम आहे.

काण्व परिवारातील प्रगाथ-घोर-काण्व ६, सोभरी ५, नाभाक ४, मेधातिथी ३, मेध्य ३, कुरुसुति ३, कुसीद ३, इरिंबीठि ३, वत्स २, मेध्यातिथि २, भर्ग प्रागाथ २, काण्वायन अश्वसूक्ति व गोसूक्ति २, पर्वत, नारद वगैरे १७ व काण्व परिवाराचे एक एक सूक्त या प्रमाणे सर्वांची मिळून ५७ सूक्ते आहेत.

आंगिरस परिवारातील प्रियमेध २, विरुप ३, कृष्ण ३, नृमेध-पुरुमेध मिळून २, तिरश्ची २, व बाकीची अंशिक पारिवारिक सूत्रे आहेत.

आत्रेयांपैकी श्यावाश्व ४, गोपवन २, अपाला १, अर्चनानस् (विकल्प रुप) नाभाक कण्वाबरोबर १ अशी सूक्ते आहेत.

भार्गव कुलातील जमदग्नि व कुत्सु प्रत्येकी १ नेम व प्रयोग यांची अंशिक प्रत्येकी १ सूक्त असून त्याशिवाय १८ मंत्रद्रष्टे ऋषी आहेत. त्यात विश्वमना-वैयश्व ४, मनु–वैवस्वतप ५ व सोळा ऋषींची प्रत्येकाचे एक अशी अंशिक सूक्ते आहेत.

या मंडलाची दैवते क्रमवार नाहीत.

इंद्र : १-१७, २१, २४, ३२-४०, ४५, ४९-५३, ५५, ५६, ६१-७०, ७६-१००.

अग्नि : १८, १९, २३, ३९, ४३, ४४, ६०, ७१, ७२, ७४, ७५, ८४, १०१ व १०३.

अश्विनीकुमार : २२, २६, ३५, ५७, ७३, ८५, ८६, ८७.

विश्वेदेव : २५-३०, ५४, ५८, ६९, ८३. आदित्य : १८, ४७, ६७, १०१.

वरुण : ४१, ४२. यज्ञ : ३१. वायु : ४६. सोम : ४८, ७९. मरुत : २० याप्रमाणे साधारण निर्देश आहे.

या मंडलात त्रिष्टुप, जगती, गायत्री छंद असून शिवाय प्रगाथ या छंदाची रचना विशेष प्रकारची आहे. तसेच पंक्ति, महापंक्ति वगैरे छंदात धृपद पण येते ऋषि, देव व छंद या सर्व दृष्टींनीं हे मंडल इतर मंडलाहून वेगळे आहे. त्यातील बालखिल्य सूक्तांचा समावेशही लक्षात घेण्यासारखा आहे.

बडोद्याच्या प्राच्य विद्या मंदिराचे अध्यक्ष श्री. विनयतोष भट्टाचार्य यांनी ऋग्वेदीय प्रकीर्ण सूक्तांच्या व्याख्येविषयी सूक्तार्थ मुक्तावलीच्या प्रस्तावनेत ऋग्वेदाच्या दहा मंडलांच्या रचनेविषयी व्यक्त केलेले मत विद्वानांनी विचार करण्यासारखे आहे.

'...ऋग्वेदाची दहा मंडले आहेत. त्यातील पहिली सात पूर्वार्धे व सात आठ, नऊ ही उत्तरार्धे आहेत असे म्हणता येईल. पहिल्या सात मंडलातील ऋषि देव, छंद योजनाबद्ध व व्यवस्थित आहेत. तो क्रम नंतरच्या मंडलात दिसून येत नाही. तसेच नंतरच्या मंडलात विषयही नवे आहेत.

सारांश रुपाने पाहिले असता शेवटच्या तीन मंडलात क्रमशः यजुर्वेद सामवेद व अथर्व वेदाचे विषय आहेत. पहिली सात मंडले साहित्याच्या दृष्टीने ऋग्वेदाला जास्त अनुरुप आहेत. या प्रमाणे नंतरच्या वेदांच्या विषयांचा समावेश शेवटच्या तीन मंडलात होतो हे तात्पर्य.

वरील मत अद्याप सर्वमान्य झालेले नाही, आठव्या मंडलाचे मुख्य ऋषी काण्व प्रगाथ हे आहेत. यजुर्वेदातील काण्व संहिता प्रसिद्ध आहे. परंतु प्रस्तुत मंडलाचे काण्व हे ते ऋषी नसून त्या संहितेचा विषयही वेगळा आहे. मंत्र पण वेगळे आहेत. आठवे मंडल व ही संहिता या दोन्ही मध्ये सुसंगति दाखवणारा एक मंत्र यजुर्वेदात आहे.

' ऋचं वाचं प्रपद्ये, मनो यजुः प्रपद्ये, साम प्राणापानौ' (३६, १)

ऋग्वेदांतील ऋचांना साहित्याच्या दृष्टीनेही प्रतिष्ठा आहे. यजुर्वेदात मनोव्यापारांच्या संदर्भात मानसशास्त्रीय भूमिका मांडलेली आहे. सामवेद प्राणांना आधारभूत, अशा संगीत-सामाचे निरुपण करतो.

आठव्या मंडलातील ऋषी व ऋचा यांच्याविषयी अभ्यास करताना मानवी मनोव्यापाराविषयी बरेच संकेत व मानसशास्त्राच्या अभ्यासाविषयींच्या पद्धति सूचना याविषयी पुष्कळ माहिती मिळते. कित्येक ऋषींची नांवे देखील त्या दृष्टीने सूचक आहेत. उदा. विश्वमना, मनु, वश, संमाद, मत्स्य, त्रिशोक ही नांवे मनोविश्लेषणात्मक आहेत तसेच मन, मति, सुमना, धीति, सुमति वगैरे शब्दातून वेगवेगळ्या मानसिक अवस्थांचाही निर्देश होतो. त्याचप्रमाणे ९ व्या मंडलात पवमान सोमाच्या पावमानी ऋचांत सामवेदाच्या गीति स्तुतिच्या पद्धतीचे दर्शन होते.

## १ ते ७ मानसरोवरातील हंस

वर निर्देश केला आहे त्याप्रमाणे आठव्या मंडलातील मानसशास्त्राकडे पहाता मनोभूमिकांच्या वर बराच प्रकाश पडतो. या मंडलाचे ऋषि कण्व कवि आहेत. ते मनीषी व क्रांत द्रष्टे आहेत. त्यांचे मन सरोवरासारखे स्वच्छ, स्फटिका सारखे नितळ आहे. वाऱ्याच्या हलक्याश्या लहरीने जलाशयावर तरंग उठतात, लहान सहान कचरा पडला तरी तो लगेच दिसून येतो, त्या सरोवरात विहार करणारे हंस पण शुद्ध चाराच खाणारे असतात. तशा ऋषींच्या या कथा आहेत.

मानस शास्त्रीय भूमिका मांडताना आठव्या मंडलाला मानसरोवराची उपमा दिली तर त्यातील मंत्रद्रष्टे ऋषि हे त्या सरोवरातील हंस आहेत. त्यांच्या विविध सूक्तात रुजु केलेली फलश्रुति व निरुपण पद्धति त्यांच्या स्वतःच्या शुद्ध सात्विक, निर्मल मनावर विकारांच्या आक्रमणा आधीच होणारे त्यांचे शमन-या सर्वांचे सुंदर प्रतिबिंब या कथात आढळते.

या मंडलात दिसून येणारी मानसशास्त्राची मांडणी म्हणजे आदर्श जीवन सिद्धांताना वेदसंगत करण्याचा मौलिक प्रयत्न आहे

योग, सांख्य, वेदान्त, नीति, सदाचार वगैरे तात्विक भूमिकेवर आपले जीवन सिद्धांत मांडलेले आहेत. त्यांच्या मुळाशी वेदांची आदर्श भावना आहे. ती भावना या मंडलात रूपक कथांच्या द्वारे व्यक्त झालेली आहे.

या सात कथांमध्ये क्रोध, काम, लोभ, मोह, मद, मत्सर व संग या सात मनोविकारांच्या दोषांचे शमन करण्याचे उपाय, बोधपर सूचन असून बृहद् देवता. अनुक्रमणी वगैरे ग्रंथांची प्रमाणेही जरुर वाटली तेथे घेतलेली आहेत.

## ८ : मनोरथाचे मार्ग

न तत्र रथा:. न रथयोगा:. न पन्थानो भवन्ति ।

अथ रथान् रथयोगान् पथश्च सृजते ॥ (बृहदारण्यक उपनिषद्)

या प्रमाणाच्या आधारे मनाने रचलेल्या मनोरथांची गति आलेखण्याचा प्रयत्न या कथानकात केलेला आहे.

यजुर्वेद (३४, ३) शिवसंकल्प सूक्तात मनाच्या चार भूमिका सांगितल्या आहेत. १) प्रज्ञान-बाह्यमन, २) चेतस्-आंतर मन, ३) धृति-सुप्त मन. ४) अमृत ज्योति दिव्य-उत्तम मन. या कथनाशी तुलना केली तर आठव्या मंडलातील ऋषींनी वेगवेगळ्या मनोभूमिकेवरून आपली आदर्श भावना दिव्य दृष्टीने व्यक्त केली आहे.

## नववे मंडल : सूक्ते ११४, मंत्र ११०८, ऋषि ८७

या मंडलात सात ऋषींच्या परिवारांचा निर्देश आहे. त्यात अंगिरस १७, काण्व ६, काश्यप ९, वैश्वामित्र ६. भार्गव २, भारद्वाज ३ व वसिष्ठ परिवारातील ११ ऋषि आहेत. त्याशिवाय वेगवेगळे ३३ ऋषि आहेत.

ऋषि व सूक्ते यांचा परस्पर संबंध पुढीलप्रमाणे आहे : हिरण्यस्तूप आंगिरस नृमेध, प्रभूवसु, रहूगण, बृहन्मति व पवित्र या प्रत्येकाची दोन, अयास्य व ऊचश्य यांच्या तीन तीन व इतर आंगिरसाची ३३ सूक्ते आहेत.

काण्व परिवारातील मेध्यातिथी ३, पर्वत, नारद व शेष प्रत्येकी १, काश्यप परिवारातील असित काश्यप २० (देवल काश्यपासह विकल्पाने) अवत्सार काश्यप ८, कश्यप मारीच ५, काश्यप रेभसूनु २, दोन काश्यपी अप्सरा १. निध्रुवि काश्यप १ याप्रमाणे एकंदर ३७ सूक्ते आहेत. वैश्वामित्र परिवाराच्या चार सूक्तात वैश्वामित्र गाथिन व प्रजापतीचा समावेश आहे.

कवि भार्गव ८, जमदग्नि भार्गव २ (आंशिक) एक वैकल्पिक व एक स्वतंत्र सूक्त. भरद्वाज बार्हस्पत्य वगैरे नऊ ऋषींचा योग ६७ व्या सूक्तात आढळतो.

९७ सूक्तात दहा वसिष्ठ, १ पराशर शाल्य, व एक कुत्स आंगिरस, व बाकीच्या ३३ ऋषींची २८ सूक्ते आहेत.

नवव्या मंडळाचा एक मात्र देव सोम आहे. त्या दृष्टीने दैवत संहितेचा हा आदर्श नमुना आहे. छंदांची रचनाही व्यवस्थित आहे. गायत्री १–६७ जगती ६८-८६, त्रिष्टुप ८७–९७ अनुष्टुप ९८–१०१ उष्णिग १०२–१०६ प्रगाथ १०७– ०८ व मिश्र छंद १०९-११४ ही सूक्ते सामगानास योग्य आहेत. स, एव, एष अशा एक सारख्या पदांनी त्यांचा आरंभ केलेला आहे.

## ९ सोमरसाचे पान.

ऋग्वेद संहितेतील सूक्तांची संख्या पहाता इन्द्र व अग्नि नंतर सोमाचे स्थान आहे. त्या खेरीज सोमासाठी एक स्वतंत्र मंडलही आहे. सामवेदात अग्नि, इन्द्र व सोम यांची तीन कांडे पूर्वार्चिक संहितेत दिलेली आहेत. यजुर्वेदात अग्निहोत्र, इष्टि व सोम या तीन प्रकृति यज्ञाचे अग्नि, इंद्र व सोम हे मुख्य देव असल्याचा निर्देश आहे. अथर्ववेदातही हाच क्रम ठेवलेला आहे.

वेदसाहित्याच्या अभ्यासकांच्या दृष्टीने हा निर्देश महत्वाचा आहे. यज्ञयाग हा केन्द्र स्थानी असून सोमाचे सवन, इन्द्राचे हवन, व अग्नीचे यजन ही प्राचीन पध्दति होती ती लुप्त झाल्यानंतर त्या विधीतील रहस्ये व त्या मागच्या भावनाही नाहीशा होत गेल्या. प्रत्येक यज्ञ हा विराट सर्जनाचे प्रतीक असून जे पिंडी ते ब्रह्मांडी या रितीने मंत्राचा अर्थ लावतांना भौतिक, दैविक व आत्मिक संबंध जोडण्याची प्रथा पण एकसारखी राहिलेली दिसत नाही.

या ठिकाणी नवव्या मंडलातील सूक्तांच्या आधारे सोमाची कथा दिली आहे सोम म्हणजे काय, सोमवेल कोठे असते, सोम व चंद्र यांचा संबंध, सोम व शरीराचा संबंध या विषयी आजवर विद्वानांनी जे सशोधन व चर्चा केली आहे त्यातील कांही मुद्दे सारांशरूपाने पुढील प्रमाणे आहेत.

अमरकोश (१–३) : चंद्र, चंद्रमा, कलानिधी, सुधांशु, द्विजराज मृगांक वगैरे वीस नांवात सोम हे नांव पण आहे. अर्थात सोम व चंद्र पर्यायवाची आहेत. ऋग्वेदांतील ऋचांत व ब्राह्मण ग्रंथांत पण ही सर्व नांवे आहेत.

निरुक्त (११, २, २) औषधि : सोम : सुनोतेः । यदेनम् अभिषुण्वन्ति । अशी व्युत्पत्ति. आहे. सोम औषधि आहे, यज्ञासाठी अभिषवण, सु सवन करून ऋत्विज तिचा रस काढतात.

' फार पूर्वी सोम स्वर्गात होता. त्यानंतर त्याला पृथ्वीवर आणले असा उल्लेख वारंवार केलेला आहे. सोम ही औषधी उंच पर्वत शिखरावर हिरव्यागार फलद्रूप जागी मिळते. कदाचित म्हणूनही तिला स्वर्गीय वनस्पती म्हटले असावे. परंतू तिलाच चंद्र–सोमही म्हटलेले आहे. व चौथ्या स्वधामात नक्षत्रांचा अधिपति

म्हणून वर्णन केलेले आहे. तसेच योग प्रक्रियेच्या संदर्भात मानवाच्या मस्तकात शिरोभागी वसणारे शांत तत्व असाही अर्थ त्यांतून निघतो.

सोम हे स्वर्गीय दिव्य अमृत आहे. व देव ते प्राशन करतात (९,१०६,८) सोमरस हा सुरेसारखा मादक नसून वीर्यवर्धक, बलदायी, तीव्र आणि स्वादिष्ट असे पेय आहे. दिवः पीयूषम् उत सोमम् इन्द्राय पातवे (९,५१,२) स्वादुः किलायं मधुमान् उतायं तीव्रः किलायम् रसवान् उतायम्। (६,४७,१)

सोमरस काढण्याच्या प्रक्रियेस अभिषवण व विधिपूर्वक काढलेल्या सोमरसास ' सूत ' अथवा ' अभिषूत ' म्हटलेले आहे. तो गाळण्याच्या गाळण्यास दशापवित्र असे नाव असून त्यातून गाळला जाणारा सोम पवमान सोम व त्या. सोमाची स्तुति गाणाऱ्या त्या पावमानी ऋचा.

ही प्रक्रीया बरोबर समजून घेतल्यास पवमान सोमाच्या सर्व सूक्तांचा अर्थ सहज समजण्यासारखा आहे. परंतु त्याची वारंवार झालेली पुनरुक्ति वेदसाहित्याच्या अभ्यासकांना व संशोधकांना पिष्टपेषणासारखी वाटते.

खरे पहाता या ऋचा म्हणजे कवि व मनीषी ऋषींच्या अंतरीच्या भावना. व उर्मीचे निरुपण आहे. निसर्गात अगणित वस्तू आहेत व जीवनात रोज अनेक घटना घडत असतात त्यातून सामान्य लोक बोध कसा घेऊ शकतील ? परंतु भावनाशील कविहृदय साध्या घटनांतून किंवा सामान्य वस्तूंतून ईश्वरी संकेताचा अनुभव करण्यास समर्थ असते. लहान लहान प्रतिकांतून कवींना विराट शक्तीचा साक्षात्कार होत असतो त्या अनुभवांचे वर्णन करतांना कित्येकदा शब्दांची भांडारे उणी पडतात तथापि त्यांची रचना, शैली, छंद, शब्दावली सामान्य अर्थापुरती मर्यादित रहात नाही त्यांतून वेगवेगळे अर्थ निघतात.

सोमाविषयीच्या ऋचा म्हणजे आर्ष दर्शनाचा उत्तम नमुना आहे आयुर्वेदात सोमाविषयीचे उल्लेख पाहिले असता सोम ही उत्तम, बलवर्धक उत्साह प्रेरक अशी अमृततुल्य वनस्पती आहे. सुश्रुत संहितेत सोम चोवीस प्रकारचे असल्याचा उल्लेख आहे परंतु मूळ सोम एकच आहे. ( एकः खलु भगवान् सोमः स्थाननामाकृति वीर्यविशेषैः चतुर्विंशतिधा भिद्यते (सुश्रुतः अध्याय २९)

सोमवेलीला पंधरा पाने असतात शुध्द पक्षात रोज एक पान फुटते. व कृष्णपक्षात एक एक पान रोज गळते. दर अमावास्येला तिच्यावर एकही पान उरत नाही (सुश्रुत अ. २९)

## १० आजिविकेचे प्रेरक बळ

नवव्या मंडळातील शेवटची तीन सूक्ते (११२, १३, १४) यांच्या आधारे बृहद् देवता (६,१३७) मध्ये एक कथा दिलेली आहे त्यांत इंद्र ऋषींना 'तुम्ही दुष्काळात कोणत्या उपायाने जगलात ?' असा प्रश्न विचारतो. ऋषि उत्तर देतात.

'कला कौशल्याची अनेक साधने उपजीविकेसाठी उपयुक्त आहेत. शकट गाडी, शाकिनी भाजीपाल्याची वाडी, गोधन पशुपालन, शेती, वाहून न जाणारे जलाशय, वन, समुद्र, पर्वत व राजा ही सर्व साधने उपयुक्त आहेत. त्यांच्या आधारे आम्ही जीवन निर्वाह चालवला.

शकटं शाकिनी गावः कृषिः अस्पदनं वनम् ।
समुद्रः पर्वतो राजा एवं जीवामहे वयम् ॥

या सूक्तात 'इन्द्राय इंदो परिस्रव' हे पालुपद प्रत्येक ऋचेच्या शेवटी येते, पं. सातवळेकरजी दैवत संहितेत सोमाविषयी लिहितात,

'या मध्ये वर्णन केलेला सोम, इंदु, हा कलानिधी आहे. कलाकार आहे Arts & Crafts अवगत असलेला (Artist) सहज उपजिविका करू शकतो.

हे कारागिर केवळ पोटभरू नाहीत. परंतु समाजात कारागिराचे स्थान फार वरचे आहे. मंत्रद्रष्टे ऋषि व कवि आनंदाने ती कामे स्वीकारतात.

श्रद्धा, भक्ति, सरळ जीवन, साधेपणा या गुणांनी कलाकारांचे जीवन उन्नत होते हे रहस्य पण या सूक्तांत दडलेला उपदेशच आहे हे लक्षात ठेवण्यासारखे आहे

## दशम मंडल. सूक्त १९१ मंत्र : १७५४ ऋषि ३७४.

दहाव्या मंडळाची १ ते १२९ सूक्ते महासूक्ते असून बाकीची ६२ क्षुद्र सूक्ते आहेत. या मंडलाची रचना पहिल्या मंडलासारखीच दिसून येते. दोन ते आठ या मंडलात क्रमानुसार गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज, वासिष्ठ, प्रगाथ काण्व वगैरे एकेका ऋषिची सूक्ते आहेत. नवव्या मंडलात ऋषि अनेक आहेत. पण देव मात्र एकच पवमान सोम आहे.

दहाव्या मंडलाच्या महासूक्तांचा व क्षुद्र सूक्तांचा मुख्य छंद त्रिष्टुप आहे. काही सूक्तात त्रिष्टुपाबरोबरच जगती छंदही जोडलेला आहे. बाकीच्या सूक्तात गायत्री, अनुष्टुप, पंक्ति, विराट बृहती वगैरे छंद आहेत,

वेगवेगळ्या कुलगोत्र परिवारातील ऋषि या मंडलात 'आढळतात. जो ऋचा रचेल तो ऋषि. ऋचेत ज्याचे वर्णन केले असेल तो देव' अशी सामान्य व्याख्या आहे. त्या व्याख्येनुसार यातील बरीच सूक्ते संवाद रूपाने रचलेली आहेत.

दुसऱ्या मडलात सर्वसाधारणपणे ज्या ऋषींची नावे आढळतात त्यांचीच नावे या मंडळातही आढळतात. त्याशिवाय देवांची नावे पण ऋषीच्यातच येतात. यम-यमी, इन्द्र इन्द्राणी, सूर्य सूर्या, बृहस्पति, अग्नि, परमेष्ठी प्रजापति, अग्निल या देवता दहाव्या मंडलात ऋचा गाणारे ऋषि झालेल्या दिसून येतात.

कित्येक भाववाचक नामे, जड पदार्थांची नावे पण या ऋषीच्या यादीत 'समाविष्ट झालेली दिसतात. त्यामुळे अग्नि, इन्द्र, वरुण, बृहस्पति, विश्वकर्मा

विश्वेदेव, मरुत, अश्विनीकुमार वगैरे देवांची स्तुति या मंडळात आहे. त्या शिवाय मन्यु, श्रद्धा, जीव, आत्मा, मन ही नामे, तसेच नद्यांची नांवे, ग्रावा, पाषाण, अक्ष फासे, मंडूक-बेडूक सर्प, वेगवेगळ्या औषधी, द्रुधण-खिळा ही नावे देवांच्या यादीत आहेत.

या मंडळातील ऋषिपरिवाराचे निरुपण याप्रमाणे करता येईल.

| परिवार | ऋषि | सूक्त | परिवार | ऋषि | सूक्त |
|---|---|---|---|---|---|
| अंगिरस | १४ | १७ | यामायन | ७ | ७ |
| वैरूप | ४ | ४ | ऐन्द्र | ११ | २० |
| आग्नेय | ३ | ३ | काश्यप | २ | ३ |
| गौपायन | ३ | ४ | कौत्स | २ | १ |
| प्रजापति | ९ | १५ | काक्षीवत | ४ | ५ |
| सौर्य | ४ | ४ | यम-यमी | २ | ३ |
| भारद्वाज | ४ | ४ | मानव | २ | ३ |
| भार्गव | ५ | ६ | सर्प | ४ | ४ |
| वैश्वामित्र | ४ | ४ | वातरशन | ७ | १ |
| भौवन | २ | ३ | शार्ंग | ४ | १ |
| आथर्वण | २ | २ | वामदेव्य | २ | ३ |
| वातायन | २ | २ | ब्राह्म | २ | २ |

या परिवारातील या ऋषींच्या सूक्ताशिवाय ६५ ऋषि स्वतंत्र असून त्यांनी ७८ सूक्ते रचलेली आहेत. यमी, सूर्या, सावित्री वागांभृणी, श्रद्धा उर्वशी, पौलोमी, घोषा, मुद्गलानी वगैरे स्त्रीयांनी रचलेली प्रेरणादायक सूक्तेही या मंडलात आहेत.

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलातील बरीच सूक्ते व अथर्ववेदातील सूक्ते यांच्यात खूप साम्य आढळते. ते पहाता आठव्या मंडलात यजुर्वेदातील सूक्तांशी साम्य असलेली सूक्ते व नवव्या मंडळातील सामवेदातल्यासारखी सूक्ते हे साम्य ध्यानात येते. या मंडलातील सर्वच सूक्तांचे सार लेख प्रस्तुत पुस्तकात देणे शक्य झाले नाही. 'हा लोक आणि परलोक' तसेच 'नारी तू नारायणी' हे सारलेख विषयानुरुप देण्याचा प्रयत्न केला आहे.

दहाव्या मंडलात येणारी प्रसिद्ध सूक्ते, सूर्य (३७) ज्ञान (७१) पुरुष (९०) हिरण्यगर्भ (१२१) भाववृत्त (१२९) सविता (१४९) ही सर्व सूक्ते दार्शनिक दृष्टीने महत्वाची आहेत. त्यांचे आलेखन या ठीकाणी होऊ शकलेले नाही. सुरुवातीच्या सूक्तांच्या विषय सूचीत परलोक आणि पितर यांच्या विषयी काही स्पष्ट उल्लेख व सूचने मिळतात.

मरणानंतरच्या दशे विषयी कोठलेच स्पष्ट मंतव्य देणे शक्य नाही. स्थूल देहाचे काय करावे ? प्रेतावर कोठले संस्कार करावे ? प्रेत ही संज्ञा कोठवर मानावी ? 'पितर' ही संज्ञा केव्हा मिळते ? सूक्ष्म मन वगैरे, आणि जीवात्म्याच्या गतीचे काय ? यमलोक, पितृलोक म्हणजे काय ? हे सारे प्रश्न मनात उद्भवतात. ऋग्वेद व अथर्ववेदात कित्येक मंतव्ये स्पष्ट आणि निश्चित आहेत. त्या शिवाय या लोकात राहून दीर्घायुष्य कंठून, कर्तव्यकर्म पार पाडून माणसाने सफळ सिध्दि प्राप्त करावयास हवी या विषयी पण स्पष्ट मत व्यक्त केलेले आहे.

ऋग्वेद संहितेत स्त्री ऋषींची बरीच सूक्ते आहेत. विशेषत: दहाव्या मंडलातील स्त्रीयांनी जीवनाचा जो आलेख घेतलेला आहे तो एक आगळाच आकृतिबंध उमटवून जातो. म्हणून 'नारी तू नारायणी' या प्रकरणात त्या ऋचा संकलित करणे योग्य वाटले.

## ३२ : हा लोक आणि परलोक

### १) पापाची टोचणी :

त्रिशिरा विश्वरूप, अन्न सोम आणि सुरापान करीत असल्याचे वर्णन अलंकारिक आहे. येथे देव-दानव व मानव यांचा समन्वय साधलेला आहे. विश्वरूपाचा पिता सुर आहे. ऋषि आहे. माता असुरकन्या आहे. असुरांची भगिनी आहे. विश्वरुप स्वत: मानव आहे. म्हणून त्याच्यात गुणही आहेत आणि अवगुणही आहेत. तो ऋषि आहे. पण पापाला तो वश होतो. तेथे त्याची शक्ति कमी पडते.

त्रित, किंवा त्रित आप्त्य म्हणा ही एकच व्यक्ति आहे. सायण भाष्या (१, १०५, १८) मधे एकत, द्वित आणि त्रित अशा तीन बंधूंचा निर्देश आहे. पारशी लोकांच्या अवेस्तामधे 'थित' याचे वर्णन एक मनुष्य म्हणून केलेले आहे. त्यात 'आथ्व्य' शब्द आप्त्यचाच पर्याय आहे. त्याने मानवासाठी आहोम-सोम रस बनवला त्रित हा यूनानी शब्द 'त्रितोस' या शब्दाचा पर्याय आहे.

### २) भाऊ बहीण :

खूप प्राचीन काळी आर्यांची वस्ती यमुना नदीच्या किनाऱ्यापासून मिसर देशातील नील नदी पर्यंत व कश्यप सागरा (कॅस्पियन समुद्र) पर्यंत पसरलेली होती. मिसर देशातील लोक आजही 'आर्य' समजले जातात. परंतु देशोदेशीचे रीतरिवाज, आहार व्यवहार बदलत जातात. त्याचबरोबर मान्यता व मूल्ये यांच्यातही फरक पडतो. मिसर देशाचा राजा फरोफ याने स्वत:च्या बहिणीशी विवाह केला होता. त्यानंतरही राजकुलात ती परंपरा चालत होती. इतर प्रजेत अजूनही चुलत भावंडांची लग्ने लावण्याची पध्दत आहे.

ऋग्वेदाच्या या सूक्तात भाऊ व बहीण यांचा लग्नाचा स्पष्ट निषेध आहे. यम हा ऋषि असून मंत्रद्रष्टा आहे. तर यमी ही देखील मंत्रदर्शन करणारी,

यमाला साह्यभूत होणारी ऋषि आहे. या संवादाखेरीज पुराणातून यमुना व यम यांच्या प्रेमाच्या कथा आलेल्या आहेत.

### ३) आदि माता पिता :

सूर्य विवस्वानापासून सरण्यूच्या ठिकाणी यम व यमी ही जोडी व अश्विनी कुमारांचा जन्म झाला. व छायेला त्याच्यापासून मनु हा पुत्र झाला. पुराणातील वर्णनाप्रमाणे विवस्वान सूर्याला संज्ञा व छाया अशा दोन बायका होत्या. संज्ञेला ववस्वत श्राध्ददेव मनु, यम आणि यमी अशी मुले झाली व छायेने सावर्णि मनु व शनि अशा दोन मुलांना जन्म दिला.

### ४) यमराजाच्या भेटीस :

दहाव्या मंडलाच्या १३५ व्या सूक्ताचा ऋषि कुमार यामायन आहे. सायण भाष्यात या ऋषिला कुमार नचिकेता म्हटले आहे. त्याची कथा – तैतरीय ब्राह्मण (३, ११.८) व कठोपनिषदात विस्ताराने दिलेली आहे. या मंडलात यम व कुमार यांचा सुंदर मधुर संवाद आहे.

### ५) श्रध्दांजलि :

५६ व्या सूक्तात ऋषि बृहदुकथ वामदेव्याने आपल्या मृतपुत्राच्या आत्म्याला चिरशांति मिळावी व स्थूल देह मूळ तत्वात मिसळून जावा या प्रकारची भावना या सूक्तात प्रगट केली आहे. मृतात्म्याला दिलेल्या श्रध्दांजलिचा हा एक उत्तम नमुना आहे.

### ६) मृत्यूला आव्हान :

५७ ते ६० या सूक्ताचे ऋषि चार बंधु, सुबंधु, श्रुतबंधु व विप्रबंधु हे गोपायन ऋषि म्हणून ओळखले जातात. त्यांची माता गोपा ही अगस्त्य ऋषीची बहीण हे गोपायन राजा असामतिचे पुरोहित होते. त्यांच्या जागी राजाने किरात व आकृति नावाच्या राक्षसांना आपले पुरोहित नेमले. त्या राक्षसांनी मायेने सुबंधूचे प्राण हरण केले. परंतु त्याच्या तिघा भावांनी अग्नीची प्रार्थना करून त्याला परत सजीवन केले. ही कथा जैमिनीय ब्राह्मण, पंचविश ब्राह्मण, सर्वानुक्रमणि व सायन भाष्यातही आलेली आहे.

## ३३ नारी तू नारायणी.

### १) प्रेमळ पुत्रवधू :

२७–२८–२९ या तीन सूक्तांचे ऋषि इन्द्र पुत्र वसुक्र आहेत. २८ व्या सूक्तात वसुक्र–इन्द्र संवाद आहे पहिल्या मंत्रात वसुक्र पत्नीला यज्ञात झालेल्या देवांच्या दर्शनात इंद्र न दिसल्याने तिने विचारले आहे. 'ममेदह श्वशुरो नाजगाम' अरे अजून मामंजी नाही आले ?'

## २) जुगाऱ्याची पत्नी :

३० ते ३४ या पाच सूक्तांचे ऋषि कवष, माता इलूषाचे पुत्र आहेत. जुगारी माणसाच्या बायकाची अवदशा पाहून त्यांचे मन कळवळले व त्यानी जुगाऱ्याला शेती करण्यासाठी परोपरीने सांगितले आहे.

'अक्षैर्मा दीव्यः कृषिमित् कृषस्व (ऋग् १०–३४, १३) बाबारे जुगार नको खेळू शेती कर.

## ३) कायाकल्प :

३९–४० या दोन सूक्तांची ऋषि घोषा हो कक्षीवान ऋषिची पुत्री आहे, सायण भाष्यात (१, ११७,७) तिला ब्रह्मवादिनी म्हटलेले आहे. तिच्या अंगावर कोड होते म्हणून तिचे लग्न झाले नव्हते. वृध्दापकाळी अश्विनी कुमारांच्या कृपेने तिच्या कायेला नव यौवन प्राप्त झाले 'अमाजुरश्चिद् भवथो युवं भगः (१,०३९, ३) दुर्भागी वृध्द घोषेला नवयौवन दिले.

## ४) वीर पुत्राची कामना

४८ ते ५० या तीन सूक्तांचा ऋषि विकुंठेचा पुत्र आहे. येथे सायणाने केलेली व्याख्या 'यस्य वाक्यं स ऋषिः । जो बोलतो तो ऋषि व 'या तेनोच्यते सा देवता' ज्याच्या विषयी बोलले जाते तो देव–या सूक्तांच्या बाबतीत स्मरते. या सूक्तांचा देव इंद्र आहे. आणि ऋषिही इंद्र आहे. माता विकुंठेची कामना पूर्ण करण्यासाठी इन्द्र स्वतःच तिचा वीर पुत्र झालेला आहे.

## ५) लग्नाच्या मांडवात

८५ व्या सूक्ताची ऋषि आहे सूर्या. सायणभाष्यात सांगितल्याप्रमाणे पहिल्या पाच ऋचांचा देव आहे सोम. त्यानंतरच्या अकरा ऋचात सूर्या स्वतःच्या विवाहाचे वर्णन करते. शेवटच्या नऊ मंत्रात वधुवरांना शुभ आशीर्वाद दिलेले आहेत. वैदिक लग्नविधीत या सूक्तातील मंत्रांना फार महत्व आहे.

## ६ संकटकाळी साहच

१०२ या सूक्ताचा ऋषि आहे मुद्गल भार्ग्यश्व. निरुक्तात (९–२३) सांगितल्या प्रमाणे मूद्गल भार्म्यश्व ऋषींनी गाडचाला बैल आणि द्रुधणखिळा जोडून युध्द करून त्यात विजय मिळवला. (१०–१०२–६) मुद्गलाची पत्नी त्यावेळी त्याचे सारथ्य करीत होती. तिला इन्द्राने साहच केले. तिची स्तुति अकराव्या ऋचेत आहे.

## ७ स्त्रीची प्रेरणा ८ गुप्तचर वेशात स्त्री.

८५ व्या सूक्तात उर्वशी पुरुरवा संवाद आहे. व १०८ व्या सूक्तात सरमा-

पणि संवाद आहे. हे दोन्ही संवाद फार प्रसिध्द आहेत. महानाट्याची भूमिका त्यातून मिळण्यासारखी आहे. स्त्री पुरुषाची प्रेरणामूर्ति होऊन त्याला विजयी करते ती गुप्त हेराचे काम करून राष्ट्राची सेवा करते. या प्रकारे स्त्री जीवनाची आगळी भव्यता या सूक्तात व्यक्त केली आहे.

## ९ मन व वाणी यांचा मेळ

१०९ व्या सूक्ताची ऋषि जुहू ही ब्रह्मजाया ब्रह्म, बृहस्पतीची पत्नी. तिलाच वाणी सावित्री म्हटलेले आहे. यज्ञात जुहू हे पात्राचे नाव आहे सायण भाष्यात म्हटल्याप्रमाणे ब्रह्मा यज्ञ करीत असता जुहूकडून काही प्रमाद घडला. म्हणून ब्रह्म्याने तिला टाकली. देवांनी केलेल्या स्तुतिने तो शांत झाला व त्याने तिचा परत स्वीकार केला. याप्रमाणे या दृष्टांतातून मन व वाणी यांचा सुमेळ दाखवला आहे.

## १०. राष्ट्राची प्रभावक शक्ति :

१२५ व्या सूक्ताची वाग् ही अंभृण ऋषींची कन्या आहे. आठ ऋचांचे हे सूक्त देवी सूक्त म्हणून प्रसिध्द आहे. (परिशिष्ट २)

राष्ट्रीय भावना जागृत करण्याची प्रेरणा या सूक्तात आहे. राष्ट्राचे मुख्य प्रेरक बळ वाणी आहे. वाणीच्या प्रभावाने राष्ट्रशक्ति जागृत होते. राष्ट्र संघटित होते. राष्ट्राची मूर्ती घडवली जाते.

## ११. जीवनाची आधारशिला :

१५१ व्या सूक्ताची ऋषि श्रद्धा कामायनी आहे. पाच ऋचांचे हे सूक्त सरळ, सोपे कंठस्थ करण्याजोगे आहे. (परिशिष्ठ २) 'श्रध्दया विन्दते वसु' श्रद्धेनेच सर्व काही मिळते.

## १२. वेद मातेची शिकवण :

सूक्त १९१ – संहितेचे हे अंतिम सूक्त आहे. ऋषि संवनन अंगिरसांनी ते रचलेले आहे. (परिशिष्ठ २) संहितेला वेदमाता म्हणून संबोधन करून संवनन ऋषींच्याद्वारे विश्वातील मानवांचे संघटन करून, परस्पर संवाद साधून, मनाने एक होऊन सर्वांचे कल्याण साधण्याची शिकवण देऊन वेदमातेने सर्व संहितेचे सार सांगून सर्वांना शुभाशिर्वाद दिलेले आहेत.

## विद्येचे चार प्रकार : ऐतरेय ब्राह्मण

प्राचीन परिपाठीप्रमाणे वेदाच्या स्वरूपात मंत्र व ब्राह्मणांचा समावेश होतो. वेदाच्या चार संहिता मंत्र भागात येतात. वेदाच्या मूळ ऋचात 'ब्रह्म' एकवचन आणि बहुवचन मंत्र या अर्थाने रूढ आहेत. या ब्रह्म मंत्राचे विवेचन ते

'ब्राह्मण' म्हटले जाते त्या ब्राह्मण ग्रंथात तीन प्रकार आढळतात. विधि ब्राह्मण, आरण्यक आणि उपनिषद. वेदाच्या प्रत्येक शाखेत मंत्र संहिता, ब्राह्मण, आरण्यक आणि उपनिषद हे चारी प्रकार आढळतात.

साधारणतः अशी मान्यता आहे की विद्याकालात विद्यार्थी मंत्र संहितांचे श्रवण करून स्वाध्याय-पाठ करीत. गृहस्थ कालात यज्ञ याग वगैरे कर्म प्रक्रियात ब्राह्मण ग्रंथातील विधीविधानांचा उपयोग होई. वानप्रस्थामधे साधी सरळ साधने चालवून घेण्यासाठी आरण्यके मार्गदर्शन करीत व जीवनाच्या अंतिम कालाच्या खंडात त्याचे निःश्रेयस साधण्यासाठी उपनिषदांचे ज्ञान आवश्यक मानले जाई. याप्रमाणे चार आश्रमांच्या व्यवस्थेत वेदांचा या चार प्रकारांनी विनिमय केलेला दिसून येतो महाभाष्यकार भगवान पतंजलि विद्येच्या चार प्रकारांचा उपयोग पुढीलप्रमाणे दाखवतात १) स्वाध्यायकाल २) प्रवचनकाल ३) आगमकाल ४) व्यवहारकाल.

यात स्वाध्याय हा फार महत्वाचा आहे. विद्यार्थ्यांची ग्रहणशक्ती प्रखर करण्यासाठी वेदाचे पठण, पाठण व श्रवण ही मुख्य साधने आहेत. विद्या पाठ करण्यात आहे अशी मान्यता होती. 'श्रुति' श्रवणपरंपरेचीच प्रतिष्ठा आहे. श्रवण केल्याने वेदमंत्राचे प्रत्यक्ष दर्शन होते. श्रवण आणि स्वाध्याय पाठ चालू राहिल्याने स्वाध्यायकाळात झालेले विद्येचे संस्कार दृढ होऊन ती जन्माची शिदोरी होऊन राही. पायाभूत वळण देणाऱ्या शिक्षणाचे हेच मूळ स्वरुप आहे, जीवनाचा हा प्रारंभ आहे.

स्वाध्याय कालानंतरचा प्रवचनकाल. तो स्वाध्यायाशीच जोडलेला आहे. 'स्वाध्याय व प्रवचन यात प्रमाद नाही' स्वाध्यायात श्रवण आहे तर प्रवचनात मनन आहे श्रवणानंतर मनन करणे तितकेच अगत्याचे आहे याप्रमाणे मंत्र ब्राह्मण एकमेका सहित चालणारे आहेत. संहिता हा स्वाध्यायाचा भाग होतो. त्याच्यावरील प्रवचनरुपाने निरुपण केलेले ब्राह्मण ग्रंथ मननाचे साधन होतात. हे प्रवचन किंवा मनन म्हणा याचे तीन प्रकार आहेत. मंत्रांचा यज्ञयागादि क्रियांसाठी उपयोग व त्यासाठी आवश्यक ती सर्व माहिती ज्या ब्राह्मण ग्रंथात आहे त्यांना विधी-ब्राह्मण ग्रंथ म्हणतात ब्राह्मणांचाच दुसरा प्रकार आरण्यक. त्यात उपासनेला व भावनेला प्राधान्य दिलेले आहे. ब्राह्मणाचा तिसरा प्रकार आहे उपनिषद. त्यात आत्मज्ञानाच्या रहस्याचे विवेचन आहे. श्रवण व मननानंतरच्या ध्यानासाठी त्यांचा उपयोग होतो. बृहदारण्यक उपनिषदात हे स्पष्ट सांगितले आहे.

आत्मा वा अरे द्रष्टव्यः । श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः ।

'आत्म्याचे दर्शन केले पाहिजे' हे सिध्दांत वाक्य आहे. त्याचे श्रवण, मनन आणि ध्यान साधन वाक्याप्रमाणे आहेत. खरे पहाता हे चारही विभाग वेगळे

काढता येण्यासारखे नाहीत. स्वाध्याय चालू असताना प्रवचनही होत असतेच. आगमकालात समजू लागते व व्यवहार कालात आत्मदर्शनाची द्वारे खुली होतात.

वेदामधे हे दोन्ही प्रकारचे विभाग दिसतात. ऋग्वेद संहिता हा मंत्र ग्रंथ आहे. त्याचेच ऐतरेय ब्राह्मण, ऐतरेय आरण्यक व ऐतरेय उपनिषद प्रसिध्द आहे. वाजसनीय शाखेत यजुर्वेद संहितेच्या मंत्रभागात ईशावास्य उपनिषद आहे म्हणून त्यास मंत्रोपनिषद म्हटलेले आहे शतपथ ब्राह्मणाच्या शेवटच्या अध्यायांना बृहदारण्यक उपनिषद म्हणतात.

चार वेदांच्या संहितात सर्व मिळून एकूण वीस हजार मंत्र आहेत. बाकीच्या तीन विभागात भाष्य विवेचनाचे ऐंशी हजार मंत्र अशी गणना करुन एकंदर वेद-मंत्र एक लाख आहेत असे प्राचीन परिपाठानुसार मानले जाते.

'एकविंशतिधा बाह्वृच्यम्। एकशतमध्वर्यु शाखाः। सहस्त्रवर्त्मा सामवेदः। नवधाथर्वणः।

प्राचीन परिपाठाप्रमाणे ऋग्वेदाच्या एकवीस, यजुर्वेदाच्या एकशे एक, सामवेदाच्या हजार व अर्थवेदाच्या नऊ शाखा आहेत असे मानतात. परंतु आज चारी वेदांच्या अकरा संहिता, सोळा ब्राह्मण ग्रथ व सात आरण्यक ग्रथ मिळतात. उपनिषदांचे ग्रंथ स्वतंत्र, वेगळे प्रसिध्द झालेले आहेत त्यापैकी दहा बारा उप-

निषदे मुख्य मानली जातात. त्यातील ईशावास्य हे मंत्रोपनिषद म्हटले जाते. कारण ते यजुर्वेद संहितेत चाळीसाव्या अध्यायाच्या रुपात आहे. तसेच छांदोग्य व शतपथ ब्राह्मणाचा एक भाग, छांदोग्य व बृहदारण्यक उपनिषदे म्हणून रुजू केलेली आहेत. ऋग्वेदाचे दोन ब्राह्मण ग्रंथ प्रसिद्ध आहेत. शाखायन शाखेचे कौषीतकि व शाक्त शाखेचे ऐतरेय. त्याचबरोबर कौषीतकि आरण्यक व उपनिषद, तसेच ऐतरेय आरण्यक व उपनिषदही आहे. याप्रमाणे प्रत्येक वेद मंत्रसंहिता, ब्राह्मण, आरण्यक व उपनिषद अशा चार भागात असलेला आढळतो. आश्वलायन गृह्यसूत्राच्या तर्पणात शांखायन व ऐतरेयाची नावे आलेली आहेत.

कौषीतकि ब्राह्मण, ह्यालाच शांखायन पण म्हणतात. कृषीतक ऋषींचा पुत्र कौषीतकि हा याचा मुख्य उपदेशक, मंत्रद्रष्टा आहे. त्याचे तीस अध्याय आहेत आणि अग्निहोत्र, दर्श, पौर्णमास, चातुर्मास्य वगैरे होम व इष्टिच्या सूचना व मुख्यत्वे सोमयागाच्या विधिविधानाचे प्रयोग व रुपक कथा वगैरे यात आहे. यज्ञ हे एक प्रतीक मानले तर विश्वातील सर्व प्रक्रियांचे दर्शन यज्ञात होऊ शकते. यज्ञाच्या क्रियाकांडातच केवळ गुरफटून न जाता त्यामागचे रहस्य जाणणाऱ्या

याज्ञिकास ब्रह्मज्ञान होऊन थोरवी प्राप्त होते. अशाप्रकारचे सूचन या ग्रंथाच्या अभ्यासातून साररुपाने मिळते.

**ऐतरेय ब्राह्मण** : वरील ब्राह्मण ग्रंथातील विषयांचे विशद वर्णन या ग्रंथात आहे. त्याचा द्रष्टा महिदास ऐतरेय याचा उल्लेख 'एतत् ह स्म वै तद् विद्वानाह महिदास ऐतरेय:। (ऐत. आरण्यक १–८–२) असा केलेला आहे. त्याच्या दीर्घायुष्याला सोमयागाच्या तीन सवनांशी गुंफताना छांदोग्य उपनिषद (५, १, ६, ७) मधे म्हटले आहे.' ते (ऐतरेय) एकशे सोळा वर्षांचे होते. त्यातील चोवीस वर्षे बालपण – प्रातःसवन चव्वेचाळीस वर्षे माध्यंदिन सवन. ते यौवन. शेवटची अठ्ठेचाळीस वर्षे ही सायंसवनाची – वार्धक्याची वर्षे होत.

ऐतरेय ब्राह्मणाची सुरुवात याप्रमाणे आहे –

'अग्निर्वै देवानामवमो, विष्णु: परम: । तदन्तरेण सर्वा अन्या देवता: ।
(ऐ. ब्रा. १, २, १)

सोमयागाला अग्निष्टोम म्हणतात. त्याच्या सुरुवातीस यजमानाला यज्ञाची दीक्षा देण्यात येते. त्यासाठी दीक्षणीया इष्टि याग करावा असे सांगितले आहे. या इष्टिमधे अग्नि व विष्णू हे मुख्य इष्ट देव आहे. त्यांच्यासाठी पुरोडाश, हवि अकरा कपालात (पात्रात) तयार करावयाचा असतो. त्याला आग्ना वैष्णव पुरोडाश म्हणतात. आता अग्नि हा पृथ्वीचा देव आहे. म्हणून त्याला देवात अवम–म्हणजे आद्य किंवा खालचा देव म्हटले आहे. विष्णु हा आदित्य रूपाने आकाशाचा देव आहे. म्हणून त्याला परम–म्हणजे शेवटचा किंवा वरचा देव म्हटले आहे. दुसरे वायु वगैरे देव आकाश व पृथ्वी यांच्या मधल्या भागात वसणारे आहेत. ऋग्वेद संहितेचा प्रारंभ अग्निसूक्ताने होतो व पहिल्या मंडलाच्या बावीसाव्या सूक्तातील शेवटच्या सहा ऋचांत विष्णूची स्तुति आहे. या दोन्हीच्या मधल्या सूक्तात वायु, इन्द्र, मरुत व विश्वेदेवांचे वर्णन आहे. याप्रमाणे ऋग्वेद संहितेचा क्रम दाखवतांना पण ब्राह्मणाची व्याख्या उपयोगी ठरते.

ऐतरेय ब्राह्मणात लहान लहान आख्याने बरीच आहेत. त्यापैकी सौपर्ण आख्यान एक मोठे आहे त्यात सोम स्वर्गातून पृथ्वीवर आणल्याचे सुंदर वर्णन आहे. त्यातील उल्लेखाप्रमाणे गायत्री. त्रिष्टुप आणि जगती हे तीनच मुख्य छंद आहेत. दुसरे छंद या तीन छंदाचेच भाग आहेत. पूर्वी हे तीनही छंद चार चार अक्षरांचेच होते. जगती व त्रिष्टुप सोम आणण्यासाठी स्वर्गात गेले तेव्हा जगतीची तीन व त्रिष्टुपाचे एक अक्षर तिकडेच राहिले. जगती अेकक्षरा आणि त्रिष्टुप तीन अक्षरांचा झाला. गायत्रीने स्वर्गातून सोमही आणला व छंदाची चार अक्षरेही परत आणली. म्हणून गायत्रीची आठ अक्षरे झाली. गायत्रीने

आपली आठ त्रिष्टुपाला दिली. तेव्हा त्रिष्टुप अकरा अक्षरांचा झाला. त्रिष्टुपाची अकरा अक्षरे जगतीला मिळाली. त्यामुळे जगती छंद बारा अक्षरांचा झाला (ऐत ३ २२)

शुन:शेपाचे आख्यान या ठिकाणी आहे. तितके विस्तृत इतर कोठेही नाही. या कथेचे मूळ ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या २४ ते ३० या सात सूक्तात आहे. शुन:शेपाचे नाव त्यातील तीन ऋचांत आलेले आहे. शुन: शेपो यमह्वद् गृभीत: (१, २, ४, १२) शुन: शेपो ह्यह्वद गृभीत: (१, २, ४, १३) शुनश्चिच्छेपं निहितं सहवूरस्त्राद (५, २, ७)

शुन:शेप जो वरूण पाशांनी बांधलेला होता त्याने वरूणाला आवाहन केले. ऋग्वेदाच्या पहिल्या मंडलाच्या ९७ व नवव्या मंडलाच्या दहा ऋचांचा ऋषि शुन:शेप आहे. या ऋचात अग्नि, इंद्र, सविता, वरूण, सोम आदि देवांची स्तुती केलेली आहे. या आख्यानात या देवांचा व त्या स्तुतीचा उल्लेख आलेला आहे.

'ऋग्वेदिक लीजन्डज् थ्रू दी अेजेस्' ( डॉ. हरियप्पा, पुणे ) या ग्रंथात या आख्यानाबद्दल म्हटले आहे– 'शुन:शेपाला वरूण पाशातून मिळालेल्या मुक्तीत वैदिक तथ्य आहे. ऐतरेय ब्राह्मणाशिवाय सर्वानुक्रमणी, शांखायन, श्रौतसूत्र, हरिवंश, भागवत वगैरे ग्रंथातही हे आख्यान आलेले आहे. शुन: म्हणजे सुखाचा शेप म्हणजे स्तंभ. 'पिलर ऑफ हॅपिनेस' असा अर्थ डॉ. हरियप्पांनी केलेला आहे.

काही विवेचकांनी या आख्यानाच्या आधारे ऋग्वेद काळी नरमेध प्रचलित असल्याचा तर्क केलेला आहे. परंतु ऐतरेय ब्राह्मणात (२–८) नरमेधाचा स्पष्ट निषेध केल्याचा उल्लेख आहे. कथेचा जो विस्तार आहे त्यावरूनही नरमेध असंभवच दाखवलेला दिसतो. वरुण–पाश हे अलंकारिक रूपक असून त्याचे अध्यात्मिक रहस्य समजून घेण्यासाठी शुन:शेपाच्या मूळच्या ऋचाच वाचाव्या लागतील.

## मुख्य देव रुपात अग्नि :–

अग्निर्वै सर्वा देवता: (ऐत. १, १) अग्नेर्वा एत: सर्वास्तन्वो यदेता: (६-४) अग्नि हा खरे सर्व देवांचे प्रत्यक्ष रुप आहे, सर्व देव आत, अग्निचीच वेगवेगळी अंगे आहेत.

याप्रमाणे सुरुवातीस सांगून पुढे म्हटले आहे, 'अग्नीच्या प्रज्वलनाच्या विविध क्रिया आहेत त्यात वेगवेगळ्या देवांचा अंतर्भाव होतो जसे अग्नीचे प्रज्वलन म्हणजेच वायु आहे. त्याचप्रमाणे विभाजित होऊन प्रज्वलन म्हणजे इंद्र व वायु आहे. प्रज्वलित ज्वालांचे खाली वर होणे हे उध्वर्ष आणि निहर्ष म्हणजेच मैत्रावरूण आहेत. ज्या दोन अरंजींच्या मंथनातून अग्नि प्रगटतो

ते मंथन म्हणजे अश्विनीकुमार व उच्चरवाचे ब–ब– ध्वनी करीत पेटणे हे इंद्रस्वरुप आहे. एक असूनही अनेक ज्वालातून प्रगटणारा अग्नि म्हणजेच विश्वेदेव आहेत. स्पष्ट, सतेज तेवणारा अग्नि हे सारस्वतरूप आहे (ऐतरेय ब्रा. ३–४) याप्रमाणे अग्निच्या अंगरूपे देवांचे वर्णन केलेले आहे.

**अग्नि सह सोम :** वैदिक यागात सोमयाग हा मुख्य आहे. त्यामुळे ऐतरेय ब्राह्मणात सोमयागाचेच वर्णन आहे. ऋग्वेदात अग्नि व इंद्र यांच्या नंतर सोमाचे स्थान आहे. यज्ञाची मुख्य तत्वे दोन: पहिला अग्नि व दुसरा सोम. असे ब्राह्मणात म्हटले आहे. त्यात सांगितले आहे की अग्नि व सोम हे यज्ञाचे दोन डोळे आहेत. चक्षुषी एवाग्नीषोमौ (२–६) ऋग्वेदात (१, ९, ३, ५) म्हटले आहे. अग्नि व सोम तुम्ही दोघे मिळून परिश्रम करता म्हणून तर आकाशात प्रकाशयुक्त पदार्थ ठेवण्यात आले आहेत.

सोमाचे वर्णन वाचताना एक गोष्ट निश्चितपणे जाणवते की सोमतत्व अखिल ब्रह्मांडाला व्यापून राहिलेले आहे. अमरत्व व प्रकाश देण्याचा धर्म हे दोन दिव्य गुण त्याच्या ठायी आहेत म्हणून सोमाला पण अग्नि प्रमाणेच सर्वा: देवता: (२:३) म्हटलेले आहे. सोम अमर आहे व स्वयंप्रकाशित पण आहे अमृत म्हणण्याचे कारण त्याचा कधी नाश होत नाही. रसरूपाने सोम सर्व पदार्थांच्या ठिकाणी वास करीत असतो. अग्निला सोमाची आहुति दिली तरी त्यामुळे त्याचा नाश होत नाही. तेच त्याचे अमरत्व आहे आहे.

औषधी–वनस्पति असेही सोमाचे वर्णन अनेक ठिकाणी आहे. यज्ञासाठी सोम विकत आणला जातो (१, १२) त्याला दगडी पाट्यावर वाटतात (३,४०) सोमपानाचे महत्त्व पण परोपरीने वर्णन केले आहे (७, ३४)

## अग्नि–होत्राचे रहस्य:

ऐतरेय ब्राह्मणात (२५, ६, ७) अग्निहोत्राचे वर्णन करताना प्रजापतीने निर्माण केलेल्या सर्व पदार्थांचे साररूप असे ॐकाराचे वर्णन केलेले आहे. शिवाय चारी वेदांचे ऋत्विज त्यांची कामे व अथर्व वेदाचा ज्ञाता जो ब्रह्मा त्याच्या विशेष उत्तरदायित्वाचे स्पष्ट दिग्दर्शन केलेले आहे

स ऋचैव हौत्रमकरोत् यजुषा आध्वर्यम् साम्नोद्‌गीथम् । तदेतत्

त्रय्यै विद्यायै शुक्रं, तेन ब्रह्मत्वमकरोत् (ऐ. ब्रा. २५, ७, ३, २)

त्या प्रजापतीने ऋग्वेदाच्या ऋचांचा संबंध जोडून होत्याच्या कर्मांना शस्त्र-शंसनाशी जोडले, यजुर्वेदाच्या मंत्रांना जोडून अध्वर्युच्या कामास यज्ञाच्या मुख्य कामाशी जोडले. आणि सामवेदाच्या गीतांना उद्‌गात्याच्या उदगीथ दानाशी जोडले. या तीन विद्या म्हणजे वेदांची शैली आहे. ऋचा, यजु आणि साम या तीनही विद्या घेऊन प्रजापतिने अथर्ववेदाच्या ब्रह्म मंत्रात त्यांची कर्मांशी सांगड घालून ब्रह्माचे तटस्थ साक्षीकर्म त्यावरोबरच जोडून दिले. ΣΣΣΣΣΣ

# परिशिष्ट २

## ऋग्वेदातील काही सूक्ते

ऋग्वेदाची दहा मंडले आहेत. प्रत्येक मंडलाचा प्रारंभ अग्निच्या स्तुतीने होतो. त्यानंतर इन्द्राची सूक्ते येतात. पवमान सोमाच्या सूक्तांचे एक स्वतंत्र मंडलच (९ वे मंडल) आहे. त्याशिवाय प्रत्येक मंडलाच्या सुरुवातीसही सोमाची सूक्ते आहेत. त्या दृष्टीने पहाता अग्नि, इन्द्र आणि सोम हे मुख्य देव. यज्ञाच्या प्रक्रियेच्या क्रमाने त्यांचा क्रम लावलेला दिसतो. तो अनुसरल्यास सामवेदात अग्निची सूक्ते आग्नेय, इन्द्राची सूक्ते ऐन्द्र आणि सोमाची, विशेषत: पावमान सोमाची तीन कांडात संकलित केलेली आहेत त्यानंतर यजुर्वेदात यज्ञक्रमाप्रमाणे दर्शपूर्ण मासेष्टि, अग्निहोत्र आणि सोमयागाचे इष्ट देव इन्द्र, अग्नि व पवमान सोम आहेत. तसेच अथर्ववेदात पण अग्नि, इन्द्र व सोम हाच क्रम ठेवलेला आहे. त्याविषयी शतपथ ब्राह्मणात (१, ६, ३, २०–२२) म्हटले आहे.

'सर्व देवांना दिल्या जाणाऱ्या आहुतींचा आधार अग्नि आहे. सोम सर्व देवांना दिली जाणारी आहुति आहे. इन्द्र हा सर्व देवात श्रेष्ठ आहे. याप्रमाणे हे तीन देव मुख्यत्वे एक रूप आहेत.

स हाग्निरुवाच 'मय्येव व: सर्वेभ्यो जुह्वतु तद् वो ऽहं मयि आभजामि ' इति। तस्मादग्नौ सर्वेभ्यो देवेभ्यो जुह्वति। तस्मादाहु:– 'अग्नि: सर्वा: देवता: ' इति।

त्या अग्निने सांगितले, 'तुम्ही माझ्यात होम करा. मी सर्व देवांना भाग देतो म्हणूत सर्व देवांसाठी अग्निस आहुति देतात. म्हणून ब्रह्मवादी सांगतात की, 'अग्नि हा सर्व देवरूप आहे.'

अथ ह सोम उवाच, 'मामेव व: सर्वेभ्यो जुह्वतु तद् वो ऽहं मयि आभजामि ' इति। तस्मात् सोमं सर्वेभ्यो देवेभ्यो जुह्वति। तस्मादाहु: 'सोम: सर्वा देवता: ' इति

त्यानंतर सोमाने सांगितले, 'तुम्ही सर्व देवांच्यासाठी मला आहुति द्या. मी सर्व देवांना भाग देतो. म्हणून सर्व देवांना देण्याची आहुति सोमास दिली जाते. म्हणून ब्रह्मवादी सांगतात, 'सोम हे सर्व देवांचे स्वरूप आहे.'

अथ यदिन्द्रे: सर्वे देवा: तस्थाना: तस्मादाहु: 'इन्द्र:सर्वा देवता इन्द्रज्येष्ठा देवा' इति। एतद्ध वै देवा: त्रेधैकदेवत्या अभवन्।

त्यानंतर सर्व देव इंद्राच्या ठिकाणी वसतात म्हणून ब्रह्मवादी म्हणतात की इंद्र हे सर्व देवांचे स्वरुप आहे. देवांच्यामधे इन्द्र श्रेष्ठ आहे. याप्रमाणे अग्नि, सोम व इन्द्र हे तीन देव एक देवरूप असून मुख्य आहेत.

वेदांचे संकलन करताना यज्ञ पद्धति समजून घेतल्यास, वेदांचे विषय समजण्यास सोपे, सरळ होतील. अर्थात यज्ञ पद्धति ही रुढी होऊन गेली व मंत्रानुसंधाना पेक्षा मंत्राची प्रक्रियाच मुख्य मानली जाऊ लागली. त्यामुळे मंत्राच्या अर्थाकडे दुर्लक्ष झाले, म्हणूनच निरुक्तकाराना म्हणावे लागले की ' वेदाध्ययन करून जर त्याचा अर्थ कळला नसेल तर त्यांना स्थाणु–जड' थडासारखा म्हणावे लागेल. ज्यांना त्यांचा अर्थ कळतो त्यांचे कल्याण होते, ज्ञानामुळे त्यांची पापे धुतली जातात, त्याना परम स्वर्ग सुखाची प्राप्ती होते.

निरुक्त कार देवाची व्याख्या करताना म्हणतात,

अग्नि: कस्मात् अग्रणीर्भवति अग्रं यज्ञेषु प्रणीयते अंगं नयति । त्याला अग्नि का म्हटले? कारण तो आपणा सर्वांचा अग्रेसर आहे. त्याला यज्ञात सर्वप्रथम बोलावले जाते. तो ज्याच्यात प्रवेशतो त्याला स्वत:चे रुप देतो.

इंद्र: इरां दृणाति इन्दवे द्रवति, इंधे भूतानि, प्राणान् समैधन्, इदं करणात्, इदं दर्शनात् इंदति वा।

तो इंद्र आहे–जो अन्नबीज–हरा–फोडणारा आहे. जो सोमरस वहायला लावतो. जो सर्व भूताना चेतना देतो, जो प्राणांना प्रकाशित करतो, जो या जगताची रचना करतो, जो विश्वाकडे पहातो व ऐश्वर्य प्राप्त करून घेतो.

ओषधि: सोम: सुनोते: यद् एनाम अभिषुण्वंत।

सोम ही औषधि आहे. ती वाटून, पिळून त्यातून रस काढतात.

यत् ते सोमं दिवि ज्योति:। हे सोम, तुम्ही आकाशातील दिव्य ज्योति आहात.

सोमो नूनमेष तद् देवानाम् अन्नम्। सोम हे देवांचे अन्न आहे. (मैत्रायणी संहिता)

सोम हे अन्न आहे. अग्नि, तसेच इंद्र हे अन्नाद आहेत. सोम यागात त्या सोमरसाचे पान करून देव अमर होतात.

पिंडी ते ब्रह्मांडी या दृष्टीने पाहिल्यास शरीरात वाणी हा अग्नि आहे प्राण इंद्र असून रस हा सोम आहे. आधि भौतिक अग्नि पृथ्वीच्या ठिकाणी, इंद्र अंतरिक्षात व सोम स्वर्गात असतो. अग्नि हा यज्ञाचा पुरोहित आहे. इंद्र देव आहे. व सोम अन्न असून देखील अग्नि व इंद्र याच्या सारखाच चेतनवंत देव आहे. चार

वेदातील वीस हजार मंत्रापैकी इंद्राचे मंत्र चार हजार, अग्नीचे तीन हजार व सोमाचे बाराशे एकसष्ठ मंत्र आहेत.

## अग्नीची कार्ये

(ऋग्वेद संहिता प्रथम मंडल. प्रथम सूक्त. ऋषि मधुच्छंदावैश्वामित्र देव अग्नि. छंद: गायत्री )

या पहिल्या सूक्ताच्या नऊ ऋचा आहेत. यज्ञ कार्यात त्यांच्या तीन ऋचांची एकेक अशा तीन तृचांची नियुक्ति केली जाते. होमयागाच्या पहाटे, पक्षीही जागे होण्याआधी प्रातरनुवाक शस्त्र गातात त्याचे मुख्य देव अग्नि, अश्विनीकुमार आणि उषा आहेत. सकाळ होईपर्यंत गाण्याच्या सूक्तांच्या क्रमात ऋग्वेदातील बऱ्याच सूक्तांचा समावेश होतो. पहिल्या मंत्रात अग्निला यज्ञाचा पुरोहित देव आणि ऋत्विज होता, तसेच रमणीय धन साधने व रत्ने धारण करणारा म्हणून संबोधले आहे. त्याचप्रमाणे दुसऱ्या व तिसऱ्या मंत्रात पुरोहित रूपाने चौथ्या मंत्रात देव आणि ऋत्विज रूपाने, पाचव्यात होता आणि सहाव्या मंत्रात रत्नधातम् रूपाने त्याचे वर्णन करून शेवटच्या तृचेत अग्निच्या प्रभावाचे वर्णन केलेले आहे. याप्रमाणे संगति लावल्यास अर्थ समजून घेणे सोपे व सरळ होते.

'अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् । होतारं रत्नधातमम् ॥१॥'

'जो यज्ञाचा पुरोहित, इष्टदेव ऋत्विज, होता आणि रत्नधारण करण्यात उत्तम अशा त्या अग्नीची आम्ही स्तुति करीत आहो.

अग्नि हा यज्ञाचा पुरोहित आहे त्याचप्रमाणे तो देवांना यज्ञासाठी बोलावून आणतो. म्हणून अनेक ऋषि त्याची स्तुति करतात.

'अग्नि: पूर्वेभिर्ऋषिभिरीड्यो नूतनैरुत । स देवान् एह वक्षति ॥ २ ॥'

पूर्वीच्या अनेक ऋषीनी, त्याचप्रमाणे नव्या ऋषीनीही त्या प्रसिद्ध अग्नीची स्तुति केली आहे. तो अग्नि आमच्या यज्ञात इन्द्रादि देवांना वहन करून आणतो. अर्थात ज्याप्रमाणे अतिथींना रथात बसवून बोलावून आणावे त्याप्रमाणे अग्नि इन्द्रादि देवांना बोलावून आणतो. याप्रमाणे इंद्र वगैरे देवांचे आवाहन करताना अग्निला पुढे करतात.

अग्नि जसा देवांचा पुरोहित आहे तसाच यजमानाचा पोषणकर्ता पण आहे.

'अग्निना रयिमश्नवत् पोषमेव दिवेदिवे । यशसं वीरवत्तमम् ॥ ३ ॥'

अग्नीची स्तुति करून त्यास यज्ञात बोलावून हवि दिल्यास तो अग्नि यजमानाला धन साधने देतो. जे दिवसे दिवस त्याचे पोषण करतात, यश वाढवतात

त्यास उत्तम प्रकारचे वीरपुत्र प्राप्त होतात, यज्ञाचे पुरोहित आचार्य असतात ते यजमानाचे हित साधतात परंतु देवांचे हित साधण्याचा अधिकार त्यांना नसतो पण अग्नि पुरोहित होऊन देव आणि यजमान उभयतांचे हित साधतो. शिवाय तो यज्ञाचा इष्टदेव होऊन इंद्र, सोम वगैरे देवांच्या बरोबर आहुतिही स्वीकारतो

अग्ने यं यज्ञमध्वरं विश्वतः परिभूरसि । स इद् देवेषु गच्छति ॥ ४ ॥

खरोखरीच हे अग्निदेव, ज्या यज्ञात तुम्ही सत्ताधीश देव असता, सर्व बाजूस तुमचा प्रभाव पडतो. तो यज्ञ देवांना प्रसन्न करण्यासाठी त्यांच्याकडे जाऊन पोचतो. कारण या प्रकारचा यज्ञ हा अध्वर, एक विशेष मार्ग आहे. ज्यात कोठल्याही प्रकारची हिंसा होत नाही व जेथे कोठल्याही प्रकारचे भय नसते (अशा त्या यज्ञात) अग्नि पुरोहित आहे. ऋत्विज आहे, देव आहे. विशेष करून होता आहे जो देवाना बोलावून यज्ञात स्वतः त्यांच्या बरोबर स्थान घेतो.

अग्निर्होता कविक्रतुः सत्यः चित्रश्रवस्तमः । देवो देवेभिरागमत् ॥ ५ ॥

अग्नि, जो देव आहे तो यज्ञात आहुती घेण्यासाठी इतर देवांच्यासह येऊन पोचतो. इतकेच नाही तर अग्नि हा होताही आहे. तो इतर देवाना बोलावून आणतो. तो कविक्रतु आहे. म्हणजे त्याचे प्रत्येक कर्म व संकल्प कविप्रमाणेच क्रांतिकारक असतो. तो स्वतः सत्याचा प्रतिष्ठापक असून त्याचे विशेष यश सर्वत्र पसरलेले आहे.

अग्नि, जो पुरोहित आहे, देव आहे. तो यजमानाचा फार प्रिय असा स्वजन आहे तो यजमानाच्या कल्याणासाठी सदा सावधान असतो.

यद् अंग दाशुषे त्वम् अग्ने भद्रं करिष्यसि ।
तव इत् तत् सत्यमंगिरः ॥ ६ ॥

हे अंग प्रियजन अग्नि, अंगार रुपाने यज्ञात प्रगट होणाऱ्या अंगिरा, तू खरोखरीच सत्यावर निष्ठा ठेवणारा आहेस. म्हणून तुम्हाला हवि देणाऱ्या यजमानाचे तुम्ही खूप कल्याण करावे.

अग्नि केवळ यज्ञाच्या वेळीच प्रगट होतो असे नाही. तो तर सदाच जागृत असतो. दिवसचे दिवस, सकाळ-संध्याकाळ त्याची उपासना करतात. त्याविषयी म्हटले आहे,

उप त्वा दिवेदिवे दोषावस्तर धिया वयम् । नमो भरन्त एमसि ॥ ७ ॥

हे अग्नि देव, सकाळी, संध्याकाळी दिवसचे दिवस आम्ही तुमच्याकडे समजपूर्वक येतो. तसेच तुमच्या प्रार्थनेची वचने नमस्कारपूर्वक उच्चारतो. अर्थात् तुमचे अनुष्ठान करण्यात आमच्या समयाचे साफल्य करून घेतो.

ज्या अग्निची उपासना सर्वजण करतात तो अग्नि सर्वत्र विराजमान आहे. यजमानाच्या अग्निशाळेतही तो त्याचप्रमाणे वृद्धिगत होतो.

राजन्तमध्वराणां गोपामृतस्य दीदिवम्। वर्धमानं स्वे मे ॥८॥

आम्ही यजमान ज्या अग्नीस प्राप्त करून घेतो तो अग्नि अध्वरयज्ञात विराजमान होतो. तो ऋत व ऋजुतेचा रक्षक आहे. तो वारंवार प्रदीप्त होतो तसेच सर्वांच्या घरातही तो वाढत रहातो. अग्नि हा स्वयंप्रकाशी आहे तथापि यजमानाकडून त्यास आहुतिची इच्छा असते. त्याचप्रमाणे ज्ञानरूप अग्नि स्वयं-प्रकाशित असला तरी अज्ञान दूर करणाऱ्या पुरुषार्थाची अपेक्षा तो ज्ञानाग्नि ठेवतो.

अग्नि हा प्रियजन आहे. तसेच तो पालक पिता म्हणून उत्तम प्रकारची भेट ही देतो त्याविषयी म्हटले आहे–

' स नः पितेव सूनवे अग्ने सूपायनो भव। सचस्वा नः स्वस्तये ॥ ९॥

ज्याप्रमाणे पिता दूरदेशाहून येताना पुत्रासाठी उत्तम भेट वस्तू आणतो त्याचप्रमाणे हे अग्निदेव, तुम्ही आमच्यासाठी उत्तमोत्तम भेटी आणणारे व्हावे व आमच्या स्वस्ति–सुखासाठी तत्पर असावे.

## इंद्राचे पराक्रम

( प्रथम मंडल सूक्त ३२. ऋचा १५ ऋषि हिरण्यस्तुप आंगिरस.
देव. इन्द्र छंदः त्रिष्टुप )

वेदात इन्द्राला देवांचा राजा म्हटलेले आहे. त्याचा पराक्रम वर्णन करणारी ही जी गाथा आहे तिला इतिहास म्हणता येण्यासारखे आहे. इन्द्र हा मुख्यत्वे आंतरिक्षाचा देव आहे. वायु, पर्जन्य, वीज आणि जल त्याला वश आहेत. अहिकुलात जन्मलेला वृत्र आंतरिक्षांतील जल अडवून बसला, सगळीकडे अंधार पडला. देवही आकुळ व्याकुळ होऊन गेले. अशावेळी इन्द्र वज्र घेऊन वृत्रावर आक्रमण करतो. त्या दोघांचे तुमुल युद्ध जुंपते. वृत्राची माता दनु त्याला वाचवण्यासाठी मधे पडते व त्याला आपल्या विशाल काये खाली झाकून घेते. तरीही इन्द्र खालून प्रहार करून वृत्राचा संहार करतो.

इन्द्राचे पराक्रम याहूनही विशेष आहेत. तो स्वर्गाचा देव असून सूर्य व उषा याना प्रकाश देणारा आहे. पृथ्वीवर तो अग्नीला समिद्ध करणारा देव आहे. त्याच्या सेनेंत ४९ मरुत आहेत. जड व चेतन चराचरावर त्याचा प्रभाव आहे. तो राजा आहे. तो भगवान आहे. सर्वव्यापक असा ईश्वर आहे. तो यज्ञास येतो व आहुति स्वीकारतो. विशेषतः सोमरस त्याला अत्यंत प्रिय आहे. त्यामुळे त्याचा उत्साह अनेक पटीने वाढतो. येथे त्याची निवडक सूक्ते दिली आहेत.

इंद्रस्य नु वीर्याणि प्रवेचं यानि चकार प्रथमानि वज्री ।
अहन्नहिम् अनु अपस्ततर्द प्रवक्षणा अभिनत् पर्वतानाम् ।।१।।

वज्रधारण करणाऱ्या इंद्राने जे विशेष पराक्रम केले त्या विषयी आम्ही सांगत आहो. त्याने अहिला मारून टाकले. त्यानंतर पाणी (जे अडवले होते) मुक्त करून पर्वा पर्वातील-पर्वत मेघातील जलप्रवाह भेदून टाकले.

अहन् अहि पर्वते शिश्रियाणं त्वष्टास्मै वज्रं स्वर्यं ततक्ष ।
वाश्रा इव धेनवः स्यन्दमाना अञ्जः समुद्रम् अव जग्मुरापः ।।२।।

पर्वापर्वातील मेघ मंडलात लपलेल्या अहिला त्याने मारून टाकले. देवांचा कारागीर त्वष्टा याने त्याच्यासाठी तीक्ष्ण वज्र निर्माण केले होते. दुपारी चरावयास गेलेल्या गायी गोशाळेतील वासरांची आठवण होताच कुरणातून त्यांच्या कडे धाव घेतात त्या प्रमाणे अंतरिक्षातील जल वेगाने समुद्राकडे धावू लागले.

वृषायमाणो अवृणीत सोमं त्रिकद्रुकेषु अपिबत् सुतस्य ।
आ सायकं मघवादत्त वज्रम् अहन्नेनं प्रथमजामहीनाम् ।।३।।

ज्या प्रमाणे एखादा श्रेष्ठ वृषभ उत्साह भरित होतो तसा इंद्र सोमरसाने आनंदित होतो. तीन कद्रुक सोमयाग, ज्योति, गौ आणि आयु मध्ये तयार झालेल्या सोमरसाच्या अंशाचे तो पान करतो. मघ-मख, यज्ञात निमंत्रित केलेला तो मघवा इंद्र, सायक-सज्ज केलेले वज्र घेऊन प्रथम मेघाचा (अहि-वृत्र) नाश करतो. ( प्रथम मेघ याचा अर्थ येथे मेघ मंडळात प्रथम जन्मलेला आहे )

यदिन्द्र अहन् प्रथमजामहीनाम् आत् मायिना अमिनाः प्रोत मायाः ।
आत् सूर्यं जनयन् द्याम् उषासं तादीत्ना शत्रुं न किला विवित्से ।। ४ ।।

हे इंद्र प्रथम मेघात जन्मलेल्या अहिला तुम्ही मारून टाकले. त्यामुळे मायावी असुरांची माया दूर होऊन त्यांचा नाश झाला. व तुम्ही अंधःकार दूर केला. सूर्य व उषःकाली प्रकाशित आकाश प्रगट केलेत. अंधार जाऊन प्रकाश फाकल्यावर एकही शत्रू बाकी उरला नाही.

अहन् वृत्रं वृत्रतरं व्यंसं इंद्रो वज्रेण महता वधेन ।
स्कन्धासीव कुलिशेना विवृक्णा अहिः शयत उपपृक् पृथिव्याः ।। ५ ।।

आकाशात अंधाराचे आवरण पसरवणाऱ्या अनेक वृक्ष राक्षसांच्या अग्रणी वृत्राचा प्रचंड प्रहार करणाऱ्या वज्राने नाश केला. वृक्षाच्या फांद्या तोडाव्या तसे त्याचे हात धडापासून तुटून पडताच तो निराधार होऊन पृथ्वीवर कोसळला.

अयोद्धेव दुर्मद आहि जुह्वे महावीरं तुविबाधं ऋजीषम् ।
नातारीद् अस्य समृतिं वधाना सं रुजानाः पिपिष इंद्रशत्रुः ।।६।।

आपल्यासारखा कोणी योद्धाच नाही, अशा मदाने वृत्र इन्द्राला युद्धाचे आव्हान देत होता. अनेक शत्रूंचा नाश करणारा इन्द्र महावीर आहे. तो ऋजिष-शत्रूंचा रसकस शोषून घेणारा आहे. त्याने ज्या शत्रूंचा नाश केला त्यांच्या पासंगास वृत्र लागला नसता. याप्रमाणे इंद्र ज्याचा शत्रू आहे तो वृत्र गतप्राण होऊन नदीत पडला त्यामुळे नदीचे जल छिन्न भिन्न होऊन गेले.

अपाद् अस्तो अपृतन्यदिन्द्रमास्य वज्रमधि सानौ जधान
वृष्णो वध्रिः प्रतिमानं बुभूषन्पुरुत्रा वृत्रो अशयद् व्यस्तः ॥ ७ ॥

वज्राने ज्याचे हातपाय तुटून गेले आहेत असा वृत्र इन्द्राशी युद्ध करीत होता. त्याच्या पर्वतासारख्या विशाल स्कंधावर इन्द्राने वज्राचे प्रहार केले. नपुंसकाने वीराप्रमाणे पराक्रम करण्यास निघावे तसा हा वृत्र युद्धास उभा राहिला होता. परंतु सारे शरीर छिन्न भिन्न होऊन तो जमिनीवर कोसळून पडला होता.

नदं न भिन्नममुया शयानं मनो रुहाणा अति यन्त्यापः ।
याश्चिद् वृत्रो महिना पर्यतिष्ठत्तासामहिः पत्सुतः शीर्बभूव ॥ ८ ॥

ज्याप्रमाणे पावसाळ्यात पूर आलेल्या नदीचे किनारे कोसळतात त्याप्रमाणे खाली पडलेल्या वृत्राच्या शरीरावरून पाण्याचे लोट वाहू लागले. ते दृश्य माणसांचे मन हरण करणारे होते. वृत्र जेव्हा आपल्या पराक्रमाने जगत होता तेव्हा मेघ त्याच्या पायाखाली दबून होते. जे जलौघ त्याच्या पावलाखाली होते ते आता स्वतःला पाय नसूनही त्याचे शरीर तुडवीत ओलांडून जात होते.

नीचावया अभवद् वृत्रपुत्रा इन्द्रो अस्या अव वधर् जभार ।
उत्तरा सूः अधरः पुत्र आसीद्दानुः शये सह वत्सा न धेनुः ॥ ९ ॥

वृत्राची माता दनु हिने वृत्राला स्वतःच्या अंगाखाली झाकून घेतले व वज्राघाता पासून दूर ठेवण्याचा प्रयत्न केला. परंतु इंद्राने मातेच्या अंगाखाली लपलेल्या वृत्रावर खालून प्रहार केले. त्यावेळी माता वर होती व पुत्र खाली होता. कामधेनूने आपल्या वासराला अंगाखाली सुरक्षित घेऊन झोपावे त्याप्रमाणे वृत्राच्या मातेने त्याला कवळून घेतले होते.

अतिष्ठन्तीनामनिवेशनानां काष्ठानां मध्ये निहितं शरीरम् ।
वृत्रस्य निण्यं विचरन्ति आपो दीर्घं तम आशयदिन्द्र शत्रुः ॥ १० ॥

जेव्हा पुत्र मरण पावला तेव्हा त्याचे शरीर पाण्याखाली लपले होते. ते जलौघ कोठेही न थांबता, न अडखळता वाहू लागले होते. यापूर्वी इंद्राच्या शत्रूंनी घोर अंधःकार पसरवला होता.

दासपत्नी : अहिगोपा अतिष्ठन् निरुद्धा आप: पणिनेव गाव: ।

अपां बिलमपि हितं यदासीत् वृत्रं जघन्वान् अप तद्ववार ।।११।।

ज्याप्रमाणे पणींनी गाईंना गुहेमधे कोंडले होते त्याचप्रमाणे जलदेवतांना वृत्राने रोधले होते. त्यामुळे तर तो दास वृत्र त्यांना आपल्या आधीन ठेवत होता. तो येथे त्यांचे रक्षण करीत होता. याप्रमाणे जलदेवतांची वहाती द्वारे वृत्राने रोघून ठेवली होती. त्या वृत्राला मारून इन्द्राने जलदेवींना मुक्त केले.

अश्व्यो वारो अभवस्तदिन्द्र सृकेयत्वा प्रत्यहन्देव एक: ।

अजयो गा अजया: शूर सोममवासृज: सर्तवे सप्त सिंधून् ।। १२ ।।

हे शूरवीर इन्द्र, दिव्य पराक्रमी, एकाकी पडलेल्या वृत्राने तुमच्या वज्रावर पहिला प्रहार केला तो माशी उडवण्यासाठी केलेल्या चामराच्या लागण्याइतका क्षुल्लक वाटला. तुम्ही गायी जिंकून घेतल्या. तुम्ही एकट्याने सोमही जिंकून घेतला. सात सात नद्यांचे प्रवाह तुम्ही मुक्त, खळखळ वहाते केले.

नास्मै विद्युन्नतन्यतु: सिषेध न यां मिहमकिरद् ध्रादुनिंच ।

इन्द्रश्च यद्युयुधाते अहिश्च उतापरीभ्यो मघवा वि जिग्ये ।। १३ ।।

वृत्राने इन्द्रावर प्रहार करण्यासाठी विद्युत् शक्ति सोडली. पण ती इन्द्रापर्यंत पोचलीच नाही. त्याचप्रमाणे मेघगर्जना व मेघसिंचन यांचीही गत झाली. इन्द्र आणि अहि–वृत्र यांच्यातील तुमुल युद्धात वृत्राने रचलेली माया कामास आला नाही.

अहेर्यातारं कमपश्य इन्द्र हृदि यत्ते जघ्नुषो भीरगच्छत् ।

नव च नवति च स्त्रवन्ती: श्येनो न भीतो अतरो रजांसि ।। १४ ।।

हे इन्द्र तुमच्यावर प्रहार करणाऱ्या वृत्रास मारून टाकल्यावर पण तुमच्या मनात आशंका होती की तो मेला की नाही ? पण तुम्ही आजवर तुमच्याशिवाय दुसरा योद्धाच कोठे पाहिला होता ? भयभीत श्येन दूर दूर उडून जावा तसे तुम्ही नव्याण्णव नद्यांच्या पार निघून गेलात.

इन्द्रो यातो ऽ वसितस्य राजा शमस्य च श्रृंगिणो वज्रबाहु: ।

सेदु राजा क्षयति चर्षणोनाम् अरान्न नेमि: परि ता बभूव ।। १५ ।।

ज्याच्या हाती वज्र आहे असा हा इन्द्र सर्व जड–चेतन पदार्थांचा राजा आहे. तो शांत, शिंगे असलेल्या पाळीव पशूंचा पालक आहे सर्व प्रजाजनांचा तो राजा असून तो त्यांच्यातच वास करतो. चक्राच्या धरीला ज्याप्रमाणे सर्व आस जोडलेले असतात व ते एका बिंदू भोवती फिरते त्याप्रमाणे चराचर विश्व इन्द्राभोवती फिरते.

# पवमान सोम

( नववे मंडल. सूक्त ९६ ऋचा २४ ऋषि: दिवोदासाचा पुत्र प्रतर्दन.
देव–पवमान सोम. छंद: त्रिष्टुप.)

सोम ही दिव्य औषधि आहे. त्या वेलीची पाने वाटून, घोटून, पिळून तो रस गाळून पात्रात भरावयाचा या प्रत्येक क्रियेबरोबर ती करीत असता मंत्र म्हटले जातात. त्यामुळे त्यात दिव्य चेतना संचरते. सोमवल्लीची पाने घोटून त्यांचा रस काढला की तो सुत सोम होतो. त्याला लोकरीच्या गाळण्यातून गाळला की त्याचा एकेक चमकणारा बिंदु म्हणजे एकेक इंदु–अंश होतो. गाळला जाणारा सोमरस वाहू लागतो. पात्रात भरला जातो. तो पवमान सोम. तो दिव्य अमृत रस इन्द्राला प्रिय आहे. त्याच्या सेवनाने इन्द्राचा उत्साह वाढतो व तो महा-पराक्रमी होतो. इतकेच नाही पण पवमान सोम स्वत: इन्द्रासारखाच एक पराक्रमी देव असून तो युद्धात शत्रूना जिकून विजयी होतो. त्या सोमाचे हे सूक्त महत्वाचे आहे.

प्र सेनानी: शूरो अग्रे रथानां गव्य–नेति हर्षते अस्य सेना ।
भद्रान् कृण्वन् इन्द्र हवान् साखिभ्य आ सामो वस्त्रा रभसानि धत्ते ॥१॥

सेनेच्या आघाडीवरचा शूर वीर सोम शत्रूने हरण केलेल्या गायी परत आणण्याची इच्छा करीत आहे. तो युद्धात रथाच्याही पुढे धावतो ( ते पाहून ) त्याची सेना हर्षभरित होते. इन्द्राला आवाहन करण्यासाठी म्हणण्यात येणारी कल्याणकारी सूक्ते तो सफळ करतो व आपल्यावर प्रेम करणाऱ्या प्रियजनांच्या साठी दूध दही वगैरे उपकरणे ग्रहण करून वेगवान होतो.

समस्य हरं हरयो मृजंति अश्वहयैरनिशितं नमोभि: ।
आ तिष्ठति रथमिन्द्रस्य सखा विव्दान् एना सुमतिं यातिं अच्छ ॥ २ ॥

स्वत:च्या बोटानी पाटयावर वाटून सोमरस काढणारे ऋत्विज हिरव्यागार सोमरसाला अभिषुत करतात. वायुवेगाचा घोडा संग्रामात रथाला जोडला की जसा वेगाने धावतो त्याप्रमाणे शुद्ध संस्कारयुक्त होण्यासाठी सोमरस गाळण्यातून वेगाने उतरू लागतो. त्यानंतर पवमान होऊन इन्द्रसखा पवमान सोम चेतनवंत प्राज्ञ होऊन स्तुति करणाऱ्या ऋत्विजांच्याकडे येतो.

स नो देव देवताते पवस्व महे सोम प्सरस इन्द्रपान: ।
कृण्वन् अपो वर्षयन् द्यामुतेमामुरोरा नो वरिवस्या पुनान: ॥ ३

हे सोमदेव, तुम्ही पवमान होऊन इंद्राचे प्रिय पेय रूप घेता तसेच देवानी विस्तृत केलेल्या यज्ञात इन्द्राचे पेय होण्यासाठी पात्रात स्थिर रहाता. तुम्ही

अंतरिक्षात जल निर्माण करता. तसेच द्युलोकात व पृथ्वीवर पाऊस पाडता. तुम्ही पवमान होऊन ऋत्विजाना धन साधन देता.

अजीतये अहतये पवस्व स्वस्तये सर्वतातये बृहते ।
तदुशन्ति विश्व इमे सखाय: तदहं वश्मि पवमान सोम ॥ ४ ॥

हे पवमान सोम, तुम्हीं आमच्या विस्तृत सोमयागात आम्ही शत्रूकडून जिंकले जाणार नाही अथवा आमचा नाश होणार नाही अशा प्रकारे पवमान व्हावे. आमचा विस्तृत सोमयाग कल्याणकारी होवो. विश्वातील स्तुति करणारे सर्व मित्रजन तुमच्या रक्षणाची आशा ठेवतात. म्हणून आम्ही त्या पवमान सोमाच्या प्राप्तीची इच्छा करीत आहोत.

सोम: पवते जनिता मतीनां जनिता दिवो जनिता पृथिव्या: ।
जनिता अग्नेर्जनिता सूर्यस्य जनिता इन्द्रस्य जनिता उत विष्णो: ॥ ५ ॥

पवमान होणारा सोम हा मतींचा जन्मदाता आहे. द्यावा पृथिवीचा निर्माता आहे. अग्नि व सूर्य यांचा निर्माता आहे इन्द्र व विष्णूचा जनयिता आहे.

ब्रह्मा देवानां पदवी: कवीनाम् ऋषिर्विप्राणां महिषो मृगाणाम् ।
श्येनो गृध्राणां स्वधितिर्वनानां सोम: पवित्रं अत्येति रेमन् ॥ ६ ॥

देवांनी जेव्हा सृष्टीच्या निर्माण काली सोमयाग केला तेव्हा सोम ब्रह्मा झाले होते. सोम क्रान्त द्रष्टा आहे. मृग जनात तो महिष आहे. बलवानात राजा आणि पक्षांच्यात प्रशस्य श्येन आहे. वनातील वृक्षांना छेदणाऱ्या कुऱ्हाडीसारखा सोम तीक्ष्ण मानला जातो.

प्रावीविपद् वाच उर्मि न सिंधुर्गिर: सोम: पवमानो मनीषा: ।
अन्त: पश्यन् वृजना इमा अवराणि अतिष्ठति वृषभो गोषु जानन् ॥ ७ ॥

हा पवमान सोम रुचिकर वाणीला प्रेरणा देतो. ज्याप्रमाणे प्रवाह बद्ध वहाणाऱ्या नद्या जलतरंगाना प्रेरक असतात त्याप्रमाणे सोम वाणीचा प्रेरक आहे. कामना तृप्त करणारा हा सोम अंतरीचे गुपित जाणणारा आहे. हलक्या प्रकारच्या शत्रूनी घेरलेल्या गायींची स्थाने जाणणाऱ्या वृषभासारखा सोम अंतरात प्रवेश करतो.

स मत्सर: पृत्सु वन्वन् अवात: सहस्त्ररेता अभि वाजमर्ष ।
इन्द्राय इन्दो पवमानो मनीषी अंशो: ऊर्मिम् ईर्स्य गा इषण्यन् ॥ ८ ॥

उत्साह प्रेरक असा हा सोम रणांगणात चौफेर युद्ध करतो. वायुप्रमाणेच याच्या वेगासही कोणी अडवू शकत नाही. सहस्त्रधारानी वहाणारा सोम शत्रूच्या बलास पुरून उरतो. हे इन्द्र सोम, तुम्ही पवमान होऊन शब्दाना प्रेरणा देता. त्या इन्द्रास, सोमाच्या अंशु किरणासा प्रेरणा द्या.

परि प्रिय: कलशे देववात इंद्राय सोमो रण्यो मदाय ।
सहस्त्रधार: शतवाज इंदुर्वाजी न सप्ति: समना जिगाति ।।९।।

प्रिय देवांच्यासाठी गतिमान होणारा रमणीय सोम इंद्राचा उत्साह वाढवण्यासाठी हजार धारातून शेकडो चमकते चंद्र होऊन पात्रातून वहात राहो. वेगवान घोडा संग्रमाकडे धाव घेतो त्या प्रमाणे योद्धा सोमासह गतिमान होतो.

स पूर्व्यो वसुवित् जायमानो मृजानो अप्सु दुदुहानो अद्रौ ।
अभिशस्तिपा भुवनस्य राजा विदद् गातुं ब्रह्मणे पूयमान: ।।१०।।

पूर्वींच्या ऋषींनी ज्या सोमाला अभिषुत केला आहे, जो वसु-वसविण्यास योग्य वस्तूंचा जाणकार असून धनलाभ करून देणारा आहे, जो रात्री भरून ठेवलेल्या वसतीवरीच्या जलाने शुद्ध होतो, जो पाटयावर वाटला जात असता दुधासारखा स्त्रवू लागतो, मित्रांचे शत्रूच्या हिंसेपासून जो रक्षण करतो, आणि सर्व लोकांचा जो राजा आहे तो सोम ब्रह्मकर्मासाठी पवित्र होऊन यजमानास उत्तम मार्ग दाखवतो.

त्वया हि न: पितर: सोम पूर्वे कर्माणि चक्रु: पवमान धीरा: ।
वन्वन् अवात: परिधीन् अपोर्णु वीरेभि: अश्वै: मघवा भवा न: ।।११।।

हे पवमान सोम, अंगिरा कुलातील पूर्वीचे ऋषि तुमच्या साह्याने अग्निष्टोमा सारखे सोम याग चांगल्या प्रकारे करू शकले. आमचे पुरातन पितर कर्म करण्यात कुशल होते. वीर अश्वांच्यासह तुम्ही आमचे मघवा होऊन रहा.

यथा अपवथा मनवे वयोधा अमित्रहा वरिवोविद् हविष्मान् ।
एवा पवस्व द्रविणं दधान इंद्रे संतिष्ठ जनय आयुधानि ।।१२।।

हे पवमान सोम तुम्ही प्रथम मनुराजासाठी अन्नधारक, त्याच्या शत्रूंचे विनाशक, धनलाभ करून देणारे पवमान गतिशील झाला होता. त्याच प्रमाणे आम्हालाही धन साधने देऊन पवमान व्हा. त्याच प्रमाणे आम्ही दिलेली आहुति स्वीकारुन इंद्राच्या साह्याला जा. त्याची आयुधे तेजस्वी करा.

पवस्व सोम मधुमान् ऋतावा अपो वसानो अधि सानो अव्ये ।
अव द्रोणानि घृतवान्ति सीद मदिन्तमो मत्सर इन्द्रपान: ।।१३।।

हे पवमान सोम तुम्ही मधुर रसाने पूर्ण, ऋतवान व सदाचारी आहात. वसतीवरीच्या पाण्याबरोबर एकधना नावाच्या पात्रात सभर होऊन गाळणीत तुम्ही उसळता व तेथूनच पवमान होता.
त्याचप्रमाणे तुम्ही उत्साह प्रेरक होऊन इंद्रासाठी सिद्ध केलेल्या जल पानाच्या द्रोण कलशात वास करता.

वृष्टिं दिवः शतधारः पवस्व सहस्त्रसा वाजयुर्देववीतौ ।
सं सिंधुभिः कलशे वावशानः समुस्त्रियाभिः प्रतिरन् न आयुः ॥ १४ ॥

हे सोम तुम्ही अंतरिक्षातील जलाचा शतधारानी वर्षाव करा. ज्या सोमयागांत यजमान देवांना हवि देतात त्या यजमानाना सहस्त्र धारानी धन द्या. त्या यजमानासाठी अन्नाची कामना ठेवणाऱ्या देवा, तुम्ही वसतीवरीच्या जलातून द्रोणकलशात भरून रहा. गाईचे दूध, तूप दही वगैरेत वास करुन आमचे आयुष्य वाढवा.

एष स्य सोमो मतिभिः पुनानो अत्यो न वाजी तरति इत् आरातीः ।
पयो न दुग्धं अदितेः इषिरम् उरु इव गातुः सुयमो न वोळहा ॥ १५ ॥

हा प्रसिद्ध सोम मतिच्या आधारे पवमान, शुद्ध आणि गतिशील झाला आहे. हा गतिमान अश्वाप्रमाणे संग्रामात शत्रूला पार करून जातो. ज्याप्रमाणे अदिती कामधेनूचे दूध काढल्याने ती शुद्ध होते त्याप्रमाणे सोम रस काढल्याने शुद्ध होतो. शिवाय विस्तृत मार्गावर सर्व प्रकारचा भार वहाणारे घोडे वश होऊन रहातात तसा सोम ऋत्विजाना वश होऊन राहातो.

स्वायुधः सोतृभिः पूयमानो अभ्यर्ष गुह्यं चारु नाम ।
अभि वाजं सप्तिरिव श्रवस्या अभि वायुम् अभि गा देव सोम ॥ १६ ॥

हे पवमान सोम, ज्यांच्याकडे सोमाला पवमान करण्यासाठी वाटण्याची, गाळण्याची दहा साधने असतात त्या ऋत्विजानी शुद्ध, पवमान केलेले सोम गुप्त रहस्यमय रसाने परिपूर्ण होऊन वेगवान अश्व चंदी खाण्यासाठी धाव घेतो त्याप्रमाणे तुम्ही अभिषुत सोम, प्राण चेतना घेऊन आमच्या पशूंच्या संनिध या.

शिशु जज्ञानं हर्यतं मृजन्ति शुम्भन्ति वन्हि मरुतो गणेन ।
कविर्गीभिः काव्येना कविः सन् सोमः पवित्रमत्येति रेभन् ॥ १७ ॥

नवजात बालकाप्रमाणे अभिषुत झालेल्या या हिरव्या सोमरसाला मरुत पवन शुद्ध करतो. शुद्ध रसात वहाणाऱ्या सोमाला सात सात मरुत शोभवतात. क्रांतद्रष्टया कविप्रमाणे काव्यासारखा मधुर शब्द करीत स्तुतिवचना सहित सोम पवमान होतो.

ऋषिमना य ऋषिकृत् स्वर्षाः सहस्त्रणीथः पदवीः कवीनाम् ।
तृतीयं धाम महिषः सिषासन् सोमो विराजमनु राजति ष्टुप् ॥ १८ ॥

ज्यांचे मन व रूप ऋषिसारखे आहे असा हा पवमान सोम स्वर्गातून वहात आहे. ऋत्विज हजार परींनी याची स्तुति करीत आहेत असा हा पवमान सोम आहे. तो महान असून पूजनीय आहे. तीसऱ्या द्युलोकाच्या धामातून नहात असता जी स्तुति होते त्यामुळे विशेष प्रसन्न होऊन तो इन्द्राला प्रकाश देतो.

चमूषत् श्येन: शकुनो विभृत्वा गोविन्दु र्द्रप्स आयुधानि बिभ्रत् ।
आपाभूर्मि सचमान: समुद्रं तुरीयं धाम महिषा विवक्ति ॥ १९ ॥

जो सोम वाटण्यासाठी पाटयावर ठेवलेला आहे, जो श्येन पक्षासारखा शक्तीने विहार करतो, जो यजमानाला गायी मिळवून देतो, जो रसरूप होऊन यज्ञाची आयुध धारण करतो, जो सोम सागराला शोभवतो तो महान पूज्य सोम सूर्य लोकापासून चौथ्या धामात, अर्थात् चंद्र लोकात रहातो.

मर्यो न शुभ्र: तन्वं मृजाना अत्यो न सृत्वा सनये धनानाम् ।
वृषेव यूथा परि कोशमर्षन् कनिक्रदत चम्वो: आ विवेश ॥ २० ॥

हा सोम शुद्ध दैदिप्यमान होऊन मानवाप्रमाणे वसतीवरीच्या जलाने स्नान करतो. यजमानाला धनसाधने मिळवून देण्यासाठी तो वेगाने धाव घेतो. वृषा बैल जसा गायींच्या कळपात हंबरतो तसा गाळण्यातून द्रोण कलशात पडताना सोम मधुर शब्द करतो व नंतर तो द्रोण, कलश आणि एकधना पात्रात प्रवेश करतो.

पवस्व इन्दो पवमानो महोभि: कनिक्रदत् परि वाराणि अर्ष ।
क्रीलन चम्वो: आ विश पूयमान इन्द्रं ते रसो मदिरो ममत्तु ॥ २१ ॥

हे इंन्द्र सोम, पूज्य ऋत्विज पवमान शुद्ध करतात तेव्हा तुम्ही गाळणीतून वाहू लागता. मधुर शब्द करीत शुद्ध होऊन वहात चमू पात्रात तुम्ही खेळत खेळत प्रवेश करता. तुमचा तो उत्साहप्रेरक सोमरस इन्द्रास प्रसन्न करो.

प्रास्य धारा बृहती: असृग्रन् अक्तो गोभि: कलशान् आ विवेश
साम कृण्वन् सामन्यो विपश्चिच क्रन्दन् एति अभित् सख्युर्न जामिम् ॥२२॥

सोमरसाच्या मोठाल्या धारा अभिषुत होऊन शुद्ध होत आहेत. सोम गाईचे दूध, तूप, दही वगैरेत मिसळून द्रोण कलशात प्रवेश करतो. साम गान करणारा कुशल उद्गाता मधुर सामगानाने देवांना प्रसन्न करतो त्याप्रमाणे हा सोमरस गाळणीतून कलशात पडताना मधुर शब्द करतो. तो जणु स्वत:च सामगायक होऊन सामगान रचतो. प्रियतम प्रियेला भेटावा तशा उत्कटतेने तो कलशात प्रवेश करतो.

अपघ्नन् एषि पवमान शत्रुन् प्रियां न जारो अभिगीत इन्दु: ।
सीदन् वनेषु शकुनो न पत्वा सोम: पुनान: कलशेषु सत्ता ॥२३॥

हे पवमान सोम, ऋत्विज तुमची स्तुति करतात तेव्हा तुम्ही द्रोणकलशात इन्दु रुपाने स्त्रवता. ज्याप्रमाणे प्रियकर आपल्या जायेला त्रास देणाऱ्या शत्रूशी सामना करतो त्याप्रमाणेच शत्रूंशी झुंजून त्यांचा संहार करून तुम्ही द्रोण कलशात

प्रवेश करता, ज्याप्रमाणे वनात उडणारे पक्षी वृक्षावर निवास करतात, त्याप्रमाणे सगळीकडे गति करून, शुद्ध होऊन तुम्ही द्रोण कलशात वास करता.

आ ते रुचः पवमानस्य सोम योषेव यन्ति सुदुघाः सुधाराः ।

हरिरानीतः पुरुवारो अप्सु अचिक्रदत् कलशे देवयूनाम् ।। २४ ।।

माता ज्याप्रमाणे बाळाला दूध पाजते त्याप्रमाणे हे सोम तुम्ही पवमान होता, तेव्हा यजमानाच्या इच्छा पूर्ण करणाऱ्या रसधारा दैदीप्यमान होऊन द्रोण कलशात पडतात. वाटला गेल्यामुळे अभिषुत झालेला हा सोमरस ऋत्विजांना अनेक परीनी प्रिय आहे. वसतीवरीच्या जलात मिसळून देवरुप धारण करण्याच्या इच्छेने यजमानाच्या द्रोण कलशात तो सोम मधुर शब्द करीत प्रवेशतो.

## पुरुष सुक्त

(ऋग्वेद दशम मंडल : ९० वे सूक्त ऋचा १६)

सहस्त्रशीर्षा पुरुषः सहस्त्राक्षः सहस्त्रपात् ।

स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद् दशांगुलम् ।। १ ।।

सर्व प्राण्यांचा समष्टिरुप ब्रह्मांड देह आहे. त्या देहातील विराट पुरुषास हजार मस्तके, हजार नेत्र व हजार चरण आहेत, तो पुरुष सर्व भूमीस व्यापून दशदिशांच्याहून एक एक अंगुली मोठा असा आहे.

पुरुष एवेदं सर्वं यद्भूतं यच्च भव्यम् ।

उतामृतत्वस्येशानो यदन्नेनातिरोहति ।। २ ।।

हे वर्तमान जगत जे आहे ते, भूतकालात ते जे होते ते व भविष्यकालात ते जसे होणार आहे ते सर्व या पुरुषात सामावलेले आहे. तो अमृत तत्वाचा स्वामी असून अन्नाने वृद्धि पावणारा आहे.

एतावानस्य महिमातो ज्यायांश्च पुरुषः ।

पादो ऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ।। ३ ।।

त्रिकाल व्यापी पुरुष हा त्याचा मर्यादित महिमा असून तो स्वतः त्याहून ारच मोठा आहे. या विश्वातील सर्व प्राणी त्याच्या एका चरणात सामावलेले आहेत. त्याचे बाकीचे चरण अविनाशी अमृत रूपाने निजप्रकाशित आकाशात शेष रूपाने भरून राहिलेले आहेत.

त्रिपादूर्ध्व उदैत् पुरुषः पादो ऽस्येहा भवत् पुनः ।

ततो विष्वङ् व्यक्रामत् साशनानशने अभि ।। ४ ।।

ज्याचे तीन चरण शेष आहेत असा तो विराट पुरुष स्वतःच्या प्रकाश आकाशात उंच उंच रहातो. त्याचा जो एक चरण ब्रम्हांडात प्रगट होतो त्यात सर्व चराचराला व्यापून तो एकटा राहिलेला आहे.

तस्माद् विराळजायत विराजो अधि पूरुषः ।
स जातो अत्यरिच्यत पश्चाद्भूमिमथो पुरः ।। ५ ।।

त्या आदिपुरुषातून ब्रम्हांडरूप समष्टि पुरुष जन्म घेतो. म्हणून त्या ब्रम्हांडास विराट म्हणतात. त्या विराट देहाची रचना करून त्यात निवास करणाऱ्या चेतन पुरुषाला आद्यपुरुष जीवात्मा म्हटले आहे. तो जन्मताच, देव, मनुष्य, पशु, पक्षी सर्वच रुपे व्यापून टाकतो. याप्रमाणे त्याने स्वतःच्या निवासासाठी प्रथम ब्रम्हांडाची रचना केली व नंतर चेतनवती जीव सृष्टि निर्माण केली.

यत् पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत ।
वसन्तो अस्यासीदाज्यं ग्रीष्म इध्मः शरद्धविः ।। ६ ।।

वर दर्शवलेल्या क्रमाप्रमाणे सर्व शरीरे निर्माण केल्यावर बाकीच्या सृष्टीच्या रचनेसाठी दुसरी द्रव्ये नसल्याने पुरुषाला हविद्रव्ये देऊन सृष्टि रचना रुपी यज्ञाचा विस्तार देवानी केला. त्याकाळी वसंतऋतु घृत, ग्रीष्म इंधन व शरद ऋतु हवि रुपाने निर्माण केला.

तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन् पुरुषं जातमग्रतः ।
तेन देवा अयजन्त साध्या ऋषयश्च ये ।। ७ ।।

सृष्टि सृजनाच्या आधी जन्मलेल्या पुरुषाला यज्ञरुप बनवून त्याला यज्ञाचा पशु समजून यज्ञस्थानी असलेल्या यूपाला–वधस्तंभाला बांधून देवानी त्याला अभिषेक केला तसेच प्रजापति वगैरेनी यज्ञपुरुषाच्या योगाने यज्ञाची रचना केली.

तस्माद् यज्ञात् सर्वहुतः संभृतं पृषदाज्यम् ।
पशून् तान् चक्रे वायव्यानारण्यान् ग्राम्याश्च ये ।। ८ ।।

आदिपुरुष स्वतः यज्ञरुप होऊन सर्व आहुति रुपही तोच झाला. त्यातून दधिमिश्रित घृत निर्माण झाले. त्याचप्रमाणे वायु ज्यांचा अधिष्ठाता देव आहे ते पशु निर्माण झाले. वनातील वन्य पशु हिंसक झाले व वस्तीत रहाणारे ते पाळीव पशु झाले.

तस्माद् यज्ञात् सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे ।
छन्दांसि जज्ञिरे तस्माद् यजुस्तमादजायत ।। ९ ।।

सर्व आहुति रुप यज्ञपुरुषा पासून ऋचा, साम गाने, सर्व छंद व यजु प्रगट झाले.

तस्मादश्वा अजायन्त ये के चोभयादतः ।
गावो ह जज्ञिरे तस्मात् तस्माज्जाता अजावयः ।।१०।।

सर्व आहुति रुप यज्ञपुरुषापासून अश्वासारखे पशु जन्मले. तसेच गायी, शेळ्या, मेंढ्या वगैरे पशु पण निर्माण झाले.

यत् पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन्।

मुखं किमस्य कौ बाहू का उरु पादा उच्येते ॥११॥

प्रजापतिच्या प्राणरुप देवांनी जेव्हा संकल्पाने विराट पुरुषाची कल्पना करून त्याची रचना केली तेव्हा त्याचे किती विभाग केले ? त्या पुरुषाचे मुख कोणते ? हात, पाय, चरण वगैरे कसे होते ?

ब्राह्मणो ऽस्य मुखमासीद् बाहू राजन्यः कृतः।

उरु तदस्य यद् वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ १२ ॥

त्या सर्वहूत यज्ञ पुरुषाच्या विराट देहात ब्राह्मण मुख रुपाने, क्षत्रिय त्याचे बाहू, वैश्य पाय (मांड्या) व शूद्र (चरण) रूपात सामाववले आहेत.

चन्द्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत।

मुखादिन्द्र श्चग्निश्च प्राणाद् वायुरजायत ॥ १३ ॥

त्याचप्रमाणे देवही त्याच्यापासूनच निर्माण झाले. मनापासून चंद्रमा-नेत्रातून सूर्य, मुखातून इंद्र व अग्नि आणि प्राणातून वायु निर्माण झाला.

नाभ्या आसीदन्तरिक्षं शीर्ष्णो द्यौः समवर्तत।

पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात् तथा लोकान् अकल्पयन् ॥ १४ ॥

देवानी त्या आदिपुरुषाच्या नाभीपासून अंतरिक्ष रचले, मस्तकातून दिव्य स्वर्ग लोक निर्माण केला. चरणापासून भूमि व कानातून दिशा याप्रमाणे देवानी वेगवेगळ्या लोकांची कल्पना केली.

सप्तास्यासन् परिधयस्त्रिः सप्तसमिधः कृताः

देवा यद् यज्ञं तन्वाना अबध्नन् पुरुषं पशुम् ॥ १५ ॥

देवानी ज्या यज्ञाचा संकल्प केला होता त्या यज्ञात इष्टि आहवनीय यज्ञाच्या तीन परिधी, उत्तर वेदिच्या तीन व आदित्य रुपाची एक परिधी लागते. त्यासाठी सात छंदांनी या परिधी तयार केल्या. जसे बारा महिने, पाच ऋतु, तीन लोक व एकवीस आदित्य त्याप्रमाणे यज्ञाला एकवीस समिधा लागतात. त्यांची रचना केली. याप्रमाणे देव यज्ञाचा विस्तार करीत असता विराट पुरुषालाच यज्ञ पशु कल्पून यूपावर बांधीत होते. अर्थात त्या विराट पुरुषाने आत्माहुति देऊन या सर्व लोकांची रचना केली.

यज्ञेन यज्ञमयजन्त देवा स्तानि धर्माणि प्रथमान्यासन्।

ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः ॥ १६ ॥

सर्व देवानी त्या यज्ञ पुरुषाची कल्पना करून जीवन यज्ञाचे यजन केले होते. विश्वाची धारणा ज्या प्रथम रहस्य धर्मावर झाली त्याची याप्रमाणे स्थापना केली

होती. युगानु युगाचे देव ज्याच्या ठायी वसत आहेत तेथे परमपुरुषाचा महिमा गाणारे उपासक, भक्तजन वास करतात.

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडलात ९० व्या सूक्ताचे ऋषि नारायण देव: पुरुष. छंद: पहिल्या १५ ऋचा अनुष्टुप व १६ व्या ऋचेचा त्रिष्टुप छंद आहे. 'पुरुष सूक्त' म्हणून हे सूक्त फार प्रसिद्ध आहे. यजुर्वेदाच्या एकतिसाव्या अध्यायात हेच ऋषि, देव व मंत्र असलेले सूक्त आहे. मंत्राच्या क्रमात व काही शब्दात थोडासा बदल आहे. जसे पहिल्या ऋचेत 'विश्वतो वृत्वा' ऐवजी 'सर्वत: स्पृत्वा' ११ व्या ऋचेचत 'मुख किमस्य कौ बाहू' ऐवजी 'मुखं किमस्यासित् कि बाहू' आहे. यथे ६ वी ऋचा आहे ती तेथे १४ वी, ७ वी आहे ती ९ वी आहे त्यामुळे येथे ८, ९, १० या क्रमाने आलेल्या ऋचा यजुर्वेदात ६, ७, ८ या क्रमाने येतात.

ऋग्वेदातील ऋचा आणि यजुर्वेदाच्या मंत्रात अर्थ लावण्याची रीत पण क्रिया करण्याच्या दृष्टीने जरा वेगळी आहे असे दिसून येते. सोमवेदातही ऋग्वेदाच्या पाच ऋचा सहस्त्रशीर्षा ० त्रिपादूर्ध्व ० पुरुष ० तावानस्य महिमा ० ततो विराड ० या क्रमाने आरण्यक कांडाच्या सहाव्या अध्यायाच्या चौथ्या खंडात घेतलेल्या दिसतात. तसेच अथर्ववेदात पंधरा ऋचा १९ व्या कांडाच्या सहाव्या सूक्तात 'जगद् बीज पुरुष' या शीर्षकाखाली घेतलेल्या आहेत. सोळाव्या ऋचेच्या ऐवजी मूर्ध्नो देवस्य हा मंत्र आहे. यात पाठ भेदही आढळतात. जसे 'त्रिपादूर्ध्व उदैत' ऐवजी त्रिभी: पद्भिद्यामरोहत्' हा मंत्र आहे. 'बर्हिषि प्रौक्षन्' ऐवजी 'प्रावृषा प्रौक्षन' तस्माद् बिराऽ जायत' ऐवजी बिराऽग्रे समभवद्' हे पाठ लक्षात येण्यासारखे आहेत.

पुरुषसूक्ताच्या सोळा मंत्राप्रमाणे पूजनाचे सोळा प्रकार, षोडषोपचार पूजन व अभिषेक करतात. रोजच्या नित्यपाठातही या सूक्ताचा समावेश होतो.

## राष्ट्रशक्ति सूक्त

(दहावे मंडल, सूक्त १२५ वे. ऋचा ८ ऋषि : वांगाभृणी, देव : आत्मा, छंद : त्रिष्टुप. दुसरी ऋचा जगती.)

सायणाचार्यांनी सांगितले आहे, 'वाणी नावाची ब्रह्मविदुषि या सूक्तात आत्मभावाची स्तुति करीत आहे. सर्वगत परमात्म्याशी ती स्वत: एकरुपता अनुभवीत असल्यामुळे सर्व जगताच्या रुपाने, सर्वांचे अधिष्ठान मी स्वत: सर्वरूप आहे अशा भावाने ती स्वत:च स्वत:ची स्तुति करीत आहे.

श्रीमद् भगवद्गीतेमधे श्रीकृष्ण स्वत:ला सर्वगत परमात्मा म्हणून स्वत:चा परिचय करून देतो, 'मी सर्वांचा प्रभव आहे, म्हणजे मी सर्वरुप होतो (१०-८)

' मी सर्व यज्ञांचा भोक्ता व प्रभु आहे (९–२४) असे सांगून भगवान कृष्ण अर्जुनाला अहंपुरुषाचे दर्शन करवितात. त्याप्रमाणे या वैदिक सूक्तात अहंशक्तीचे दर्शन करविले आहे.

अहं रुद्रोभिः वसुभिश्चरामि । अहमादित्यैरुत विश्वदेवैः ।

अहं मित्रावरुणोभा बिभर्मि । अहमिन्द्राग्नौ अहमश्विनोभा ।

या सूक्ताची ऋषि वाणी विश्वरुप राष्ट्रभावाचा अनुभव करणारी रुद्रोभिः–अकरा रुद्रांच्या भावाने, वसुभिः– आठ वसूंच्या भावाने– वावरते आहे. मी बारा आदित्य, उत आणि अनेक विश्वगत देवांच्या भावाने मित्र व वरुण या देवांच्या भावाने, मी इंद्र व अग्नि तसेच उभय अश्विनीकुमार या सर्वांना एक विश्वरूप-भावाने आत्मभाव जागृत झाल्याने मी एका राष्ट्रास धारण करते.

राष्ट्राच्या रक्षणासाठी आपली दिव्य शक्ति देणाऱ्या देवात मुख्यत्वे अकरा रुद्र, आठ वसु, बारा आदित्य, व विविध विश्वेदेव आहेत. त्या सर्वांच्यात आत्म-भावाने राष्ट्राचे संरक्षण करण्याची भावना जागृत करून मी स्वतः राष्ट्रशक्तीच त्या त्या देवाच्या द्वारे सर्वत्र संचार करते. त्याचप्रमाणे दिवसाचा देव मित्र व रात्रीचा देव वरुण. मासाच्या दोन पक्षांचे दोन देव इंद्र व अग्नि व ऋतु ऋतुंचे देव अश्विनीकुमार या सर्वांना मी राष्ट्रभावनेने धारण करते. राष्ट्राचे रक्षण सकाळ, संध्याकाळ अहोरात्र, शुक्ल–कृष्ण पक्ष व संवत्सराच्या सर्व ऋतुंत सर्वकाळ व्हावे म्हणून मी त्या देवतांच्या रुपात कालालाही धारण करते.

अहं सोममाहनसं बिभर्मि । अहं त्वष्टारमुत पूषणं भगम् ।

अहं दधामि द्रविणं हविष्मते । सुप्राव्ये यजमानाय सुन्वते ।। २ ।।

आहनसम्–खलबत्त्यात कुटून रस रूपाने तयार केलेले सोम, त्याला, त्वष्टारम्–देवांचा कारागीर त्वष्टा, त्याला, शिवाय पूषणं–पूषादेवाला. भगम्–भगदेवाला, हविष्मते–यज्ञयागादि परोपकाराच्या कामात हविद्रव्य साधन सामग्री तयार करण्यास, सुप्राव्ये–ती द्रव्ये उत्तम प्रकारे उपयोगात आणणाऱ्यास, सुन्वते सोमरस तयार करणारास, यजमानाय–यज्ञ कार्य करणारासाठी द्रविणंदधामि–फल धारण करते.

राष्ट्रहितासाठी जो मधुर सोमरस तयार करावयाचा आहे, जो राष्ट्रीय जीवनात अमी रसाचे सिंचन करतो, तो जीवनरस मी धारण करते. शिवाय राष्ट्रातील कारागीर, त्वष्टा, पूषा, भग हे समाजाची सेवा करणारे देव, त्यांनाही मी धारण करते. राष्ट्र सेवेसाठी जे यजमान व सेवक सिद्ध होतात त्यांच्यातील काही साधने सज्ज करतात. काही ती साधने सेवा करणाऱ्याकडे पोचवतात तर काही राष्ट्रीय

जीवनात जीवन रसाच्या अमृताचे सिंचन करतात. हे सर्वच राष्ट्रहित करणारे यजमान आहेत. त्यांच्या सत्कार्याचे उत्तम फल त्यांना मिळावे म्हणून मी राष्ट्र भावाने त्या फलरूप द्रव्याला धारण करते.

अहं राष्ट्री संगमनी वसूनाम् । चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।
तां मा देवा व्यदधुः पुरुत्रा । भूरिस्थात्रां भूर्यावेशयन्तीम् ॥३॥

राष्ट्री–राष्ट्र भावाने जागृत झालेली शक्तीची भावना. वसूनाम्–विविध साधन सामुग्री. संगमनी–गोळा करणारी. चिकितुषि–प्रत्यक्ष रुपाने रुजु होणारी' यज्ञियानाम्–यज्ञ परोपकार करण्यासाठी तयार झालेल्या सेवकातील. प्रथमा–पहिली. ता–त्या प्रकारे प्रसिद्ध. मा–मला, देवा–देवानी. पुरुत्रा–परोपरीने भूरि स्थात्राम्–पदार्थांत रहाणारी. भूरि-आवेश यन्तीम–चेतना रुपाने अनेकात प्रवेश करणारी. व्यदधुः–केली आहे.

मी स्वतःच राष्ट्राचे संरक्षण करणारी राष्ट्रशक्ति आहे. विविध प्रकारच्या योग्य वस्तू जमविण्याची शक्ति माझ्यात आहे. ही राष्ट्रशक्ति अदृश्य रहात नाही. पण तिचे प्रत्यक्ष दर्शन एकेका व्यक्तीत होत रहाते. राष्ट्राच्या यज्ञ–परोपकाराच्या भावनेत काया वाचा मनाने सेवा करून, सेवा व्रत धारण करणाऱ्या सर्व व्यक्तींना जोडणाऱ्यात ही राष्ट्रशक्ति प्रथम आहे. अग्रेसर आहे. या शक्तीस परोक्ष रितीने चेतना देणारे देव, इन्द्र, अग्नि, सोम, वसु, रुद्र, आदित्य, विश्वेदेव, वगैरे राष्ट्र शक्तीस सत्ता व चेतना देत रहातात. राष्ट्राच्या स्थूल भौतिक पदार्थांत ही शक्ति सत्ता रुपाने तसेच सर्व प्राण्यात व माणसात ती चेतना रुपाने वसत असते. म्हणून सर्व देव स्थूल पदार्थातील सत्ता व जिवंत पदार्थांतील चेतना राष्ट्रास व्यापक परोपकारी कार्यासाठी सक्रीय बनवतात.

मया सा अन्नमत्ति यो विपश्यति । यः प्राणिति य ईं श्रृणोत्युक्तम्
अमन्तवो मां त उप क्षियन्ति । श्रुधि श्रुत श्रद्धिवं ते वदामि ॥४॥

यः जो अन्नमत्ति–अन्न खातो, यः विपश्यति–जो पहातो. यः प्राणिति–जो प्राण घेतो, यः ई उक्तम श्रृणोति–जो सांगितलेले ऐकतो, मया–माझ्या प्रेरणेने माम्–अमन्तवः– राष्ट्रशक्तीच्या भावातील माझ्या चेतनेस जे मानीत नाहीत ते उपक्षियन्ति–नाश पावतात. श्रुत–विद्वान श्रुधि–ऐक श्रद्धि–वम्–श्रद्धेने मिळवता येते ते वदामि–सांगते.

या विश्वभावनेने राष्ट्रातील जी जी व्यक्ति शरीर पोषणासाठी अन्न भक्षण करते. मनाच्या संतोषासाठी ज्ञानाचे दर्शन करते, जीवन धारणेसाठी श्वासोश्वास घेते, वेदाने सांगितलेले आत्मशांतिसाठी ऐकते. या प्रकारच्या सर्व स्थूल,

सूक्ष्म क्रिया प्रक्रियांची प्रेरणा माझ्यातूनच जागत असते. राष्ट्रशक्तिचे पोषण, संतोष व शांतीचे कार्य करणाऱ्या माझी ही प्रक्रिया अदृश्य रुपाने चाललेली असते. त्यामुळे कित्येक स्थूल दृष्टीने पहाणारे चिंतक माझी राष्ट्रव्यापक शक्ति जाणू शकत नाहीत आणि या राष्ट्रशक्तीचा निषेध करीत रहातात. असे उथळ दृष्टीचे अज्ञानी लोक स्वत:चा नाश करून घेतात. म्हणून हे बहुश्रुत विद्वाना तू या लोकांचे ऐकू नको. परंतु मी तुला जे रहस्य सूक्ष्म रितीने सांगते आहे ते नीट ऐकून घे. जिच्याबर निरंतर श्रद्धा ठेवावी अशी एक राष्ट्रभावनाच काय ती आहे. त्या राष्ट्रभावनेनुसार मी राष्ट्रशक्ति कार्य करीत असते. त्यातील गुप्त रहस्ये मी तुला सांगते.

अहमेव स्वयमिदं वदामि । जुष्टं देवेभिरुत मानुषेभि: ।
यं कामये तं तमुग्रं कृणामि । तं ब्राह्मणं तमृषिं ते सुमेधाम् ॥ ५ ॥

अहम् एवं स्वयं– मी स्वत:च वदामि– सांगते देवेभि: उत मानुषेभि: । देव आणि मानवांच्याकडून जुष्टम् जतन केलेले यम् कामये जे मला प्रिय आहेत. तम् तम् त्याला त्याला उग्रम–उग्र ब्रह्माणम् ब्रह्मा. ऋषिम्–ऋषि. सुमेधाम्–बुद्धिशाली कृणोमि–करते.

विश्वभावनेला पोषक अशा राष्ट्रसंघाला देवानी सूक्ष्मरीतीने व मानवाने स्थूल रीतीने जतन केले आहे, म्हणून राष्ट्राचे संरक्षण दोन्ही प्रकारे होत आले आहे. मी हे रहस्य जाणते म्हणूनच हे गुपित मी स्वत:च तुला सांगते आहे. खरे म्हणजे जी राष्ट्रभावना माझ्या ठिकाणी चेतनशक्ति रुपाने जागृत झाली आहे. तिच्याच प्रेरणेच्या जोरावर मी वेगवेगळया कामना बाळगीत आहे. माझ्या या कामना मी स्वत: पूर्ण करीत नाही. परंतु या राष्ट्रातील संरक्षण कार्यात उत्साह असणाऱ्याना उग्र–उत्साहयुक्त करून ज्या व्यक्ति ब्रह्माप्रमाणे राष्ट्र सर्जनाचे काम करीत असतील त्यांना मी ब्रह्मा बनवते. ज्या व्यक्ति ऋषींच्याप्रमाणे क्रांती करीत असतील त्यांना ऋषी व ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रात काम करणाऱ्यांना विज्ञानी बनवते (व त्यांच्या द्वारे त्या कामनांची पूर्ती करवून घेते).

अहं रुद्राय धनुरा तनोमि । ब्रह्मद्विषे शरवे हन्तवा उ ।
अहं जनाय समदं कृणोमि । अहं द्यावापृथिवी आ विवेश ॥ ६ ॥

रुदाय– रुद्रासाठी. धनु: – धनुष्य आतनेमि– चढवते. ब्रह्मद्विषे–व्यापक राष्ट्रभावनेचा द्वेष करणाऱ्यांसाठी. शरवे–हिंसक. हन्तवै–मारण्यासाठी. जनाय–यजमानासाठी. राष्ट्रसेवकाच्यासाठी. समदम्–संग्राम. कृणोमि–करते. द्यावापृथिवी–आकाश आणि भूमी. आविवेश–अंतर्यामीच्या रुपाने प्रवेश करते.

जेव्हा जेव्हा राष्ट्राच्या व्यापक विश्वभावनेला अनुसरून परोपकाराची कामे होत असतात तेव्हा त्या राष्ट्राचा नाश करण्यासाठी शत्रू पण उभे रहातात. या प्रकारच्या स्वार्थी व विश्वभावनेचा द्वेष करणाऱ्या शत्रूंचा संहार करण्यासाठी मी स्वतःच रुद्राप्रमाणे कल्याणकार्य करणारांना प्रेरणा देऊन धनुष्य सज्ज करून शत्रूंचा संहार करते या प्रमाणे सेवाभावी कार्यकर्त्या सेवकांना मीच युद्धसंग्रामास पाठवते. खरे म्हणजे माझी विश्वभावना सर्व व्यापक अंतर्यामी रुपाने आकाशापासून पाताळापर्यंत सर्व व्यापून राहिलेली आहे.

अहं सुवे पितरमस्य मूर्धन्। मम योनिरप्स्वन्तः समुद्रे।
ततो वि तिष्ठे भुवनानु विश्वा। उतामूं द्यां वर्ष्मणोप स्पृशामि॥

अस्य–या राष्ट्राच्या. मूर्धन–मस्तक. पितरम्–पितारुप आकाशाला. सुवे–जन्म देते. अप्सु–जलाच्या. तन्मात्रात समुद्रे अन्तः। कारणरुप समुद्राच्या आत. मम योनिः–माझे उत्पत्ती स्थान. ततः–त्यामुळे भुवना विश्वा–सर्व भुवनात. अनु–प्रवेश करून. वितिष्ठे–रहाते. उत अमुं द्याम–शिवाय त्या आकाशास. वर्ष्मणा–कारण देहाने. उपस्पृशामि–स्पर्श करते.

राष्ट्रात व्यापक विश्वभावना जागवण्याचे मुख्य कारण एकच आहे. ते म्हणजे या सर्व विश्वपदार्थांचे मूळ उत्पत्ती स्थान एकच महासागर आहे. अर्थात देश प्रदेशाच्या विभागाप्रमाणे सागराची वेगवेगळी नावे असली तरी त्याचे पाणी सगळीकडे सारखेच आहे. त्याप्रमाणे राष्ट्रे वेगवेगळी दिसली तरी त्यांच्या मुळाशी स्वाभाविक असणारी ऐक्यभावना जोपासल्यास सर्व राष्ट्रे एक विश्वरुप होतात. या सर्व राष्ट्रांचे शिरछत्र–आधार, उत्तमांग मस्तकासारखे जे आकाश, त्या आकाश पित्यालाही मी स्वतःच विश्वभावनेला अनुसरून निर्माण करीत आहे. एकाच मातापित्याची संताने ज्या प्रमाणे भावंडे, मित्र होऊन एकमेकांचे रक्षण करतात त्याच विश्वभावनेच्या मूळ कारणामुळे विश्वातील सर्व प्राणी टिकून रहात आहेत. राष्ट्राच्या विश्वरुप देहाने ही राष्ट्रशक्ति उंच आकाशाला जाऊन भिडते व सकळ विश्व व्यापून रहाते.

अहमेव वात इव प्रवामि। आरभमाणा भुवनानि विश्वा।
परा दिवा पर एना पृथिव्या। एतावती महिना संबभूव॥८॥

विश्वा भुवनानि–सर्व लोकाना आरभमाणा–आरंभ करणारी. वात इव–वायु प्रमाणे. अहम् एव–मी स्वतः प्रवामि–प्रवृत्त होते. दिवा पर–आकाशाच्या पलिकडे. एना पृथिव्या–या पृथ्वीच्या वर, महिना–पृथ्वीतून एतावती–एवढ्या परिणामी संबभूव–झाले आहे.

राष्ट्रा राष्ट्रांना विश्वभावनेचे अनुदान देणारी मी स्वत: राष्ट्रशक्ति विश्वातील सर्व पदार्थांच्या विविध प्रवृत्तीचा प्रारंभ करणारी मीच आहे. स्वयंप्रेरित वायु ज्याप्रमाणे विहार करतो त्या प्रमाणे मी स्वत: स्वयंसंचालित प्रवृत्ति होऊन सगळीकडे पोचते. याप्रमाणे माझ्या स्वयंभू सहज प्रेरणा शक्तीचा मूल स्त्रोत हाच परमकारण रुप व्यापक परमात्मा आहे. जो स्वत: आकाश व पृथ्वी यांच्या पर आहे. मी राष्ट्रशक्ति विश्व भावनेच्या प्रेरणेचा प्रसार करते तो त्या मूळ कारणाऱ्याच चेतनेचा व प्रेरणेचा महिमा आहे. अर्थात राष्ट्र शक्तीच्या रुपाने मी प्रत्यक्ष कार्य करते परंतु त्याचे मूळ कारण राष्ट्रा राष्ट्रात मित्रभावना जागवणारे ते परम तत्वच आहे. त्याच्या छत्र छायेखाली सकल विश्व एका घरट्यात रहाणाऱ्या पक्षा प्रमाणे सुरक्षित रहाते.

## श्रद्धा सूक्त

(दहावे मंडल. सूक्त १५१. ऋचा ५ ऋषि श्रद्धा. देव श्रद्धा छंद अनुष्टुप)

भगवद् गीतेत (१७–३) म्हटल्या प्रमाणे श्रद्धा हीच मानवाची खरी संपत्ति आणि मूळ संभूति आहे. जशी ज्याची श्रद्धा तशी त्याची सिद्धी. श्रद्धा श्रत्-सत्य व धा–धारण कर. अशी दोन पदे आहेत. अर्थात मूळ सत्याला अनुसरुन जे जीवन जगतात ते श्रद्धा–पुरुष सफलता प्राप्त करून घेतात. या सूक्ताच्या ऋषि श्रद्धा कामायनी, जीवनाच्या भावना रुपाने आपल्या अंतरात श्रद्धेची ज्योत जागवून आपल्या जीवनाला सिद्धीचे दान देतात.

श्रद्धयाग्नि: समिध्यते श्रद्धया हूयते हवि: ।
श्रद्धां भगस्य मूर्धनि वचना वेदयामसि ॥१॥

श्रद्धया: जीवनातील अभिलाषेचा एक प्रकार. तिच्या आधारे अग्नि समिध्यते-अग्नि प्रज्वलित होतो. हवि: हूयते–हुत द्रव्य देवांना दिले जाते. भगस्य–भाग्याचा मूर्धनि–मस्तकातील वचसा–शद्बानी वेदयामसि–आम्ही जाहीर करतो.

खरोखरीच या श्रद्धेमुळे, विश्वासामुळे जड, वाळक्या काटक्यात अग्नि प्रगटतो व प्रतिदिन प्रज्वलित होतो. बाकी जडाचा व चेतनाचा एरवी संबंधच काय ? श्रद्धा जागते तेव्हाच यजमान देवांच्यासाठी हवि देतो. बाकी अग्नित टाकले तर ते जळून त्याचा नाश होईल असा अविश्वास मनात असल्यास काय होईल ? खरोखरीच आपल्या सर्वांच्या भाग्याच्या शिरीही श्रद्धाच आहे. स्तुतिवचनात आपल्याला तिचे दर्शन होते व आपण ते इतरांपुढे प्रगट करतो. (जाहीर करतो)

प्रियं श्रद्धे ददत: प्रियं श्रद्धे दिदासत: ।
प्रियं भोजेषु यज्वस्विदं म उदितं कृधि ॥ २ ॥

श्रद्धे-श्रद्धेच्या देवतेस संबोधन ददतः – हविचे दान करणाऱ्या यजमानाचे प्रियम्-प्रिय (इच्छा-प्रेय-कल्याण) दिदसतः-दान देण्याची इच्छा असणाऱ्या यजमागाचे भोजेषु-कर्माप्रमाणे फळ भोगणाऱ्यांच्यात यज्वसु-यज्ञादि परोपकाराची कामे करणाऱ्या यजमानात इदं मे-माझे उदितम् सांगितलेले कृधि– करा.

हे श्रद्धारूप देवी, जी श्रद्धाशील माणसे परोपकाराची कामे करण्यासाठी धन साधनाचे दान देतात, त्यांची प्रिय कामे तुम्ही करावी. जी माणसे केल्या कर्माची फळे चांगल्या प्रकारे भोगतात व जे चांगल्या कामांच्या द्वारा दान देण्याची इच्छा करतात त्यांचे तुम्ही प्रिय करा. यज्ञयागादि चागली कामे करणारांचे तुम्ही भले करा. हे देवी तुमच्या विषयीचे माझे श्रद्धायुक्त वचन तुम्हाला प्रिय वाटो.

यथा देवा असुरेषु श्रद्धामुग्रेषु चक्रिरे ।
एवं भोजेषु यज्वस्वस्माकमुदितं कृधि ॥ ३ ॥

यथा–ज्याप्रमाणे देवा–इन्द्र वगैरे देव उग्रेषु असुरेषु–उग्र स्वभावच्या असुरात. श्रद्धा चक्रिरे–श्रद्धा ठेवतात. एवम् अस्माकम्–त्याप्रमाणे आमचे.

ज्याप्रमाणे इन्द्रादि देव उग्र स्वभावाच्या असुरांच्या विषयी स्वतःच्या मनात दृढ श्रद्धा ठेवतात की 'या क्रूर असुरांना रणसंग्रामात आम्ही निश्चित मारू' त्याच प्रमाणे कर्माप्रमाणे फळ भोगणारे व परोपकारी कामे करणारे सफल होतात या प्रकारच्या आमच्या श्रद्धायुक्त वचनांना तुम्ही प्रिय माना (ती खरी करा.)

श्रद्धां देवा यजमाना वायुगोपा उपासते ।
श्रद्धां हृदयाकूत्या श्रद्धया विन्दते वसु ॥ ४ ॥

देवाः–देक यजमानाः–परोपकारी कामे करणारी माणसे. वायु गोपा–वायुला रक्षक बनवून स्वतःचे रक्षण करून घेणारे. श्रद्धाम् उपासते श्रद्धेला देवी मानून उपासना करणारे. हृदय्या–आकूत्या–हृदयाच्या संकल्प रुप भावनेने. विन्दते मिळवतात वसु–धन.

दिव्य परोपकारी कामे करणारे देव ज्याप्रमाणे श्रद्धेची उपासना करतात, त्या देवांचे रक्षण अंतर्यामी वायु मातरिश्वा करतो. त्या अंतर्यामी वायुचे रक्षण जे मिळवतात व यज्ञादि परोपकाराची कामे करतात ते मानव श्रद्धा देवीची स्तुति प्रार्थना करतात. दयाळू माणसे हृदयातील भावनांच्या सहकार्याने श्रद्धेचे जतन करतात व त्या श्रद्धेच्या बळावर माणसे धन, साधन वगैरे लाभ प्राप्त करुन घेतात.

श्रद्धां प्रातर्हवामहे श्रद्धा मध्यंदिनं परि ।
श्रद्धां सूर्यस्य निम्रुचि श्रद्धे श्रद्धापयेह नः ॥ ५ ॥

प्रातः-पहाटे हवामहे बोलावतो. मध्यंदिनं परि-दुपारच्या वेळी सूर्यस्य निम्नुचि-सूर्य मावळण्याच्या वेळी श्रद्धापय इह नः आम्हाला या कर्मावर श्रध्दा ठेवणारे करा.

ज्याप्रमाणे सोमयागी सकाळ संध्याकाळ सोमाचे सवन करतात, ज्याप्रमाणे अग्निहोत्री सकाळी, दुपारी व संध्याकाळी त्रिकाल संध्या करतात. त्याचप्रमाणे परोपकारी कामे करू इच्छिणारी आम्ही श्रध्दाशील माणसे पण आमच्या हृदयोची भावना पोषणाऱ्या श्रध्देला सकाळी आवाहन करतो. दुपारी आवाहन करतो आणि त्याच श्रध्देस सूर्य मावळण्याच्या वेळीही आवाहन करतो. हे श्रध्दा देवी, आमची सर्व कार्ये विश्वासपूर्वक करीत रहाण्यासाठी आमच्या हृदयात दृढ श्रध्दा असो.

## अघमर्षण सूक्त

(दहावे मंडल : सूक्त १९०, ऋचा ३, ऋषिः अघमर्षण मधुच्छंदाचा पुत्र. देवः भाववृत्त, छंदः अनुष्टप).

भगवद्गीतेत (१८,५) सांगितले आहे, 'यज्ञ, दान व तप ही तीन कर्मे त्यजू नयेत. कारण ती कर्मे मानवास शुद्ध करून परोपकारास जोडतात.' या सूक्तात उत्तम तप करून प्रजापतीने सत्वगुण निर्माण केले व त्यांच्या द्वारे संवत्सर काल, सूर्य, चंद्र, आकाश तसेच पृथ्वी व अंतरिक्ष असे त्रैलोक्य निर्माण केले-त्यांचे वर्णन केलेले आहे. या ऋचातून सृष्टि सर्जनाच्या प्रारंभ काळाचे वास्तविक दर्शन होते. आत्मज्ञानी या दर्शनाने ऋत, सदाचार व सत्वगुण प्राप्त करून घेऊन जीवनात ते प्रगट करतात. त्यामुळे पाप-अघ मर्षण-दूर होते हे सूक्त संध्येच्या नित्यपाठात आहे.

ऋतं च सत्यं चाभीदधात् तपसो ऽध्यजायत ।
ततो रात्र्यजायत ततः समुद्रा अर्णवः ॥ १ ॥

अभिदधात्-अभितप्त चारी प्रकारच्या तपाच्या आचरणाने तप्त तपस्य-सृष्टीच्या कारणाचे निरीक्षण करण्याच्या धीराने ऋतम-सदाचार व सत्यं-सत्य व सदाचार दोन्ही अध्यजायत-प्रगट झाले आहेत. ततः-म्हणून रात्री अजायत-रात्री सारखा अव्यक्त काल निर्माण झाला. अर्णवः समुद्रः-तरंग जल असलेला सागर.

ब्रह्म परमात्मा, जो स्वयं प्रकाशमान आहे त्याने प्रजापति रूपाने सुरुवातीस निरीक्षण केले व 'मला सृष्टीचे सर्जन करावयाचे आहे' या भावनेने त्याने उग्र

तप केले. त्याच्या प्रतापाने ऋत-सदाचार व सत्य या दोन्ही गुणांची निर्मिती झाली. त्यामुळेच रात्रीसारखा अव्यक्त काळ व तरल समुद्रासारख्या जगताचे कारणरुप असे अव्यक्तरुप प्रगट झाले आहे

समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत ।
अहोरात्राणि विदधत् विश्वस्य मिषतो वशी ॥ २ ॥

अर्णवात् समुद्रात-अव्यक्त कारण स्वरुपाने. संवत्सरः-व्यक्त वर्ष. अजायत-झाले आहे. अहोरात्राणि-दिवस आणि रात्र. विदधत्-बनविले. मिषतः-क्षणाने विश्वस्य-विश्वाचा. वशी-वश करणारा स्वामी.

परब्रह्म परमात्मा जो स्वयंप्रकाशी आहे तो विश्वातील सर्व पदार्थाचा व पळ, कला, घटका, वार, पक्ष, मास, वर्ष वगैरे कालाचा स्वामी आहे. याप्रमाणे प्रजापतीने अव्यक्त समुद्रासारख्या कारणातून व्यक्त वर्ष-काल प्रगट केला आहे तसे रात्र-दिवस याप्रमाणे गणना करून वर्षाची रचना केली आहे.

सूर्याचंद्र मसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।
दिवं च पृथिवी चान्तरिक्षमथो स्वः ॥ ३ ॥

धाता-आदि प्रजापतीने. यथापूर्वम्-पूर्वी सृष्टी होती त्याप्रमाणे. सूर्याचंद्र मसौ-सूर्य चंद्र वगैरे दिव्य पदार्थापासून आरंभ करून. अकल्पयत्-संकल्प करून निर्माण केले. अथ आणि स्वःदिवम्-सुख देणाऱ्या आकाशाला.

परब्रह्म परमात्मा स्वयंप्रकाशी आहे. त्यानेच आदि प्रजापती रुपाने या युगातील सृष्टीचे सृजन केले. ज्यात सूर्य व चंद्र दोन्ही प्रारंभीचे पदार्थ असून आविनाशी आहेत. त्याच प्रमाणे धात्याने पृथ्वी, अंतरिक्ष व सुखदायक असे आकाश निर्माण केले आहे.

## संज्ञान : राष्ट्र-हित दर्शविणारे सूक्त

(दहावे मंडल सूक्त १९१. ऋचा ४. ऋषी : संवनन. देव संज्ञान. छंद अनुष्टुप)

ऋग्वेद संहितेचे हे शेवटचे सूक्त आहे. पहिल्या सूक्तात अग्निची स्तुती केली होती. तो अग्नि स्वतः एका राष्ट्राला वसवण्यास समर्थ, उत्तम रत्न आहे. शिवाय नीतिमंजरीमध्ये बंधु-मित्रराज्य, मेधा-विवेक शक्ति, यश, ब्रह्म-विशाल मन, वेद, खाणीतील रत्न, भग-भाग्य आणि ऋत-सत्य ही राष्ट्राच्या धारणेची रत्ने आहेत असे म्हटले आहेत. राष्ट्राला या नवरत्नांची प्राप्ति अग्नि सारख्या प्रतापी व तेजस्वी राष्ट्र पुरुषाद्वारा होते. म्हणून पहिल्या ऋचेत त्या राष्ट्रपुरुषाची, अग्निची

स्तुति करून राष्ट्रातील सर्वांना खेळीमेळीने, एकीने रहाण्याचा उपदेश केला आहे. आणि शेवटच्या ऋचेत साक्षात वेदमातेने प्रजाजनांना शुभाशिर्वाद दिलेले आहेत.

या संज्ञान सूक्तात राष्ट्राचे उत्तम संविधान दाखवलेले आहे. या संविधानाच्या पालनाने राष्ट्राचे सर्व प्रकारे उत्तम हित साधता येण्यासारखे आहे.

संषमिद् युवसे वृषन्नग्ने विश्वान्यर्य आ।
इळस्पदे समिध्यसे स नो वसून्याभर ॥१॥

वृषन्-कामना पूर्ण करणारा अग्ने-अग्रणी अर्य-श्रेष्ठ. संसम् इत्-सर्व बाजूनी. विश्वानी-सर्व प्राण्याना युवसे-एकत्र करतात. इळस्पदे-वाणीच्या स्थानी शोभणारा समिध्यसे-वाढता सः ते नः आमचे वसूनि-वसवण्यास योग्य आ भर-आणा.

नित्य निरंतर प्रज्वलित झालेला अग्नि ज्या प्रमाणे यजमानाची सर्व कामना पूर्ण करतो त्याच प्रमाणे प्रजाजनांकडून आदर सत्कार पावलेला राष्ट्राचा अग्रणी नेता सर्व प्रकारे श्रेष्ठ असून प्रजाजनांच्या सर्व कामना तो पूर्ण करतो. त्याशिवाय तो प्रजाजनांची योग्य स्थानी नियुक्ति करतो. त्या राष्ट्रपुरुषाची प्रार्थना करताना सुरुवातीच्या ऋचेत म्हटले आहे, हे वृषन्, अग्नि, हे प्रशंसक, वाणीस्थानी शोभणाऱ्या राष्ट्र पुरुषा, तुम्ही सर्वश्रेष्ठ आहात. तुम्ही नित्य निरंतर विकसित रहा. आम्ही तुमची स्तुति करीत आहो. तुम्ही आमच्यासाठी नवरत्ने घेऊन या.

संगच्छध्वम् सं वदध्वम् सं वो मनांसि जानताम् ।
देवा भागं यथापूर्वे संजानाना उपासते ॥२॥

संगच्छध्वम्-तुम्ही सर्व एकत्र या. संवदध्वम् एक वाणी उच्चारा. व मनासि संजानाताम्-तुमची मने एकाच प्रकारचा बोध मिळवोत. यथा पूर्वे-ज्या प्रमाणे पूर्वीच्या काळी भागम्-आपआपला भाग. संजानाना बोध प्राप्त करून घेणारा उपासते-जतन करतात. उपासना करतात.

स्तुति प्रार्थनेने प्रसन्न झालेल्या राष्ट्र पुरुषाने, एकमेकांशी सख्य व संगनमत करून राष्ट्र संघटन करण्यासाठी आपल्याकडे आलेल्या प्रजाजनांना आदर्श संविधानाची रूपरेषा आखून देताना सांगितले.

'हे राष्ट्राच्या हितचिंतक प्रजाजनांनो तुम्ही सर्व मिळून, संघ रचून परस्परांची कार्ये करीत रहा. तुम्ही सर्वांनी सभा-समिती रचून एकमताने प्रस्तावांचा उच्चार करावा. त्याच प्रमाणे परस्परांच्या मनोभावात ऐक्य आणून मनातील शिवसंकल्पांचा निर्णय घ्यावा. या संदर्भात मी तुम्हाला

पूर्वीच्या काळी देवांनी रचलेल्या संविधानाची आठवण करून देतो. त्यांनीही याच प्रमाणे (ऐक्याच्या मार्गाने) उत्तम ज्ञान संज्ञान मिळवून दिव्य राष्ट्राचे संगोपन केले होते.

समानो मंत्रः समितिः समानी समानं मनः सह चित्तमेषाम् ।
समानं मंत्रमभि मंत्रये वः समानेन वो हविषा जुहोमि ॥ ३ ॥

समानः मंत्रः– सारखी मंत्रणा–विचारणा. समानी समितिः– सारखी विषय विचारिणी समानं मनः–संघटनेसाठी सारख्या–एका विचाराची मने. एषाम्–या जनांच्या चित्तम्–बुद्धिची चेतना. अभिमंत्रये–मी मंत्रणेला संमत मानतो. वः– तुमच्या. समानेन हविषा–सारख्या हुत द्रव्यांनी जुहोमि–होम करतो.

जेव्हा राष्ट्राचे प्रजानन परस्पर भेटून, एकत्र जमून विचार विनिमय करतात, मंत्रणा केल्यानंतर सर्व संमतीने विषय विचारिणी समितीची रचना करतात, त्या समितीत सावधान चित्ताने सारखे मनन करून बुद्धिपूर्वक राष्ट्राच्या हिताच्या गोष्टीचा विचार करतात तेव्हा त्यांचा अग्रणी राष्ट्रपुरुष प्रजाजनांशी एकमत होऊन राष्ट्रहिताची विचारणा करून, त्या प्रजाजनांच्या कडून समान धन– साधनांचा, हवि द्रव्यांचा स्वीकार करून राष्ट्रहिताची, परोपकाराची कामे करतो.

समानी व आकूतिः समाना हृदयानि वः ।
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥ ४ ॥

वः–तुमची. आकूतिः–भावना. अभिप्राय. हृदयानि–हृदये. अंतःकरणे. सुसह असति–उत्तम हिता सहित–'साहित्य' असोत.

राष्ट्राचे संविधान रचून विश्वाची उत्तम कार्ये करणाऱ्या राष्ट्रपुरुषाला व त्या राष्ट्राच्या प्रजाजनांना ऋग्वेद संहितेच्या या अंतिम ऋचेत सहित–हिताबरोबर 'साहित्या'ची भावना ठेवून संहितेच्या रूपाने वेदमातेने शुभाशिर्वाद देताना म्हटले आहे,

हे राष्ट्र पुरुष, आणि प्रजाजनांनो, तुम्हा सर्वांचे अभिप्राय व तुमचे संकल्प सारख्या प्रकारे, सर्वांचे हित करणारे असोत. तसेच तुम्हा सर्वांची हृदये परस्परा- विषयीची सख्य भावनेचे जतन करोत. तुम्ही सर्व प्रजाजन अन्य राष्ट्रांच्या प्रजाज- नांच्यासह, एकत्र बसून हितकारी–'साहित्य' गोष्टी कराव्या त्या योगाने त्यांच्याशी पण तुमची मने जोडली जावोत. एकरुप होवोत.

## श्रमाचे स्तोत्र. श्रम हीच श्री ! ऐतरेय ब्राह्मण

राजकुमार रोहिताला अरण्याच्या मार्गावर देवराज इंद्र वृद्ध ब्राह्मणाच्या वेषाने भेटले तेव्हा त्यांनी राजकुमाराला श्रमांचा महिमा वर्णन करताना सांगितले,

'नाना श्रान्ताय श्रीरस्ति' इति रोहित शुश्रुम।

पापो नृषद्-वरा जन इन्द्र इत् चरतः सखा, चरैवेति ॥ १ ॥

खरोखरीच कोणत्याही प्रकारे श्रम न करणाराला श्री कधी लाभत नाही. हे रोहिता, जो श्रम करतो त्यालाच श्री मिळते, असे आम्ही ऐकले आहे. इतर सव प्रकारे माणूस कितीही श्रेष्ठ असला तरी तो जर श्रम करीत नसेल तर तो माणसात निंद्य नृषद्–म्हणजे तुच्छ पामर, पापरुप आहे. श्रेष्ठ परमेश्वर जो इन्द्र तोही नेहमी हिंडत्या फिरत्या, काम करत्या माणसाशीच सख्य करतो. बसून राहणाऱ्या आळशाशी नाही. म्हणून सांगतो तू हिंडत रहा. चालत रहा.

पुष्पिण्यौ चरतो जङ्घे भूष्णुरात्मा फलग्रहिः।

शेते अस्य सर्वे पाप्मानः श्रमेण प्रपथे हतः, चरैवेति ॥ २ ॥

वृक्ष जसा मोठा होऊन फळाफुलांनी शोभतो तसा हिंडता फिरता माणूस, त्याचे पाय हृष्टपुष्ट होतात. त्याचा मध्य–देह–आत्मा विकसित होतो. त्याला आरोग्यरुपी फल प्राप्त होते. श्रम करणाऱ्या माणसाची सर्व पापे मार्गावर चालता चालता श्रमामुळे नाश पावतात व गळून पडतात. म्हणून हे कुमार तू चालत रहा.

आस्ते भग आसीनस्य ऊर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः।

शेते निपद्यमानस्य चरेति चरतो भगः चरैवेति ॥ ३ ॥

जो आसीन असतो, बसून रहातो त्याचे भग–भाग्यही बसून रहाते. जो आळस टाकून उद्योगासाठी उद्युक्त होतो, त्याचे भाग्यही त्याच्याबरोबर उठून उभे रहाते. कामकाज केल्याशिवाय जो गादीवर लोळत राहतो, त्याचे भाग्यही झोपून जाते व जो देशोदेशी यात्रा करीत हिंडतो, फिरतो त्याचे भाग्यही दिवसें-दिवस वृद्धिगत होते. म्हणून तू चालत रहा. फिरत रहा.

कलिः शयाना भवति संजिहानस्तु द्वापरः।

उत्तिष्ठन् त्रेता भवति कृतं संपद्यते चरत्–चरैवेति ॥ ४ ॥

कलि, द्वापर, त्रेता आणि सत्य ही जशी चार युगे आहेत, त्याप्रमाणे माणसाच्या जीवनातही चार युगे आहेत. जो झोपून रहातो त्याचा काळ झोपेतच निघून जातो. त्यामुळे कलियुगाप्रमाणे त्याचा पापांचा संग्रह साठत जातो. जो झोपेतून उठतो पण घर सोडून बाहेर निघत नाही, त्याच्या जीवनाचे द्वापर युग सुरू होते. पाप व पुण्य समसमान होते. बाहेर पडण्यासाठी तयार झालेल्या माणसाचे त्रेता युग उगवते. पुण्याचे तीन भाग व पापाचा एकच भाग उरतो व जो कामासाठी बाहेर पडतो चालतो, श्रम करतो त्याच्या पावलोपावली कृतयुग निर्माण होते. केलेल्या पुण्यांचे फल (कृत) त्याला प्राप्त होते. म्हणून सांगतो, तू फिरत रहा.

चरन् वै मधु विन्दति चरन् स्वादुम् उदुम्बरम् ।
सूर्यस्य पश्य श्रेमाणं यो न तन्द्रयते चरन्, चरैवेति ।

निरंतर हिंडत फिरत रहातो त्याला मधासारखी मधुर फळे लाभतात. स्वादिष्ट उंबराच्या फळासारखी श्रमाची फळे मिळत रहातात. हे कुमार, या सूर्याच्या सौभाग्यश्रीचा महिमा पहा तर खरा ! हा सूर्य विशाल आकाशात सतत भ्रमण करतो. क्षणाचाही आळस तो कधी करीत नाही. श्रम आणि श्री यांचा सूर्य हा प्रत्यक्ष जिवता जागता नमुना आहे. त्यावरून बोध घे आणि चालत रहा. चालत रहा. (ऐत. ३३,३,१४)

। ॐ स्वस्ति श्री ।



---